योगीश्वर ग्रंथमाला, पुष्प चौथें

# ऋग्रत्न भाण्डार

अर्थात्

## (लघु-ऋग्वेद)

रामचंद्र गोविंद कोलंगडे

'योगीश्वर याज्ञवल्क्य' 'याज्ञवल्क्य-दर्शन'
'शुक्लयजुर्मणिमाला' 'भगवान गौतम
बुद्ध', इत्यादि ग्रंथांचे
कर्ते.

ऋचो अक्षरे परमे व्योमन्यस्मिन्देवा अधिविश्वे निषेदुः ।
यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते ॥
ऋग्वेद १-१६४-३९



शके. १८७३ }
सन १९५१ }

मुंबई.

{ किंमत १० रुपये.

# उपोद्घात

यावत् स्थास्यन्ति गिरयः सरितश्च महीतले।
तावत् ऋग्वेदमहिमा लोकेषु प्रचरिष्यति
सायणाचार्य.

पुण्य व पावनशील गंगोत्रीचें पवित्र नांव निदान ऐकून तरी ठाऊक नाहीं, असा अभागी प्राणी आज महाराष्ट्रांत कोण आहे? अखिल मानव-जातीचें पाप व दुरित हरण करणाऱ्या दिव्य गंगामाईचें प्रत्यक्ष माहेरघरच तें! त्या स्वर्गीय गंगेची साक्षात् जन्मभूमि! मग कोण नाहीं त्या पूज्य व पावनकारक पुण्य तीर्थाचें डोळे भरून दर्शन घेण्यास उत्सुक होणार! जो तो हिंदू त्या मंगलधामाचा भावभक्तिपूर्वक नाममहिमा गात असतो हें खरें. आणि हें खरें असलें तरी मौज ही कीं त्या पवित्र व पावनकारक आणि म्हणून श्रेष्ठ व पुण्यकारक अशा त्या मंगल महातीर्थाची प्रत्यक्ष अशी ओळख आज किती जणास आहे? त्या मंगलधामाचें पवित्र-दर्शन प्रत्यक्ष घेण्याचें सद्भाग्य किती जणांच्या नशिबीं आलें आहे! याचें कारण काय, तर त्या पुण्यप्रद स्थानाची निर्जनता व दुर्गमता! स्थान जितकें पवित्र तितकें गांठण्यास मोठें दुर्गम! प्रसर्गी प्राणावर बेतलें तरी बेतलेंच! मग अशा कठीण व अवघड स्थानाकडे—प्रत्यक्ष त्याचें महात्म्य कांहीं जरी आणि किती जरी असलें तरी—सामान्य माणसाला तेथें जाऊन आपल्या डोळ्यांचें पारणें फेडून कृतकृत्य होण्याची बुद्धि क्वचितच होत असल्यास त्यांत नवल तें काय!

अशीच गोष्ट—तंतोतंत अशीच गोष्ट—या आमच्या वेदासंबंधानें झाली तरी आहे, असें म्हटल्यास त्यांत बिघडलें तें कोठें! या वेदमाउलीविषयीं आम्हां भारतीयांची पूज्य बुद्धि, पवित्र भावना, योग्य अभिमान, अद्याप जागृत आहे, ही गोष्ट सर्वस्वी खरी! पण खेदाची गोष्ट ही कीं अशा

प्राचीन, पवित्र व प्रभावी वेदग्रंथाची ओळख आज आमच्यांत किती जणास आहे ! सबंध महाराष्ट्र धुंडाळून पाहिला तरी खरे वेदभक्त व वेदार्थज्ञ हाताच्या बोटावर मोजण्याइतके तरी सांपडतील कीं काय, हें श्रीहरिच जाणें ! वेदासारखें दिव्य नि तेजस्वी ज्ञानभांडार डोळ्याआड होऊन विस्मृतीच्या अगाध उदरांत गडप होण्याच्या पंथास लागावें, हा खरोखर दैवदुर्विलास नव्हे काय ? असो. आतां झालें तें होऊन गेलें. त्याविषयीं अधिक चर्चा करण्यांत अर्थ नाहीं.

मात्र आम्हांस आतां स्पष्ट सांगावेसें वाटतें कीं वेदमाउलीकडे पुन: वळण्याचा, तिचें दर्शन घेणेचा, तिला कौल लावणेचा पर्वकाल भारताला आतां पुनः लाभला आहे. तेव्हां दोन हजार वर्षांचें आलस्य झाडून, भ्रामक व विपरीत समजुतीला मूठमाती देऊन, श्रुतिमाउलीचें पवित्र दर्शन घेतल्यास भारताचें गतवैभव व सुवर्णयुग पाहण्याचें सद्भाग्य त्यास खरोखर पुनः लाभेल, ही आशा खात्रीनें निरर्थक ठरणार नाहीं, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. भारताचा खरा उद्धार व खरा उत्कर्ष हा अनुभवपुष्ट भारतीय अष्टपैलू संस्कृतीवरच सर्वस्वी अवलंबून असून, त्या संस्कृतीचें मूलपीठ हें वेदग्रंथाच्या दिव्य अंतरंगांत गर्भित आहे. हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट असूनहि आम्हांस तें अद्याप दिसत नाहीं व दिसू नये, हें आश्चर्य तर खरेंच, पण त्याबरोबरच दुर्दैवहि नव्हे काय ! 'अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती । नाहीं श्रुति परौति । माउली गा ॥' अशी वेदमहती श्रीज्ञानराजांनीं आपल्या दिव्य ज्ञानेश्वरींत अर्थपूर्ण व गौरवपूर्वक गाइली आहे. त्याची आम्हांस आठवण न होणें म्हणजे भारतीयांचें नष्टचर्य अजून संपलें नाहीं, असाच त्याचा सरळ अर्थ होय.

तेव्हां भारतराष्ट्राच्या उत्कर्षार्थ व विश्वशांतीच्या प्रसारार्थ उदार नि उदात्त अशा तेजस्वी भारत संस्कृतीचें यावच्छक्य पुनरुज्जीवन करून तिला उजळा देऊन पुन: प्रभावी करावयाची तर वेदग्रंथांची ओळख, अभ्यास व प्रसार अवश्यमेव झालाच पाहिजे, याविषयीं विचारवंत भारतीयांत दुमत होणें शक्यच नाहीं. याचें कारण असें कीं वेदाची शिकवण म्हणजे वाघिणीचें दूध ! रोगनाशक व पुष्टिवर्धक अशी दिव्यौषधि !

व्यक्तीला व राष्ट्राला तेजःपुंज व निर्भय करणारें असें स्वर्गीय अमृत! इष्ट मनोरथ पूर्ण करणारा कल्पवृक्ष! जो त्या दिव्य ज्ञानामृताचे घुटके घेईल, तो सिंहाचा छावा बनलाच पाहिजे! आणि मार्गेपुढें केव्हांतरी मानव कोटींतून उत्क्रांत पावून, अखेर देवकोटींत जाऊन विराजमान झालाच पाहिजे!

आणि कां नाहीं होणार? 'वीर्यं वै कर्म' ही ज्याची शिकवण, 'अभयं वै ब्रह्म' हा ज्याचा महामंत्र, ' इदं सर्वं यदयमात्मा ' हा ज्याचा घंटाघोष व ' अहं ब्रह्मास्मि ' ही ज्याची फलश्रुति, अशा विश्वमंगल तेजस्वी महाग्रंथाचें-यज्ञप्रकृति वेदनारायणाचें—परम श्रेयःस्वरूप ज्ञानदेवाचें-शुभमंगल दर्शन झाल्यावर मग कोण नाहीं धन्य होणार! नि कोण नाहीं कृतकृत्य होणार? लोखंडाला परिसाचा दिव्य स्पर्श झाला म्हणजे त्याचें सुंदर सुवर्ण बनत नाहीं काय? सूर्याचा उदय झाल्यावर अंधकार पळून जात नाहीं काय! अमृत पोटांत गेल्यावर मृत्यूचे हातपाय गारठून लुले पडत नाहींत काय? मग झालें तर. ज्यावर वेदनारायणाची कृपादृष्टि वळली तो मानव नरशार्दूलहि होईल आणि मार्गेपुढें 'नरा' चा 'नारायणहि' बनेल! यांत शंका कसली नि आश्चर्य कसलें! वेदज्ञानाचा तो दिव्य महिमाच आहे. असा वैभवशाली प्राचीन भारतीयांचा तेजस्वी इतिहास कंठरवानें सर्व जगाला जाहीर करीत आहे. आणि हें ज्यांना कळत नाहीं व पटत नाहीं ते कपाळकरंटेच खरे!!

या स्वतंत्र भारतांत पौरुषाचें नवचैतन्य पुनः तेजाळावयाचें तर अखिल मानवकोटीच्या अघाडीवर असलेल्या आमच्या प्राचीन आर्य ऋषींच्या विश्वमंगल व तेजस्वी अशा ज्ञानभास्करांचें पवित्र दर्शन पुनः घेण्याची ही आतां वेळच आली आहे. जगांत खरी शांति नांदून मानवकुलाचा उद्धार व उत्कर्ष साधावयाचें सामर्थ्य जर कोठें असेल तर तें फक्त या सनातन धर्माच्या विशाल व दिव्य संस्कृतींतच आहे, हें ठांसून सांगावयास मग भ्यावयाचें काय नि कोणाला! विश्वशांतीची मायकूस म्हणजे ही आर्य संस्कृति! क्षणोक्षणीं पालटणाऱ्या चंचल नि अस्थिर राजकीय तत्त्वज्ञानानें किंवा देहतर्पणाच्या नादीं लागलेल्या जडमूढ पक्षोपक्षांच्या गलबल्यानें

मुळींच साधणार नाहीं. मानव कुटुंबांत शाश्वत शांति व विश्वबंधुत्व नांदण्याचा हा मार्गच नव्हे! राष्ट्रीय मत्सर, वर्णद्वेष, वर्गकलह, समाजविघटणा, लष्करी चुरस, आसुरी महत्त्वाकांक्षा, स्वार्थसाधुपणा इत्यादि दुष्ट मनोविकार पोसण्याचे व वाढविण्याचे हे आसुरी आखाडे आहेत! यांतून शांतिसमाधानाची व सुखानंदाची आशा करणें म्हणजे निंबापासून आंब्याची आशा करण्यासारखेंच आहे!!

आम्ही सत्यसत्य सांगतों कीं, अखिल विश्वाकडे आत्मीय दृष्टीनें पाहणाऱ्या व पाहण्यास शिकवणाऱ्या उदार भारतीय संस्कृतीच्या प्राप्त परिस्थित्यनुरूप पुनरुज्जीवनानेंच हें कार्य साधूं शकेल; म्हणून उदयोन्मुख नवभारतास आमच्या प्राचीन, पवित्र व प्रभावी ज्ञानदेवाचें ओझरतें मंगल दर्शन करवून त्याच्या ज्ञानदीपावर आलेली अज्ञानाची काजळी झाडून, तो पुन्हा सतेज व प्रफुल्ल करावा, या उद्देशानें आम्हीं या गृहभूषण ग्रंथमालेचा उपक्रम करून, त्यांतील हें 'ऋग्रत्नभांडार' नांवाचें चौथें सुंदर व सुमंगल पुष्प महाराष्ट्रास सादर करीत आहों. ही आमची अल्प व नम्र सेवा सूज्ञ, उदार नि भाविक महाराष्ट्र थोर मनानें गोड मानून घेईल, तर आमच्या श्रमाचें सार्थक झालें असें समजून आम्हांस पुढील मार्ग आक्रमण करण्यास धीर व उत्साह येईल ही आशा प्रदर्शित करून, आतां प्रस्तुत विषयाकडे वळतों.

ऋग्वेद ग्रंथाविषयीं आधुनिक वाचकवर्ग हा बहुतेक अनभिज्ञ असल्यामुळें तत्संबंधीं त्याला उपयुक्त व मार्गदर्शक अशी कांहीं ऐतिहासिक व शास्त्रीय माहिती देणें हें जरूर असल्यामुळें त्याचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करूं इच्छितों. वेद हे पौरुषेय कां अपौरुषेय या वादग्रस्त प्रश्नाच्या भानगडींत न शिरतां इतकें मात्र आम्ही छातिठोकपणें सांगू शकतों कीं, जागतिक वाङ्मयाच्या इतिहासांत त्यांचें स्थान सर्वांत उच्च व अग्रभागीं आहे! ते जितके प्राचीन आहेत, तितकेच तेजस्वी आहेत! ते ज्ञानगर्भ असून मानव बुद्धीला सतत चैतन्य देणारे आहेत! या पृथ्वीवर आज जितके म्हणून धर्म नांदत आहेत त्या सर्वांना प्रकाश प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष या दिव्य ग्रंथांतूनच मिळाला आहे, ही गोष्ट जगांतील समतोल दृष्टीच्या सर्व धर्म-अभ्यासूकांना

कळून व मान्य होऊन चुकली आहे. अतएव सायणाचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें ऋग्वेदासारखे महनीय ग्रंथ हे यावच्चंद्रदिवाकरौ अमरकीर्ति आहेत, हें भारतीयांनीं विसरण्याचें पाप करूं नये! असो.

## वेदाचा उद्देश

वेद केव्हां झाले याचा मानव बुद्धीला पत्ता लागत नाहीं व आतापर्यंत लागला नाहीं व पुढें केव्हांहि लागण्यासारखा नाहीं. म्हणून त्यांना अनादि असें म्हणण्यांत येतें. ते प्रथम अव्यक्त रूपांत होते. त्यांचें दर्शन ज्या महापुरुषांना—पुण्यपुरुषांना-प्रथम झालें व ज्यांनीं तें जगाला उच्चारून जाहीर केलें, त्यांना ऋषि असें म्हणण्यांत येतें. 'यस्य वाक्यं स ऋषिः'-ज्यानें मंत्र उच्चारून जगाला कळविला, तो त्या मंत्राचा ऋषि होय आणि ज्याला उद्देशून तो मंत्र म्हटला गेला ती त्या मंत्राची देवता. 'या तेनोच्यते सा देवता' असा मंत्रांतील 'देवता' शब्दाचा अर्थ समजला जातो. वेद म्हणजे ज्ञान असा त्याचा सर्वसाधारण अर्थ असला तरी देवताविषयक ज्ञान असा त्याचा पारिभाषिक अर्थ आहे. वेदांत जें ज्ञान आहे, तें मुख्यत्वें करून अलौकिक, आधिदैविक व अध्यात्मिक असें सूक्ष्म व गूढ ज्ञान आहे. पण म्हणून त्यांत जागतिक ज्ञान नाहीं, असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. तें आनुषंगानें त्यांत आहेच आहे. पण त्यासाठीं त्याचा अवतार नसून अलौकिक ज्ञान-पारलौकिक ज्ञान—सांगण्यासाठीं त्याचा अवतार आहे, हा सांगण्याचा भाव.

मनुष्याला आपले इष्ट मनोरथ साधण्यासाठीं परमेश्वरानें त्याला बुद्धीची दिव्य देणगी देऊन ठेविली आहे. तिचा जीवनक्रमांत यथेच्छ उपयोग करून, इष्टसिद्धि व अनिष्टपरिहार साधावा असा परमेश्वरी उद्देश असून, त्याप्रमाणें मनुष्यानें त्या बुद्धीचा प्रपंचांत भरपूर व कसून उपयोग करून घेऊन आपला कार्यभाग उरकून घ्यावा, असा ईशसंकेत आहे. पण जेव्हां व जेथें त्या बुद्धीचें कांहीं चालत नाहीं—ती जेथें थकते व हातपाय टेकते—तेथेंच व तेव्हांच वेदाकडे धांव मारून, श्रद्धेच्या जोरावर त्यांतील आदेशानुसार वागून आपली कार्यसिद्धि करून घ्यावी, हा त्याचा उद्देश आहे.

भाष्यकारांनीं ही गोष्ट पुढील वचनांत स्पष्ट नमूद करून ठेविली आहे. 'प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुध्यते, एनं विदन्ति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ॥' प्रत्यक्ष अगर अनुमानानें मनुष्याला जो उपाय सुचत नाहीं तो वेदानें सूचित केला जातो म्हणून वेदाची वेदता होय अशी सायणाचार्यांनीं ऋग्वेदभाष्यांत वेद शब्दाची व्याख्या केली आहे.

त्यावरून हें उघड होतें कीं प्रत्यक्ष उपाय जेथें बुद्धीला दिसतो अगर तर्कानें त्याचें आकलन करण्यांत येतें, तेथें वेदाला कौल लावण्याचें कारण नाहीं. तेथें बुद्धीची मात्राच चालविली पाहिजे आणि ती मात्राच तेथें प्रभावी ठरते. हीच गोष्ट विद्यारण्यांनीं देखील जरा निराळ्या शब्दांत सांगितली आहे. वेद शब्दाची व्याख्या त्यांनीं दिली आहे ती अशी:– 'इष्ट प्राप्त्यनिष्टपरिहारयोरलौकिकमुपायं यो ग्रन्थो वेदयति स वेदः' इष्टप्राप्ति व अनिष्ट परिहार .ह्यांविषयीं अलौकिक उपाय-लौकिक नव्हे–दैवी उपाय –पौरुषेय नव्हे-सुचवून अगर दाखवून देणारा जो ग्रंथ त्यास वेद असें म्हणतात. यावरून देखील पौरुषेय मार्गानें–मानवी बुद्धिसामर्थ्यानें–ज्या गोष्टी साध्य होण्यासारख्या आहेत त्याबद्दल वेदाकडे धांव मारण्याची गरज नाहीं, असा भावार्थ वरील वचनांतून ध्वनित होतो.

अर्थात् जेथें व जेव्हां मनुष्याचे सर्व लौकिक उपाय थकतात, प्रयत्न फसतात, आणि बुद्धि कुंठित होते, तेथेंच व तेव्हांच या दिव्य व अलौकिक ग्रंथाचें साहाय्य घेणें हें इष्ट व युक्त असून, त्याप्रमाणें प्राचीन आर्यांनीं–वेदोपासकांनीं–तें तसें घेऊन श्रद्धाभक्तीच्या जोरावर आपलें ऐहिक व पारलौकिक सुख व हित-उत्कर्ष व उद्धार–साध्य करून घेतले होते, हें इतिहास-पुराणांवरून अगदीं स्पष्ट होतें. यावरून हें उघड होतें कीं वेद ग्रंथाचा उद्देश म्हणा अगर प्रांत म्हणा, तो लौकिक नसून अलौकिक व पारलौकिक आहे. एकंदरींत काय तर वेदग्रंथाची शिकवण मनुष्यमात्रास अडल्या वेळीं योग्य मार्गदर्शक असून, ती उत्कर्षक व मंगलकारक आहे, याविषयीं आतां अधिक सांगणें नको.

## वेदाचें मूळ स्वरूप

प्राचीन भारतीय आर्यांचें पवित्र ज्ञानभांडार ज्या ग्रंथांत समाविष्ट

झालें आहे, त्यास वेद असें म्हणतात. हा जो वेद तो प्रथमारंभीं मुळांत एकच एक ( एको वेदः ) असा होता. पण तो कर्तव्यपरत्वें चतुर्विध (चतुष्पादः) असा होता. ही चतुर्विधता म्हणजे ऋक्, यजुः, साम व अथर्व या मंत्रांची असून, ती सरमिसळ अशी एकच रास होती. त्या राशीलाच वेद अशी संज्ञा प्राप्त झाली. ही स्थिति कृतयुगापासून जवळ जवळ द्वापर-अखेरपर्यंत चालू होती.

द्वापरच्या अखेर ही स्थिति पालटली. लोक अल्पवीर्य बनत चालले ( 'अल्पवीर्या द्विजातयः' ब्रह्मांड पु. ३४-३ ) अर्थात् त्याबरोबरच त्यांचें आयुर्मानहि घटत चाललें. ( 'तस्य मानं युगवशादल्पं चैव दृश्यते' ब्रह्मांड पु. ३४-४ ). याप्रमाणें लोक दुर्बल व अल्पायु बनत चालल्यामुळें वेदाध्ययन पूर्वीप्रमाणें प्रचारांत राहणें हें साहजिकच दुर्घट होत चाललें आणि यामुळें वेदनाश होतो कीं काय अशी भीति उत्पन्न होऊन, तत्कालीन वेदोपासकांना मोठी चिंता उत्पन्न झाली. कारण वेदनाश म्हणजे यज्ञनाश, आणि यज्ञनाश म्हणजे सर्वनाश ! आणि मार्गेपुढें असा प्रसंग ओढवण्याचा रंग दिसूं लागला.

या आपत्तीला आळा घालावा, यज्ञसंस्था सुसूत्र व सुरळीत चालावी व एतदर्थ वेदाध्ययन सुगम व सुलभ व्हावें, म्हणून दिव्यदृष्टि वेदव्यासांनीं त्या सम्मिश्र वेदराशींतून ऋक्, यजुः, साम व अथर्व मंत्र निरनिराळे वेंचून काढून सवर्गीय मंत्र एकत्र करून त्यांच्या संहिता केल्या. हा इतिहास भागवतांत वर्णिला आहे तो असा :—पराशरात्सत्यवत्यामंशांशकलया विभुः । अवतीर्णो महाभाग वेदं चक्रे चतुर्विधम् ॥ ४९ ॥ ऋगथर्वयजुः साम्नां राशीनुद्धृत्य वर्गशः। चतस्रः संहिताश्चक्रे मन्त्रैर्मणिगणा इव ॥५०॥ ( भागवत स्कंध १२, अ.६, ४९-५० ) याप्रमाणें त्या वेदराशींच्या चार संहिता केल्यावर त्यांतील एकेक संहिता एकेका शिष्यास अशी चार शिष्यांस वांटून दिली. त्यांपैकीं ऋक् संहिता ही पैल ऋषींच्या पदरांत पडली. ( 'तासां च चतुरः शिष्यानुपाहूय महामतिः । एकैकां संहितां ब्रह्मन्नेकैकस्मै ददौ विभुः ॥५१ ॥ पैलाय संहितामाद्यां बह्वृचाख्यामुवाच ह । वैशंपायनसंज्ञाय निगदाख्यं यजुर्गणम् ॥ ५२॥ भागवत स्कंध, १२, अ.६, ५१-५२)

आणि ही व्यवस्था यज्ञकार्यार्थ करण्यांत आली. ही गोष्ट ' व्यदधाद्यज्ञसंतत्यै वेदमेकं चतुर्विधम्' या वचनावरून स्पष्ट होतें. तेव्हां लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं मुळांत वेद हा एकच असून, पुढें म्हणजे द्वापराच्या अंतभागीं त्या एका वेदाच्या चार संहिता करून त्या चार शिष्यांस देऊन यज्ञांतील पौरोहित कार्य सुलभ व सुगम करण्यांत आलें. पण हा इतिहास पाश्चात्य पंडितांना अवगत नसल्यामुळें त्यांनीं ऋग्वेद हा स्वतंत्र वेद मानून, त्याला इतर वेदांपासून निराळें केलें व त्याचा एक स्वतंत्र कालखंड कल्पून त्या दृष्टीनें त्याचें परीक्षण व निरीक्षण करण्याचा पायंडा घातला व तोच आमच्या आधुनिक आंग्लविद्याविभूषित भारतीय पंडितांनीं सत्य समजून त्या धोरणानें तेहि चालू लागले आहेत. पण ही कल्पना चुकीची आहे, असा भारतीय इतिहास स्पष्ट सांगत आहे.

## ऋग्वेदशाखा-विस्तार

वेदव्यासांनीं वेदराशींतून ऋचांची निवड करून तिची संहिता बनविली. ती आज ऋग्वेद या नांवानें ओळखली जाते. ही संहिता त्यांनीं पैल ऋषींस दिली, असें वर सांगण्यात आलें आहे. त्या पैल ऋषींनीं त्या संहितेचे दोन भाग करून इंद्रप्रमती व बाष्कल या दोन शिष्यांस ती पढविली. ऋचो गृहीत्वा पैलस्तु व्यभजत्तु द्विधा पुनः ॥ २४ ॥ द्वे कृत्वा संहिते चैव शिष्याभ्यामददाद्विभुः॥ इंद्रप्रमतये चैकां द्वितीयां बाष्कलाय च ॥२५॥ (ब्रह्मांड पुराण,अ.३४,२४-२५)पुढें बाष्कलांनीं त्याचे चार प्रकार करून ते आपल्या चार शिष्यांस दिले.व पुढें इंद्रप्रमतीच्या शिष्यपरंपरेंतील देवमित्र शाकल्यांनीं आपल्या मतानुसार मूळ संहितेचे पांच प्रकार करून ते त्यांनीं आपल्या शिष्यांस पढविले. पतंजल काळीं या ऋग्वेदाच्या एकंदर एकवीस शाखा झाल्या होत्या असें 'एकविंशतिधा बाह्वृच्यम्' या त्यांच्या वचनावरून स्पष्ट होतें. या एकवीस शाखांचा समावेश मुख्य पांच गटांत करण्यांत आला असून तो पुढील प्रमाणें चरणव्यूहांत देण्यांत आला आहे. तें वचन आहे तें असें- 'एतेषां शाखा पंचविधा भवन्ति। शाकलाः। बाष्कलाः। आश्वलायनाः। शांखायनाः। माण्डूकेयाश्चेति ॥ या एकवीस पोट शाखांचे मिळून मुख्य पांच गट झाले असून त्यांचीं नांवें अनुक्रमें शाकल, बाष्कल, आश्वलायन, शांखायन, माण्डूकेय अशीं आहेत.

पुढें वेदमित्र शाकल्यानें आपल्या संहितेच्या ज्या पांच पोटशाखा पाडल्या, त्याची हकीकत वायुपुराणांत देण्यांत आली आहे ती अशीः—
वेदमित्रस्तु शाकल्यो महात्मा द्विजसत्तमः । चकार संहिता पञ्च बुद्धिमान् पदवित्तमः ॥ ६३ ॥ तच्छिष्याऽभवन् पञ्च मुद्गलो गोलकस्तथा । खालीयश्च तथा मत्स्यः शैशरेयस्तु पञ्चमः ॥ ६४ ॥ ( वायु. पु. अ. ३० ६३-६४ ) बुद्धिमान व पदज्ञ असा महात्मा जो वेदमित्र शाकल्य, त्यानें ऋग्वेदाच्या पांच संहिता करून त्या अनुक्रमे मुद्गल, गोलक, खालीय, मत्स्य, व शैशरेय अशा पांच शिष्यांस वांटून दिल्या. असाच उल्लेख विष्णुपुराणांतहि पण आढळतो. मात्र फरक हा कीं वायुपुराणांतील 'मत्स्यः याबद्दल येथें 'वात्स्यः' 'गोलकाः' बद्दल 'गोमुखः' 'खालीयाः' बद्दल 'शालीयाः' व 'शैशरेयाः' बद्दल 'शरीरः' हा शब्द आढळतो. याचप्रमाणें बाष्कलनेंहि ऋग्वेदाच्या चार संहिता करून त्या अनुक्रमें 'बोध्य' 'अग्निमाठर' 'पाराशर' व याज्ञवल्क्य ( हे योगीश्वर याज्ञवल्क्य नव्हेत ) यांस दिल्या. ( ब्रह्म. पु. ३४, २६-२७ ) याप्रमाणें शाकल्याच्या पांच व बाष्कलाच्या चार असे मिळून एकंदर ऋग्वेदाच्या नऊ मुख्य शाखा झाल्या आहेत. प्रस्तुतचा आमचा जो ऋग्वेद आहे तो शाकल्य-पाठाचा असून, त्यावरच सायणाचार्यांचें 'वेदार्थ प्रकाश' नांवाचें सुप्रसिद्ध महाभाष्य आहे. ऋग्वेद शाखेचा हा असा थोडक्यांत इतिहास आहे.

## ऋग्वेदाची ग्रंथपत्ति

ऋग्वेद हा ग्रंथ समग्र सूक्तबद्ध व छंदोबद्ध म्हणजे पद्यमय असून, तो चिरेबंदी वाड्याप्रमाणें इतका व्यवस्थित व बंदिस्त आहे कीं तेथें कोठें म्हणून कोठेंसुद्धां इतरांना हस्तक्षेप करून ढवळाढवळ करण्यास मुळींसुद्धां वाव नाहीं. शौनकाचार्यांनीं बारकाईनें या ग्रंथाची मोजदाद करून, त्याची नीट ताळेबंदी करून ठेविली असल्यामुळें तेथें आतां उलाढाल करण्याला कोणाला संधि म्हणून राहिली नाहीं. त्यांची ती अचूक पद व अक्षरगणति पाहून आधुनिकांना एक मोठी नवलाईच वाटण्यासारखी असल्यामुळें त्याचा उल्लेख आम्ही येथें थोडक्यांत करीत आहों. ऋग्वेदांत एकंदर पदें किती

आहेत याबद्दल त्यांनीं लिहून ठेविलें आहे तें असें—'शाकाल्यदृष्टे पदलक्षमेकं सार्धंच वेद त्रिसहस्रयुक्तम् । शतानि चाष्टौ दशकं द्वयं च षट् चेति ह चर्चितानि ॥ ४५ ॥ शाकल्योक्त ऋक्संहितेंत एक लक्ष त्रेपन्न हजार आठशें सव्वीस पदें आहेत. आणि ऋचांची संख्या दिली आहे ती अशी—'ऋचां दशसहस्राणि ऋचां पंचशतानि च । ऋचामशीतिः पादश्च पारणं संप्रकीर्तितम् ॥ ४३ ॥' शाकलसंहितेंत ऋचांची संख्या एकंदर दहा हजार पांचशें ऐंशी इतकी भरते. आणि गंमत ही कीं एवढ्यावरच त्यांचें समाधान न होतां पुढें अक्षरांचीसुद्धां मोजदाद करून त्याची देखील नोंद करून ठेविली आहे ती अशीः—'चत्वारिंशत् सहस्राणि द्वात्रिंशच्चाक्षरसहस्राणि' म्हणजे तेथें जी अक्षरसंख्या आहे ती चार लक्ष बत्तीस हजारच भरते.

शिवाय ऋग्वेदाची बांधणी अध्यायवारी व मंडलवारी अशा द्विविध पद्धतीनें करण्यांत आली असून, त्यांचीहि संख्या सुनिश्चित करण्यास ते चुकले नाहींत. सर्वानुक्रमणीमध्यें शौनकाचार्यांनीं त्यांचा हिशोब दिला आहे, तो असाः– 'अध्यायानां चतुःषष्टिर्मण्डलानि दशैव तु । वर्गाणां तु सहस्रे द्वे संख्याते च षळुत्तरे ॥ ३८ ॥ सहस्रमेतत्सूक्तानां निश्चितं खैलकैर्विना । दश सप्त च पठ्यन्ते संख्यातं वै पदक्रमम् ॥ ३९ ॥ ऋक् संहितेंत एकंदर चौसष्ट अध्याय, दहा मंडळें, दोन हजार सहा वर्ग व दहाशें सतरा सूक्तें असून त्यांत खिलांचा समावेश करण्यांत आला नाहीं. आठव्या मंडळांत हीं खैलिक सूक्तें येत असून, त्यांचे अठरा वर्ग व अकरा सूक्तें अशी संख्या भरते. आणि हीं वरील संख्येंत मिळविलीं म्हणजे २०२४ वर्ग व १०२८ सूक्तें अशी एकंदर संख्या भरते. आणि हें सर्व नीट व्यवस्थितपणें सांगावयाचें झालें तर शाकल्योक्त ऋग्वेद संहितेंत ६४ अध्याय, २०२४ वर्ग १० मंडळें, १०२८ सूक्तें, १०५८० ऋचा, १५३८२६ पदें व ४३२००० अक्षरें असून, तीं सर्व या महाग्रंथाची दिव्य दौलत पाहिली म्हणजे कोणास साश्चर्यानंद वाटणार नाहीं ! इतक्या व्यवस्थित रीतीनें, शब्द नि शब्द आणि अक्षर नि अक्षर अचूक मोजदाद करून आजपर्यंत सुरक्षित जतन करून ठेविलेला असा हा प्राचीन, सुंदर, विशाल व ज्ञानगर्भ महाग्रंथ जगांतील वाङ्मय-इतिहासांत हा एवढा एकच आहे !!

## मंत्रज्ञान

वेदग्रंथ हे अलौकिक ग्रंथ असून त्यांचा प्रांत व विषय हे आधिदैविक व आध्यात्मिक आहेत. म्हणून व्यावहारिक नियमापासून त्यांची अध्ययन पद्धत कांहीं अंशी निराळी आहे. मंत्रातील भाषा प्राकृत भाषेहून भिन्न व दुर्बोध असली तरी ती अर्थपूर्ण आहे. म्हणून जो मंत्र तोंडानें म्हणावयाचा त्याचा अर्थ बुद्धीनें आकलन केल्याशिवाय नुसत्या अक्षरोच्चारानें मंत्रांतील मर्म समजत नाहीं आणि मर्म न समजलें,—त्याचा आशय न समजला—तर यथोचित कर्म घडत नाहीं. व कर्म न घडलें तर मंत्र प्रभावी होऊन इष्ट मनोरथ सिद्धीस जात नाहीं, हें मग निराळें सांगावयास पाहिजे कीं काय !

आतां येथें मंत्रज्ञान म्हणजे अक्षरज्ञान नव्हे, तर अर्थज्ञान; वेदमंत्र स्फुरण पावून फलद्रूप होण्यास त्या मंत्राचा अर्थ म्हणजे मर्म व रहस्य अंतःकरणांत स्पष्ट प्रतिबिंबित होणें अपरिहार्य आहे. ज्या देवाला प्रसन्न करून घेऊन तद्द्वारां आपले इष्ट मनोरथ प्राप्त करून घ्यावयाचे त्या देवाला स्वरूपतः व स्वभावतः ओळखिलें नाहीं तर तो देव तरी आपणांस कसा ओळखणार ! म्हणून मंत्रार्थ समजून मंत्रोच्चार करणें याचेंच नांव वेदाध्ययन, 'ऋचो ह यो वेद स वेद देवान्'—ज्याला ऋचांचें अर्थज्ञान झालें तोच वैदिक देवांना ओळखतो—असें बृहद्देवतेंत स्पष्ट म्हटलें आहे. प्रत्यक्ष ऋग्वेदांतहि हेंच सांगितलें आहे. 'ऋचे अक्षरे परमे व्योमन् यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः। यस्तन्नवेद किमृचा करिष्यति ॥ (ऋ १-१६४-३९) अत्युच्च अशा स्वर्गाप्रमाणें असणाऱ्या वेदमंत्रांच्या अक्षरांत देव वास करून आहेत. तर असें जें वेदमंत्राक्षर तें ज्याला अर्थरूपानें समजलें नाहीं त्याला ऋचा काय करणार आहेत ? ज्यांनीं तें अक्षरगत तत्त्व ओळखिलें ते ज्ञानीच पूर्ण सुखी व कृतकृत्य होतात.

आणि ही गोष्ट डोळ्यांपुढें ठेवूनच यास्काचार्यांनीं आपल्या निरुक्तांत स्पष्ट म्हटलें कीं 'स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् । योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥—(नि. अ. १ सू. १८) जो वेदाचें अध्ययन करून त्याचा अर्थ मात्र जाणत नाहीं तो खरोखर

भारवाहक खांबाप्रमाणें आहे. जो त्याचा अर्थ जाणतो, त्याचेंच कल्याण होतें व तोच ज्ञानानें सर्व पापांचा नाश करून निष्पाप होत्साता स्वर्गास जातो. एवंच सांगावयाचें तात्पर्य काय तर वेदाध्यन हें सार्थच झालें पाहिजे. तरच त्याचें नांव वेदाध्ययन!.

पण बुद्धोत्तर काळीं-वैदिक आर्यांच्या अवनत काळीं-तेजस्वी यज्ञसंस्थेच्या र्‍हासकाळीं–हा मनु पालटून देवोपासनेला निराळीच कलाटणी मिळाली. म्हणजे वैदिक देवोपासना बंद पडून त्याची जागा अवतारोपासनेनें घेतली. इंद्र, अग्नि व वरुण या देवांना छाट मिळून त्यांची जागा रामकृष्णादिक पुराणपुरुषांनीं बळकावली. वेदाभ्यासाला ओहटी लागून तेथें पुराणग्रंथाची सरशी झाली. अर्थात् श्रौतोपासना बंद पडली व त्याची जागा स्मार्तोपासनेनें पटकावली. याचा परिणाम असा झाला कीं वेदाध्ययन पद्धतीचे दोन गट निर्माण झाले. एक यज्ञोपासक-मीमांसक-गट व दुसरा स्मार्तोपासक-मूर्तिपूजक गट असे दोन गट बनून, त्यांच्या त्यांच्यांत वेदाध्ययनाबद्दल मदभेद उत्पन्न होऊन मीमांसक हे 'अध्ययन सार्थाक्षरग्रहणमिति' या मताचे व दुसरे म्हणजे मूर्तिपूजक हे 'अध्ययनं च अक्षरमात्रपाठः या मताचे पुरस्कर्ते बनले. अर्थात् आधुनिक वैदिक व भटभिक्षुक हे अर्थज्ञान शून्य वेद-पठणाचे पुरस्कर्ते व अभिमानी आहेत. याज्ञवल्क्यांनीं शतपथांत 'यो अश्वमेधं न वेद सोऽब्राह्मणः' जो अश्वमेध जाणत नाहीं तो अब्राह्मण होय, या वचनांची या दुसऱ्या गटाला पूर्ण विस्मृति पडली आणि त्याचें प्रायश्चित्त आजच्या पोपटपंची भटाभिक्षुकांना भोगणें प्राप्त झालें आहे! पण आज परिस्थिति बदलल्यामुळें व लोकांत जागृति होऊन ज्ञानलालसा वाढल्यामुळें वेदार्थ समजून घेण्याची बुद्धि व प्रवृत्ति हिंदू समाजांत दिवसेंदिवस वाढत चालली आहे, हें एकापरी सुचिन्हच असून, ती ज्ञानलालसा सुपूर्त करण्याची संधि आतां पुनः प्राप्त झाली आहे व तें कर्तव्य बजावण्याची जबाबदारी वेदाभिमानी उदारमनस्क विद्वानांवर येऊन पडत असून, तें कार्य योगीश्वर ग्रंथमालेनें यथाशक्ति व यथामति पूर्ण करण्याचें अंगीकृत केलें आहे. तें कितपत तडीस गेलें आहे, हें ज्याचें त्यानेंच ठरवावें, म्हणजे झालें. असो.

## दैवतज्ञान

वेदमंत्र सुफलदायी बनण्याकरतां आणखी कांहीं आनुषंगिक गोष्टींकडे नजर देणें हेंहि आवश्यक आहे. केवळ मंत्राचा अर्थ समजून घेऊन भागत नाहीं. कारण प्रत्येक वेदमंत्र ऋषि, देवता, छंद व विनियोग यांनीं युक्त असून, त्यांचेंहि त्या मंत्राबरोबरच यथार्थ ज्ञान असणें व त्या मंत्राबरोबरच त्यांचाहि उच्चार करणें जरूर आहे. त्याशिवाय मंत्रोच्चार शास्त्रोक्त झाला असें म्हणतां येत नाहीं. आणि मंत्र शास्त्रोक्त म्हटल्याशिवाय तो प्रभावी होत नाहीं. हा असा मंत्रशास्त्राचा नियम आहे, 'यो ह वा अविदितार्षेयच्छन्दोदैवतब्राह्मणेन याजयति वा अध्यापयति वा स्थाणुं वर्च्छति गर्तं वा पद्यति ॥' (१ १). असें तांड्य आर्षेयब्राह्मणांत म्हटलें असून, त्याचा भावार्थ असा कीं जो वेद मंत्राचा ऋषि, छंद, दैवत व ब्राह्मण म्हणजे विनियोग न जाणतां फक्त मंत्र पठणानेंच यज्ञयागादि करतो अथवा वेद शिकवितो तो जणु कांहीं खांबाला टक्करच मारतो अथवा खड्यांत घसरून पडतो ! या विषयीं बृहद्देवतेंत एक वचन आढळतें तें असें ! 'नहि कश्चिदविज्ञाय यथातथ्येन दैवतम् । लौक्यानां वा वैदिकांना कर्मणां फलमश्नुते' (१-४) ज्याला मंत्रांतील देवतांचें यथार्थ ज्ञान नाहीं त्याला लौकिक अगर वैदिक कर्मांचें फल मिळत नाहीं. याचें कारण असें कीं जो मंत्राची देवता जाणून यजन कर्म करतो, त्याचेंच हविरन्न ती ती देवता ग्रहण करते. अन्यथा त्यानें दिलेला हविर्भाग ती देवता ग्रहण करीत नाहीं. म्हणून म्हटलें आहे की, 'मंत्राणां देवताविद्यः प्रयुङ्क्ते कर्म कर्हिचित् । जुषन्ते देवतास्तस्य हविर्न देवाताऽविदः ॥ ( बृहद्देवता ८-१३१ )

नुसत्या देवताज्ञानावरच हें भागण्यासारखें नाहीं. तर त्या मंत्राचा द्रष्टा ऋषि व छंद यांचेंहि ज्ञान त्याबरोबरच आवश्यक आहे. 'नियमोऽयं जपे होमे ऋषिश्छन्दोऽथ दैवतम् । अन्यथा चेत्प्रयुञ्जानस्तत्फलाच्चात्र हीयते ॥ ( बृ. ८-१३४ ). वेदपठणाचा असा हा नियमच होऊन बसला आहे कीं जपहोमांत त्या त्या मंत्राचा ऋषि, छंद व दैवत यांचा यथार्थ विनियोग करणें. आणि जर कोणी त्याचा अन्यथा उपयोग करील त्याला त्या कर्माचें फल मिळणार नाहीं. इतकेंच नव्हे तर तसें करणारा पापी होतो.

(८-१३६). अतएव ज्याला मंत्रद्वारा आपलें कल्याण करून घेणें आहे, त्यानें त्या मंत्राचा ऋषि, छंद व दैवत यांचें सम्यग् ज्ञान जरूर करून घेतलें पाहिजे. आणि इकडे दुर्लक्ष करून जो मंत्राचा उच्चार करील त्याचें तें कर्म फुकट जाऊन शिवाय वर पाप मात्र पदरीं पडतें, असा मंत्रशास्त्राचा इशारा आहे.

ऋषीचें ज्ञान म्हणजे ऋषीचें नामपात्र ज्ञान नव्हे. तर त्या ऋषीचें संपूर्ण चरित्र, त्याचा स्वभाव, गुण व महिमा यांचें ज्ञान, दैवतज्ञान म्हणजे नाममात्र ज्ञान नसून त्या देवतांचें स्वरूप, स्वभाव व गुणधर्म यांचें ज्ञान व छंदज्ञान म्हणजे त्या छंदाची शास्त्रोक्त माहिती असा अर्थ येथें अभिप्रेत आहे. 'अर्थज्ञानमृषिज्ञानं भूयिष्ठमुपकारकम्' या वचनाकडे वेदाभ्यासूचें लक्ष जाईल तर काय सोनें होईल ! एकंदरींत काय तर वेद-मंत्र उच्चारतांना प्रथम त्याचा ऋषि, मग देवता व छंद उच्चारून, नंतर मंत्रपठणास सुरवात करावी, हा सांगण्याचा भावार्थ. (बृ. ८-१३८)

हें सर्व झालें तरी तेवढ्यावर सर्व कांहीं भागलें असें होत नाहीं. तर तो मंत्र उच्चारणाराहि कांहीं विशिष्ट गुणांनीं युक्त असावा लागतो. सर्वांनाच मत्रोच्चाराचा सरास अधिकार नाहीं. त्यालाहि नियम आहेत. मंत्र कोणीं कसा उच्चारावा, याबद्दल बृहद्देवतेंत सांगितलें आहे तें असें:-- 'योगेन दाक्षेन दमेन बुध्द्या बाहुश्रुत्येन तपसा नियोगैः। उपास्यास्ताः कृत्स्नशो देवता या, ऋचो ह यो वेद स वेद देवान्। यजूंषि यो वेद स वेद यज्ञान् सामानि यो वेद स वेद तत्त्वम् ॥ (८-१३०). देवतांची उपासना एकाग्रचित्तानें, निरलसपणानें, इंद्रियनिग्रहानें, ज्ञानपूर्वक, बहुश्रुत-पणानें, तपानें, व नियोगानें करावी. जो ऋचा जाणतो तो देवांना जाणतो, जो यजुर्वेद जाणतो तो यज्ञकर्म जाणतो आणि ज्याला सामवेद समजला, त्यालाच तत्त्व काय तें समजलें. यावरून प्राचीन, वैदिक ऋषींचें वेदकालीन पुरोहितांचें, ज्ञान किती सखोल, किती व्यापक, किती भरीव नि किती अगाध होतें, याची कल्पना करतां येतें.

## मंत्रपठणपद्धति.

येथें आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे कीं वेदपठण हें सर्वांस सर्वांसच उक्त नाहीं. याचें कारण असें कीं वेदपठण करणाऱ्यांत कांहीं विशिष्ट गुण असावे लागतात. ते जर नसतील तर तो द्विज असूनहि मंत्रपठणास योग्य नाहीं ! मंत्रपठण करणारा कसा असावा याबद्दल याज्ञवल्क्य शिक्षेंत हा पुढील श्लोक आहे:—'प्रकृतिर्यस्य कल्याणी दन्तौष्ठौ यस्य शोभनौ । प्रगल्भश्च विनीतश्च स वर्णान्वक्तुमर्हति ॥ (या. शि. २७). ज्याची प्रकृति निरोगी व सदृढ आहे, ज्याचे दांत शुभ्र व स्वच्छ आहेत, ज्याचे ओंठ सुंदर आहेत, आवाज गोड आहे व मन निग्रही आहे असा मनुष्यच वर्णोच्चार म्हणजे मंत्रोच्चार करण्यास अधिकारी आहे.

आतां तो अधिकार कोणाला नाहीं हें या पुढील वचनांत सांगण्यांत आलें आहे. 'न करालो न लंबोष्ठो नाव्यक्तो नानुनाशिकः । गद्गदो बद्धजिह्वश्च न वर्णान्वक्तुमर्हति ॥' जो दंतरोगी आहे, ज्याचे ओंठ जाड आहेत, ज्याचे उच्चार अस्पष्ट आहेत, जो नाकांतून बोलतो, जो तोतरा आहे, ज्याची जीभ जड आहे, अशाला मंत्रोच्चार करण्याचा अधिकार नाहीं. शिवाय वेदमंत्र म्हणतांना अक्षरांत, अगर उच्चारांत अगर स्वराघातांत चूक होऊन उपयोगी नाहीं. आणि झाली तर काय अनर्थ घडतो हें पुढील वचनांत सांगितलें आहे. 'मंत्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह । स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेंद्रशत्रुः स्वरतोपराधात्॥ मंत्र हा स्वरहीन अगर वर्णहीन म्हटल्यानें अगर त्याचा चुकीचा प्रयोग केल्यानें तो योग्य अर्थबोधक होत नाहीं. असा चुकून म्हटलेला मंत्र वज्र होऊन यजमानाचा घात करतो. म्हणून मंत्रपठण योग्य रीतीनें करावें व मंत्रोच्चार विधिवत् करावा असा नियम आहे.

### ऋग्वेदाचे भाष्यकार

वेद जितके प्राचीन तितकेच ते दुर्बोध आहेत. पण सुदैवाची गोष्ट ही कीं कांहीं विद्वान पंडितांनीं व आचार्यांनीं अत्यंत परिश्रम घेऊन त्याचा अर्थ सुगम करण्यासाठीं त्यावर विस्तृत भाष्यें लिहून जगावर फार मोठे

उपकार करून ठेविले आहेत. त्यांचीं भाष्यें नसतीं तर वेदज्ञानास आज जग खास मुकलें असतें. या ऋग्वेदावर आतांपर्यंत अनेक भाष्यकार झाले असून त्यांपैकी जुन्यांतले जुने भाष्यकार यास्काचार्यांनंतरचे म्हणजे स्कंद-स्वामी हे होत. हे बलभीदेशांतले असून त्यांच्या पित्याचें नांव भर्तृध्रुव असें होतें. 'बलभीविनिवास्येतामृगर्थागमसंहृतम् । भर्तृध्रुवसुतश्चक्रे स्कंदस्वामी यथामति ॥' असा शेरा प्रथमाष्टकाच्या पहिल्या अध्यायाच्या शेवटीं मारण्यांत आला आहे. यांचा काल निश्चित असा मिळत नसला तरी अनुमानानें ठरविण्यास एक आधार उपलब्ध झाला असून, तो म्हणजे शतपथाचे भाष्यकार हरिस्वामी, हा होय. हे हरिस्वामी स्कंदस्वामीचे आपणास शिष्य म्हणवीत असून, त्यांनीं तें शतपथभाष्य कलियुग ३१४० मध्यें म्हणजे इ. स. ६३९ मध्यें लिहिलें असें म्हटलें आहे. यावरून त्यांचा काल इ. स. ६०० च्या सुमारास धरण्यास हरकत नाहीं. स्कंदस्वामीचें हें भाष्य ऋग्वेदभाष्य' या नांवानें प्रसिद्ध आहे.

यानंतर नांव घेण्यासारखे दुसरे भाष्यकार म्हणजे वेंकटार्यतनय माधवभट्ट हे होत. यांची 'ऋगर्थदीपिका' या नांवाची संपूर्ण टीका असून, ती अलीकडे पंजाबचे संस्कृत प्रो. श्री. लक्ष्मण स्वरूप यांनीं संपादन करून छापून प्रसिद्ध केली आहे. 'श्री वेंकटार्यतनयो व्याचिकीर्षति माधवः । ऋक्संहितामस्य देवः प्रसीदतु विनायकः ॥' असा त्यांच्याविषयीं उल्लेख सांपडतो. हे माधवभट्ट चोल देशांतील कावेरी तटाकीं असलेल्या गोमत गांवचे रहिवासी असावेत. बहुशः हा गांव म्हणजे त्रिचिनापल्ली जिल्ह्यांतील तिरवाडुथुराय असावा. कारण येथें देवळांत जो देव आहे त्याचें नांव 'गोमतीश्वर' असें आहे. त्यांचा काल ११००–१२०० च्या दरम्यानचा असावा असें आज अनुमान करण्यांत येतें. सायणाचार्यांनी आपल्या भाष्यांत ( ऋ. १०-८६-१ ) माधवभट्ट भाष्यकाराचा जो उल्लेख केला आहे, ती व्यक्ति म्हणजे हे वेंकटार्यतनय माधवभट्टच होत.

या वेंकटार्यतनय माधव भट्टानंतर आणखी एक 'माधव' या नांवाचे भाष्यकार होऊन गेले. त्यांनी ऋग्वेदावर लिहिलेलें 'ऋग्वेद व्याख्या' या

नांवाचें भाष्य आतां उपलब्ध झालें असून, तें डॉ. चि. कुञ्जन् राजा एम्. ए. यांनीं अड्यार येथें छापून प्रसिद्ध केलें आहे. तेथें सुरुवातीस 'माधवाकृता ऋग्वेद व्याख्या' असें म्हटलें असून, प्रथमाध्यायाच्या शेवटीं 'ऋक्संहितायाः प्रथमाध्यायं व्याकरोदिति कुशिकानां कुले जातो माधवः सुंदरी सुतः॥' असा शेरा आहे. यावरून तो कौशिक गोत्री असून त्यांच्या आईचें नांव सुन्दरी असें होतें हें स्पष्ट होतें. त्याचप्रमाणें त्यांच्या बापाचें नांव 'वेंकट' असें होतें हें या पुढील वचनावरून दिसून येतें. 'इत्थं चतुर्थमध्यायं' व्याकरोत् प्रथमेऽष्टके । अष्टकस्य कुलं जातो माधवो वेंकटात्मजः॥' असा चवथ्या अध्यायाच्या शेवटीं शेरा आहे. अर्थात् हे व्यंकटात्मज माधव वरील वेंकटकार्य सुनु माधवभट्टाहून निराळे असून, दोघांचीं निरनिराळी भाष्यें आतां प्रसिद्ध झालीं आहेत.

त्यानंतर आनंदतीर्थ म्हणजे द्वैतमतस्थापनाचार्य मध्वाचार्य यांचें भाष्य संपूर्ण ऋग्वेदावर नसून फक्त २४ सूक्तांवरच आहे. आणि त्याच्याखाली 'ऋग्भाष्य संपूर्ण' असा शेरा आहे. त्याचा काल संवत् १२५५ ते १३३५ या मधला धरण्यांत येतो.

आनंदतीर्थानंतर सायणाचार्य हे येतात. ऋग्वेदावरील आजपर्यंत झालेल्या सर्व टीकाकारांत व भाष्यकारांत या सायणाचार्यांचा दर्जा सर्वांत श्रेष्ठ असा आहे. त्यांचें सखोल वेदाध्ययन, विस्तृत ग्रंथावलोकन, अलौकिक प्रतिभा, बहुश्रुतपणा, वर्णनशैली, लेखनचातुर्य हीं अनुपम असून, त्यांच्या 'वेदार्थ प्रकाश' भाष्यांत इतरत्र न आढळणारें असें एक प्रकारचें नवीन सौंदर्य प्रतीत होतें. भाषा सुबोध असून विविध माहितीनें पूर्ण भरलेली आहे. हे सायणाचार्य विजयनगर स्थापनाचार्य सुप्रसिद्ध माधवाचार्यांचे धाकटे बंधु होत. ही गोष्ट माधवाचार्यांनीं आपल्या पराशरस्मृतीच्या टीकेंत दिलेल्या स्वकुलवृत्तावरून स्पष्ट होते. त्यांचें तेथें वाक्य आहे तें असें:—श्रीमती जननी यस्य सुकीर्तिर्मायणः पिता । सायणो भोगनाथश्च मनोबुद्धी सहोदरौ ॥ यस्य बोधायनं सूत्रं शाखा यस्य च याजुषी । भारद्वाजं कुलं यस्य सर्वज्ञः स हि माधवः ॥ ' या वचनावरून सायण हे माधवाचार्यांचे बंधु ठरतात. शिवाय ते बुक्क राजाचे मंत्रीहि होते. या बुक्क राजाच्या काळींच त्यांनीं ऋग्वेदा-

वर भाष्य लिहिलें. त्यांचें चारीहि वेदांवर व शतपथ ब्राह्मणावर भाष्य आहे. वैदिक वाङ्मयांत सायणाचार्यांचें नांव अजरामर आहे. या विषयीं शंका नाहीं. यांचा काल संवत् १३७२ ते १४४४ च्या पर्यंत येतो.

त्यानंतर नांव घेण्यासारखा भाष्यकार म्हणजे आर्यसमाजाचे संस्थापक स्वामी दनानंद सरस्वती हे होत. हे औदिच्य म्हणजे सामवेदी ब्राह्मण असून, त्यांचें पूर्वाश्रमांतील नांव मूलशंकर असें होतें. हे आधुनिक युगांतील भाष्यकार असून स्वतंत्र बाण्याचे महा विद्वान पंडित होते. फक्त वेदग्रंथ तेवढेच अपौरुषेय असून, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषदें इत्यादि ग्रंथ पौरुषेय आहेत असें त्यांचें ठाम मत होतें. त्यांनीं ऋग्वेदावर व शुक्लयजुर्वेदावर ( माध्यंदिन ) सुंदर भाष्य लिहिलें असून, त्यांत त्यांची अगाध विद्वत्ता, सखोल वेदाभ्यास व स्वतंत्र विचारसरणी व संस्कृत भाषेवरील प्रभुत्व हीं चांगलीं प्रतीत होतात. ते आर्यसमाजाचे आद्य संस्थापक असून त्या दृष्टीनें त्यांनीं वैदिक धर्माची बहुमोल सेवा केली आहे. त्यांचा काल संवत् १८८१ ते १९४० पर्यंत धरण्यांत येत असून, ऋग्वेद भाष्य संवत् १९३३ भाद्रपद शुक्लप्रतिपदेस लिहिण्यास प्रारंभ करून त्याच वर्षी मार्गशीर्ष पोर्णिमेस त्यांनीं समाप्त केलें. त्यांच्या भाष्याला परंपरेचा आधार नसल्यामुळें कित्येक सनातनी पंडितांना तें मान्य नाहीं. प्रसंगविशेषीं प्राचीन भाष्यकारांचें खंडण करण्यास देखील स्वामीजींनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. सायणाचार्यादि प्राचीन भाष्यकारांविषयीं ते पुढीलप्रमाणें आपलें मत व्यक्त करतात. ' पूर्वेषां सायणाचार्यादीनां ये गुणाः सन्ति ते त्वस्माभिरपि स्वीक्रियन्ते गुणानां सर्वैः शिष्टैः स्वीकार्यत्वात् । तेषां ये दोषाः सन्ति तेऽत्र दिग्दर्शनेन खण्ड्यन्ते ॥ ( वेदभाष्य, पृ. ७ ). यानंतर वेदावर लिहिणारे आचार्य झाले नाहींत.

वरील भाष्यकारांशिवाय आणखी कांहीं भाष्यकार झाले असून त्यांत लक्ष्मण, आत्मानंद, रावण, मुद्गल, चतुर्वेदस्वामी, देवस्वामी, भट्ट भास्कर, उवट, हरदत्त हीं नांवें उल्लेखनीय आहेत. पण यांचीं भाष्यें अर्धवट व अप्रसिद्ध असल्यामुळें नांवापलीकडे त्यांची माहिती देण्यांत येत नाहीं.

## ऋग्वेदाचे भाषांतरकार

इंग्रजी अमलांत कांहीं जरी नसलें तरी एक गोष्ट मोठी उल्लेखनीय झाली. ती म्हणजे देशाला स्वास्थ्य मिळून प्राचीन विद्येला एक प्रकारचें नवीन वळण लागलें. तोंपर्यंत वेदग्रंथ सगळे संस्कृत भाषेंतच होते. त्याचा लौकिक पाश्चात्य देशांत जाऊन तेथील कांहीं विद्याप्रेमी पंडितांनीं येथें येऊन, एतद्देशीय पंडितांच्या साहाय्यानें संस्कृत भाषेचा अभ्यास करून, अत्यंत परिश्रम घेऊन वेदाचें भाषांतर इंग्रजी, जर्मन, फ्रेंच व ल्याटिन भाषेंत तयार करून तें त्या त्या देशांत छापून प्रसिद्ध केलें. या बाबतींत उल्लेखनीय ग्रंथकारांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेत. पंडित ग्रासमन व लुडविग यांनीं जर्मन् भाषेंत, पंडित ग्रिफिथ व विलसन यांनीं इंग्रजी भाषेंत, पंडित रोशन् यानें ल्याटिन भाषेंत ऋग्वेदाचें भाषांतर करून छापून प्रसिद्ध केलें. मराठींत नांव घेण्यासारखे महाशय म्हणजे कै. श्री. पटवर्धन व वे. शा. सं. चित्रावशास्त्री हे होत. श्री. पटवर्धन यांनीं 'श्रुतिबोध' ग्रंथांत मूळ व मराठी अर्थ साद्यंत छापून महाराष्ट्रांत फार मोठी वाङ्मयसेवा केली आहे. तसेंच वे. चित्रावशास्त्री यांनीं नुसतें मराठी भाषांतर छापून मराठी वाचकवर्गावर फार मोठे उपकार केले आहेत. शिवाय अनेक वेदप्रेमी लहानथोर पंडितांनीं त्रोटक त्रोटक सूक्तें सार्थ छापून वेळोवेळीं प्रसिद्ध केलीं आहेत. श्री. बोडस यांचेंहि नांव येथें उल्लेखनीय आहे. तसेंच महामहोपाध्याय काणे यांनींहि कांहीं सूक्तें छापून प्रसिद्ध केलीं आहेत. असो.

## ऋग्रत्न भांडाराचें वैशिष्ट्य.

आतां राहता राहिला प्रश्न काय तो या ग्रंथाच्या वैशिष्ट्याचा. याविषयीं दोन शब्द लिहून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करतों. सकृद्दर्शनी हें सांगितलें पाहिजे कीं ऋग्वेद हा ग्रंथ जगांतील कोणत्याहि धर्म ग्रंथापेक्षां अतिशय मोठा, तसाच अत्यंत विशाल व रहस्यमय असून, तो विविध व उपयुक्त माहितीनें पूर्ण भरलेला आहे. तथापि तितकाच तो समजण्यास दुर्बोध व क्लिष्ट आहे. त्यांत हजारांवर सूक्तें व दहा हजारांवर ऋचा असून

त्यांत विविध देवता व इतर उपयुक्त विषय यांची शास्त्रशुद्ध अशी सुंदर माहिती ग्रथित करून ठेवण्यांत आली आहे. असा हा सुंदर व ज्ञानगर्भ महाग्रंथ-इच्छा असली तरी-वाचावयास कठीण व समजावयास दुर्बोध असल्यामुळें, अनेक जिज्ञासु वाचक मोठ्या उत्साहानें ग्रंथ हातीं घेऊन पांच पंचवीस सूक्तें वाचतात न वाचतात तोंच त्रासून कंटाळून पुस्तक खालीं ठेवितात, असा बहुतेक अनुभव आहे. तेव्हां ही आपत्ति अंशतः दूर करून वाचकांची जिज्ञासा शेवटपर्यंत तरतरीत राखून त्यांना या पवित्र व पूज्य ग्रंथाचें ओझरतेंच पण साद्यंत दर्शन घडावें, या उद्देशानें त्या महाग्रंथाची ही चिमुकली आवृत्ति तयार करून, ती भाविक व जिज्ञासु महाराष्ट्रास सादर करीत आहे. हा एवढा ग्रंथ जरी लक्षपूर्वक वाचून काढल्यास वाचकांस ऋग्वेदाचें अंतरंग व बहिरंग यांचें दर्शन घडून त्यांची जिज्ञासा अल्पांशानें तरी तृप्त होण्यास खात्रीनें मदत होईल, अशी आमची नम्र समजूत आहे. आमच्या ग्रंथाचें हें पहिलें वैशिष्टय होय.

आतां दुसरें वैशिष्टय म्हणजे ग्रंथाच्या मांडणींतील फरक होय. ऋग्वेदाच्या कित्येक सूक्तांत एकापेक्षां अधिक देवता व एकापेक्षां अधिक छंद असून त्यांचा उल्लेख सूक्ताच्या मथळ्यांत एकत्र देण्याचा परिपाठ असून, त्यामुळें मंत्र वाचीत असतां त्या मंत्राचा ऋषि, देवता व छंद चटकन् समजण्यास अडचण होऊन थोडासा त्रास होतो. तसें न व्हावें या हेतूनें देवता व छंद बदलल्यास तें सूक्त फोडून एकच ऋषि, एकच देवता व एकच छंद अशी जुळणी करून त्याची 'रत्न' या नांवाखालीं मांडणी करून, त्या रत्नाखालींच त्या मंत्राचा ऋषि, देवता व छद यांचा उल्लेख करण्यांत आला आहे. यामुळें मंत्राचा ऋषि, देवता व छंद चटकन् समजण्यास सुलभ झालें आहे. उदाहरणार्थ पृष्ठ सहावरील मंडळ १ लें, सूक्त २२ वें पाहा. त्या एका सूक्ताचे सरळ आठ भाग पाडून, त्याचीं आठ रत्नें बनविलीं आहेत. अशीच सर्व ग्रंथाची योजना आंखण्यांत आली असून ती वाचकवर्गास फार सोईची वाटेल असें आम्हांस वाटतें.

आतां ग्रंथाचें तिसरें वैशिष्टय म्हणजे महत्त्वाच्या मंत्राचे श्रौत व स्मार्त विनियोग त्या त्या मंत्राखालींच देण्यांत आले आहेत. अशी व्यवस्था

आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कोणत्याहि ग्रंथांत पहावयास मिळत नाहीं. मात्र सायणाचार्यांच्या भाष्यांत श्रौत विनियोग तेवढा पहावयास मिळतो. पण स्मार्त विनियोग तेथें नाहीं. पण हे दोनहि विनियोग एकत्र पहावयास मिळण्याची संधि फक्त या ग्रंथामध्येंच आढळते. हें वैशिष्ट्य फक्त या ग्रंथाचेंच आहे. त्यावरून वाचकांना मंत्रविनियोगाचीहि अर्थज्ञानाबरोबरच ओळख होण्यास मदत होते.

चौथें व शेवटचें वैशिष्ट्य म्हणजे तें हें कीं मंत्राचा अर्थ आम्हीं सायण-भाष्याला धरून केला असून त्यामुळें परंपरेची पाठ राखली आहे. शिवाय या ग्रंथांत केवळ शब्दार्थच नसून त्या मंत्राच्या बुडाशीं असणारा भावहि लक्षांत घेऊन, त्या रोखानें अर्थाची सुबोध अशी शब्दयोजना केली आहे. म्हणजे या आमच्या ग्रंथांत शब्दार्थ व भावार्थ या दोहोंचेंहि सुंदर मिश्रण झाल्याचें दिसून येईल. असा प्रकार मराठी भाषेंतील आतां-पर्यंतच्या कोणत्याहि ग्रंथांत दिसून येत नाहीं. यावरून या ग्रंथाचें वैशिष्ट्य व उपयुक्तता वाचकांस सहज समजून येईल.

आतां, जातां जातां ज्या थोर व उदार सद्गृहस्थांनीं हा ग्रंथ प्रकाशांत येण्यास मदत केली, त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून वाचकांची आम्ही रजा घेतों. पापडीचे श्रीमंत कृष्णराव बर्वे, शेअर ब्रोकर मुंबई, यांच्या थोर औदार्यामुळेंच या योगीश्वर ग्रंथमालेचा पाय मुंबईंत स्थिर होऊन, प्रस्तुत ग्रंथाला छापखान्यांत प्रवेश मिळाला. ते आम्हांस सातशे रुपये देऊन पहिले आश्रयदाते झाले व वेळोवेळीं आम्हांस बहुमोल मदत केली. त्यांच्या या उदार सहानुभूतीबद्दल योगीश्वर ग्रंथमाला त्यांची सदैव ऋणी राहील. त्यानंतर वसई येथील 'श्री. लक्ष्मीबाई फडके ट्रस्ट फंड' याचे गुणग्राहक विश्वस्त यांनीं या ग्रंथास ५०१ रुपयांची उदार देणगी देऊन आम्हांस प्रकाशनाच्या कामीं बहुमोल मदत केली. याबद्दल त्यांचे आम्ही फार आभारी आहों. शिवाय इतर सद्गृहस्थांनीहि आम्हांस यथाशक्ति मदत करून प्रकाशनाचें काम सुलभ केलें. त्याबद्दल आम्ही त्यांचेहि अंतःकरण-पूर्वक आभार मानतों.

त्यांतल्या त्यांत अर्नाळचे शिक्षणप्रेमी व कर्तृत्ववान् श्रीयुत राजाराम नारायण सामंत, वसई हायस्कूल (हल्ली वाघ हायस्कूल) याचे आद्य संस्थापक व तसेच वसईचे सुप्रसिद्ध व लोकप्रिय डॉ. सदानंद केशव गाळवणकर यांनीं निरपेक्षबुद्धीनें व आपुलकीच्या भावनेनें आम्हांस वेळोवेळीं योग्य मदत व मार्गदर्शन केलें, त्याबद्दल त्यांचेहि आम्ही आभारी आहों. तसेंच अर्नाळचे कॉंग्रेसचे निष्ठावंत कार्यकर्ते डॉ. दिनकरराव गाळवणकर यांनीं अडचणीच्या वेळीं आपल्या बंगल्यांत योगीश्वर ग्रंथ मालेला आश्रय देऊन ग्रंथ प्रकाशनाच्या कामीं बहुमोल मदत केली. त्यांचे आभार मानल्याशिवाय आम्हांस लेखणी खालीं ठेववत नाहीं. सरतेशेवटीं आभार मानावयाचे राहिले ते म्हणजे पुण्याचे समर्थ भारत छापखान्याचे व्यवस्थापक श्रीयुत स. रा. सरदेसाई हे होत. त्यांनीं हा प्रस्तुतचा ग्रंथ काळजीपूर्वक, चांगला व सुंदर छापून दिला, त्याबद्दल आम्ही त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानून लेखणीला रजा देतों.

अण्णासाहेब नवरे
यांचा बंगला, शीव, मुंबई
१८ जुलै १९५१.

ग्रंथकर्ता



# मण्डल पहिलें

## रत्न १ लें

मधुच्छंद-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद

॥ ॐ ॥ अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् ।
होतारं रत्नधातमम् ॥ १-१-१ ॥

**श्रौ. वि. (अग्नि) प्रातरनुवाक;** **स्मा. वि. ब्रह्मयज्ञ, आज्यहोम**

अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत ।
स देवाँ एह वक्षति ॥ १-१-२ ॥
अग्निना रयिमश्नवत्पोषमेव दिवेदिवे ।
यशसं वीरवत्तमम् ॥ १-१-३ ॥

**श्रौ. वि. ( आधान ) अनुवाक्या**

## ( मराठी भावार्थ )

### रत्न १ लें

यज्ञशालेंत आह्वनीय रूपानें अग्रभागीं स्थित असणारा, भक्तजनांचे मनोरथ उदार हस्तानें पुरविणारा, यज्ञस्थानांत देवांना बोलावून आणणारा, पुण्यफलरूप संपत्तीचें पोषण करणारा असा हा अग्निदेव, त्या देवाचें मी भावभक्तिपूर्वक स्तवन करतों. ( १-१-१ ) हा अग्निदेव भृगुअंगिरा-प्रभृति पुरातन ऋषींकडून स्तविला गेला. आणि तसाच आजहि आमच्यासारख्या प्राकृत भक्तजनांकडून स्तविला जात आहे. तो यजनार्ह देवांना या यज्ञशालेंत घेऊन येवो ! ( १-१-२ ) भक्तजनांकडून स्तविला जाणारा हा जो अग्निदेव त्या अग्निदेवाच्या उपासनेनें यजमान हा नित्य वार्द्धिगत होणारें, यश प्राप्त करून देणारें, व पुत्रपौत्र व दासदासी यांनीं संपन्न असणारें असें ऐश्वर्य प्राप्त करून घेतो. ( १-१-३ )

अग्ने यं यज्ञमध्वरं विश्वतः परिभूरसि ।
स इद्देवेषु गच्छति ॥ १-१-४ ॥
अग्निर्होता कविक्रतुः सत्यश्चित्रश्रवस्तमः ।
देवो देवेभिरा गमत् ॥ ॥ १-१-५ ॥
यदङ्ग दाशुषे त्वमग्ने भद्रं करिष्यसि ।
तवेत्तत्सत्यमङ्गिरः ॥ १-१-६ ॥
उप त्वाग्ने दिवेदिवे दोषावस्तर्धिया वयम् ।
नमो भरन्त एमसि ॥ ॥ १-१-७ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) अग्निषोमप्रणयन**

राजन्तमध्वराणां गोपामृतस्य दीदिविम् ।
वर्धमानं स्वे दमे ॥ १-१-८ ॥
स नः पितेव सूनवेऽग्ने सूपायनो भव ।
सचस्वा नः स्वस्तये ॥॥ १-१-९ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) प्रातरनुवाक.** **स्मा. वि. ब्रह्मयज्ञ, आज्यहोम**

## रत्न २ रें

**मधुच्छंद-ऋषि, सरस्वती देवता, गायत्री-छंद**

पावका नः सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती ।
यज्ञं वष्टु धियावसुः ॥ १-३-१० ॥

**श्रौ. वि. ( अन्वारंभणीयेष्टि ) पुरोनुवाक्या** **स्मा. वि. सरस्वतीआवाहन**

चोदयित्री सूनृतानां चेतन्ती सुमतीनाम् ।
यज्ञं दधे सरस्वती ॥॥ १-३-११ ॥
महो अर्णः सरस्वती प्र चेतयति केतुना ।
धियो विश्वा वि राजति ॥ १-३-१२ ॥

हे अग्निदेवा ! ज्या यज्ञावर तुझी आह्वनीय, मार्जालीय, गार्हपत्य व आग्नीध्र या रूपानें सर्व बाजूनी देखरेख असते, तोच यज्ञ अहिंसित होत्साता देवांना तृप्त करण्यासाठीं स्वर्गांप्रत जाऊं शकतो. ( १-१-४ ) अग्निदेव हा यज्ञप्रसंगीं देवांना यज्ञशाळेंत बोलावून आणणारा, वर्तमान, भूत, भविष्य जाणणारा, कर्मवीर, सत्यस्वरूप व महाकीर्तिमान असा आहे. तो देवांना बरोबर घेऊन या आमच्या यज्ञशाळेंत प्रवेश करो ! ( १-१-५ ) हे अग्निदेवा ! तुला जो भक्त हवि अर्पण करील, त्याला तूं गृह-वित्त-पुत्रादि देऊन त्याचें अनंत कल्याण करतोस. आणि ही सुखदायक कृपा ती तुझीच होय ! हे अंगिरा अग्ने ! ही गोष्ट अगदीं सत्य-त्रिवार सत्य-आहे. ( १-१-६ ) हे अग्नि-नारायणा ! आम्हीं—जे तुझे भक्त—दररोज दिवसा व रात्रीं भक्तिपूर्वक तुझें पूजन करून तुझ्या सन्निध येऊं इच्छितों. ( १-१-७ ) तेजस्वी, हिंसारहित, यज्ञकर्मांचें संरक्षण करणारा, कर्मफलाचा पुनः पुनः प्रकाश करणारा, असा हा जो अग्निदेव तो यज्ञशाळेंत हवींनी संवर्धन होत असतो. ( १-१-८ ) हे अग्निदेवा ! बाप जसा मुलाला सहज गम्य असतो तद्वत् तूंहि आम्हांस सुगम होऊन रहा. आणि आमच्या कल्याणार्थ सदैव आमच्या सन्निध अस. ( १-१-९ )

## रत्न २ रें

उपासकांना पावन करणारी, हविरन्नानें समृद्ध असलेली, बुद्धिवैभवानें नटलेली अशी ही सरस्वती देवी आमचा यज्ञ देवांप्रत नेऊन पोंचवो ! ( १-३-१० ) सत्य भाषणाला प्रेरणा करणारी व सद्बुद्धीला चेतना देणारी अशी ही सरस्वती, ती या आमच्या यज्ञाचा स्वीकार करती झाली. ( १-३-११ ) ही सरस्वती प्रवाहरूपानें प्रभूत जल देणारी आहे. आणि देवतारूपानें सर्व बुद्धिमत्तेची अधिष्ठात्रीहि व प्रकाश देणारीहि पण तीच आहे. ( १-३-१२ )

## रत्न ३ रें

**मधुच्छंद-ऋषि, इन्द्र-देवता, गायत्री-छंद**

केतुं कृण्वन्नकेतवे पेशो मर्या अपेशसे ।
समुषद्भिरजायथाः ।। १-६-३ ।।

**श्रौ. वि.** प्रातःसवन. **स्मा. वि.** शांतिपाठ; केतुआवाहन

## रत्न ४ थें

**मेधातिथि-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद**

अग्निं दूतं वृणीमहे होतारं विश्ववेदसम् ।
अस्य यज्ञस्य सुक्रतुम् ।। १-१२-१ ।।

**श्रौ. वि.** ( अग्नि ) प्रातरनुवाक; **स्मा. वि.** अग्नि-आवाहन

अग्ने शुक्रेण शोचिषा विश्वाभिर्देवहूतिभिः ।
इमं स्तोमं जुषस्व नः ।। १-१२-१२ ।।

## रत्न ५ वें

**मेधातिथि-ऋषि,, द्रविणोदा-देवता, गायत्री-छंद**

द्रविणोदा द्रविणसो ग्रावहस्तासो अध्वरे ।
यज्ञेषु देवमीळते ।। १-१५-७ ।।
द्रविणोदा ददातु नो वसूनि यानि शृण्विरे ।
देवेषु ता वनामहे ।। १-१५-८ ।।
द्रविणोदाः पिपीषति जुहोत प्र च तिष्ठत ।
नेष्ट्रादृतुभिरिष्यत ।। १-१५-९ ।।
यत्त्वा तुरीयमृतुभिर्द्रविणोदो यजामहे ।
अध स्मा नो ददिर्भव ।। १-१५-१० ।।

**श्रौ. वि.** ( अग्नि ) अग्निस्तुति. **स्मा. वि.** पुण्याहवाचन

## रत्न ३ रें

अहो मनुष्य हो ! हें आश्चर्य पाहा ! रात्रीं झोंपल्यामुळें प्रज्ञारहित झालेल्यांना प्रातःकाळीं पुनः जागृत करीत, आणि अंधकारामुळें रूपरहित झालेल्या पदार्थाला प्रातःकाळीं प्रकाश पाडून त्याला पुनः रूपयुक्त करीत हा आदित्य दररोज उष्ण किरणांनीं युक्त होत्साता उदय पावत असतो. ( १-६-३ )

## रत्न ४ थें

देवांना बोलावून आणणारा, सर्व-संपत्तिमान, हा यज्ञ पूर्णत्वानें सिद्धीस नेणारा असा जो अग्निदेव, त्या देवदूत अग्निदेवाची आम्ही परिचर्या करतों. ( १-१२-१ )

हे अग्निदेवा ! तूं उज्ज्वल तेजानें संपन्न आहेस. आणि सकल देवता-स्तोत्रांनीं युक्त आहेस. तर आतां तूं या आमच्या स्तुतिस्तोत्राचा स्वीकार कर ! ( १-१२-१२ )

## रत्न ५ वें

धनाची इच्छा करणारे हे ऋत्विज सोम कुटण्याचे दगड हातांत घेऊन, द्रविणोदा अग्निदेवाची सोमयागांत व इतर यज्ञांतहि स्तुति करीत असतात. ( १-१५-७ ) जें धन प्रसिद्ध आहे तें द्रविणोदा देव आम्हांस देवो ! त्या धनाची आम्हीं देवांमध्यें विभागणी करून देऊं. ( १-१५-८ ) द्रविणोदा देव हा ऋतूंसह नेष्ट्याच्या पात्रांतून सोमरस पिऊं इच्छितो. तर हे ऋत्विजांनो ! तुम्हीं आतां होमस्थानीं चला. आणि तेथें जाऊन त्याच्यासाठीं सोमरस अर्पण करा आणि मग तेथून परत फिरा. ( १-१५-९ ) हे द्रविणोद देवा ! ज्याअर्थी आम्ही ऋतूंसहवर्तमान तुला चवथ्यांदा हवि अर्पण करीत आहोंत त्याअर्थी तूं आम्हांस न चुकतां धनदान दे ! ( १-१५-१० )

## रत्न ६ वें

**मेधातिथि-ऋषि, सदसस्पति-देवता, गायत्री-छंद**

सदसस्पतिमद्भुतं प्रियमिन्द्रस्य काम्यम् ।

सनिं मेधामयासिषम् ॥ १-१८-६ ॥

**श्रौ. वि. ( अनुप्रवचनीय ) चरुहोम. स्मा. वि. अग्नि-आवाहन**

यस्मादृते न सिध्यति यज्ञो विपश्चितश्चन ।

स धीनां योगमिन्वति ॥ १-१८-७ ॥

आदृध्नोति हविष्कृतिं प्राञ्चं कृणोत्यध्वरम् ।

होत्रा देवेषु गच्छति ॥ १-१८-८ ॥

## रत्न ७ वें

**मेधातिथि-ऋषि, अश्विनी-देवता, गायत्री-छंद**

प्रातर्युजा वि बोधयाश्विनावेह गच्छताम् ।

अस्य सोमस्य पीतये ॥ १-२२-१ ॥

**श्रौ. वि. ( प्रातरनुवाक )आश्विनग्रह-पुरोनुवाक्या**

या सुरथा रथीतमोभा देवा दिविस्पृशा ।

अश्विना ता हवामहे ॥ १-२२-२ ॥

या वां कशा मधुमत्यश्विना सूनृतावती ।

तया यज्ञं मिमिक्षतम् ॥ १-२२-३ ॥

नहि वामस्ति दूरके यत्रा रथेन गच्छथः ।

अश्विना सोमिनो गृहम् ॥ १-२२-४ ॥

## रत्न ८ वें

**मेधातिथि-ऋषि, सविता-देवता, गायत्री-छंद**

हिरण्यपाणिमूतये सवितारमुप ह्वये ।

स चेत्ता देवता पदम् ॥ १-२२-५ ॥

## रत्न ६ वें

मी बुद्धि मिळविण्यासाठीं सदसस्पति देवाजवळ आलों आहें. तो देव आश्चर्यकारक आहे. आणि तो इन्द्राचा मित्र असून भजनीय आहे. तसाच तो धनदाताहि आहे. ( १-१८-६ ) ज्याच्या सहाय्यावांचून कोणाहि यजमानाचा यज्ञ सिद्धीस जाऊं शकत नाहीं, तो सदसस्पति देव यजमानाच्या कर्मानुष्ठानाची म्हणजे यज्ञाची पूर्णता घडवून आणतो. ( १-१८-७ ) त्यानंतर त्या हविसंपादक यजमानाची अभिवृद्धि करतो आणि त्याचा यज्ञ निर्विघ्न पार पाडतो. तसेंच आम्हीं केलेली स्तुति देवांना तोषविण्यासाठीं मग देवांजवळ जाते. ( १-१८-८ )

## रत्न ७ वें

प्रातःसवनांतील हविर्भाग ग्रहण करण्यासाठीं अश्वीदेवांना जागे करा. ते अश्वीदेव सोमपानार्थ आमच्या यज्ञशाळेंत प्राप्त होवोत. ( १-२२-१ ) अश्वीदेवांना आम्ही हांक मारीत आहों. त्यांचे रथ सुंदर आहेत. रथांत बसून लढणाऱ्या योद्ध्यांतील ते उत्तम योद्धे आहेत. ( १-२२-२ ) हे अश्विनो ! सुंदर व मोठ्यानें आवाज करणारा जो तुमचा चाबूक आहे, त्या चाबकाच्या मदतीनें आमच्या यज्ञमंडपांत सोमरसाचा वर्षाव होईल असें करा ! ( १-२२-३ ) अहो अश्विदेवहो ! तुम्ही यजमानगृहीं रथांत बसून या. त्याचें घर मुळींच दूर नाहीं. ( १-२२-४ )

## रत्न ८ वें

सुवर्णाप्रमाणें ज्याचे हात चकचकीत आहेत, अशा त्या सविता देवाला आमच्या संरक्षणार्थ मी भक्तिभावपूर्वक बोलावीत आहे. तो यज्ञोपासकांच्या प्राप्तव्य स्थानाचा ज्ञाता आहे. ( १-२२-५ )

**श्रौ. वि. ( दश ) वैश्वदेवशस्त्र**

अपां नपातमवसे सवितारमुप स्तुहि ।
तस्य व्रतान्युश्मसि ॥ १-२२-६ ॥
विभक्तारं हवामहे वसोश्चित्रस्य राधसः ।
सवितारं नृचक्षसम् ॥ १-२२-७ ॥
सखाय आ नि षीदत सविता स्तोम्यो नु नः ।
दाता राधांसि शुम्भति ॥ १-२२-८ ॥

**श्रौ. वि. ( दर्श ) वैश्वदेवशस्त्र**

## रत्न ९ वें

**मेधातिथि-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद**

अग्ने पत्नीरिहा वह देवानामुशतीरुप ।
त्वष्टारं सोमपीतये ॥ १-२२-९ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) प्रातःसवन याज्या**

आ ग्ना अग्न इहावसे होत्रां यविष्ठ भारतीम् ।
वरूत्रीं धिषणां वह ॥ १-२२-१० ॥

## रत्न १० वें

**मेधातिथि-ऋषि, देवी-देवता, गायत्री-छंद**

अभि नो देवीरवसा महः शर्मणा नृपत्नीः ।
अच्छिन्नपत्राः सचन्ताम् ॥ १-२२-११ ॥

## रत्न ११ वें

**मेधातिथि-ऋषि, इन्द्राणी-वरुणानी-अग्नायी-देवता, गायत्री-छंद**

इहेन्द्राणीमुप ह्वये वरुणानीं स्वस्तये ।
अग्नायीं सोमपीतये ॥ १-२२-१२ ॥

जलाचा मित्र नसणाऱ्या सविता देवाची आमच्या संरक्षणार्थ स्तुति करा! त्याची आम्ही मोठ्या समारंभानें उपासना करूं इच्छितों. ( १-२२-६ ) मनुष्यांना प्रकाश देणाऱ्या सविता देवास आम्ही आमंत्रण करतों. विविध प्रकारची गृहोपयोगी साधनसंपत्ति तो आम्हांस वांटून देणारा आहे. ( १-२२-७ )

मित्रहो! खालीं बसा. आपण सर्व मिळून सविता देवाचें स्तुतिस्तोत्र प्रेमळपणानें गाऊं या. तो मोठा उदार आहे! या त्याच्या औदार्य-वृत्तीमुळेंच त्यास मोठें भूषण प्राप्त झालें आहे! ( १-२२-८ )

## रत्न ९ वें

हे अग्निदेवा! आमच्या यज्ञमंडपांत येण्यास उत्सुक झालेल्या देवपत्न्यांना व त्याचप्रमाणें त्वष्टा देवालाहि सोमपानार्थ इकडे शीघ्र घेऊन ये! ( १-२२-९ ) हे अत्यंत तरुण अग्निदेवा! होत्रा, भारती, वरूत्री, धिषणा या देवपत्न्यांना आमचें रक्षण करण्यासाठीं तूं या यज्ञगृहांत घेऊन ये! ( १-२२-१० )

## रत्न १० वें

बलप्रद अन्न व श्रेष्ठ प्रतीचें सुख बरोबर घेऊन मनुष्यांचें रक्षण करणाऱ्या देवता अखंडित पंखांनीं आमच्याकडे येवोत! ( १-२२-११ )

## रत्न ११ वें

इन्द्रपत्नी इन्द्राणी, वरुणपत्नी वरुणानी, अग्निपत्नी अग्नायी, यांना आमचें कल्याण व्हावें म्हणून या यज्ञशाळेंत येऊन सोमपान करण्यासाठीं आम्ही आग्रहानें बोलावीत आहों. ( १-२२-१२ )

## रत्न १२ वें

**मेधातिथि-ऋषि, द्यावापृथिवी-देवता, गायत्री-छंद**

मही द्यौः पृथिवी च न इमं यज्ञं मिमिक्षताम् ।
पिपृतां नो भरीमभिः ॥ १-२२-१३ ॥

**श्रौ. वि. अग्निमंथन, वैश्वदेवशस्त्र; स्मा. वि. भूमिस्पर्श**

तयोरिद् घृतवत्पयो विप्रा रिहन्ति धीतिभिः ।
गन्धर्वस्य ध्रुवे पदे ॥ १-२२-१४ ॥

## रत्न १३ वें

**मेधातिथि-ऋषि, पृथिवी-देवता, गायत्री-छंद**

स्योना पृथिवि भवानृक्षरा निवेशनी ।
यच्छा नः शर्म सप्रथः ॥ १-२२-१५ ॥

**श्रौ. वि. ( महानाम्नीव्रत ) भूमिस्पर्श. स्मा. वि. पृथ्वीमंत्र; शयनमंत्र**

## रत्न १४ वें

**मेधातिथि-ऋषि, विष्णु-देवता, गायत्री-छंद**

अतो देवा अवन्तु नो यतो विष्णुर्विचक्रमे ।
पृथिव्याः सप्त धामभिः ॥ १-२२-१६ ॥

**श्रौ. वि. प्रातःसवन; स्मा. वि. अभिषेकः, षडंगन्यास**

इदं विष्णुर्वि चक्रमे त्रेधा नि दधे पदम् ।
समूळ्हमस्य पांसुरे ॥ १-२२-१७ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) आतिथ्येष्टि; स्मा. वि. अभिषेक**

त्रीणि पदा वि चक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्यः ।
अतो धर्माणि धारयन् ॥ १-२२-१८ ॥

**श्रौ. वि. ( उपसद् ) वैष्णवयाज्या; स्मा. वि. षडंगन्यास विष्णुप्रार्थना**

विष्णोः कर्माणि पश्यत यतो व्रतानि पस्पशे ।
इन्द्रस्य युज्यः सखा ॥ १-२२-१९ ॥

## रत्न १२ वें

अत्यंत विशाल अशा द्यावापृथ्वी देवता या आमच्या यज्ञशालेंत सुखसमृद्धीचा वर्षाव करोत ! आणि आम्हांस पुष्टिप्रद पदार्थांनीं समृद्ध करोत ! ( १-२२-१३ ). गंधर्वांच्या अढळ लोकांत म्हणजे अंतरिक्षांत द्यावापृथ्वीचें जें घृतसदृश जल आहे, त्याचा विद्वान् लोक यज्ञोपासन-द्वारा आस्वाद घेतात. ( १-२२-१४ )

## रत्न १३ वें

हे पृथिव ! तूं सुखकारक, कंटकरहित, लोकांना राहण्यास योग्य आणि तशीच मोठी विशाल अशी आहेस. अतएव आम्हांस सुखरूप असें आश्रयस्थान दे ! ( १-२२-१५ )

## रत्न १४ वें

जेथून विष्णुदेवानें गायत्र्यादि सात छंदांच्या सहाय्यानें पृथ्वीचें विविध प्रकारें आक्रमण केलें, त्या पृथ्वीस्थानापासून देव आमचें रक्षण करोत ! ( १-२२-१६ ) विष्णुदेवानें हें सर्व विश्व पादाक्रांत करून टाकलें आहे. अग्निरूपानें पृथ्वीवर, वायुरूपानें द्युलोकावर व सूर्यरूपानें स्वर्गावर याप्रमाणें तीन वेळां त्यानें पादक्षेपण केलें. या पादांमध्येंच हें संपूर्ण जग अंतर्भूत झालें आहे. ( १-२२-१७ ) सर्व जगाचा रक्षक व दुर्दमनीय असा जो विष्णुदेव, त्या विष्णुदेवानें अग्नि, वायु व आदित्य यांचीं तीन स्थानें आपल्या पादस्थलीं व्यापून टाकलीं आहेत. तो देव अग्निहोत्रादि पुण्य कर्मांचा रक्षक आहे. ( १-२२-१८ ) अहो भक्तजन हो ! यज्ञाचा अधिष्ठाता असा जो विष्णुदेव त्याचीं सृष्टिसंहारादि अद्भुत कृत्यें तुम्ही अवलोकन करा. त्या आपल्या कृत्यांनीं त्यानें तुमचीं लौकिक व वैदिक कर्में बद्ध करून सोडलीं आहेत. तो इन्द्राचा अनुरूप सखा आहे. ( १-२२-१९ )

तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः ।
दिवीव चक्षुराततम् ॥ ॥ १-२२-२० ॥

स्मा. वि. सूर्य अर्घ्यदान.

तद्विप्रासो विपन्यवो जागृवांसः समिन्धते ।
विष्णोर्यत्परमं पदम् ॥ १-२२-२१ ॥

**औ. वि. १ प्रातःसवन स्मा. वि. अभिषेक, विष्णु-प्रार्थना पुण्याहवाचन**

## रत्न १५ वें

**मेधातिथि काण्व-ऋषि, आपो-देवता, गायत्री-छंद**

अपो देवीरुप ह्वये यत्र गावः पिबन्ति नः ।
सिन्धुभ्यः कर्त्वं हविः ॥ १-२३-१८ ॥

**औ. वि. (अग्नि) आपोनप्त्रीया स्मा. वि. आपोदेवी मंत्र**

## रत्न १६ वें

**मेधातिथि काण्व-ऋषि, आपो-देवता, पुर उष्णिक्-छंद**

अप्स्व१न्तरमृतमप्सु भेषजमपामुत प्रशस्तये ।
देवा भवत वाजिनः ॥ १-२३-१९ ॥

**स्मा. वि. आपोदेवी मंत्र.**

## रत्न १७ वें

**मेधातिथि काण्व-ऋषि, आपो-देवता, अनुष्टुप्-छन्द.**

अप्सु मे सोमो अब्रवीदन्तर्विश्वानि भेषजा ।
अग्निं च विश्वशंभुवमापश्च विश्वभेषजीः ॥ १-२३-२० ॥

**औ. वि. (करीरिष्टि) अनुवाक्या. स्मा. वि. आपोदेवी मंत्र**

## रत्न १८ वें

**मेधातिथि काण्व-ऋषि, आपो-देवता, गायत्री-छंद**

आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे३ मम ।
ज्योक् च सूर्यं दृशे ॥ १-२३-२१ ॥

चक्षूप्रमाणें आकाशांत प्रसारित असलेलें असें जें विष्णुदेवाचें सूर्यरूपी श्रेष्ठ स्वरूप, त्याचें विद्वान् लोक सदैव दर्शन घेत असतात. ( १-२२-२० ) लोकप्रसिद्ध अशा त्या यज्ञपुरुषाचें जें श्रेष्ठ स्थान आहे, त्याचें विद्वान् व कर्तव्यदक्ष असे ब्राह्मण उपासनेच्या द्वारा संदीपन करीत असतात. ( १-२२-२१ )

## रत्न १५ वें

जेथें आमच्या गायी जलपान करतात तेथील जलदेवतांस मी आमंत्रण करतों. कारण या नद्यांतील आपो देवींना हविर्भाग अर्पण करणें हें आमचें कर्तव्य आहे. ( १-२३-१८ )

## रत्न १६ वें

जलाच्या पोटांत अमृत आहे आणि औषधि सत्वेंहि आहेत. म्हणून अशा आपो देवीच्या स्तुतीकरितां, हे ऋत्विज हो, तुम्ही तयार असा. ( १-२३-१९ )

## रत्न १७ वें

उदकामध्यें सर्व औषधि आहेत आणि तसेंच सर्व जगाला सौख्य देणारा अग्निहि पण आहे, असें मला सोमदेवानें सांगितलें आहे. त्याच-प्रमाणें उदक हें सर्व रोगनिवारक औषधींनीं परिपूर्ण आहे, हेंहि मला त्यानेंच सांगितलें. ( १-२३-२० )

## रत्न १८ वें

हे आपो देवींनो, माझें शरीर निरोगी रहावें म्हणून तुम्ही मला आरोग्यकारक असें औषध द्या. सूर्य देवाचें निरंतर दर्शन घेतां यावें म्हणून आम्ही निरोगी राहूं असें करा ! ( १-२३-२१ )

## रत्न १९ वें

**मेधातिथि काण्व-ऋषि, आपो-देवता, अनुष्टुप्-छंद**

इदमापः प्र वहत यत् किं च दुरितं मयि ।
यद् वाहमभिदुद्रोह यद् वा शेप उतानृतम् ॥ १-२३-२२ ॥

**औ. वि. (अवभृत) स्नान** **स्मा. वि. मार्जन**

आपो अद्यान्वचारिषं रसेन समगस्महि ।
पयस्वानग्न आ गहि तं मा सं सृज वर्चसा ॥
॥ १-२३-२३ ॥

**औ. वि. (पशु) आह्वनीय उपस्थान.** **स्मा. वि. मार्जन**

## रत्न २० वें

**शुनः शेप-ऋषि, वरुण-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

नहि ते क्षत्रं न सहो न मन्युं वयश्चनामी पतयन्त आपुः ।
नेमा आपो अनिमिषं चरन्तीर्न ये वातस्य प्रमिनन्त्यभ्वम् ॥
॥ १-२४-६ ॥

**औ. वि. वरुण याज्या.** **स्मा. वि. वरुणसूक्त**

अबुध्ने राजा वरुणो वनस्योर्ध्वं स्तूपं ददते पूतदक्षः ।
नीचीनाः स्थुरुपरि बुध्न एषामस्मे अन्तर्निहिताः केतवः स्युः ॥
॥ १-२४-७ ॥

उरुं हि राजा वरुणश्चकार सूर्याय पन्थामन्वेतवा उ ।
अपदे पादा प्रतिधातवेऽकरुतापवक्ता हृदयाविधश्चित् ॥
॥ १-२४-८ ॥

शतं ते राजन् भिषजः सहस्रमुर्वी गभीरा सुमतिष्टे अस्तु ।
बाधस्व दूरे निर्ऋतिं पराचैः कृतं चिदेनः प्र मुमुग्ध्यस्मत् ॥
॥ १-२४-९ ॥

## रत्न १९ वें

अजाणतेपणानें आम्हीं जें कांहीं पातक केलें असेल अथवा जाणून-बुजून आम्हीं जो दुसऱ्यांचा अपराध केला असेल अगर सज्जनांना निरर्थक शिव्याशाप दिले असतील ती सर्व पापें हे आपोदेवींनो! तुम्हीं वाहून न्या! ( १-२३-२२ ) आज रोजीं अवभृत स्नानार्थ आम्हीं जलामध्यें प्रवेश केला आहे. अर्थात आम्हीं जलरसाशीं संयुक्त झालों आहों. हे अग्निनारायणा! तूं जलामध्यें रहात असल्यामुळें तूं या आमच्या कर्मानुष्ठानप्रसंगीं उपस्थित होऊन तें आमचें स्नान आम्हांस तेजस्वी करील असें कर! ( १-२३-२३ )

## रत्न २० वें

हे वरुण देवा! आकाशांत उडणारे हे जे श्येनादि पक्षी आहेत, ते सर्व तुझ्या शरीरबळाची, तुझ्या पराक्रमाची, किंवा तुझ्या रागाची बरोबरी करूं शकत नाहीत. तसेंच हें सतत वाहत असणारें उदक अथवा सोसाट्यानें वाहणारा झंझावात देखील तुझ्या वेगाशीं सामना देऊं शकत नाहीं. ( १-२४-६ ) शुद्ध बलाचा जो वरुण राजा तो मूळरहित आकाशामध्यें राहून, शिरोभागीं तेजाचा स्तूप धारण करतो. उच्चभागीं असणाऱ्या त्या वरुण देवाचे किरण मात्र अधोमुख होऊन असतात. पण त्यांचें मूल मात्र वर असतें. असें जरी असलें तरी ते आमच्यामध्यें प्राण-रूपानें केन्द्रित होऊन राहिले आहेत. ( १-२४-७ ) सूर्याला उदयास्त करीत फिरण्यासाठीं म्हणून वरुण राजानें रस्ता चांगला रुंद करून दिला आहे. जेथें पाऊल ठेवण्याची सोय नव्हती, तेथें त्यानें सरळ वाट करून दिली. जे आम्हांस मर्मभेदक भाषण बोलणारे शत्रु आहेत, त्यांचें वरुण निराकरण करो! ( १-२४-८ ) हे वरुण राजा! तुझ्याजवळ शेंकडों, हजारों प्रकारचीं औषधें आहेत. तुझी कृपाबुद्धि विशाल व दृढ असो! आम्हांस छळणारी जी निर्ऋति नामक पापदेवता, तिला आमच्यापासून पराङ्मुख करून दूर नेऊन ठेव! आणि तेथें तिचें निर्दालन कर! आमच्या हातून जें कांहीं पातक घडलें असेल त्यांतून आमची सुटका कर! ( १-२४-९ )

अमी य ऋक्षा निहितास उच्चा नक्तं ददृश्रे कुह चिद्दिवेयुः ।
अदब्धानि वरुणस्य व्रतानि विचाकशच्चन्द्रमा नक्तमेति ॥१-२४-१०॥

तत्त्वा यामि ब्रह्मणा वन्दमानस्तदा शास्ते यजमानो हविर्भिः ।
अहेळमानो वरुणेह बोध्युरुशंस मा न आयुः प्र मोषीः ॥१-२४-११॥

**श्रौ. वि. (वरुणप्रघास) याज्या.   स्मा. वि. शांतिपाठ; वरुण-आवाहन**

तदिन्नक्तं तद्दिवा मह्यमाहुस्तदयं केतो हृद आ वि चष्टे ।
शुनः शेपो यमह्वद् गृभीतः सो अस्मान् राजा वरुणो मुमोक्तु ॥
॥ १-२४-१२ ॥

शुनःशेपो ह्यह्वद् गृभीतस्त्रिष्वादित्यं द्रुपदेषु बद्धः ।
अवैनं राजा वरुणः ससृज्याद्विद्वाँ अदब्धो वि मुमोक्तु पाशान् ॥
॥ १-२४-१३ ॥

अव ते हेळो वरुण नमोभिरव यज्ञेभिरीमहे हविर्भिः । क्षयन्नस्मभ्य-मसुर प्रचेता राजन्नेनांसि शिश्रथः कृतानि ॥ १-२४-१४ ॥

**श्रौ. वि. (अवभृत) वरुणयाज्या.**

उदुत्तमं वरुण पाशमस्मदवाधमं वि मध्यमं श्रथाय । अथा वयमा-दित्य व्रते तवानागसो अदितये स्याम ॥ १-२४-१५ ॥

**श्रौ. वि. (अवभृत) वरुणयाज्या.   स्मा. वि. यजमान-अभिषेक; मार्जन**

## रत्न २१ वें

**शुनःशेप-ऋषि, वरुण-देवता, गायत्री-छंद**

इमं मे वरुण श्रुधी हवमद्या च मृळय ।
त्वामवस्युरा चके ॥ १-२५-१९ ॥

**श्रौ. वि. (वरुणप्रघास) वरुण अनुवाक्या;   स्मा. वि. वरुण-आवाहन**

हे जे आकाशांत उंच ठिकाणीं स्थापन केलेले सप्तऋषी आहेत, ते फक्त रात्रींच दिसतात. दिवसाचे कोठें तरी निघून जातात. वरुण देवाचे कायदे अनुल्लंघनीय असे आहेत. त्याच्याच हुकुमानें चन्द्रमा हा रात्रीं प्रकाशत येतो. ( १-२४-१० ) हे वरुण देवा ! हा यजमान तुला हविर्भाग अर्पण करून धनपुत्रादिकांनीं युक्त अशा उदंड आयुष्याची इच्छा धारण करतो. ती त्याची इच्छा सफल व्हावी म्हणून मी तुझी प्रौढ वैदिक मंत्रांनीं स्तुति व प्रार्थना करीत आहे. हे महाकीर्तिमान देवा ! तिरस्कार न करतां तूं ही माझी प्रार्थना ऐक आणि कृपा करून आमचें आयुष्य अकालींच हिरावून घेऊं नकोस ! ( १-२४-११ ) तें हें वरुणविषयक स्तोत्र मला रात्रीं काय, दिवसा काय आणि माझ्या अंतरंगांतील भाव झाला तरी काय हेंच सांगत आहे कीं बांधून टाकलेल्या शुनःशेपाने ज्याचा धांवा केला तो वरुण राजा आम्हांसहि बंधमुक्त करील. ( १०-२४-१२ ) तीन खांबांशीं जखडून बांधलेल्या शुनःशेपानें अदितिपुत्र वरुण राजाचा धांवा केला. विद्वान् व अजिंक्य अशा त्या वरुण राजानें त्या शुनःशेपाचे पाश शिथिल करून त्यास बंधमुक्त केलें ! ( १-२४-१३ ). हे वरुण देवा ! नमस्कारमंत्रांनीं व हविरन्नदानांनी आम्हांवर तुझी अवकृपा न व्हावी म्हणून आम्ही तुझी प्रार्थना करीत आहों. हे बलवंता ! हे बुद्धिमंता ! हे वरुण राजा ! या आमच्या यज्ञानुष्ठानांत हजर राहून, तूं आम्हीं केलेल्या पातकांचा अंत करून, आम्हांस बंधमुक्त कर ! ( १-२४-१४ ). हे वरुण राजा ! तूं आमचा वरचा पाश शिथिल कर ! मधला पाश शिथिल कर ! खालचा पाशहि शिथिल कर ! हे अदितिपुत्र वरुण देवा ! आम्हीं तुझ्या व्रतांत अनुरक्त राहून निष्पाप होऊं व उत्कर्षाप्रत जाऊं असें घडो ! ( १-२४-१५ )

## रत्न २१ वें

हे वरुण देवा ! ही माझी प्रार्थना ऐक आणि मला आज रोजीं सुखी कर ! तुझ्या कृपाछत्राची इच्छा धरून मी तुझ्याजवळ ही प्रार्थना करीत आहे. ( १-२५-१९ )

त्वं विश्वस्य मेधिर दिवश्च ग्मश्च राजसि ।
स यामनि प्रति श्रुधि ॥१-२५-२०॥
उदुत्तमं मुमुग्धि नो वि पाशं मध्यमं चृत ।
अवाधमानि जीवसे ॥ १-२५-२१ ॥

## रत्न २२ वें

**शुनःशेप ऋषि, देव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

नमो महद्भ्यो नमो अर्भकेभ्यो नमो युवभ्यो नम आशिनेभ्यः ।
यजाम देवान्यदि शक्नवाम मा ज्यायसः शंसमा वृक्षि देवाः ॥
॥ १-२७-१३ ॥

**श्रौ. वि. (दर्श) जप** **स्मा. वि. देव-नमस्कार; मंत्र-पुष्पांजलि**

## रत्न २३ वें

**हिरण्यस्तूप आंगिरस-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद**

त्वमग्ने प्रथमो अङ्गिरा ऋषिर्देवो देवानामभवः शिवः सखा ।
तव व्रते कवयो विद्मनापसोऽजायन्त मरुतो भ्राजदृष्टयः ॥
॥ १-३१-१ ॥

त्वं तमग्ने अमृतत्व उत्तमे मर्तं दधासि श्रवसे दिवेदिवे ।
यस्तातृषाण उभयाय जन्मने मयः कृणोषि प्रय आ च सूरये ॥
॥ १-३१-७ ॥

त्वं नो अग्ने तव देव पायुभिर्मघोनो रक्ष तन्वश्च वन्द्य ।
त्राता तोकस्य तनये गवामस्यनिमेषं रक्षमाणस्तव व्रते ॥
॥ १-३१-१२ ॥

**श्रौ. वि. प्रातरनुवाक;** **स्मा. वि. अग्नि-प्रीत्यर्थ हवन**

हे प्रबुद्ध वरुण देवा ! पृथ्वी आणि स्वर्ग यांमध्यें प्रकाशणारा असा तूं एकटाच आहेस. तर हे देवा ! आमचें रक्षण करण्याबद्दल तूं क्षेमेच्छु आम्हांस अभयदानवजा प्रत्युत्तर दे. ( १-२५-२० ) हे वरुण देवा ! आम्हीं दीर्घकाल जगावें, एतदर्थ तूं आमचे वरच्या बाजूचे पाश सैल कर ! मधल्या बाजूचे पाश सैल कर ! आणि खालच्या बाजूचे पाशहि सैल करून टाक ! ( १-२५-२१ )

## रत्न २२ वें

माझा थोरांना नमस्कार असो ! लहानांना नमस्कार असो ! तरुणांना आणि तसेंच वृद्धांनाहि माझा नमस्कार असो ! आमच्या शक्त्यनुसार आम्ही देवांचें भजन करूं. जे थोर देव आहेत त्यांच्या स्तुतीचा लोप आम्हीं केव्हांहि होऊं देणार नाहीं. ( १-२७-१२ )

## रत्न २३ वें

हे अग्नि देवा ! तूं सर्व अंगिरसामध्यें पहिला अंगिरा ऋषि आहेस. स्वतः देव असून इतर देवांचा तूं कल्याणकारक सखाहि पण आहेस. तुझ्या व्रतांत मेधावी, कुशल, तेजस्वी शस्त्रें धारण करणारे असे मरुत् उत्पन्न झाले. ( १०-३१-१ ) हे अग्नि देवा ! तुझी सेवा करणाऱ्या यजमानास तूं प्रतिरोजीं अन्न देऊन त्याला श्रेष्ठ अमरपदीं धारण करतोस. आणि जो यजमान पुत्रपौत्रादि द्विपाद प्राण्यांविषयीं व अश्वगवादि चतुष्पाद प्राण्यांविषयीं इच्छा धरून असतो त्या यजमानाला सुख व अन्न या दोहोंचाहि लाभ करून देतोस. ( १०-३१-७ ) हे वंदनीय अग्नि देवा ! तुझ्या उपासकाचें शरीर तूं आपल्या संरक्षक शक्तीच्या योगानें रक्षण कर ! तुझ्या व्रतानुष्ठानांत रत असणारे जे आम्हीं, त्या आमच्या पुत्रपौत्रादिकांचें व गायीगुरांचेंहि न विसंबतां रक्षण कर ! ( १-३१-१२ )

## रत्न २४ वें

**हिरण्यस्तूप आंगिरस-ऋषि, सविता-देवता, त्रिष्टुप्-छंद**

आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च ।
हिरण्ययेन सविता रथेनाऽऽ देवो याति भुवनानि पश्यन् ॥
॥ १-३५-२ ॥

**श्रौ. वि. (अभिप्लव षडह) वैश्वदेवशस्त्र स्मावि. सूर्य-अर्घ्यदान; शांतिपाठ**

ये ते पन्थाः सवितः पूर्व्यासोऽरेणवः सुकृता अन्तरिक्षे ।
तेभिर्नो अद्य पथिभिः सुगेभी रक्षा च नो अधि च ब्रूहि देव ॥
॥ १-३५-११ ॥

## रत्न २५ वें

**कण्व घौर-ऋषि, ब्रह्मणस्पति-देवता, प्रगाथ-छंद**

उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते देवयन्तस्त्वेमहे ।
उप प्र यन्तु मरुतः सुदानव इन्द्र प्राशूर्भवा सचा ॥ १-४०-१ ॥

**श्रौ वि. (प्रवर्ग्य).अभिष्टव. स्मा. वि. देवकोत्थापन**

त्वामिद्धि सहसस्पुत्र मर्त्य उपब्रूते धने हिते ।
सुवीर्यं मरुत आ स्वश्व्यं दधीत यो व आचके ॥ १-४०-२ ॥
प्रैतु ब्रह्मणस्पतिः प्र देव्येतु सूनृता ।
अच्छा वीरं नर्यं पङ्क्तिराधसं देवा यज्ञं नयन्तु नः ॥ १-४०-३ ॥

**श्रौ. वि. अग्निषोमीयप्रणयन, प्रवर्ग्य.**

यो वाघते ददाति सूनरं वसु स धत्ते अक्षिति श्रवः ।
तस्मा इळां सुवीरामा यजामहे सुप्रतूर्तिमनेहसम् ॥१-४०-४॥
प्र नूनं ब्रह्मणस्पतिर्मन्त्रं वदत्युक्थ्यम् ।
यस्मिन्निन्द्रो वरुणो मित्रो अर्यमा देवा ओकांसि चक्रिरे ॥
॥ १-४०-५ ॥

## रत्न २४ वें

अंधकारमय अशा अंतरिक्ष लोकांतून पुनःपुनः भ्रमण करीत, देव आणि मनुष्य यांना त्यांच्या त्यांच्या जागीं स्थिर करीत, कोण पुण्य करतात व कोण पाप करतात याचा छडा घेत, भगवान सूर्यदेव हा सुवर्णाच्या रथांत बसून आमच्याकडे येतो. ( १-३५-२ ) हे सवितृ देवा ! तुझे जे पूर्वसिद्ध व धूलिरहित असे आकाशांतील उत्तम मार्ग आहेत, त्या सुगम मार्गांनीं येथें येऊन, तूं आमचें रक्षण कर ! आणि त्याचप्रमाणें आमची देवांमध्यें जाऊन प्रशंसा कर ! ( १-३५-११ )

## रत्न २५ वें

हे ब्रह्मणस्पति देवा ! तूं आतां ऊठ ! देवोपासक जे आम्ही ते तुझी प्रार्थना करीत आहों. उदार असे मरुत् देवहि तुझ्या समीपच राहोत. हे इंद्र देवा ! बृहस्पतीबरोबर तूंहि सोमपान करणारा हो ! ( १-४०-१ ) हे शक्तिपुत्रा ! हे ब्रह्मणस्पते ! युद्धांत शत्रूनें टाकून दिलेल्या धनाच्या लाभार्थ मनुष्य तुझेंच स्तुतिस्तोत्र गातो. हे मरुत् हो ! जो भक्त तुमची प्रार्थना करितो, त्याला उत्तम वीर्यवान पुत्र व सुंदर घोडे यांचा लाभ होईल असें करा ! ( १-४०-२ ) ब्रह्मणस्पति आम्हांकडे येवो ! प्रियसत्यरूप वाग्देवता आम्हांकडे येवो ! देव आमच्या शत्रूला दूर पिटाळून देऊन, मनुष्यांना हितकर व पंच हवींनी समृद्ध असा जो हा यज्ञ त्या आमच्या यज्ञांत हजर राहून तो यथासांग पार पाडोत ! (१-४०-३) जो यजमान ऋत्विजाला उत्तम धन देतो त्याला ब्रह्मणस्पतीच्या प्रसादानें अक्षय असा अन्नलाभ होतो. त्या यजमानासाठी आम्ही इळा देवीस हविर्भाग अर्पण करतों. ही इळा देवी म्हणजे उत्तम वीरभटांनीं युक्त असून, शत्रूंचा फडशा पाडणारी आहे. तिला मात्र हिंसा करावयास कोणीच समर्थ नाहीं. ( १-४०-४ ) ब्रह्मणस्पतिदेव उक्थ्यसंज्ञक मंत्र होतृमुखांत राहून अवश्य म्हणतो, कीं ज्या मंत्रांत इन्द्र, वरुण, मित्र, अर्यमा व इतर देव हे सर्व निवास करून राहिले आहेत. ( १-४०-५ )

तमिद्वोचेमा विदथेषु शंभुवं मन्त्रं देवा अनेहसम् ।
इमां च वाचं प्रतिहर्यथा नरो विश्वेद्वामा वो अश्नवत् ॥ १-४०-६ ॥
को देवयन्तमश्नवज्जनं को वृक्तबर्हिषम् ।
प्रप्र दाश्वान्पस्त्याभिरस्थिताऽन्तर्वावत्क्षयं दधे ॥ १-४०-७ ॥
उप क्षत्रं पृञ्चीत हन्ति राजभिर्भये चित्सुक्षितिं दधे ।
नास्य वर्ता न तरुता महाधने नार्भे अस्ति वज्रिणः ॥ १-४०-८ ॥

## रत्न २६ वें

**कण्व घौर-ऋषि, रुद्र-देवता, गायत्री-छंद**

कद्रुद्राय प्रचेतसे मीळ्हुष्टमाय तव्यसे ।
वोचेम शंतमं हृदे ॥ १-४३-१ ॥
यथा नो अदितिः करत्पश्वे नृभ्यो यथा गवे ।
यथा तोकाय रुद्रियम् ॥ १-४३-२ ॥

**श्रौ. वि. (रुद्रयज्ञ) दिगुपस्थान.**

## रत्न २७ वें

**कण्व घौर-ऋषि, मित्र। वरुण-देवता, गायत्री छंद**

यथा नो मित्रो वरुणो यथा रुद्रश्चिकेतति ।
यथा विश्वे सजोषसः ॥ १-४३-३ ॥

**श्रौ. वि. ( रुद्रयज्ञ ) दिगुपस्थान.**

## रत्न २८ वें

**कण्व घौर-ऋषि, रुद्र-देवता, गायत्री छंद**

गाथपतिं मेधपतिं रुद्रं जलाषभेषजम् ।
तच्छंयोः सुम्नमीमहे ॥ १-४३-४ ॥

अहो देवांनो ! आम्ही ऋत्विज झालों तरी तोच कल्याणकारक व निर्दोष मंत्र यज्ञसमारंभांत म्हणत जाऊं. हे नायकहो ! तुम्हांला हा मंत्र जर ऐकावासा वाटला तर आम्हीं जें काय म्हणूं तें सर्व तुम्हांप्रत येऊन पोंचो. ( १-४०-६ ) जो देवभक्त आहे, त्याची ब्रह्मणस्पतिव्यतिरिक्त कोण बरोबरी करूं शकेल ! यज्ञकृत्यांत दर्भ पसरणाऱ्या यजमानाची तरी कोण बरोबरी करूं शकेल ? हवि अर्पण केलेला यजमान हा ऋत्विजप्रभृति अनेक मनुष्य-परिवारांनीं वेष्टित असून, त्याला पुत्रपौत्रादिकांनीं युक्त व धनधान्यादिकांनीं समृद्ध असें भरीव घरदार लाभतें. ( १-४०-७ ) ब्रह्मणस्पति सर्व सामर्थ्य आपल्यांतच केन्द्रित करतो. आणि मग वरुणादिकांच्या सहाय्यानें शत्रूंचा धुव्वा उडवून देतो. पेंचप्रसंगीं आपल्या निवासस्थानाचा दृढ आश्रय करून राहतो. तो वज्रधारी असल्यामुळें त्या ब्रह्मणस्पतीला लहानशा चकमकींत काय अथवा मोठ्या संग्रामांत काय तोंड देऊन पुढें उभें राह-ण्यास कोणीच समर्थ होत नाहीं. ( १-४०-८ )

### रत्न २६ वें

जो परमज्ञानी, अभीष्ट वस्तूंचा वर्षाव करणारा, व महापराक्रमशाली आहे, अशा त्या हृदयस्थ रुद्र देवाप्रीत्यर्थ अत्यंत सुखकारक असें स्तोत्र केव्हां गाइलें असतां तें त्याच्या मनाला अत्यंत आल्हादप्रद होईल ! ( १-४३-१ ) असें कोणतें स्तोत्र गाइलें असतां अदिति देवी, आमच्या पशूंस, आमच्या माणसांस, आमच्या गायींस, आणि आमच्या पुत्रपौत्रांस त्या रुद्र देवाचा मंगल प्रसाद मिळवून देईल ! ( १-४३-२ )

### रत्न २७ वें

तसेंच ज्या स्तोत्रद्वारा मित्र, वरुण व रुद्र आणि सर्व देव हे संतुष्ट होऊन आम्हांकडे कृपादृष्टीनें पाहतील ! ( १-४३-३ )

### रत्न २८ वें

स्तोत्राचा स्वामी, यज्ञाचा पालक व सुखकर औषधाचा मालक, असा जो रुद्र देव, त्याचेजवळ बृहस्पति पुत्र जो शंयु, त्याचें जें सकलजन-हितकारी सुख, त्याची आम्ही याचना करतों. ( १-४३-४ )

यः शुक्र इ॑व सूर्यो॒ हिर॑ण्यमिव॒ रोच॑ते ।
श्रेष्ठो॑ दे॒वाना॒ं वसु॑ः ॥ १-४३-५ ॥
शं नः॑ कर॒त्यर्व॑ते सु॒गं मे॒षाय॑ मे॒ष्ये॑ ।
नृभ्यो॒ नारि॑भ्यो॒ गवे॑ ॥ १-४३-६ ॥
श्रौ. वि. (रुद्रयज्ञ) दिगुपस्थान.

## रत्न २९ वें

**कण्व घौर-ऋषि, सोम-देवता, गायत्री छंद**

अ॒स्मे सो॑म॒ श्रिय॒मधि॒ नि धे॑हि श॒तस्य॑ नृ॒णाम् ।
महि॒ श्रव॑स्तुविनृ॒म्णम् ॥ १-४३-७ ॥
मा नः॑ सोम परि॒बाधो॒ मारा॑तयो जुहुरन्त ।
आ न॑ इन्दो॒ वाजे॑ भज ॥ १-४३-८ ॥
श्रौ. वि. (रुद्रयज्ञ) दिगुपस्थान.

## रत्न ३० वें

**कण्व घौर-ऋषि, सोम देवता, अनुष्टुप्-छंद**

यास्ते॑ प्र॒जा अ॒मृत॑स्य॒ पर॑स्मि॒न्धाम॑न्नृ॒तस्य॑ ।
मू॒र्धा नाभा॑ सोम वेन आ॒भूष॑न्तीः सोम वेदः ॥ १-४३-९ ॥
श्रौ. वि. (रुद्रयज्ञ) दिगुपस्थान.

## रत्न ३१ वें

**प्रस्कण्व काण्व-ऋषि, सूर्य-देवता, गायत्री-छंद**

उदु॒ त्यं जा॒तवे॑दसं दे॒वं व॑हन्ति के॒तव॑ः ।
दृ॒शे विश्वा॑य॒ सूर्य॑म् ॥ १-५०-१ ॥
अप॒ त्ये ता॒यवो॑ यथा॒ नक्ष॑त्रा यन्त्य॒क्तुभि॑ः ।
सूरा॑य वि॒श्वच॑क्षसे ॥ १-५०-२ ॥

जो सूर्याप्रमाणें तेजस्वी व सुवर्णाप्रमाणें प्रिय आहे तो रुद्र देव सर्व देवांमध्यें श्रेष्ठ असून आम्हांस राहण्यास घर देणारा आहे. ( १-४३-५) तो लोक-विख्यात रुद्र देव आमच्या घोड्यांला, मेंढ्यांला, मेंढीला, पुरुषांना, स्त्रियांना व गाईंना सुख देणारा आहे. ( १-४३-६ )

## रत्न २९ वें

हे सोमदेवा ! शंभर पुरुषांना म्हणजे पुष्कळ लोकांना पुरेल एवढी संपत्ति व तसेंच अत्यंत बलवर्धक अन्न आम्हांस प्राप्त होईल असें कर ! ( १-४३-७ ) जे यज्ञयागद्वेष्टे आहेत ते आम्हांस बाधा न करोत ! तसेंच आमचे जे शत्रू आहेत तेहि पण आम्हांस पीडा न देवोत ! हे इंदो ! आम्हांस अन्न देऊन तूं आमची भरभराट कर ! ( १-४३-८ )

## रत्न ३० वें

हे सोमदेवा ! तूं अमर आहेस. सत्य लोकाच्या श्रेष्ठ स्थानावर तूं रहात आहेस. तुझे जे भक्तजन, त्यांना पोटाशीं धरलें आहेस. आणि म्हणून यज्ञगृहांत तूं त्यांच्या शिरोभागीं असल्यामुळें, ते तुला पुण्य-कर्मांनीं पूजित असल्याचें तूं पाहतच असतोस. ( १-४३-९ )

## रत्न ३१ वें

सर्व जगाला सूर्य देवाचें दर्शन घडावें म्हणून लोक-प्रसिद्ध, जातधन, व तेजस्वी अशा त्या देवाला त्याचे किरण वर अंतरिक्षांतून वाहून घेऊन येतात. ( १-५०-१ ) सर्व जगाला पाहणाऱ्या सूर्य देवाचा उदय झाला म्हणजे नक्षत्रें व रात्र चोराप्रमाणें तोंड काळें करतात. ( १-५०-२ )

अदृश्रमस्य केतवो वि रश्मयो जनाँ अनु ।
भ्राजन्तो अग्नयो यथा ॥ १-५०-३ ॥
तरणिर्विश्वदर्शतो ज्योतिष्कृदसि सूर्य ।
विश्वमा भासि रोचनम् ॥ १-५०-४ ॥
प्रत्यङ् देवानां विशः प्रत्यङ्ङुदेषि मानुषान् ।
प्रत्यङ् विश्वं स्वर्दृशे ॥ १-५०-५ ॥
येना पावक चक्षसा भुरण्यन्तं जनाँ अनु ।
त्वं वरुण पश्यसि ॥ १-५०-६ ॥
वि द्यामेषि रजस्पृथ्वहा मिमानो अक्तुभिः ।
पश्यञ्जन्मानि सूर्य ॥ १-५०-७ ॥
सप्त त्वा हरितो रथे वहन्ति देव सूर्य ।
शोचिष्केशं विचक्षण ॥ १-५०-८ ॥
अयुक्त सप्त शुन्ध्युवः सूरो रथस्य नप्त्यः ।
ताभिर्याति स्वयुक्तिभिः ॥ १-५०-९ ॥

**श्रौ. वि. (सूर्यक्रतु) आश्विन शस्त्र.** **स्मा. वि. सौरजप; सूर्योपस्थान**

## रत्न ३२ वें

**प्रस्कण्व-ऋषि, सूर्य-देवता, अनुष्टुप्-छन्द**

उद्वयं तमसस्परि ज्योतिष्पश्यन्त उत्तरम् ।
देवं देवत्रा सूर्यमगन्म ज्योतिरुत्तमम् ॥ १-५०-१० ॥

**श्रौ. वि. अवभृत; (पत्नीसंयाज)** **स्मा. वि. सूर्योपस्थान**

उद्यन्नद्य मित्रमह आरोहन्नुत्तरां दिवम् ।
हृद्रोगं मम सूर्य हरिमाणं च नाशय ॥ १-५०-११ ॥

**श्रौ. वि. रोगघ्न-उपनिषत्;** **स्मा. वि. रोगनाशकमंत्र. विषघ्न मंत्र**

या सूर्य देवाचे तेजस्वी किरण तेजःपुंज अग्नीप्रमाणें सर्व जग प्रकाशित करतात. ( १-५०-३ ). हे सूर्य देवा ! तूं आकाशमार्गातून जलद गमन करणारा आहेस. तसाच तूं सर्व जगाला दर्शनीय आहेस. तूं प्रकाशाचा जनक असून, सर्व अंतरिक्ष प्रकाशित करतोस. ( १-५०-४ ) मरुत् प्रभृति देवांस, मनुष्यांस व स्वर्गवासी जनांस तुझें दर्शन घडेल अशा रीतीनें तूं सर्वांस सामोरा होऊन उदय पावतोस. ( १-५०-५ ) हे विश्व-पावना ! हे अनिष्ट-निवारक सूर्य देवा ! अखिल प्राणिजाताला धारण करणाऱ्या या मर्त्यलोकाला तूं ज्या प्रकाशानें प्रकाशित करतोस त्या प्रकाशाचें आम्ही स्तवन करतों. ( १-५०-६ ) हे सूर्य देवा ! विस्तीर्ण अशा अंतरिक्षांतून तूं संचार करणारा आहेस. दिवस आणि रात्र यांना तूंच उत्पन्न करतोस. सर्व जगाला पाहणाराहि पण तूंच आहेस ! ( १-५०-७ ) हे सर्वसाक्षी सूर्य देवा ! केंससदृश किरण असलेला जो तूं त्या तुझा रथ रक्तवर्णाचे सात घोडे वाहून घेऊन जात असतात. ( १-५०-८ ) सूर्य देव हा आपला रथ खालीं न पाडतील अशा सात अश्वस्त्रियांना आपल्या रथास जुंपत असतो. याचें कारण हें कीं, या अश्वस्त्रिया रथाचें जूं आपण होऊनच मानेवर घेत असतात. म्हणून अशा घोड्या आपल्या रथास जुंपून तो देव भक्तजनांच्या यज्ञगृहाकडे येत असतो. ( १-५०-९ )

## रत्न ३२ वें

उत्कृष्ट अशा स्वर्गलोकाचें दर्शन घेऊं इच्छिणारे आम्ही अंधकारमय अशा या मर्त्यलोकांतून निघून वर आलों आहों. आणि देवलोकांतील अत्यंत श्रेष्ठ व तेजःपुंज असा जो सूर्य देव, त्या देवाप्रत प्राप्त झालों आहों. ( १-५०-१० ) हे सूर्य देवा ! हे मंगल तेजा ! आज तूं उदय पावून व आकाशावर आरोहण करून माझा हृद्रोग व कावीळ यांचा नाश कर ! ( १-५०-११ )

शुकेषु मे हरिमाणं रोपणाकासु दध्मसि ।
अथो हारिद्रवेषु मे हरिमाणं नि दध्मसि ॥ १-५०-१२ ॥
उदगादयमादित्यो विश्वेन सहसा सह ।
द्विषन्तं मह्यं रन्धयन्मो अहं द्विषते रधम् ॥ १-५०-१३ ॥

**श्रौ. वि. १ रोगघ्न उपनिषत्.      स्मा. वि. रोगनाशक मंत्र; विषघ्न मंत्र**

## रत्न ३३ वें

**पराशर शाक्त्य-ऋषि, अग्नि-देवता, द्विपदा विराट-छंद**

शुक्रः शुशुक्वाँ उषो न जारः पप्रा समीची दिवो न ज्योतिः ।
परि प्रजातः क्रत्वा बभूथ भुवो देवानां पिता पुत्रः सन् १-६९-१ ॥

## रत्न ३४ वें

**पराशर शाक्त्य-ऋषि, अग्नि-देवता, द्विपदा विराट-छंद**

गर्भो यो अपां गर्भो वनानां गर्भश्च स्थातां गर्भश्चरथाम् ॥
अद्रौ चिदस्मा अन्तर्दुरोणे विशां न विश्वो अमृतः स्वाधीः ॥
॥ १-७०-२ ॥

## रत्न ३५ वें

**गोतम राहूगण-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

एत्वग्न इह होता नि षीदादब्धः सु पुरएता भवा नः ।
अवतां त्वा रोदसी विश्वमिन्वे यजा महे सौमनसाय देवान् ॥
॥ १-७६-२ ॥

**श्रौ वि. (अग्नि) प्रातरनुवाक;      स्मा. वि. वैश्वदेव (अग्नि) आवाहन**

प्र सु विश्वान्रक्षसो धक्ष्यग्ने भवा यज्ञानामभिशस्तिपावा ।
अथा वह सोमपतिं हरिभ्यामातिथ्यमस्मै चकृमा सुदाव्ने ॥
॥ १-७६-३ ॥

माझी कावीळ मी पोपटावर व रोपणका पक्ष्यावर ठेवून देतों. आणि तसेंच हरिद्रव वृक्षावरहि स्थापन करतों. ( १-५०-१२ ) हा समोर दिसणारा अदितिपुत्र जो सूर्य नारायण, तो आपल्या सर्व सामर्थ्यासह उदय पावला आहे. तो मला छळणाऱ्या रोगाचा नाश करणारा आहे. म्हणून मी उपद्रव करणाऱ्या रोगाची हिंसा करीत नाहीं. ( १-५०-१३ )

### रत्न ३३ वें

उषेच्या प्रियकराप्रमाणें अग्निदेव हा वीर्यवान व देदीप्यमान असून, तो स्वर्गातील सूर्याप्रमाणें द्यावापृथ्वींना आपल्या तेजानें भरून काढतो. जन्मल्या-बरोबर, हे अग्निदेवा ! तूं आपल्या प्रकाशानें सर्व जग व्यापून सोडतोस. तूं देवाचा पुत्र असून त्यांचा पालकहि पण झाला आहेस. ( १-६९-१ )

### रत्न ३४ वें

जो उदकांच्या पोटांत, वृक्षांच्या पोटांत, चराचरांच्या पोटांत आणि तसेंच पर्वतांच्या पोटांतहि असतो, त्या अग्निदेवाला घरामध्यें स्थापन करा ! राजाप्रमाणें सर्व लोकांचा तो एकटाच हित-कर्ता असून, अमर आहे. ( १-७०-२ ) जो या अग्निदेवास उत्तम स्तोत्र गाऊन त्याची चांगली स्तुति करतो, त्याला तो रात्रीचा नाथ उत्तम धन देतो. हे सुज्ञ अग्निदेवा ! तूं देव आणि तसेंच आम्हीं मर्त्यजन यांस जाणतच आहेस. तर हे देवा ! या भूमीवरील आमच्या गृहादिकांचें रक्षण कर ! ( १-७०-३ )

### रत्न ३५ वें

हे अग्निदेवा ! आम्हांकडे ये ! हे देवांना बोलावून आणणाऱ्या देवा ! येथें बैस. अहिंसित असा तूं आमचा पुढारी हो ! सर्वव्यापक द्यावापृथ्वी तुझें रक्षण करोत ! आम्हांवर देवांचा अनुग्रह व्हावा म्हणून तूं त्यांना हवि अर्पण करून, त्यांचा सत्कार कर ! (१-७६-२) हे अग्निदेवा ! तूं सर्व राक्षसांना जाळून खाक कर ! आणि आमच्या यज्ञाचें हिंसेपासून रक्षण करणारा हो ! आणि मग सोमपालक जो इन्द्र त्या देवाला हरिद्वर्ण घोड्यांसह येथें घेऊन ये. त्या उदार, दानशूरासाठीं आम्हीं आदरातिथ्याची उत्तम तयारी केली आहे. ( १-७६-३ )

## रत्न ३६ वें

**गोतम राहूगण-ऋषि, इन्द्र-,देवता पंक्ति-छंद**

उपो षु शृणुही गिरो मघवन्मातथा इव ।
यदा नः सूनृतावतः कर आदर्थयास इद्योजा न्विन्द्र ते हरी ॥
॥ १-८२-१ ॥

**श्रौ. वि. (षोडशी). षोडशिशस्त्र**

अक्षन्नमीमदन्त ह्यव प्रिया अधूषत । अस्तोषत स्वभानवो विप्रा नविष्ठया मती योजा न्विन्द्र ते हरी ॥ १-८२-२ ॥

**श्रौ. वि. (षोडशी शस्त्रः)** **स्मा. वि. अक्षतासमर्पण.**

सुसंदृशं त्वा वयं मघवन्वन्दिषीमहि ।
प्र नूनं पूर्णवन्धुरः स्तुतो याहि वशाँ अनु योजा न्विन्द्र ते हरी॥
॥ १-८२-३ ॥

**श्रौ. वि. (महापितृ यज्ञ). आहवनीय उपस्थान.**

## रत्न ३७ वें

**गोतम राहूगण-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद**

आ नो भद्राः क्रतवो यन्तु विश्वतोऽदब्धासो अपरीतास उद्भिदः।
देवा नो यथा सदमिद्वृधे असन्नप्रायुवो रक्षितारो दिवेदिवे ॥
॥ १-८९-१ ॥

**श्रौ. वि. (अग्नि) वैश्वदेव शस्त्र; स्मा. वि. शांतिपाठ; रात्रिसूक्त.**

देवानां भद्रा सुमतिर्ऋजूयतां देवानां रातिरभि नो नि वर्तताम् ।
देवानां सख्यमुप सेदिमा वयं देवा न आयुः प्र तिरन्तु जीवसे ॥
॥ १-८९-२ ॥

तान्पूर्वया निविदा हूमहे वयं भगं मित्रमदितिं दक्षमस्त्रिधम् ।
अर्यमणं वरुणं सोममश्विना सरस्वती नः सुभगा मयस्करत् ॥
॥ १-८९-३ ॥

## रत्न ३६ वें

हे धनवान इन्द्रदेवा ! तूं येथें येऊन आमची स्तुति मनःपूर्वक ऐक. विपरीत भाव धरूं नकोस. तूं आम्हांस गोड व सत्य अशी सुंदर वाणी दिली आहेस. त्या वाणीनें आम्हीं केलेली तुझी स्तुति तूं ग्रहण कर. हे देवा ! तूं आतां आपले घोडे सत्वर रथाला जोड ना ? (१-८२-१) हे इन्द्रदेवा ! तूं दिलेल्या अन्नाचें प्रसाद म्हणून भक्षण करून आमच्या-सारखे तुझे भक्तजन तृप्त झाले आहेत आणि हर्षनिर्भर होऊन नाचूं लागले आहेत ! स्वतःच्या प्रतिभातेजानें चमकत असलेले विप्रश्रेष्ठ तुझें नव्या स्तोत्रानें स्तवन करीत आहेत. करितां, हे देवा, तूं आपले घोडे लवकर जुंप. ( १-८२-२ ) हे धनवंता ! सर्वांवर कृपादृष्टीनें पाहणाऱ्या तुला आम्ही वंदन करीत आहों. तर, हे इन्द्रदेवा ! आम्हांकडून स्तविला गेलेला असा तूं तुझी भक्ति करणाऱ्या यजमानांसाठीं धनानें भरलेल्या रथांत बसून जरूर इकडे ये. आणि यासाठीं तूं आपले घोडे सत्वर जोड. ( १-८२-३ )

## रत्न ३७ वें

कल्याणकारक, अखंडित, विघ्नरहित, अप्रतिरुद्ध, शत्रुभेदक असे महायज्ञ सर्व बाजूंनीं आम्हांकडे प्राप्त होवोत ! तें असें कीं देव आम्हांपासून विन्मुख न होतां दिवसेंदिवस आमचें रक्षण करणारे आणि आमची अभिवृद्धि होण्यासाठीं म्हणून सदैव आमचेजवळ राहणारे असे होतील. ( १-८९-१ ) सन्मार्गानें जाणाऱ्या देवांची अनुग्रह-बुद्धि आम्हांस अभिमुख होवो ! देवांचें दान फल-रूपानें आम्हांस अभिमुख होवो ! आम्हीं देवांची मैत्री संपादन करूं ! दीर्घकाल जगण्यासाठीं देव आमचें आयुष्य वर्धन करोत ! ( १-८९-२ ) जगविख्यात अशा त्या सत्यनिष्ठ भग, मित्र, अदिति, प्रजापति, मरुद्गण, अर्यमा, वरुण, सोम, अश्विनीकुमार, प्रभृति सर्व देवांना प्राचीन वेद मंत्रानें आम्ही आव्हान करतों. ( १-८९-३ )

तन्नो वातो मयोभु वातु भेषजं तन्माता पृथिवी तत्पिता द्यौः ।
तद् ग्रावाणः सोमसुतो मयोभुवस्तदश्विना शृणुतं धिष्ण्या युवम् ॥
॥ १-८९-४ ॥

तमीशानं जगतस्तस्थुषस्पतिं धियंजिन्वमवसे हूमहे वयम् । पूषा
नो यथा वेदसामसद्वृधे रक्षिता पायुरदब्धः स्वस्तये ॥ १-८९-५ ॥

**औ. वि. (अग्नि) वैश्वदेव शस्त्र. स्मा. वि. शांतिपाठ; रात्रिसूक्त**

## रत्न ३८ वें

**गोतम राहूगण-ऋषि, विश्वदेव-देवता, विराट्स्थाना-छंद**

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ।
स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥
॥ १-८९-६ ॥

**औ. वि. (अग्नि) वैश्वदेव शस्त्र. स्मा. वि. शांतिपाठ; पुण्याहवाचन**

## रत्न ३९ वें

**गोतम राहूगण-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद**

पृषदश्वा मरुतः पृश्निमातरः शुभंयावानो विदथेषु जग्मयः ।
अग्निजिह्वा मनवः सूरचक्षसो विश्वे नो देवा अवसा गमन्निह ॥
॥ १-८९-७ ॥

**औ. वि. (अग्नि) वैश्वदेव शस्त्र. स्मा. वि. शांतिपाठ. पुण्याहवाचन**

## रत्न ४० वें

**गोतम राहूगण-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः १-८९-८ ॥

वायुदेव आम्हांस सुख व हित होईल असें औषध देवो! माता पृथ्वी आम्हांस सुखकर व हितकर असें औषध देवो! पिता स्वर्ग आम्हांस सुखप्रद व हितप्रद असें औषध देवो! सोमनिष्कर्षक असे दगड आम्हांस सुखप्रद व हितप्रद असें औषध देवोत! हे गृहाप्रमाणें रक्षण करणाऱ्या अश्विनी देवांनो! ही वायुप्रभृतींना उद्देशून केलेली आमची प्रार्थना तुम्हींहि ऐकून ती पूर्ण करा! ( १-८९-४ ). जंगम व स्थावर सृष्टीचा पालनकर्ता व बुद्धीला संतोषविणारा असा जो इन्द्र देव त्या प्रसिद्ध इन्द्र देवाला आमच्या रक्षणार्थ आम्ही पाचारण करतों. तो देव यज्ञानुष्ठानानें प्रसन्न करण्यास योग्य आहे. जेणेंकरून पूषा देव आमची धनाभिवृद्धि व कल्याण यांचें रक्षण करणारा होईल अशा तऱ्हेनें आम्ही त्या दुर्दम्य पूषा देवासहि आव्हान करतों. ( १-८९-५ )

### रत्न ३८ वें

पुराणप्रसिद्ध इन्द्र देव आम्हांस अक्षय मंगल देवो! सकलैश्वर्यसंपन्न पूषा देव आमचें शाश्वत कल्याण करो! अखंडित पंखाचा गरुड देव आमचें उदंड क्षेम करो! आणि देवगुरु बृहस्पति आम्हांस अक्षय्य सौख्य देवो! ( १-८९-६ )

### रत्न ३९ वें

पांढऱ्या ठिपक्याचे घोडे ज्यांचे आहेत, अदिति ही ज्यांची माता आहे, जे शुभमार्गानें जाणारे आहेत, यज्ञगृहाकडे जे नेहमीं येत जात असतात, अग्नि हा ज्यांच्या जिव्हास्थानीं आहे, जे सर्वज्ञ आहेत, जे सूर्याप्रमाणें तेजस्वी आहेत, असे मरुत् देव व तसेंच इतर सर्वहि देव हविरन्न-ग्रहणार्थ या आमच्या यज्ञमंडपांत उपस्थित होवोत. ( १-८९-७ )

### रत्न ४० वें

अहो देव हो! तुमच्या अनुग्रहानें आम्हीं कानांनीं शुभ गोष्टीच ऐकत असावें! अहो भक्तपालकांनो! डोळ्यांनीं आम्हीं शुभच पाहत असावें! सुदृढ अशा हस्तपादादि अवयवांनीं व भार्या पुत्रादिकांनीं युक्त होत्साते, तुमचें स्तवन करीत देवांनीं मनुष्यास दिलेल्या संपूर्ण आयुष्याचा आम्हीं सुखानें उपभोग घेत राहूं असें घडो! ( १-८९-८ ).

**श्रौ. वि. (अग्नि) वैश्वदेव शस्त्र. स्मा. वि. शांतिपाठ. पुण्याहवाचन.**

शतमिन्नु शरदो अन्ति देवा यत्रा नश्चक्रा जरसं तनूनाम् ।
पुत्रासो यत्र पितरो भवन्ति मा नो मध्या रीरिषतायुर्गन्तोः ॥
॥ १-८९-९ ॥

**श्रौ. वि. (अग्नि) वैश्वदेव शस्त्र. स्मा. वि. शांतिपाठ.**

अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षमदितिर्माता स पिता स पुत्रः ।
विश्वे देवा अदितिः पञ्च जना अदितिर्जातमदितिर्जनित्वम् ॥
॥ १-८९-१० ॥

**श्रौ. वि. (पशु) याज्या. स्मा. वि. दक्षस्थापन.**

## रत्न ४१ वें

**गोतम राहूगण-ऋषि, विश्वेदेव-देवता, गायत्री-छंद.**

मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः ।
माध्वीर्नः सन्त्वोषधीः ॥ १-९०-६ ॥

**श्रौ वि. मधुपर्क. स्मा. वि. मधुस्नान; पितृतर्पण.**

मधु नक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवं रजः ।
मधु द्यौरस्तु नः पिता ॥ १-९०-७ ॥
मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः ।
माध्वीर्गावो भवन्तु नः ॥॥ १-९०-८ ॥

**श्रौ. वि. मधुपर्क. स्मा. वि. मधुस्नान; पितृतर्पण.**

## रत्न ४२ वें

**गोतम राहूगण-ऋषि, विश्वेदेव-देवता, अनुष्टुप्-छंद.**

शं नो मित्रः शं वरुणः शं नो भवत्वर्यमा ।
शं न इन्द्रो बृहस्पतिः शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ १-९०-९ ॥

**स्मा. वि. शांतिपाठ.**

अहो देवांनो ! शंभर वर्षेपर्यंत तुम्ही आमच्याजवळ रहा. त्या शंभर वर्षांत आमच्या शरीराला वृद्ध करा ! तोंपर्यंत आमचे पुत्र पुत्रवंत होवोत ! आमचें ठरलेलें आयुष्य संपेपर्यंत अकालींच त्याचें हरण करूं नका ! ( १-८९-९ )

अदिति स्वर्ग आहे. अदिति अंतरिक्ष आहे. तीच जगन्माता आहे. तीच पिता आहे. तीच पुत्र आहे. तीच सर्व देव आहे. तीच पंच-जन आहे. फार काय, हे उत्पन्न झालेले सर्व प्राणिजात आणि पुढें उत्पन्न होणारी सकल जीवसृष्टि हें सर्व पण ही अदितिच होय. (१-८९-१०)

## रत्न ४१ वें

यज्ञोपासक यजमानाप्रीत्यर्थ वायु सुखकर वाहतो. नद्या मधुर उदक देतात. ओषधि आम्हांसाठीं मधुर रस देणाऱ्या होवोत ! ( १-९०-६ )

रात्र आम्हांस सुखकर होवो ! दिवस आम्हांस क्षेमकर होवोत ! माता पृथ्वी आह्मांसाठीं मधुर रससंपन्न होवो ! पिता स्वर्ग आह्मां-करितां मधुर जल वर्षाव करो ! ( १-९०-७ )

वनस्पति आह्मांसाठीं मधुररससंपन्न होवोत ! भगवान् सूर्य देव, आह्मांस आल्हादप्रद होवो ! गायी आह्मांकरितां मधुर दूध देणाऱ्या होवोत ! ( १-९०-८ )

## रत्न ४२ वें

मित्र देव आम्हांस क्षेमकर होवो ! वरुण देव आह्मांस क्षेमकर होवो ! अर्यमा देव आह्मांस क्षेमकर होवो ! इन्द्र देव, बृहस्पति देव आणि विशालपादाचा विष्णु देव हे सर्व आह्मांस क्षेमकर होवोत ! ( १-९०-९ )

## रत्न ४३ वें

**गोतम राहूगण-ऋषि, सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

त्वं सोम प्र चिकितो मनीषा त्वं रजिष्ठमनु नेषि पन्थाम्।
तव प्रणीती पितरो न इन्दो देवेषु रत्नमभजन्त धीराः॥ १-९१-१॥

**श्रौ. वि. ( महापितृयज्ञ ) हविरनुवाक्या**

## रत्न ४४ वें

**गोतम राहूगण-ऋषि, सोम-देवता, गायत्री-छंद**

आ प्यायस्व समेतु ते विश्वतः सोम वृष्ण्यम्।
भवा वाजस्य संगथे ॥ १-९१-१६ ॥

**श्रौ. वि. ( पत्नीसंयाज ) सोम-अनुवाक्या**

आ प्यायस्व मदिन्तम सोम विश्वेभिरंशुभिः।
भवा नः सुश्रवस्तमः सखा वृधे ॥ १-९१-१७ ॥

## रत्न ४५ वें

**गोतम राहूगण-ऋषि, सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद**

सं ते पयांसि समु यन्तु वाजाः सं वृष्ण्यान्यभिमातिषाहः।
आप्यायमानो अमृताय सोम दिवि श्रवांस्युत्तमानि धिष्व॥
॥ १-९१-१८ ॥

**श्रौ. वि. ( पत्नीसंयाज ) सोम-याज्या**

या ते धामानि हविषा यजन्ति ता ते विश्वा परिभूरस्तु यज्ञम्।
गयस्फानः प्रतरणः सुवीरोऽवीरहा प्र चरा सोम दुर्यान्॥
॥ १-९१-१९ ॥

**श्रौ. वि. सोमपशुहविर्याज्या**

सोमो धेनुं सोमो अर्वन्तमाशुं सोमो वीरं कर्मण्यं ददाति।
सादन्यं विदथ्यं सभेयं पितृश्रवणं यो ददाशदस्मै ॥ १-९१-२० ॥

**श्रौ. वि. ( महापितृयज्ञ ) सोम-अनुवाक्या**

### रत्न ४३ वें

हे सोमदेवा ! तूं आमच्या बुद्धिद्वारा पूर्णतया ज्ञात झाला आहेस. तूं आम्हांस सरळ मार्गावरून घेऊन जाणारा आहेस. आमचे बुद्धिमान् पूर्वज तुझ्या नेतृत्वाखालींच देवांमध्यें रमणीय असें अन्न प्राप्त करून घेते झाले. ( १-९१-१ )

### रत्न ४४ वें

हे सोमदेवा ! तूं वृद्धिंगत हो ! सर्व बाजूंनीं तुला वीर्य प्राप्त होवो ! आम्हांस अन्न प्राप्त करून देण्यात तूं दक्ष रहा ! ( १-९१-१६ ). हे अत्यंत आनंद देणाऱ्या सोमा ! तूं आपल्या सर्व लतावयवांनीं वृद्धिंगत हो ! उत्तम अन्नानें तूं संपन्न आहेस. तर तूं आमचा सखा हो ! आणि आमची भरभराट कर ! ( १-९१-१७ )

### रत्न ४५ वें

शत्रूंचा पाडाव करणाऱ्या सोमदेवा ! जगांतील सर्व पयोरस तुजकडे येवोत ! सर्व हविरन्न तुला प्राप्त होवो ! सर्व वीर्य तुला येऊन मिळो ! हे देवा ! याप्रमाणें तूं वृद्धिंगत होत्साता आमच्या अमरत्वासाठीं स्वर्गामध्यें उत्तम अन्न धारण कर ! ( १-९१-१८ ). हे सोमदेवा ! तुझ्या ज्या निवासस्थानांचें यजमान हवींनीं पूजन करतात तीं सर्व आमच्या यज्ञावर कृपादृष्टि करणार होवोत ! हे देवा ! आमच्या धनादिकांची वृद्धि करणारा, आमचें संकटांतून तारण करणारा, वीर संपन्न, पुत्रांना न मारणारा असा तूं आमच्या यज्ञशालेकडे ये. ( १-९१-१९ )

सोमदेव हा हवि अर्पण करणाऱ्या यजमानाला धेनु देतो, चपळ घोडा देतो, आणि त्याचप्रमाणें पराक्रमशाली, संसार-दक्ष, यज्ञपरायण, सभाप्रमुख, व आपल्या पित्याची कीर्ति वाढविणारा असा तेजस्वी पुत्र देतो ! ( १-९१-२० )

# रत्न ४६ वें

**गोतम राहूगण–ऋषि, उषा–देवता, जगती·छंद**

एता उ त्या उषसः केतुमक्रत पूर्वे अर्धे रजसो भानुमञ्जते ।
निष्कृण्वाना आयुधानीव धृष्णवः प्रति गावोऽरुषीर्यन्ति मातरः ॥
॥ १-९२-१ ॥

**श्रौ. वि. ( प्रातरनुवाक ) उषा-क्रतु स्मा. वि.–उषास्तोत्र**

उदपप्तन्नरुणा भानवो वृथा स्वायुजो अरुषीर्गा अयुक्षत ।
अक्रन्नुषासो वयुनानि पूर्वथा रुशन्तं भानुमरुषीरशिश्रयुः ॥
॥ १-९२-२ ॥

अर्चन्ति नारीरपसो न विष्टिभिः समानेन योजनेना परावतः ।
इषं वहन्तीः सुकृते सुदानवे विश्वेदह यजमानाय सुन्वते ॥
॥ १-९२-३ ॥

अधि पेशांसि वपते नृतूरिवापोर्णुते वक्ष उस्रेव बर्जहम् ।
ज्योतिर्विश्वस्मै भुवनाय कृण्वती गावो न व्रजं व्युषा आवर्तमः ॥
॥ १-९२-४ ॥

प्रत्यर्ची रुशदस्या अदर्शि वि तिष्ठते बाधते कृष्णमभ्वम् ।
स्वरुं न पेशो विदथेष्वञ्जञ् चित्रं दिवो दुहिता भानुमश्रेत् ॥
॥ १-९२-५ ॥

**श्रौ. वि. ( प्रातरनुवाक ) उषाक्रतु; स्मा. वि. उषास्तोत्र**

अतारिष्म तमसस्पारमस्योषा उच्छन्ती वयुना कृणोति ।
श्रिये छन्दो न स्मयते विभाती सुप्रतीका सौमनसायाजीगः ॥
॥ १-९२-६ ॥

## रत्न ४६ वें

त्या ह्या प्रसिद्ध उषादेवी जगावर प्रकाश उधळूं लागल्या आहेत ! अंतरिक्षांतील पूर्वार्धप्रदेशांत त्या आपलें सुंदर तेज प्रकट करीत आहेत ! योद्धे ज्याप्रमाणें आपलीं शस्त्रें घासून पुसून लखलखीत करीत असतात, तद्वत् या गमनशील माता जगावर आपलें तेज उजळीत दररोज इकडे येत असतात. ( १-९२-१ ) अहाहा ! त्यांची ती अरुण-प्रभा साहजिकच वर आकाशमंडळांत खुलून राहिली आहे ! सहज जोडतां येणाऱ्या अशा तांबूस रंगाच्या गायी त्यांनीं आपल्या रथास जोडल्या आहेत. अशा रथांत बसून पूर्वीप्रमाणें आजहि त्यांनीं सर्व प्राणिमात्रांना जागृत केलें आहे. ह्या आरक्तवर्ण उषा तेजस्वी सूर्यदेवाच्या सेवेसाठींच हजर झाल्या आहेत. ( १-९२-२ ) लढाईंतील योध्याप्रमाणें ह्या अग्रेसर उषांनीं आपला सुंदर प्रकाश एकसमयावच्छेदेंकरून आकाशांत अत्यंत दूरवर प्रसारित करून टाकला आहे ! पुण्यशील, दानशूर, व सोमरस तयार करणाऱ्या यजमानाप्रीत्यर्थ त्या दररोज अन्न घेऊन येत असतात. ( १-९२-३ ) न्हावी जसा केस कापून टाकतो तद्वत् ही उषा अंधःकाराला छिन्न करून टाकिते. नटणपटु नर्तकीप्रमाणें ही उषा झाली तरी विविध वेषभूषा धारण करते. गाय जशी आपली कांस दोहनप्रसंगीं उघडी करते, तद्वत् ही उषा आपलें वक्षःस्थल सर्वांस दिसेल अशा तऱ्हेनें अनावृत करून ठेविते. गायी जशा कुरणाकडे धांव घेतात तद्वत् ही उषा पूर्वेकडे धांवून आली असून, तिनें अंधःकाराचा पार फडशा करून टाकला आहे. ( १-९२-४ ) हिचा तेजःपुंज प्रकाश प्रथम पूर्वेकडे उजळूं लागतो. आणि मग तो पुढें पुढें पसरत जाऊन काळ्याकुट्ट अंधःकारास दूर पिटाळून लावतो. ऋत्विज लोक सदोमंडपांतील खांब घृत माखून जसा विभूषित करतात तद्वत् तिनें आपलें रूप सजविलेलें आहे. ही द्युलोक-कन्या आतां तेजस्वी सूर्यदेवाच्या सेवेस उद्युक्त होत आहे.( १-९२-५ ) आम्ही अंधःकारप्रदेशांतून पार पडलों. अंधःकाराचा नाश करणारी ही उषा सर्व जगावर प्रकाश पाडून तें चैतन्ययुक्त करती झाली. या तेजस्वी उषेनें काव्य जसें सुंदर असतें तद्वत् सुंदर स्वरूप धारण केलें आहे. तिची मुखश्री निर्मल कांतीनें युक्त असल्यामुळें जणूं काय ती मंदहास्यानें विलसतच आहे ! त्या सुमधुर उषेनें आम्हांस प्रमुदित करण्या-करितां सगळा अंधःकार जसा कांहीं गट्ट करून टाकला आहे ! ( १-९२-६ )

भास्वती नेत्री सूनृतानां दिवः स्तवे दुहिता गोतमेभिः ।
प्रजावतो नृवतो अश्वबुध्यानुषो गोअग्राँ उप मासि वाजान् ॥
॥ १-९२-७ ॥

## रत्न ४७ वें

**गोतम-राहूगण-ऋषि, उषा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

उषस्तमश्यां यशसं सुवीरं दासप्रवर्गं रयिमश्वबुध्यम् ।
सुदंससा श्रवसा या विभासि वाजप्रसूता सुभगे बृहन्तम् ॥
॥ १-९२-८ ॥

**औ. वि. ( प्रातरनुवाक ) उषाक्रतु; स्मा. वि. उषास्तोत्र**

विश्वानि देवी भुवनाभिचक्ष्या प्रतीची चक्षुरुर्विया वि भाति ।
विश्वं जीवं चरसे बोधयन्ती विश्वस्य वाचमविदन्मनायोः ॥
॥ १-९२-९ ॥

पुनःपुनर्जायमाना पुराणी समानं वर्णमभि शुम्भमाना ।
श्वघ्नीव कृत्नुर्विज आमिनाना मर्तस्य देवी जरयन्त्यायुः ॥
॥ १-९२-१० ॥

व्यूर्ण्वती दिवो अन्ताँ अबोध्यप स्वसारं सनुतर्युयोति ।
प्रमिनती मनुष्या युगानि योषा जारस्य चक्षसा विभाति ॥
॥ १-९२-११ ॥

पशून्न चित्रा सुभगा प्रथाना सिन्धुर्न क्षोद उर्विया व्यश्वैत् ।
अमिनती दैव्यानि व्रतानि सूर्यस्य चेति रश्मिभिर्दृशाना ॥
॥ १-९२-१२ ॥

तेजस्वी व सत्यभाषणाची प्रणेत्री अशी ही जी द्युलोक-कन्या उषादेवी, तिचें गोतमकुलोत्पन्न ऋषींनीं स्तवन केलें. हे उषे ! आम्ही-तुझे स्तोत्रपाठक—पुत्रपौत्रादिकांनीं, दासभृत्यादिकांनीं व अश्वगवादि पशूंनीं विशिष्ट असें अन्न प्राप्त करून घेऊं असें कर ! (१-९२-७)

## रत्न ४७ वें

हे उषे ! यशोयुक्त, वीरपुत्रयुक्त, दासगणयुक्त, अश्वयुक्त अशी सुंदर संपत्ति आम्हास उपभोगावयास मिळो ! हे भाग्यशालिनि ! हे अन्नदात्रे ! हे उषादेवि ! तूं आमच्या सुंदर स्तोत्रांनीं व यागप्रधान पुण्यकर्मांनीं प्रसन्न झालीस म्हणजे जें धन तूं आम्हांस देशील, त्याचा आम्ही उपभोग घेऊं असें घडो ! (१-९२-८) ही उषादेवी सर्व भुवनावर सुंदर प्रकाश पाडून, मग आपली दृष्टि पश्चिमेकडे वळविते. तसेंच सर्व प्राण्यांनीं आपापल्या उद्योगास लागावें म्हणून ती त्यांस जागृत करते. प्रतिभासंपन्न कविजनांचें सुंदर स्तुतिस्तोत्र श्रवण करणारी अशी ही उषादेवी आहे. (१-९२-९) ही उषा पुनः पुनः जन्म पावणारी असली तरी ती अति पुरातन अशीच समजली जाते ! ती कधींहि न बदलणाऱ्या अशा सुंदर कांतीनें मंडित आहे. कर्तनशील व्याधस्त्री पक्ष्यांचे पंख तोडून व अवयवें छाटून जशी त्यांची हिंसा करते तद्वत् ही उषा झाली तरी मानवांचें आयुष्य क्षणोक्षणीं हरण करीत असते. (१-९२-१०) आकाशाच्या सीमांतापर्यंत सुमधुर प्रकाश पाडीत आपली भगिनी जी रात्र तिला ती दूर हुसकावून लावीत आहे. मानवांचें आयुष्य ती सारखी हिरावून घेत असते. तिचा प्रियकर जो सूर्य त्याची ती प्रिया असून आपल्या मधुर कांतीनें ती सुतरां विलसत आहे ! (१-९२-११) ज्याप्रमाणें गोपाल हा गायी कुरणांत नेऊन तेथें त्यांना चहूंकडे विखरतो किंवा मह्य नदी पुरानें तुडुंब भरली म्हणजे जशी ती जिकडे तिकडे पाणीच पाणी करून सोडते तद्वत् या भाग्यशालिनी व अत्यंत पूजनीय उषेनें आपला सुंदर प्रकाश जगभर पसरून टाकला आहे. देवव्रताला बाध न आणणारी ही उषा, पहा आतां सूर्यकिरणांशी एकरूप झालेली दिसूं लागली. (१-९२-१२)

## रत्न ४८ वें

गोतम राहूगण–ऋषि, उषा-देवता, उष्णिक्–छंद

उषस्तच्चित्रमा भरास्मभ्यं वाजिनीवति ।
येन तोकं च तनयं च धामहे ॥ १-९२-१३ ॥

औ. वि. ( प्रातरनुवाक ) स्मा. वि. उषास्तोत्र

उषो अद्येह गोमत्यश्वावति विभावरि ।
रेवदस्मे व्युच्छ सूनृतावति ॥ १-९२-१४ ॥
युक्ष्वा हि वाजिनीवत्यश्वाँ अद्यारुणाँ उषः ।
अथा नो विश्वा सौभगान्या वह ॥ १-९२-१५ ॥

## रत्न ४९ वें

गोतम राहूगण–ऋषि, अश्विनी-देवता, उष्णिक्–छंद

अश्विना वर्तिरस्मदा गोमद्दस्रा हिरण्यवत् ।
अर्वाग्रथं समनसा नि यच्छतम् ॥ १-९२-१६ ॥

औ. वि. ( प्रातरनुवाक ) आश्विन क्रतु; स्मा. वि. अश्विन आवाहन

यावित्था श्लोकमा दिवो ज्योतिर्जनाय चक्रथुः ।
आ न ऊर्जं वहतमश्विना युवम् ॥ १-९२-१७ ॥
एह देवा मयोभुवा दस्रा हिरण्यवर्तनी ।
उषर्बुधो वहन्तु सोमपीतये ॥ १-९२-१८ ॥

## रत्न ५० वें

कुत्स आंगिरस-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद

वैश्वानरस्य सुमतौ स्याम राजा हि कं भुवनानामभिश्रीः ।
इतो जातो विश्वमिदं वि चष्टे वैश्वानरो यतते सूर्येण ॥
॥ १-९८-१ ॥

औ. वि. ( आग्निमारुत ) वैश्वानरीय निविद्धान

## रत्न ४८ वें

हे अन्नसंपन्न उषे! ज्यायोगें आमच्या पुत्रपौत्रादिकांचा चरितार्थ सुरळीत चालेल असें विविध धनधान्य आम्हांस प्राप्त होईल असें कर! (१-९२-१३) हे सत्य व मधुर भाषण करणारे उषे! गवाश्वादिकांनीं सुसंपन्न असणारे हे देवि! या प्रभातसमयीं या आमच्या धनप्राप्ति करून देणाऱ्या यजनकर्मावर तूं आपला सुमंगल प्रकाश पाड! (१-९२-१४) हे अन्नसंपन्न उषे! तू आज आपले लाल रंगाचे घोडे रथास जोड आणि सर्व सौभाग्य-वस्तु आम्हाकडे घेऊन ये! (१-९२-१५)

## रत्न ४९ वें

शत्रूचा नाश करणारे हे अश्विनी देवांनो! आमचें घर धेनूंनीं व धन-धान्यांनीं सुसंपन्न करण्याकारितां तुम्ही उभयतां आपला रथ उदार बुद्धीनें आमच्याकडे वळवून आणा! (१-९२-१६) हे अश्विनी देवहो! आम्हा मानवांकरितां द्युलोकांतून प्रशंसनीय असें उज्ज्वल तेज तुम्हींच इकडे आणलें. त्याचप्रमाणें शक्तिवर्धक असें अन्नहि पण घेऊन या ना! (१-९२-१७) प्रातःकालींच जागृत झालेले अश्व दानशूर, सुखदायक व शत्रुनाशक अशा अश्विनी देवांना या आमच्या यज्ञशालेंत सोमपानार्थ घेऊन येवोत! (१-९२-१८)

## रत्न ५० वें

आम्हीं वैश्वानर अग्निदेवाच्या सुप्रसन्न मर्जींत रहावें! तो सर्व भुवनांचा राजा असून, सेवा करण्यास अगदीं योग्य आहे. येथेंच या अरणीपासून जन्म पावून या जगावर तो सर्वत्र प्रकाश पाडतो. अखिल मानवमात्राविषयीं हितबुद्धि बाळगणारा असा तो वैश्वानर अग्निदेव सूर्याबरोबरच येत असतो. (१-९८-१)

पृष्टो दिवि पृष्टो अग्निः पृथिव्यां पृष्टो विश्वा ओषधीरा विवेश ।
वैश्वानरः सहसा पृष्टो अग्निः स नो दिवा स रिषः पातु नक्तम् ॥

॥ १-९८-२ ॥

**श्रौ. वि. ( चा. मा. ) वैश्वानर याज्या.** **स्मा. वि. पृष्टोदिवि विधान**

वैश्वानर तव तत्सत्यमस्त्वस्मान्रायो मघवानः सचन्ताम् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥

॥ १-९८-३ ॥

**श्रौ. वि. ( आग्निमारुत ) वैश्वानर सूक्त.**

## रत्न ५१ वें

**कश्यप मारीच-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

जातवेदसे सुनवाम सोममरातीयतो नि दहाति वेदः ।
स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा नावेव सिन्धुं दुरितात्यग्निः ॥

॥ १-९९-१ ॥

**श्रौ. वि. ( आग्निमारुत शस्त्र ) स्मा. वि. अग्नि-उपस्थान; दुर्गा-आवाहन.**

## रत्न ५२ वें

**कुत्स आंगिरस-ऋषि, उषा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिरागाच्चित्रः प्रकेतो अजनिष्ट विभ्वा ।
यथा प्रसूता सवितुः सवायँ एवा रात्र्युषसे योनिमारैक् ॥

॥ १-११३-१ ॥

**श्रौ. वि. प्रातरनुवाक; उषाक्रतु** **स्मा. वि. सौरजप**

रुशद्वत्सा रुशती श्वेत्यागादारैगु कृष्णा सदनान्यस्याः ।
समानबन्धू अमृते अनूची द्यावा वर्णं चरत आमिनाने ॥

॥ १-११३-२ ॥

हा अग्नि द्युलोकांत पुसला जातो. पृथ्वीवरहि पुसला जातो. औषधीमध्येंहि तोच रहात असतो. तो बलानें संपन्न असून सर्व लोक त्याला पुसत असतात. तो देव आमचें दिवसा व रात्रीं शत्रूपासून रक्षण करो! (१-९८-२) हे वैश्वानर अग्निदेवा! आम्हीं ही तुझी केलेली उपासना सत्य होवो! आम्हांला प्रिय अशी धनपुत्रादि संपत्ति प्राप्त होवो! मित्र, वरुण अदिति, सिंधु, पृथ्वी आणि द्युलोक हे सर्व देव त्यास अनुमोदन देवोत! (१-९८-३)

## रत्न ५१ वें

जातवेदाचें पूजन करण्याकरितां आम्हीं हा सोमरस पिळून तयार करून ठेविला आहे. आमच्याशीं जे शत्रुत्वभावानें वागतात त्यांचें धन तो देव जाळून भस्मसात् करो! नाव जशी नदींतून तरून सुरक्षित पैलतीरास लागते तद्वत् अग्निदेव आमचीं दुःसह दुःखें पार नाहींशीं करून आम्हांस दुःखरहित सुख प्राप्त करून देवो! (१-९९-१)

## रत्न ५२ वें

पहा! सर्व ग्रहनक्षत्रादि तेजांतील अत्यंत श्रेष्ठ असें हें उषादेवीचें सुमंगल तेज पूर्वेकडे उजळत आहे! हा सुंदर व सर्वव्यापी प्रकाश उदय पावला आहे! रात्रीपासून उत्पन्न झालेली ही उषा सवित्यास जन्म देण्याकरितांच जणू प्रादुर्भूत झाली आहे! म्हणून रात्रीनें तिजसाठीं जागा मोकळी करून दिली आहे. (१-११३-१) अहाहा! आपला तेजस्वी बालक बरोबर घेऊन ही शुभ्र व देदीप्यमान उषा येथें आगमन करती झाली! तिच्यासाठीं कृष्णवर्ण रात्रीनें आपलीं स्थानें मोकळीं केलीं आहेत. त्या एकमेकींच्या सख्ख्या बहिणी असून, सूर्यानें युक्त व अमर आहेत. एकमेकीस अनुसरणाऱ्या अशा त्या देवता असून, जगाचें रूप आलटीत-पालटीत आकाशांतून त्या नित्य भ्रमण करीत असतात. (१-११३-२)

समानो अध्वा स्वस्रोरनन्तस्तमन्यान्या चरतो देवशिष्टे ।
न मेथेते न तस्थतुः सुमेके नक्तोषासा समनसा विरूपे ॥

॥ १-११३-३ ॥

भास्वती नेत्री सूनृतानामचेति चित्रा वि दुरो न आवः ।
प्रार्प्या जगद्व्यु नो रायो अख्यदुषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥

॥ १-११३-४ ॥

जिह्मश्ये३ चरितवे मघोन्याभोगय इष्टये राय उ त्वम् ।
दभ्रं पश्यद्भ्य उर्विया विचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥

॥ १-११३-५ ॥

क्षत्राय त्वं श्रवसे त्वं महीया इष्टये त्वमर्थमिव त्वमित्यै ।
विसदृशा जीविताभिप्रचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥

॥ १-११३-६ ॥

एषा दिवो दुहिता प्रत्यदर्शि व्युच्छन्ती युवतिः शुक्रवासाः ।
विश्वस्येशाना पार्थिवस्य वस्व उषो अद्येह सुभगे व्युच्छ ॥

॥ १-११३-७ ॥

परायतीनामन्वेति पाथ आयतीनां प्रथमा शश्वतीनाम् ।
व्युच्छन्ती जीवमुदीरयन्त्युषा मृतं कं चन बोधयन्ती ॥

॥ १-११३-८ ॥

उषो यदग्निं समिधे चकर्थ वि यदावश्चक्षसा सूर्यस्य ।
यन्मानुषान्यक्ष्यमाणाँ अजीगस्तद्देवेषु चकृषे भद्रमप्नः ॥

॥ १-११३-९ ॥

या दोघाहि बहिणींचा येण्याजाण्याचा मार्ग एकच आहे आणि तो अनंत आहे. तेजस्वी सूर्याच्या आज्ञेप्रमाणें त्या वागणाऱ्या असून, आळी-पाळीनें चालण्याचा त्यांचा रिवाज आहे. त्या एकमेकीस दुखवीत नाहींत अगर कोठें म्हणून कोठेंसुद्धां थबकतहि नाहींत. त्या भिन्नस्वरूपाच्या असल्या तरी सुंदर असून एकमतानें चालणाऱ्या आहेत. ( १-११३-३ ) तेजस्वी, सत्य-भाषणाची जननी, चित्रविचित्र रंगाची अशी जी उषा, तिला आम्हीं ओळखिलें. तमाचा नाश करून तिनें आमचे दरवाजे उघडले आहेत; सर्व जगावर प्रकाश पाडून आमची संपत्ति ती आम्हांस पुनः दाखविती झाली. तिनें आपल्या प्रकाशानें सर्व जगाला जागृत केलें आहे. (१-११३-४) जे झोंपले आहेत त्यांनीं उठून चालूं लागावें, ज्यांना सुख-कारक वस्तु इच्छा असतील त्यांनीं त्यासाठीं प्रयत्न करावा, ज्यांना यज्ञयाग करावयाचा असेल त्यांनीं कर्मानुष्ठानास लागावें, ज्यांना धनसंपत्ति हवी असेल त्यांनीं त्या उद्योगास प्रवृत्त व्हावें, व ज्यांना अंधुक दिसत आहे त्यांना स्पष्ट दिसावें या हेतूनें या उदार उषादेवी सर्व जगास जागृत केलें आहे. (१-११३-५) तुमच्यांपैकीं कोणीं पराक्रम करावा, कोणीं कीर्ति मिळवावी, कोणीं यज्ञयागादिक देवोपासना करावी, कोणीं उद्योगधंद्यास लागावें, कोणीं आपल्या चरितार्थाचा मार्ग शोधावा, यासाठीं या उदार उषादेवीनें सर्व जगास जागृत केलें आहे. (१-११३-६) पृथ्वीवरील सर्व संपत्तीची स्वामिनी अशी ही द्युलोक-कन्या जी उषा देवी, ती भर तारुण्यानें मंडित असून झगझगीत शुभ्रवस्त्र परिधान करून दररोज जगाला दर्शन देत असते. हे सुमंगल उषे ! आज या आमच्या यज्ञशालेंत तूं आपला सुंदर प्रकाश पाड की ! (१-११३-७) ही उषा आजपर्यंत गेलेल्या उषांच्या मार्गानेंच वाटचाल करीत आहे. पुढें येणाऱ्या उषांत ही पहिलीच असून, ती अंधार नाहींशी करणारी, प्राण्यास कार्यप्रवृत्त करणारी, व झोप-लेल्यास जागृत करणारी अशी आहे. (१-११३-८) हे उषे ! तूं आम्हांस अग्नि प्रदीप्त करावयास प्रवृत्त केलेस. आणि सूर्यप्रकाशाच्या योगानें अंधः-कारांत बुडालेल्या या जगाला पुनः उजळा दिलास. तूं देवभक्तांस जागृत करून, त्यायोगानें तूं देवांचें देखील एक मोठें हितकृत्य घडवून आणलेंस. (१-११३-९)

कियात्या यत्समया भवाति या व्यूषुर्याश्च नूनं व्युच्छान् ।
अनु पूर्वाः कृपते वावशाना प्रदीध्याना जोषमन्याभिरेति ॥
॥ १-११३-१० ॥

ईयुष्टे ये पूर्वतरामपश्यन् व्युच्छन्तीमुषसं मर्त्यासः ।
अस्माभिरू नु प्रतिचक्ष्याभूदो ते यन्ति ये अपरीषु पश्यान् ॥
॥ १-११३-११ ॥

यावयद् द्वेषा ऋतपा ऋतेजाः सुम्नावरी सूनृता ईरयन्ती ।
सुमङ्गलीर्बिभ्रती देववीतिमिहाद्योषः श्रेष्ठतमा व्युच्छ ॥
॥ १-११३-१२ ॥

शश्वत् पुरोषा व्युवास देव्यथो अद्येदं व्यावो मघोनी ।
अथो व्युच्छादुत्तराँ अनु द्यूनजरामृता चरति स्वधाभिः ॥
॥ १-११३-१३ ॥

व्य१ञ्जिभिर्दिव आतास्वद्यौदप कृष्णां निर्णिजं देव्यावः ।
प्रबोधयन्त्यरुणेभिरश्वैरोषा याति सयुजा रथेन ॥
॥ १-११३-१४ ॥

आवहन्ती पोष्या वार्याणि चित्रं केतुं कृणुते चेकिताना ।
ईयुषीणामुपमा शश्वतीनां विभातीनां प्रथमोषा व्यश्वैत् ॥
॥ १-११३-१५ ॥

उदीर्ध्वं जीवो असुर्न आगादप प्रागात् तम आ ज्योतिरेति ।
आरैक् पन्थां यातवे सूर्यायागन्म यत्र प्रतिरन्त आयुः ॥
॥ १-११३-१६ ॥

ही उषा येथें किती वेळ राहणार आहे ! ज्या मार्गे प्रकाशून गेल्या त्या तरी किती वेळ राहिल्या होत्या व पुढें येणाऱ्या तरी किती वेळ राहणार आहेत ? तथापि जगास प्रकाशित करण्यासाठीं मागील उषांनीं जें काय केलें तेंच हीहि उषा करते व पुढें येणाऱ्या उषांनाहि बरोबर घेऊन तसेंच करावयास लावते. (१-११३-१०) ज्यांनी ज्यांनी म्हणून पूर्वकालीन उषांना प्रकाशतांना पाहिलें ते सर्व आतां मरून गेले आहेत. आतां आम्हीहि तिला पहात आहोंत; व तिला पाहणारे भविष्यकालींहि पण निपजतील. (१-११३-११) हे उषे ! देवोपासकांचा द्वेष करणाऱ्या दुष्टांचा तूं निःपात कर ! यज्ञकर्माचें पालन करणारी, सत्यासाठींच जन्म पावलेली, सुखस्वरूप, मधुरभाषिणी, सुमंगला, देवांचें हविरन्न घेऊन येणारी व अत्यंत श्रेष्ठ अशी तूं आपला उज्ज्वल प्रकाश आज या आमच्या यज्ञशालेंत पाडणारी हो ! (१-११३-१२) ही उषा प्राचीन कालापासून सतत प्रकाशत आली आहे. त्याचप्रमाणें त्या उदार उषेनें आजहि येथें आपला उज्ज्वल प्रकाश पाडला आहे व पुढेंहि ती अशीच प्रकाशत राहील. ती जरारहित, मृत्युरहित असून स्वतःच्या तेजानें सदैव चमकत राहते. (१-११३-१३) आपल्या तेजस्वी किरणांनीं विभूषित होऊन द्युलोकाच्या विस्तीर्ण प्रदेशावर ही दैवी उषा चमकत आहे ! तिनें जगावरील काळा पडदा बाजूस सारला आहे ! अरुणवर्ण अश्व जोडलेल्या सुंदर रथांत बसून, निजलेल्या लोकांना जागें करीत ही इकडेच येत आहे ! (१-११३-१४) पुष्टिकर व वीर्यवर्धक अशी अन्नसंपत्ति बरोबर घेऊन ही चैतन्यदायक उषा आपले आश्चर्यकारक किरण जगावर प्रसार करीत आहे. आजपर्यंत येऊन गेलेल्या उषांपैकीं ही शेवटची व पुढें येणाऱ्या उषांपैकीं पहिली असून ती आपली प्रभा आज येथें उधळूं लागली आहे ! (१-११३-१५) हे लोक हो ! असे झोपला काय उठा ना ! हा पहा आपला चैतन्यदायक प्राण आला आहे ! अंधःकार दूर पळून गेला ! आणि सर्वत्र प्रकाश उजळून राहिला ! सूर्याला आपला प्रवास सुखानें करतां यावा म्हणून या उषेनें त्याचा मार्ग मोकळा करून ठेविला आहे. जेथें अन्न वर्धन पावतें तेथें आपण आतां जाऊं या. (१-११३-१६)

स्यूमना वाच उदियर्ति वन्हि: स्तवानो रेभ उषसो विभातीः ।
अद्या तदुच्छ गृणते मघोन्यस्मे आयुर्नि दिदीहि प्रजावत् ॥
॥ १-११३-१७ ॥

या गोमतीरुषसः सर्ववीरा व्युच्छन्ति दाशुषे मर्त्याय ।
वायोरिव सूनृतानामुदर्के ता अश्वदा अश्नवत् सोमसुत्वा ॥
॥ १-११३-१८ ॥

माता देवानामदितेरनीकं यज्ञस्य केतुर्बृहती वि भाहि ।
प्रशस्तिकृद् ब्रम्हणे नो व्यु१च्छा नो जने जनय विश्ववारे ॥
॥ १-११३-१९ ॥

यच्चित्रमप्न उषसो वहन्तीजानाय शशमानाय भद्रम् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ १-११३-२० ॥

## रत्न ५३ वें

**कुत्स आंगिरस-ऋषि, रुद्र देवता, जगती-छंद**

इमा रुद्राय तवसे कपर्दिने क्षयद्वीराय प्र भरामहे मतीः ।
यथा शमसद् द्विपदे चतुष्पदे विश्वं पुष्टं ग्रामे अस्मिन्ननातुरम् ॥
॥ १-११४-१ ॥

**श्रौ. वि. ( रुद्र-यज्ञ ) दिशोपस्थान. स्मा. वि. भस्मग्रहण; रुद्रसूक्त**

मळा नो रुद्रोत नो मयस्कृधि क्षयद्वीराय नमसा विधेम ते ।
यच्छं च योश्च मनुरायेजे पिता तदश्याम तव रुद्र प्रणीतिषु ॥
॥ १-११४-२ ॥

अश्याम ते सुमतिं देवयज्यया क्षयद्वीरस्य तव रुद्र मीढ्वः ।
सुम्नायन्निद्विशो अस्माकमा चरारिष्टवीरा जुहवाम ते हविः ॥
॥ १-११४-३ ॥

स्तोत्र अर्पण करणारा हा उपासक उषेचीं सुंदर स्तोत्रें व्यवस्थित तयार करून, तीं मोठ्या भावभक्तीनें गात आहे. म्हणून हे उदार देवि ! तूं या स्तोत्याकरिता प्रकाशमान हो आणि आम्हांला संतति व दीर्घायुष्य हीं दे ! ( १-११३-१७ ) गोसंपन्न, अश्वसंपन्न, वीरसंपन्न अशा या उषा हवि अर्पण करणाऱ्या यजमानाप्रीत्यर्थ प्रकाशित होत असतात. अतएव सोम अर्पण करणारा हा यजमान हें स्तोत्र संपतांच वायुगतीनें त्या उषांप्रत प्राप्त होवो। ( १-११३-१८ ) हे उषे ! तूं देवांची माता, अदितीचें मुख, यज्ञाचा ध्वज व महान् अशी आहेस ! आम्हांकरितां तूं प्रकाशित हो ! आमच्या स्तोत्राची तारीफ करून, तू आम्हांस प्रकाश दे ! हे सर्वप्रिय उषे ! तू आम्हांला लोकांमध्यें प्रमुख कर! ( १-११३-१९ ) जें सुदर व कल्याणकारक धन आहे तें ही उषा देवी पूजन व स्तवन करणाऱ्या भक्तासाठीं घेऊन येत आहे. तर त्यास मित्र, वरुण, अदिति, सिन्धु, पृथ्वी व द्युलोक या सर्वांचें अनुमोदन असो ! ( १-११३-२० )

## रत्न ५३ वें

हा रुद्रदेव महा समर्थ असून तो जटामंडित आहे. ऐश्वर्यसंपन्न असे मरुद्गण त्याचे पुत्र आहेत. अशा रुद्रदेवाचें आम्ही स्तवन करतों. अशा योगानें आम्हांला, आमच्या पुत्रपौत्रांना व अश्वगवादिकांना आरोग्य प्राप्त होईल. आणि आमच्या गांवांतील सर्व प्राणिमात्रांचें रोगराईपासून रक्षण होऊन त्यांची भरभराट होईल. (१-११४-१) हे रुद्रदेवा ! तूं आह्मांस सुखी कर ! आम्हांस आनंद प्राप्त करून दे ! वीरपुत्रसंपन्न अशा तुला हवि अर्पण करून आम्हीं तुझी उपासना करीत आहों. पिता मनु यानें आपल्या प्रजेला जें आरोग्य व जें निर्भयत्व मिळवून दिलें होतें, तें आरोग्य व तें निर्भयत्व आम्ही तुझ्या कृपादृष्टीखालीं राहून प्राप्त करून घेऊं असें घडो ! (१-११४-२) हे यौवनाढ्या ! मरुद्गणांनीं युक्त असा जो तूं त्या तुझ्याप्रीत्यर्थ कर्मानुष्ठान करून आम्ही तुझी अनुग्रहबुद्धि संपादन करूं ! तूं आमच्या लोकांमध्यें ये आणि त्यांना सुखप्रद हो ! आम्ही आमच्या सुरक्षित प्रजेनें युक्त होत्साते तुला हविरन्न अर्पण करून, प्रसन्न करतों. (१-११४-३)

त्वेषं वयं रुद्रं यज्ञसाधं वङ्कुं कविमवसे नि ह्वयामहे ।
आरे अस्मद्दैव्यं हेळो अस्यतु सुमतिमिद्वयमस्या वृणीमहे ॥

॥ १-११४-४ ॥

दिवो वराहमरुषं कपर्दिनं त्वेषं रूपं नमसा नि ह्वयामहे ।
हस्ते बिभ्रद्भेषजा वार्याणि शर्म वर्म च्छर्दिरस्मभ्यं यंसत् ॥

॥ १-११४-५ ॥

इदं पित्रे मरुतामुच्यते वचः स्वादोः स्वादीयो रुद्राय वर्धनम् ।
रास्वा च नो अमृत मर्तभोजनं त्मने तोकाय तनयाय मृळ ॥

॥ १-११४-६ ॥

मा नो महान्तमुत मा नो अर्भकं मा न उक्षन्तमुत मा न उक्षितम् ।
मा नो वधीः पितरं मोत मातरं मा नः प्रियास्तन्वो रुद्र रीरिषः ॥

॥ १-११४-७ ॥

मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः ।
वीरान्मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मन्तः सदमित्त्वा हवामहे ॥

॥ १-११४-८ ॥

**श्रौ. वि. (रुद्रयज्ञ) दिशोपस्थान. स्मा. वि. रुद्रसूक्त; शुद्धोदक स्नान.**

उप ते स्तोमान्पशुपा इवाकरं रास्वा पितर्मरुतां सुम्नमस्मे ।
भद्रा हि ते सुमतिर्मृळयत्तमाथा वयमव इत्ते वृणीमहे ॥१-११४-९॥

तेजःपुंज, यज्ञकार्य सिद्धीस नेणारा, वक्रमार्गानें चालणारा, व महाबुद्धिमान्, अशा महादेवाला आमच्या रक्षणार्थ आम्ही पाचारण करीत आहों. तो रुद्रदेव आम्हांवरील दैवी कोप नाहींसा करो ! त्या महादेवाचा आम्हांवर कृपाप्रसाद व्हावा अशी आमची मनीषा आहे. (१-११४-४) वराहाप्रमाणें सुदृढ अंगाचा, शुभ्रकांतीचा, जटामंडित व प्रभासंपन्न अशा रुद्रदेवाला स्वर्ग लोकांतून आमच्याकडे येण्यास नमस्कार-मंत्र म्हणून आम्ही हाक मारतों. तो देव येतांना बरोबर हातामध्यें रोग-नाशक अशा उत्तमोत्तम औषधि घेऊन येवो ! आणि आम्हांस आरोग्य, सुख, अभेद्य कवच व सुरक्षित घर प्रदान करो ! (१-११४-५) अत्यंत मधुर व अत्यंत पुष्टिवर्धक असें हें स्तोत्र आम्ही मरुद्गणांचा जो पिता त्या रुद्रदेवाप्रीत्यर्थ गात आहोंत. तर हे अमर रुद्रदेवा ! मानवांना प्रिय असें मधुर अन्न तूं आम्हांस दे ! आणि तसेंच आम्हांस, आमच्या पुत्रांस, व आमच्या नातवांस सुखी राख ! (१-११४-६) हे रुद्रदेवा ! आमच्यांत जे वृद्ध आहेत त्यांना मारूं नकोस ! जे बाल आहेत त्यांना मारूं नकोस ! जे तरुण आहेत त्यांना मारूं नकोस ! जे स्त्रियांच्या गर्भांत आहेत त्यांसहि मारूं नकोस ! आमच्या बापाला मारूं नकोस ! आमच्या आईला मारूं नकोस ! आणि आमच्या इष्टमित्रादि प्रियजनांसहि पण मारूं नकोस ! ( १-११४-७ ) हे भगवन् रुद्रदेवा ! आमच्या पुत्राला व नातवाला मारूं नकोस। आमच्या आयुष्याला मारूं नकोस ! आमच्या गाईगुरादि पशूंना मारूं नकोस ! घोड्यांना मारूं नकोस ! आमच्या वीरांना –यद्यपि ते रागीट असले तरी–मारूं नकोस ! हविसंपन्न असे आम्ही–तुझे भक्त–सदैव तुला यज्ञामध्यें हविर्भाग अर्पण करण्यासाठीं पाचारण करतों. ( १-११४-८ ) हे रुद्रदेवा ! ज्याप्रमाणें गुराखी हा सायंकाळीं मालकाची गुरें एकत्र करून त्याचीं त्याला परत करतो, तद्वत् तुझ्याकडून मिळविलेलीं हीं स्तोत्रें एकत्र करून आम्ही तुझीं तुला परत अर्पण करीत आहों. हे मरुत्पित्या ! आम्हांस सुख दे ! कारण ती तुझी कृपाबुद्धि अत्यंत सुखदायी आणि म्हणून प्रलोभनीय आहे. अतएव मी त्या तुझ्या मंगल कृपेची याचना करतों. ( १-११४-९ )

## रत्न ५४ वें

**कुत्स आंगिरस-ऋषि, रुद्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

आरे ते गोघ्नमुत पूरुषघ्नं क्षयद्वीर सुम्नमस्मे ते अस्तु ।
मृळा च नो अधि च ब्रूहि देवाधा च नः शर्म यच्छ द्विबर्हाः ॥
॥१-११४-१०॥

अवोचाम नमो अस्मा अवस्यवः शृणोतु नो हवं रुद्रो मरुत्वान् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ।
॥ १-११४-११ ॥

**श्रौ. वि. ( रुद्रयज्ञ ) दिशोपस्थान.**

## रत्न ५५ वें

**कुत्स आंगिरस-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद**

चित्रं देवानामुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः ।
आप्रा द्यावापृथिवी अन्तरिक्षं सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ॥
॥ १-११५-१ ॥

**श्रौ. वि. ( अतिरात्र ) आश्विनशस्त्र; स्मा. वि. सौरजप.**

सूर्यो देवीमुषसं रोचमानां मर्यो न योषामभ्येति पश्चात् ।
यत्रा नरो देवयन्तो युगानि वितन्वते प्रति भद्राय भद्रम् ॥
॥ १-११५-२ ॥

भद्रा अश्वा हरितः सूर्यस्य चित्रा एतग्वा अनुमाद्यासः ।
नमस्यन्तो दिव आ पृष्ठमस्थुः परि द्यावापृथिवी यन्ति सद्यः ॥
॥ १-११५-३ ॥

तत्सूर्यस्य देवत्वं तन्महित्वं मध्या कर्तोर्विततं सं जभार ।
यदेदयुक्त हरितः सधस्थादाद्रात्री वासस्तनुते सिमस्मै ॥
॥ १-११५-४ ॥

## रत्न ५४ वें

हे शत्रुमर्दना ! गाईंना व मनुष्यांना मारण्याचें जें तुझें हत्यार आहे, तें कृपा करून आम्हांपासून दूर राहो ! आणि तुझ्याजवळ जें सुख आहे, तें मात्र आमचें असो ! हे रुद्रदेवा ! तूं आम्हांवर अनुग्रह कर आणि आमची बाजू घेऊन बोल. हे देवा ! तूं ज्ञान व कर्म यांचा स्वामी आहेस, तर तूं आम्हांस सुख दे ! ( १–११४–१० ) संरक्षणाची इच्छा करणारे आम्ही हें स्तोत्र रुद्रदेवाप्रीत्यर्थ गाऊन दाखविलें आहे; त्या रुद्रदेवाला आमचा नमस्कार असो ! मरुत्वान् असा हा रुद्र आमच्या स्तोत्राचा मनःपूर्वक स्वीकार करो ! आणि हें जें आम्हीं स्तोत्र गाऊन दाखविलें, त्याला मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथ्वी व स्वर्ग या देवता अनुमोदन देवोत । ( १–११४–११ )

## रत्न ५५ वें

किरणांचा पुंज, मित्र व वरुण यांचा डोळा, असा जो हा सूर्यदेव तो आतां उदयाचलावर प्राप्त झाला आहे. आणि आश्चर्य हें कीं, स्वर्ग, पृथ्वी व नभोमंडळ हीं त्यानें आपल्या सुदिव्य तेजानें कोंदून सोडलीं ! सूर्यदेव हा चराचर सृष्टीचा आत्मा आहे ! ( १–११५–१) तरुण हा जसा सुंदर युवतीच्या कच्छपीं लागून चालत असतो, तद्वत् हा सूर्य झाला तरी दिव्यकांतीनें युक्त अशा उषेच्या मागून येत असतो. या उषादेवीचा उदय झाला म्हणजे सूर्यदेवाचे उपासक तत्प्रीत्यर्थ अग्निहोत्राचें अनुष्ठान करण्यास प्रारंभ करतात. त्याचप्रमाणें आम्हीहि आमच्या कल्याणार्थ त्या मगलमूर्ति देवाचें स्तवन करीत आहों. ( १–११५–२ ) कल्याणकारक, दुरितहारक, चित्रविचित्र रंगाचे व रमणीय असे अश्व अंतरिक्षाच्या उच्च स्थानावर प्राप्त झाले आहेत. त्या अश्वांना आमचा नमस्कार असो ! ते आतां हां हां म्हणतां द्यावापृथ्वीला व्यापून सोडतील. ( १–११५–३ ) सूर्यदेवाचें देवपण व मोठेंपण तें हेंच कीं, त्रैलोक्यांत दिवसा आपण स्वतः पसरलेले किरणजाल अस्तसमयीं तो आपण स्वतःच आपल्यामध्यें आकर्षून घेतो, जेव्हां तो हे सुवर्ण रंगाचे सुंदर किरण आकाशमंडलांतून आपल्यामध्यें आकर्षून घेतो, तेव्हांच रात्र ही जगावर आपला अंधःकार पसरते. ( १–११५–४ )

तन्मित्रस्य वरुणस्याभिचक्षे सूर्यो रूपं कृणुते द्योरुपस्थे ।
अनन्तमन्यद्रुशदस्य पाजः कृष्णमन्यद्धरितः सं भरन्ति ॥

॥ १-११५-५ ॥

अद्या देवा उदिता सूर्यस्य निरंहसः पिपृता निरवद्यात् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥

॥ १-११५-६ ॥

## रत्न ५६ वें

**कक्षीवान्-ऋषि, अश्विनौ-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

मध्वः सोमस्याश्विना मदाय प्रत्नो होता विवासते वाम् ।
बर्हिष्मती रातिर्विश्रिता गीरिषा यातं नासत्योप वाजैः ॥

॥ १-११७-१ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) प्रातरनुवाक.**

यो वामश्विना मनसो जवीयान् रथः स्वश्वो विश आजिगाति ।
येन गच्छथः सुकृतो दुरोणं तेन नरा वर्तिरस्मभ्यं यातम् ॥

॥ १-११७-२ ॥

ऋषिं नरावंहसः पाञ्चजन्यमृबीसादत्रिं मुञ्चथो गणेन ।
मिनन्ता दस्योरशिवस्य माया अनुपूर्वं वृषणा चोदयन्ता ॥

॥ १-११७-३ ॥

अश्वं न गूळ्हमश्विना दुरेवैर्ऋषिं नरा वृषणा रेभमप्सु ।
सं तं रिणीथो विप्रुतं दंसोभिर्न वां जूर्यन्ति पूर्व्या कृतानि ॥

॥ १-११७-४ ॥

सूर्यदेव हा स्वर्गावरून जे पुण्यवान् आहेत त्यांवर मित्रदृष्टि धारण करून अनुग्रह करतो आणि जे पापी आहेत त्यांवर वरुणदृष्टि ठेवून त्यांचा निग्रह करतो. या सूर्यदेवाचें अद्वैत असें एक रूप असून तें देशकालाद्यवच्छेदरहित व तेजःपुंज असें आहे. त्याचें दुसरें आणखी एक रूप असून तें सगुण असल्यामुळें इन्द्रियें त्यास ग्रहण करूं शकतात. ( १–११५–५ ) अहो किरणदेवहो ! आज सूर्योदयाबरोबर आम्हांस सर्व पापापासून आणि सर्व दुर्लौकिकापासून तुम्ही मुक्त करा ! मित्र, वरुण, आदिति, सिंधु, पृथ्वी व स्वर्ग हीं आमची प्रार्थना मान्य करोत. ( १–११५–६ )

## रत्न ५६ वें

हे अश्विदेवहो ! मधुर सोमरसानें तुम्हास प्रसन्न करण्याकरितां हा तुमचा पुरातन उपासक तुमची उपासना करीत आहे. तुम्हांसाठीं हवि दर्भावर ठेविले असून त्याबरोबरच म्हणावयाचें स्तोत्रहि पण तयार केलें आहे. हे नासत्य हो ! अन्न व बल यांनीं युक्त होत्साते तुम्ही आमच्या यज्ञशालेंत या ! ( १–११७–१ ) हे अश्विदेवहो ! मनापेक्षांहि अतिशय वेगवान् असे उत्तम घोडे जोडलेला असा जो तुमचा रथ लोकांमध्यें फिरत असतो व ज्यांत बसून तुम्ही यजन करणाऱ्या यजमानाच्या घरीं जात असतां त्या रथांत बसून तुम्ही आमचेकडे या. ( १–११७–२ ) हे वीर्यशाली व नेते अश्विदेवहो ! तुम्हीं दुष्ट दस्यूंच्या सर्व कपटाचा नाश करून व त्यांना ठार मारून लोकवंद्य अत्रिऋषीला त्याच्या पुत्रादि परिवारासहित त्या कठिण कारागृहांतील अग्निकुंडांतून मुक्त केलेंत. ( १–११७–३ ) हे नेते व मनोरथपूरक अश्विदेवहो! दुष्टांनी पाण्यांत बुडवून ठेविल्यामुळें शिथिलावयव झालेल्या त्या रेभ ऋषीला आपल्या अद्भुत वैद्यकीय चातुर्यानें पुनः सुदृढ अवयवांनीं तुम्हीं युक्त केलेंत. तुमचीं हीं चिरंतन कृत्यें कधींहि शिळीं होत नाहींत. ( १–११७–४ )

सुषुप्वांसं न निर्ऋतेरुपस्थे सूर्यं न दस्रा तमसि क्षियन्तम् ।
शुभे रुक्मं न दर्शतं निखातमुदूपथुरश्विना वन्दनाय ॥
॥ १-११७-५ ॥

तद् वां नरा शंस्यं पज्रियेण कक्षीवता नासत्या परिज्मन् ।
शफादश्वस्य वाजिनो जनाय शतं कुम्भाँ असिञ्चतं मधूनाम् ॥
॥ १-११७-६ ॥

युवं नरा स्तुवते कृष्णियाय विष्णाप्वं ददथुर्विश्वकाय ।
घोषायै चित् पितृषदे दुरोणे पतिं जूर्यन्त्या अश्विनावदत्तम् ॥
॥ १-११७-७ ॥

युव श्यावाय रुशतीमदत्तं महः क्षोणस्याश्विना कण्वाय ।
प्रवाच्यं तद् वृषणा कृतं वां यन्नार्षदाय श्रवो अध्यधत्तम् ॥
॥ १-११७-८ ॥

पुरू वर्पांस्यश्विना दधाना नि पेदव ऊहथुराशुमश्वम् ।
सहस्रसां वाजिनमप्रतीतमहिहनं श्रवस्यं तरुत्रम् ॥
॥ १-११७-९ ॥

एतानि वां श्रवस्या सुदानू ब्रह्माङ्गूषं सदनं रोदस्योः ।
यद् वां पज्रासो अश्विना हवन्ते यातमिषा च विदुषे च वाजम् ॥
॥ १-११७-१० ॥

सूनोर्मानेनाश्विना गृणाना वाजं विप्राय भुरणा रदन्ता ।
अगस्त्ये ब्रह्मणा वावृधाना सं विश्पलां नासत्यारिणीतम् ॥
॥ १-११७-११ ॥

सुंदर अश्वी हो! भूमीच्या मांडीवर शयन करणाऱ्याप्रमाणें, अंधारांत बुडून गेलेल्या सूर्याप्रमाणें, किंवा जमिनींत पुरून ठेविलेल्या सुंदर सुवर्णालंकाराप्रमाणें विहिरींत खोल गाडलेल्या त्या वंदनाला तुम्हीं सुरक्षित बाहेर काढलेंत! ( १-११७-५ ) हे नेते नासत्य हो! तुम्हीं लोकांसाठी बलवान् अश्वाच्या खुरापासून मद्याचे शंभर कुंभ भरलेत. हें तुमचें कृत्य पज्रकुळांत जन्मलेल्या कक्षीवानानें सर्वत्र वाखाणण्यासारखें आहे! नाहीं काय? ( १-११७-६ ) हे नेते अश्वी हो! तुमचें स्तोत्र गाणाऱ्या कृष्णपुत्र विश्वकाला विष्णापू नांवाचा हरवलेला पुत्र तुम्हीं शोधून परत आणून दिलांत. हे अश्वी हो! बापाच्या घरींच अविवाहित राहून वृद्ध होत चाललेल्या घोषेला तुम्हीं चांगला पति मिळवून दिलांत! ( १-११७-७ ) हे अश्विदेव हो! तुम्हीं कुष्ठ रोगामुळें काळवंडलेल्या श्यावाला गोरी स्त्री मिळवून दिलीत! आणि दृष्टि गेल्यामुळें एकांतांत पडून राहिलेल्या कण्वाला उत्तम दृष्टि प्राप्त करून दिलीत! तसेंच तुम्ही नृषदाच्या बहिऱ्या मुलाला कान दिलात! हे वीर्यवान् अश्वी हो! हें तुमचें कृत्य खरोखरीच प्रशंसनीय आहे. नाहीं कोण म्हणेल? ( १-११७-८ ) हे अश्वी हो! नाना रूपें धारण करणारे तुम्ही पेदूला वेगवान् असा घोडा आणून दिलात कीं जो हजारांनीं धन देणारा, अत्यंत बलवान्, अप्रतिहतगति, शत्रूचा वध करणारा, कीर्तिमान् व संकटांतून तारणारा असा होता. ( १-११७-९ ) हे उदार अश्विदेव हो! अशीं हीं तुमचीं अद्‌भुत कृत्यें अत्यंत प्रशंसनीय आहेत! व हें स्तोत्र द्यावापृथ्वींतील घरामध्यें राहणाऱ्या तुम्हांला प्रसन्न करण्यास समर्थ आहे. जेव्हां पज्रकुलोत्पन्न लोक तुमचा धांवा करतील तेव्हां शक्तिप्रद अन्न घेऊन इकडे या आणि स्तुतिकर्त्या मला अन्न द्या! ( १-११७-१० ) हे पोषण करणारे नासत्य हो! पुत्रानें केलेल्या स्तोत्राच्या योगानें भारद्वाजऋषीनें तुमचें स्तवन केलें असतां तुम्हीं त्याला अन्नसंपत्ति दिलीत. अगस्त्यानें केलेल्या स्तोत्रामुळें प्रसन्न होऊन तुम्हीं विश्पलेचा तुटलेला पाय लोखंडाचा जोडून तिला बरी केलीत. ( १-११७-११ )

कुह यान्ता सुष्टुतिं काव्यस्य दिवो नपाता वृषणा शयुत्रा ।
हिरण्यस्येव कलशं निखातमुदूपथुर्दशमे अश्विनाहन् ॥
॥ १-११७-१२ ॥

युवं च्यवानमश्विना जरन्तं पुनर्युवानं चक्रथुः शचीभिः ।
युवो रथं दुहिता सूर्यस्य सह श्रिया नासत्यावृणीत ॥
॥ १-११७-१३ ॥

युवं तुग्राय पूर्व्येभिरेवैः पुनर्मन्यावभवतं युवाना ।
युवं भुज्युमर्णसो निः समुद्राद्विभिरूहथुर्ऋज्रेभिरश्वैः ॥
॥ १-११७-१४ ॥

अजोहवीदश्विना तौग्र्यो वां प्रोळ्हः समुद्रमव्यथिर्जगन्वान् ।
निष्टमूहथुः सुयुजा रथेन मनोजवसा वृषणा स्वस्ति ॥
॥ १-११७-१५ ॥

अजोहवीदश्विना वर्तिका वामास्नो यत् सीममुञ्चतं वृकस्य ।
वि जयुषा ययथुः सान्वद्रेर्जातं विष्वाचो अहतं विषेण ॥
॥ १-११७-१६ ॥

शतं मेषान् वृक्ये मामहानं तमः प्रणीतमशिवेन पित्रा ।
आक्षी ऋज्राश्वे अश्विनावधत्तं ज्योतिरन्धाय चक्रथुर्विचक्षे ॥
॥ १-११७-१७ ॥

शुनमन्धाय भरमह्वयत् सा वृकीरश्विना वृषणा नरेति ।
जारः कनीन इव चक्षदान ऋज्राश्वः शतमेकं च मेषान् ॥
॥ १-११७-१८ ॥

हे सूर्याचे वीर्यवंत पुत्र अश्विदेव हो! तुम्ही सुंदर स्तुति ऐकण्याकरितां कण्वाच्या घरीं चाललां असतां वाटेंत भूमींतून पुरलेला सुवर्णपूरित कलश बाहेर काढावा त्याप्रमाणें कूपांत पडून राहिलेल्या रेभाला तुम्ही दहावे दिवशीं त्यांतून वर काढलेंत; त्या वेळीं तुम्ही कोठें चालला होतां! ( १-११७-१२ ) हे अश्विदेव हो! वृद्ध होत चाललेल्या च्यवनऋषीला तुम्हीं आपल्या वैद्यकीय चातुर्यानें पुनः तरुण केलेंत! सूर्याची कन्या ही आपल्या शृंगारसौभाग्यासह तुमच्या रथांत येऊन चढून बसली! ( १-११७-१३ ) हे दुःखनिवारक अश्विदेव हो! आपल्या पुरातन पराक्रमामुळें तुम्ही तुग्राला पुनः अधिकच स्तवनीय झालांत. तुम्हींच आपल्या शीघ्र गतिमान् जहाजाच्या व वेगवान् घोड्याच्या योगानें भुज्यूला खवळलेल्या समुद्रांतून सुरक्षित बाहेर काढून त्याला पितृगृहीं पोंचता केलेंत! ( १-११७-१४ ) हे अश्विदेवहो! चिमणीनें तुमचा धांवा केला, त्यासरशीं तुम्हीं धांवून येऊन तिला लांडग्याच्या जवड्यांतून सोडवलींत! आपल्या जयशाली रथांतून तुम्हीं जहुपाला पर्वताच्या शिखरावर घेऊन गेलांत. आणि विष्वाच् नामक राक्षसाच्या मुलाला विषारी बाणानें ठार केलेंत! केवढे अद्भुत पराक्रम हे तुमचे!! ( १-११७-१६ ) हे अश्वीहो! शंभर मेंढे लांडगीला खावयास देऊन तिला खुष केली म्हणून ऋज्राश्वाच्या दुष्ट बापानें त्याचे डोळे फोडून त्यास अंध केलें, तेव्हां तुम्हीं त्याला पुनः दृष्टि आणून दिलींत. विविध जग पाहण्यासाठीं त्या आंधळ्या ऋज्राश्वाला पुनः प्रकाश दिलांत! ( १-११७-१७ )

आंधळा झालेल्या ऋज्राश्वासाठीं त्या लांडगीनें तुमचा धांवा केला आणि म्हटलें कीं, हे शूर अश्वी हो! हे पराक्रमी वीरहो! प्रेमवेडा तरुण जसा परस्त्रीला आपलें सर्व धन देऊं करतो तद्वत् या ऋज्राश्वानें एकशे एक मेंढे कापून मला खावयास दिले. ( १-११७-१८ )

मही वामूतिरश्विना मयोभूरुत स्त्रामं धिष्ण्या सं रिणीथः ।
अथा युवामिदह्वयत् पुरन्धिरागच्छतं सीं वृषणाववोभिः ॥
॥ १-११७-१९ ॥

अधेनुं दस्रा स्तर्यं१ विषक्तामपिन्वतं शयवे अश्विना गाम् ।
युवं शचीभिर्विमदाय जाया न्यूहथुः पुरुमित्रस्य योषाम् ॥
॥ १-११७-२० ॥

यवं वृकेणाश्विना वपन्तेषं दुहन्ता मनुषाय दस्रा ।
अभि दस्युं बकुरेणा धमन्तोरु ज्योतिश्चक्रथुरार्याय ॥
॥ १-११७-२१ ॥

आथर्वणायाश्विना दधीचेऽश्व्यं शिरः प्रत्यैरयतम् ।
स वां मधु प्र वोचदृतायन् त्वाष्ट्रं यद् दस्रावकपिकक्ष्यं वाम् ॥
॥ १-११७-२२ ॥

सदा कवी सुमतिमा चके वां विश्वा धियो अश्विना प्रावतं मे ।
अस्मे रयिं नासत्या बृहन्तमपत्यसाचं श्रुत्यं रराथाम् ॥
॥ १-११७-२३ ॥

हिरण्यहस्तमश्विना रराणा पुत्रं नरा वध्रिमत्या अदत्तम् ।
त्रिधा ह श्यावमश्विना विकस्तमुज्जीवस ऐरयतं सुदानू ॥
॥ १-११७-२४ ॥

एतानि वामश्विना वीर्याणि प्र पूर्व्याण्यायवोऽवोचन् ।
ब्रह्म कृण्वन्तो वृषणा युवाभ्यां सुवीरासो विदथमा वदेम ॥
॥ १-११७-२५ ॥

हे अश्वीहो ! तुमची ती थोर कृपादृष्टि सुखकारक आहे ! हे भक्तकाम-कल्पद्रुमहो! शरीराचे अवयव विकल झाले असतां ते पुनः तुम्ही नीट करता. म्हणून त्या बुद्धिमती घोषेनें तुमचा धांवा केला,तेव्हां हे वीर्यवन्त हो! तुम्हीं आपल्या रक्षणासह तिच्याकडे गेलांत. (१-११७-१९) हे दर्शनीय अश्वी हो! कृश झालेली, दूध न देणारी व वांझोटी अशी गाय तुम्हीं शयूसाठीं दुभती केलीत. तुम्हीं आपल्या पराक्रमानें पुरुमित्राची तरुणकन्या कामद्यु इजला विमद ऋषीला जाया म्हणून आणून दिलीत. (११ १७-२०) हे पराक्रमी अश्वी हो ! तुम्ही नांगराच्या योगानें तयार केलेल्या जमिनींत धान्य पेरणारे आणि पाऊस पाडून मनूकरितां अन्न निर्माण करणारे आहां. तुम्ही तेजस्वी वज्रानें दस्यूंना मारून आर्यांकरितां तेजस्वी प्रकाश प्रकट केलांत. ( १-११७-२१ )

हे दर्शनीय अश्विदेवहो ! अथर्वणपुत्र दध्यंचाला तुम्हीं घोड्याचें मुख लावलेंत, तेव्हां त्यानें तुम्हांला मधुविद्या शिकविली. ती गुह्य विद्या तत्पूर्वी फक्त त्वष्टृदेवालाच अवगत होती. आणि या दध्यंचानें तुम्हांला ती सांगितली. ( १-११७-२२ ) हे विद्वान् अश्विदेव हो ! तुमची कृपा मी नित्य भाकितों. माझ्या सर्व सत्कृत्यांचें तुम्ही कृपा करून रक्षण करा. आम्हांला विपुल व सुश्राव्य अशी संतति-संपत्ति द्या ! ( १-११८-२३ ) हे समर्थ अश्विदेव हो ! तुम्हीं वध्रिमतीला हिरण्यहस्त पुत्र दिलांत. हे उदार देवहो ! तीन ठिकाणीं तुकडे केलेल्या श्यावाला तुम्हीं पुनः जिवंत करून वर उठविलेंत ! तुमच्या चमत्कृतीला खरोखर अंतच नाहीं ! ( १-११७-२४ ) हे बलसंपन्न अश्विदेवहो ! याप्रमाणें हे तुमचे अद्भुत पराक्रम आम्हीं भक्तांनीं वर्णन केले आहेत. तर तुमचें स्तोत्र गाणारे आम्ही वीरपुत्रसंपन्न होऊन या यज्ञसमारंभांत तुमची स्तुति गात राहूं असें घडो ! ( १-११७-२५ )

## रत्न ५७ वें

कक्षीवान्-ऋषि, दानस्तुति-देवता, जगती-छंद.

नार्कस्य पृष्ठे अधि तिष्ठति श्रितो यः पृणाति स ह देवेषु गच्छति ।
तस्मा आपो घृतमर्षन्ति सिन्धवस्तस्मा इयं दक्षिणा पिन्वते सदा ॥
॥ १-१२५-५ ॥

औ. वि.--दानस्तुति.

## रत्न ५८ वें

कक्षीवान्-ऋषि, दानस्तुपि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

दक्षिणावतामिदिमानि चित्रा दक्षिणावतां दिवि सूर्यासः ।
दक्षिणावन्तो अमृतं भजन्ते दक्षिणावन्तः प्रतिरन्त आयुः ॥
॥ १-१२५-६

औ. वि. दानस्तुति. स्मा. वि. वधूवरांना आशीर्वाद.

मा पृणन्तो दुरितमेन आरन्मा जारिषुः सूरयः सुव्रतासः ।
अन्यस्तेषां परिधिरस्तु कश्चिदपृणन्तमभि सं यन्तु शोकाः ॥
॥ १-१२५-७ ॥

## रत्न ५९ वें

परुच्छेप-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद

ये देवासो दिव्येकादश स्थ पृथिव्यामध्येकादश स्थ ।
अप्सुक्षितो महिनैकादश स्थ ते देवासो यज्ञमिमं जुषध्वम् ॥
॥ १-१३९-११॥

औ. वि. ( दश ) प्रउग-शस्त्र. स्मा. वि.--श्राद्धमंत्र.

## रत्न ६० वें

दीर्घतमा-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद.

बळित्था तद्वपुषे धायि दर्शतं देवस्य भर्गः सहसो यतो जनि ।
यदीमुपह्वरते साधते मतिर्ऋतस्य धेना अनयन्त सस्रुतः ॥
॥ १-१४१-१ ॥

### रत्न ५७ वें

जे हविर्भाग देऊन देवांना प्रसन्न करणारे देवभक्त आहेत ते स्वर्गाच्या उच्च स्थानावर चढून तेथें राहतात. त्यांना देवांमध्यें प्रतिष्ठित स्थान मिळतें. त्यांच्यासाठीं नद्या घृतसदृश मधुर उदक वाहवतात. आणि भूमि सस्यादिकांनीं सुसमृद्ध होते. (१-१२५-५)

### रत्न ५८ वें

बहुविध दक्षिणा देणाऱ्या उदार लोकांसाठींच ही उत्तमोत्तम संपत्ति आहे. त्यांचेसाठीं म्हणूनच सूर्य आकाशांत प्रकाशत असतो. दक्षिणा देणारे महात्मे अमरत्व पावतात आणि त्यांनाच दीर्घायुष्य लाभते ! (१-१२५-६) दक्षिणा देणारे उदार यजमान दुःखांत अगर पापांत न पडोत ! तसेंच देवांचें स्तोत्र गाणारे व देवव्रतांत अनुरक्त राहणारे सद्भक्त वार्धक्यानें जीर्ण न होवोत ! दुसरा कोणीतरी त्यांचें अग्नीच्या परिधीप्रमाणें रक्षण करो ! जे देवयजन करीत नाहींत अशा कंजुष माणसांवरच सर्व दुःखशोकादिकांचे प्रसंग कोसळोत ! ( १–१२५–७ )

### रत्न ५९ वें

हे देवास देवांनो ! तुम्ही आपल्या महाभाग्यानें स्वर्गात अकराच आहां. पृथ्वीवरहि अकराच आहां. अंतरिक्षामध्येंहि पण अकराच आहां. ते तुम्ही आमच्या या यज्ञाचें सेवन करून आनंदित व्हा ! ( १-१३९-११ )

### रत्न ६० वें

आदित्य देवाचें तें दर्शनीय तेज सर्वांकडून शरीरव्यवहारार्थ धारण केलें जातें, हें अगदी युक्तच आहे. कारण तें तेज सामर्थ्यापासून उत्पन्न झालेलें आहे. माझी बुद्धि तर तिकडेच धांव घेते आणि अभीष्ट साधते. यज्ञसंबंधक मंत्ररूप वाणी होतृमुखांतून त्या अग्निदेवाकडेच वाहत असते. ( १-१४१-१ )

पृक्षो वपुः पितुमान्नित्य आ शये द्वितीयमा सप्तशिवासु मातृषु ।
तृतीयमस्य वृषभस्य दोहसे दशप्रमतिं जनयन्त योषणः ॥
॥ १-१४१-२ ॥

निर्यदीं बुध्नान्महिषस्य वर्पस ईशानासः शवसा क्रन्त सूरयः
यदीमनु प्रदिवो मध्व आधवे गुहा सन्तं मातरिश्वा मथायति ॥
॥ १-१४१-३ ॥

प्रयत्पितुः परमान्नीयते पर्या पृक्षुधो वीरुधो दंसु रोहति ।
उभा यदस्य जनुषं यदिन्वत आदिद्यविष्ठो अभवद्घृणा शुचिः ॥
॥ १-१४१-४ ॥

आदिन्मातॄराविशद्यास्वा शुचिरहिंस्यमान उर्विया वि वावृधे ।
अनु यत्पूर्वा अरुहत्सनाजुवो नि नव्यसीष्ववरासु धावते ॥
॥ १-१४१-५ ॥

आदिद्धोतारं वृणते दिविष्टिषु भगमिव पपृचानास ऋञ्जते ।
देवान्यत्क्रत्वा मज्मना पुरुष्टुतो मर्तं शंसं विश्वधा वेति धायसे ॥
॥ १-१४१-६ ॥

## रत्न ६१ वें

**दीर्घतमा-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

कथा ते अग्ने शुचयन्त आयोर्ददाशुर्वाजेभिराशुषाणाः ।
उभे यत्तोके तनये दधाना ऋतस्य सामन्रणयन्त देवाः ॥
॥ १-१४७-१ ॥

अन्नसाधक, शरीरपोषक, अन्नसंपन्न व शाश्वत असा हा अग्निदेव वैश्वानर रूपानें पृथ्वीचा आश्रय करून राहतो. त्याचें जें दुसरें रूप आहे, तें हितकारक अशा सप्त मातृस्थानीय लोकांच्या आश्रयानें राहतें. त्याचें तिसरें आणखी एक रूप आहे. तें वर्षाव करणाऱ्या आदित्य-किरणांमध्यें वास करून राहतें. याप्रमाणें तीन स्थानीं राहणाऱ्या अग्नीला मंथन-समर्थी दहा अंगुलींनी मिळून उत्पन्न केला आहे. ( १-१४१-२ ) जेव्हां विशाल अरणीच्या मूळ स्थानापासून सामर्थ्यसंपन्न असे ज्ञानी ऋत्विज स्तोत्र गाऊन अग्नीला उत्पन्न करतात, जेव्हां काष्ठांत गुप्त असलेल्या अग्निदेवाला पुरातन काळाप्रमाणें यजमान अरणीतून मथन करून उत्पन्न करतो, (१-१४१-३) जेव्हां हवीला उत्कृष्टत्व प्राप्त व्हावें म्हणून अग्नि त्याच्याभोंवतीं फिरवतात, जेव्हां हवनीय वनस्पति (समिधा) त्याच्या दाढांत प्रवेश करतात, आणि जेव्हां तो दोन्ही अरणींमधून प्रकट होतो तेव्हां तो पवित्र अग्निदेव तेजः-पुंज व अत्यंत तरुण असाच असतो. (१-१४१-४) नंतर तो अमर व पवित्र देव मातृरूप वनस्पती (काष्ठ) समूहांत लागलाच प्रवेश करून झपाट्यानें वाढूं लागतो. त्यांच्यापैकीं त्या देवाच्या वाढीस ज्या प्रथम कारणीभूत झालेल्या असतात त्यांच्यामधून तो अग्नि प्रज्वलित होऊन मग नवीन व कनिष्ठ (समिधा) समूहांत अत्यंत वेगाने प्रवेश करतो. (१-१४१-५) स्वर्गांत राह-णाऱ्या देवांना प्रसन्न करण्यासाठीं त्या यज्ञगृहांत घेऊन येण्याकरितां म्हणून ऋत्विजलोक अग्नीलाच पसंत करतात आणि मग त्यास हवि व स्तोत्र अर्पण करून त्यास प्रसन्न करून घेतात. कारण हविरन्न स्वीकारण्यासाठीं स्वर्गीय देव व मर्त्य यजमान यांस कसें एकत्र आणावें हें फक्त तो बहुजन-स्तुत व सर्वाधार अग्निदेवच जाणतो. ( १-१४१-६ )

## रत्न ६१ वें

हे अग्ने ! तेजःपुंज व सर्वव्यापक असे तुझे किरण भक्तजनाला अन्ना-सहित आयुष्य कोणत्या उपायानें प्राप्त करून देतात, कीं ज्यायोगें यजमान हे अन्नवंत व आयुष्मंत होत्साते पुत्र-पौत्रादिकांना धारण करणारे आणि तसेंच यज्ञविषयक सामगायनांत रंगून जाणारे होतील ? (१-१४७-१ )

बोधा मे अस्य वचसो यविष्ठ मंहिष्ठस्य प्रभृतस्य स्वधावः ।
पीयति त्वो अनु त्वो गृणाति वन्दारुस्ते तन्वं वन्दे अग्ने ॥
॥ १-१४७-२ ॥

श्रौ. वि. प्रातरनुवाक.

## रत्न ६२ वें

दीर्घतमा-ऋषि, अग्नि-देवता, उष्णिक्-छंद.

पुरु त्वा दाश्वान्वोचेऽरिरग्ने तव स्विदा ।
तोदस्येव शरण आ महस्य ॥ १-१५०-१ ॥

श्रौ. वि. (अग्नि) प्रातरनुवाक (अति.) आश्विनशस्त्र.

व्यनिनस्य धनिनः प्रहोषे चिदररुषः ।
कदा चन प्रजिगतो अदेवयोः ॥ १-१५०-२ ॥
स चन्द्रो विप्र मर्त्यो महो व्राधन्तमो दिवि ।
प्रप्रेत्ते अग्ने वनुषः स्याम ॥ १-१५०-३ ॥

## रत्न ६३ वें

दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विष्णु-देवता, त्रिष्टुप्-छंद.

विष्णोर्नु कं वीर्याणि प्र वोचं यः पार्थिवानि विममे रजांसि ।
यो अस्कभायदुत्तरं सधस्थं विचक्रमाणस्त्रेधोरुगायः ॥
॥ १-१५४-१ ॥

श्रौ. वि. (अग्नि) आग्निमारुतशस्त्र स्मा. वि. विष्णुसूक्त.

प्रतद्विष्णुः स्तवते वीर्येण मृगो न भीमः कुचरो गिरिष्ठाः ।
यस्योरुषु त्रिषु विक्रमणेष्वधिक्षियन्ति भुवनानि विश्वा ॥
॥ १-१५४-२ ॥
प्र विष्णवे शूषमेतु मन्म गिरिक्षित उरुगायाय वृष्णे ।
य इदं दीर्घं प्रयतं सधस्थमेको विममे त्रिभिरित्पदेभिः ॥
॥ १-१५४-३ ॥

हे अन्नवंता ! हे यौवनाढ्या ! अत्यंत थोर व विनयपूर्वक वाणीनें बोलणारा जो मी त्या माझें बोलणें ऐक. हे देवा ! कोणी तुझी निंदा करतात तर कोणी तुझी स्तुति करतात. पण वंदनशील असा जो मी तो मात्र तुझ्या सुंदर मूर्तीला सदैव वंदनच करतो. ( १-१४७-२ )

## रत्न ६२ वें

हे अग्निदेवा ! तुला हविर्भाग अर्पण करून मी तुझ्यापासून पुष्कळ वर मागून घेतों. श्रीमंत यजमानाच्या घरीं नोकर असावा तद्वत् मीहि तुझा नोकरच आहें. (१-१५०-१) हे अग्निदेवा ! श्रीमंत असूनहि जो तुला भजत नाहीं व देवांना हविर्भाग देत नाहीं आणि तसेंच जो देवांची स्तुति करीत नाहीं आणि देवांवर प्रेम करीत नाहीं अशानें कदाचित् तुला बोलाविलें तर तूं त्याजवर वरप्रसाद करूं नकोस. (१-१५०-२ ) हे अग्ने, जो मनुष्य तुला भजतो तो चंद्राप्रमाणें आल्हाददायक होतो. तो देवांमध्यें श्रेष्ठ होतो ! म्हणून देवा, आम्ही तुझे परम भक्त होऊन असावें असें घडो ! ( १-१५०-३ )

## रत्न ६३ वें

आतां मी त्या विष्णु देवाच्या प्रचंड शौर्यकथांचें थोवर्तें वर्णन करीत आहें, तें ऐका; कीं ज्यानें ही पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्गलोक निर्माण केला, ज्यानें विस्तीर्ण असा द्युलोक अंतराळींच सांवरून धरला, ज्यानें अग्नि, वायु व सूर्य या तीन रूपानें हें सगळें त्रैलोक्य पादाक्रांत केलें आणि ज्या देवाला महर्षि हे स्तुतिस्तोत्र गाऊन भक्तिभावानें आळवीत असतात. ( १-१५४-१ ) विष्णु देवाची स्तुति त्याच्या पराक्रमामुळेंच सर्व जन गात असतात. घोर प्रदेशांत वास करणाऱ्या किंवा पर्वतशिखरावर राहणाऱ्या भयंकर सिंहाप्रमाणें हा देव महापराक्रमशाली आहे. त्याच्या विशाल पादस्थलीं हीं सर्व भुवनें सामावून राहिलीं आहेत. ( १-१५४-२ ) पर्वतावर राहणारा, अनेकांकडून स्तविला जाणारा, आणि मनोरथ पुरविणारा, अशा विष्णु देवास बल व स्तोत्र प्राप्त होवो ! हें जें विशाल विश्व पसरलेलें आहे तें सर्व त्यानें आपल्या तीनच पावलांत आक्रमून ठेविलें आहे. (१-१५४-३)

यस्य त्री पूर्णा मधुना पदान्यक्षीयमाणा स्वधया मदन्ति ।
य उं त्रिधातु पृथिवीमुत द्यामेको दाधार भुवनानि विश्वा ॥

॥ १-१५४-४ ॥

तदस्य प्रियमभि पाथो अश्यां नरो यत्र देवयवो मदन्ति ।
उरुक्रमस्य स हि बन्धुरित्था विष्णोः पदे परमे मध्व उत्सः ॥

॥ १-१५४-५ ॥

ता वां वास्तून्युश्मसि गमध्यै यत्र गावो भूरिशृङ्गा अयासः ।
अत्राह तदुरुगायस्य वृष्णः परमं पदमव भाति भूरि ॥

॥ १-१५४-६ ॥

## रत्न ६४ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, इन्द्राविष्णू-देवता, जगती-छंद**

प्र वः पान्तमन्धसो धियायते महे शूराय विष्णवे चार्चत ।
या सानुनि पर्वतानामदाभ्या महस्तस्थतुरर्वतेव साधुना ॥

॥ १-१५५-१ ॥

**श्रौ. वि. (अभिप्लव) स्तोमातिशंसन.** **स्मा. वि.--विष्णुसूक्त.**

त्वेषमित्था समरणं शिमीवतोरिन्द्राविष्णू सुतपा वामुरुष्यति ।
या मर्त्याय प्रतिधीयमानमित्कृशानोरस्तुरसनामुरुष्यथः ॥

॥ १-१५५-२ ॥

ता ईं वर्धन्ति मह्यस्य पौंस्यं नि मातरा नयति रेतसे भुजे ।
दधाति पुत्रोऽवरं परं पितुर्नाम तृतीयमधि रोचने दिवः ॥

॥ १-१५५-३ ॥

त्याचीं मधुर रसानें भरलेलीं तीन पावलें अक्षय अन्नानें लोकांना प्रमुदित करतात आणि तो ही पृथ्वी, स्वर्ग व अंतरिक्ष व सर्व भूतजात यांना धारण करतो. ( १–१५४–४ ) त्या विष्णु देवाला प्रिय असलेल्या अविनश्वर अशा ब्रह्मलोकावर आम्ही जाऊं इच्छितों. कारण तेथें विष्णुभक्त यज्ञयागादि पुण्यकर्मांच्या योगानें जाऊन परमानंद प्राप्त करून घेतात. सर्व जग व्यापून टाकणाऱ्या त्या विश्वव्यापक परमेश्वराच्या सुखलोकांत मधुर अमृताचे झरे सतत वाहत असतात. तो विष्णु देव सर्व भक्तजनांचा हितकर्ता आहे. ( १-१४५-५ ) आम्ही विष्णु देवाजवळ अशी प्रार्थना करतों कीं, तुम्हीं यजमान-पत्नी दोघांनी त्या श्रेष्ठस्थानीं जावें कीं, जेथें अनेकांस आश्रयणीय व अति विस्तृत अशीं किरणें सदैव राहत आहेत. कारण येथेंच त्या बहुस्तुत व मनोरथपूरक विष्णु देवाचें श्रेष्ठ स्थान आपल्या माहात्म्यानें नित्य प्रकाशत असतें. ( १–१५४–६ ).

## रत्न ६४ वें

अहो ऋत्विज हो ! तुमचें सोमरूपी अन्न स्तवनप्रिय अशा महान् व शूर इन्द्राला आणि विष्णूला अर्पण करा. इन्द्र व विष्णु हे दोघे अजिंक्य व परमश्रेष्ठ असून ते इष्टस्थळीं नेणाऱ्या वेगवान् घोड्याप्रमाणें उच्च पर्वतशिखरावर उभे आहेत. (१-१५५-१) हे इन्द्राविष्णूनो ! हा सोमयाजी यजमान इष्टमनोरथ पूर्ण करणाऱ्या तुमच्या सुमंगल आगमनाचें यज्ञद्वारा स्वागत करतो. कारण तुम्ही हविप्रदान करणाऱ्या यजमानाला द्यावयाचें प्रतिफल शत्रूचें निवारण करणाऱ्या अग्निदेवाकरवीं प्रदान करणारे आहांत. (१-१५५-२)

त्या सोमाहुति या इंद्राचें महत्त्व वाढविणाऱ्या आहेत. तो इन्द्र तें सोमपानजनित सामर्थ्य प्रजोत्पादनाकरितां व रक्षणाकरितां म्हणून द्यावापृथ्वीप्रत पोंचवितो. पित्याचें उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा प्रकारचें जें सामर्थ्य आहे तें पुत्र हा आदित्याच्या तेजस्वी मंडळांत ठेवितो. (१-१५५-३)

## रत्न ६५ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि विष्णु-देवता, जगती-छंद.**

तत्तदिदंस्य पौंस्यं गृणीमसीनस्यं त्रातुरंवृकस्यं मीळ्हुषंः ।
यः पार्थिवानि त्रिभिरिद्विगांमभिरुरु क्रमिष्टोरुगायायं जीवसें ॥
॥ १-१५५-४ ॥

**श्रौ. वि. (अभिप्लव) सोमातिशंसन.** **स्मा. वि.--विष्णुसूक्त.**

द्वे इदंस्य क्रमणे स्वर्दृशोऽभिख्याय मर्त्यो भुरण्यति ।
तृतीयमस्य नकिरा दंधर्षति वयंश्चन पतयन्तः पतत्रिणंः ॥
॥ १-१५५-५ ॥

चतुर्भिः साकं नंवतिं च नामंभिश्चक्रं न वृत्तं व्यतींरवीविपत् ।
बृहच्छरीरो विमिमांन ऋक्वभिर्युवाकुमारः प्रत्येत्याहवम् ॥
॥ १-१५५-६ ॥

## रत्न ६६ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विष्णु-देवता, जगती-छंद.**

भवां मित्रो न शेव्यो घृतासुतिर्विभूतद्युम्न एवया उं सप्रथाः ।
अधां ते विष्णो विदुषां चिदर्ध्यः स्तोमो यज्ञश्च राध्यो हविष्मंता ॥
॥ १-१५६-१ ॥

**श्रौ. वि. (उक्थ्य)-अच्छावाकशस्त्र** **स्मा. वि.-विष्णुसूक्त.**

यः पूर्व्याय वेधसे नवीयसे सुमज्जांनये विष्णंवे ददांशति ।
यो जातमंस्य महतो महि ब्रवत्सेदु श्रवोंभिर्युज्यं चिदभ्यंसत् ॥
॥ १-१५६-२ ॥

## रत्न ६५ वें

सर्व जगताचा स्वामी, भक्तजनरक्षक, शत्रुरहित व नित्य तरुण अशा विष्णु देवाच्या पराक्रमाचें दीर्घायुष्यप्राप्तीसाठीं म्हणून आम्ही संकीर्तन करतों. अहो त्यानें विशाल अशा तीनच पादांनीं पृथिव्यादि तीनहि लोकांचें संपूर्ण आक्रमण केलें आहे ! केवढें हें आश्चर्य ! (१-१५५-४) ह्या सर्वद्रष्ट्या विष्णूचीं भूमि व अंतरिक्ष अशीं हीं दोनच पावलें मनुष्य जाणूं शकतो. स्वर्गलोकात्मक जो त्याचा तिसरा पाद आहे तो मात्र कोणताहि मानव जाणूं शकत नाहीं. केवळ मनुष्यच नव्हे, तर सर्वत्र संचार करणारे असे ज्ञानी मरुत् आणि गरुडादि पक्षीहि त्यास आकलन करूं शकत नाहींत. (१-१५५-५) अनेक अरा असलेल्या मोठ्या चाकाप्रमाणें तो विष्णु देव आपल्या प्रेरणाशक्तीनें चवऱ्याण्णव कालावयवांना सतत फिरवीत असतो. हा शरीरानें विराट स्वरूप असला तरी स्तुतीच्या योगानें सहज आकलन केला जातो. तो तरुण आहे. कुमार नाहीं. भक्तीनें आळविला म्हणजे तो सहज प्राप्त होतो. ( १-१५५-६ ).

## रत्न ६६ वें

हे विष्णु देवा ! तूं आम्हांला दुःखांतून तारण करणारा आहेस ! तसाच सुखकारक आहेस ! उदकवर्षाव करणारा आहेस ! महाकीर्तिमान् आहेस ! आमचा रक्षणकर्ता आहेस ! अत्यंत विशाल आहेस ! एवंविशिष्ट असा जो तूं त्या तुझें पुनः पुनः स्तोत्र करणें हें उचित आहे. आणि हविसंपन्न यजमानानें तुझी समाराधना करावी हेंहि पण उचितच होय. (१-१५६-१) जो मनुष्य नित्य, जगत्कर्ता, नित्य नवनवीन, व स्वयंभू अशा विष्णु-देवाला हविर्भाग अर्पण करतो व त्या महानुभावाच्या जन्मकथांचें संकीर्तन करतो, तो भक्त कीर्तिमान् होऊन शेवटीं त्या देवाच्या श्रेष्ठ-स्थानाप्रत जातो. (१-१५६-२).

तमु स्तोतारः पूर्व्यं यथा विद ऋतस्य गर्भं जनुषा पिपर्तन ।
आस्य जानन्तो नाम चिद्विवक्तन महस्ते विष्णो सुमतिं भजामहे ॥
॥ १-१५६-३ ॥

तमस्य राजा वरुणस्तमश्विना क्रतुं सचन्त मारुतस्य वेधसः ।
दाधार दक्षमुत्तममहर्विदं व्रजं च विष्णुः सखिवाँ अपोर्णुते ॥
॥ १-१५६-४ ॥

आ यो विवाय सचथाय दैव्य इन्द्राय विष्णुः सुकृते सुकृत्तरः ।
वेधा अजिन्वात्त्रिषधस्थ आर्यमृतस्य भागे यजमानमाभजत् ॥ ॥
॥ १-१५६-५ ॥

## रत्न ६७ वें

**दीर्घतमा-ऋषि, अश्व-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

एकस्त्वष्टुरश्वस्या विशस्ता द्वा यन्तारा भवतस्तथ ऋतुः ।
या ते गात्राणामृतुथा कृणोमि ताता पिण्डानां प्र जुहोम्यग्नौ ॥
॥ १-१६२-१९ ॥

**श्रौ. वि. (अश्वमेध)-अधिग्रुप्रेषानंतर। स्मा. वि.-अश्वदेवता सूक्त.**

मा त्वा तपत्प्रिय आत्मापियन्तं मा स्वधितिस्तन्व१ आ तिष्ठिपत्ते ।
मा ते गृध्नुरविशस्तातिहाय छिद्रा गात्राण्यसिना मिथू कः ॥
॥ १-१६२-२० ॥

न वा उ एतन्म्रियसे न रिष्यसि देवाँ इदेषि पथिभिः सुगेभिः
हरी ते युञ्जा पृषती अभूतामुपास्थाद्वाजी धुरि रासभस्य ॥
॥ १-१६२-२१ ॥

सुगव्यं नो वाजी स्वश्व्यं पुंसः पुत्राँ उत विश्वापुषं रयिम् ।
अनागास्त्वं नो अदितिः कृणोतु क्षत्रं नो अश्वो वनतां हविष्मान् ॥
॥ १-१६२-२२ ॥

अहो स्तोत्र गाणारे भक्तजन हो ! अनादिसिद्ध व जलोत्पादक अशा विष्णु देवाला प्रसन्न करा व त्याचें माहात्म्य तुम्ही जसें जाणतां तसें वर्णन करा. हे विष्णु देवा ! थोर असा जो तूं त्या तुझ्या सुप्रसन्न मर्जीत आम्ही राहूं असें कर ! (१-१५६-३) ऋत्विज—मंडळानें युक्त असलेल्या बुद्धिमान् यजमानाच्या यज्ञाचें राजा वरुण स्वीकार करतो.व अश्विनी देवहि स्वीकार करतात. त्या विष्णूचे इंद्रमरुतादि देव सहाय्यकर्ते असून त्यानें महद्बल धारण केलें आहे. आणि तोच देव मेघारूढ होऊन वृष्टि करणारा आहे. (१-१५६-४) स्वर्गांत राहणारा आणि भक्तजनाला उत्तमोत्तम फल देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असणारा तो विष्णु देव यज्ञामध्यें यजमानाला सहाय्य करण्याकरितां येतो व तेथें येऊन त्या सुदर स्तुतिकर्त्या यजमानाला तो त्रैलोक्यव्यापक देव इष्ट फल देऊन त्यास संतुष्ट करतो. (१-१५६-५).

## रत्न ६७ वें

तेजस्वी घोडयाचा विशस्ता [ कापणारा ] हा एकच असतो. आणि तो म्हणजे कालात्मा होय. आणि त्याला धरणारे दोघे असतात. हे अश्वा! तुझे अवयव मी यथाकाल व यथाक्रम कापून काढून, त्यांचे मांसपिंड बनवून मी ते अग्नीमध्यें हवन करतों. ( १–१६२–१९ ) हे अश्वा ! तूं देवांकडे जातेवेळीं तुझा प्रिय आत्मा व्यथित न होवो ! तुला कापणारी सुरी तुझ्या शरीरांत फार वेळ न राहो! कापणारा अडाणीपणानें तुझीं गात्रें सुरीनें वांकडींतिकडीं न कापो. ( १–१६२–२० ) हे अश्वा ! खचित खचित तूं कांहीं मरत नाहींस किंवा तुला व्यथाहि पण होत नाहीं ! तर देवयानाच्या सुंदर मार्गानें तूं सरळ देवांप्रत जातोस. तुला स्वर्गांत घेऊन जाण्याकरितां रथाला इंद्राचे घोडे जोडले जातील. किंवा मरुतांच्या ठिपक्याठिपक्यांच्या हरिणी जुपल्या जातील किंवा अश्विनीवाहन जो रासभ, त्याच्या धुरेला बलवान् अश्व जोडला जाईल. ( १–१६२–२१ ) हा यज्ञेश्वराप्रीत्यर्थ अर्पण केलेला घोडा आम्हांस उत्तम गोधन, उत्तम अश्व, वीर्यशाली पुत्र, व सर्व बाजूंनी आमची समृद्धि करणारी अशी दिव्य संपत्ति देवो ! अनाद्यनन्त अदिति आम्हांस निष्पाप करो, आणि हा हविर्भूत अश्वमेघ आम्हांला क्षात्रतेज प्राप्त करून देवो ! (१–१६२–२२).

## रत्न ६८ वें

दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप-छंद

को ददर्श प्रथमं जायमानमस्थन्वन्तं यदनस्था बिभर्ति ।
भूम्या असुरसृगात्मा क्व स्वित्को विद्वांसमुप गात्प्रष्टुमेतत् ।
॥ १-१६४-४ ॥

श्रौ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र. स्मा. वि. तत्त्वज्ञान

पाकः पृच्छामि मनसाविजानन्देवानामेना निहिता पदानि ।
वत्से बष्कयेऽधि सप्त तन्तून्वि तत्निरे कवय ओतवा उ ॥
॥ १-१६४-५ ॥

अचिकित्वाश्चिकितुषश्चिदत्र कवीन्पृच्छामि विद्मने न विद्वान् ।
वि यस्तस्तम्भ षळिमा रजांस्यजस्य रूपे किमपि स्विदेकम् ॥
॥ १-१६४-६ ॥

इह ब्रवीतु य ईमङ्ग वेदास्य वामस्य निहितं पदं वेः ।
शीर्ष्णः क्षीरं दुह्रते गावो अस्य वव्रिं वसाना उदकं पदापुः ॥
॥ १-१६४-७ ॥

## रत्न ६९ वें

दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप-छंद

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परि षस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभि चाकशीति ॥
॥ १-१६४-२० ॥

## रत्न ६८ वें

तो निर्गुण व निर्विकारी परमेश्वर जेव्हां सगुण व शरीरधारी झाला तेव्हां त्याचा तो जन्म पाहणारा असा कोणी तरी होता काय ! कारण तेव्हां हें अस्थियुक्त पंचमहाभूतात्मक शरीर अस्थिरहित त्या परमेश्वामध्येंच गर्भित होऊन राहिलें होतें. प्राण व रक्त हे भूमीपासून झाले आहेत. मग तो आत्मा कोठें होता ! या सर्व गोष्टींचें ज्याला ज्ञान होतें त्या गुरूला विचारण्याला तरी कोण गेला होता ! ( १-१६४-४ ) बुद्धीनें अल्प असल्यामुळें हें सर्व गहनतत्त्व समजण्यास मी असमर्थ आहें आणि म्हणून मी हे प्रश्न विचारीत आहे. कारण देवांना देखील या गोष्टी गूढच आहेत. नाहींत काय ! ज्याच्यामध्यें हें सर्व त्रिभुवन स्थित आहे अशा सूर्यदेवाला आवरण घालण्यासाठीं ऋषींनीं पसरलेले ते सात धागे तरी कोणते ! (१-१६४-५) याविषयीं मी अगदींच नेणता आहें. याविषयाचें ज्ञान करून घ्यावें म्हणून मी ज्ञानवंतांना या विषयासंबंधानें विचारीत आहें, कीं ज्यानें हे सहाहि लोक धारण केले आहेत अशा त्या जन्मरहित आदित्यमंडळांतील एकमेवाद्वितीय असें तें परम तत्त्व तरी कोणते ! (१-१६४-६) ज्या कोणा ज्ञात्याला हें अवगत असेल त्यानें हें मला लवकर सांगावें. समोर दिसणाऱ्या, नित्य गमनशील अशा या सूर्यदेवाचें स्वरूप मोठें गुढ आहे ! त्या आदित्याचे शिराप्रमाणें उच्चभागीं असणारे कांहीं किरण उदकाच्या धारा खालीं सोडतात व कांहीं तप्त किरण तें पाणी सोडलेल्या मार्गानेंच पुनः वर शोषून घेतात. ( १-१६४-७ ).

## रत्न ६९ वें

एकमेकांजवळ राहणारे व एकमेकांचे मित्र असे दोन पक्षी एकाच वृक्षाचा आश्रय करून राहते झाले. त्यांपैकीं एक त्या वृक्षाच्या मधुर फळांचा उपभोग घेतो आणि दुसरा त्याचा उपभोग न घेतां फक्त आपल्या संवगड्याचें तें खाणें पाहत असतो. (१-१६४-२०)

**श्रौ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र;** **स्मा. वि. तत्त्वज्ञान**

यत्रा सुपर्णा अमृतस्य भागमनिमेषं विदथाभिस्वरन्ति ।
इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धीरः पाकमत्रा विवेश ॥
॥ १-१६४-२१ ॥

यस्मिन्वृक्षे मध्वदः सुपर्णा निविशन्ते सुवते चाधि विश्वे ।
तस्येदाहुः पिप्पलं स्वाद्वग्रे तन्नोन्नशद्यः पितरं न वेद ॥
॥ १-१६४-२२ ॥

यद्गायत्रे अधि गायत्रमाहितं त्रैष्टुभाद्वा त्रैष्टुभं निरतक्षत ।
यद्वा जगज्जगत्याहितं पदं य इत्तद्विदुस्ते अमृतत्वमानशुः ।
॥ १-१६४-२३ ॥

## रत्न ७० वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अनच्छये तुरगातु जीवमेजद् ध्रुवं मध्य आ पस्त्यानाम् ।
जीवो मृतस्य चरति स्वधाभिरमर्त्यो मर्त्येना सयोनिः ॥
॥ १-१६४-३० ॥

**श्रौ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र.** **स्मा. वि. तत्त्वज्ञान**

अपश्यं गोपामनिपद्यमानमा च परा च पथिभिश्चरन्तम् ।
स सध्रीचीः स विषूचीर्वसान आ वरीवर्ति भुवनेष्वन्तः ॥
॥ १-१६४-३१ ॥

**श्रौ. वि. ( प्रवर्ग्य ) अभिष्टव** **स्मा. वि. तत्त्वज्ञान**

य ईं चकार न सो अस्य वेद य ईं ददर्श हिरुगिन्नु तस्मात् ।
स मातुर्योना परिवीतो अन्तर्बहुप्रजा निर्ऋतिमा विवेश ॥
॥ १-१६४-३२ ॥

द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र बन्धुर्मे माता पृथिवी महीयम् ।
उत्तानयोश्चम्वोऽर्योनिरन्तरत्रा पिता दुहितुर्गर्भमाधात् ॥
॥ १-१६४-३३ ॥

ज्याचेजवळ सुगमनशील असे किरण स्वकर्तव्य जाणून उदकाचा सारभूत अंश नित्य पोंचवीत असतात, आणि जो सर्व जगाचा स्वामी व रक्षणकर्ता आहे, असा तो ज्ञानमय परमेश्वर या माझ्या अज्ञ अंतःकरणांत प्रवेश करून राहिला आहे. (१-१६४-२१ ) ज्या आदित्य-रूप वृक्षावर हे जे किरणरूप पक्षी उदकांतील मधुर रसाचा आस्वाद घेत राहत असतात, ते रात्रीं त्या वृक्षामध्यें जाऊन प्रवेश करतात आणि उदय-काळीं पुनः सर्व जगावर प्रकाश पाडतात. त्या वृक्षाचें फल गोड असतें असें तत्त्वज्ञानी सांगत आले आहेत, पण या फलाचा रसास्वाद जे त्या जगत्पा-लनकर्त्याला उपासनाद्वारा जाणत नाहींत, त्यांस मिळूं शकत नाहीं. ( १-१६४-२२ ) पृथ्वीवर अग्नि स्थापन केला आहे, तें स्थान कोणतें, आकाशापासून निर्माण केलेल्या वायूचें स्थान कोणतें, आणि आकाशांतील गमनशील सूर्याचें स्थान कोणतें हें सर्व जे जाणतात, तेच ज्ञानी भक्त अमरत्व पावतात. ( १-१६४-२३ )

## रत्न ७० वें

श्वासोच्छ्वास करणारी, जिवंत व हालचाल करणारी जी वस्तु आहे, ती या देहरूपी घरामध्यें खांबाप्रमाणें स्थिर होऊन राहिली आहे. शरीरगत जीवात्मा व मरणधर्मी देह या दोघांचें उत्पत्तिस्थान समानच असून, तो जीव स्वधान्नावर राहणारा आहे. ( १-१६४-३० ) जगाचा रक्षक व कधींहि न थकणारा असा जो आदित्य त्यास मी पाहिला आहे. तो अंत-रिक्षांतील मार्गानीं उदयास्त करीत फिरत असतो. तो या जगामध्यें पुनः पुनः येत जात असतो. (१-१६४-३१) ह्याला ज्यानें उत्पन्न केलें तो त्याला ओळखीत नाहीं. ज्यानें त्याला पाहिला आहे तो त्याच्यापासून गुप्त राहिला आहे. हा जीवात्मा मातेच्या उदरांत गुरफटून गेलेला असून, त्याला अनेक जन्म आहेत आणि तो संसारदुःखांत बुडून गेला आहे. (१-१६४-३२) अंतरिक्ष हा माझा बाप, तोच माझा जनक, पृथ्वीची नाभि हा माझा बंधु व ही थोर पृथ्वी माझी माता होय. उताण्या असलेल्या दोन सोमपात्रांच्या मध्यभागीं सर्व जगाचें जन्मस्थान असून तेथेंच आपल्या कन्येच्या ठिकाणीं पित्यानें गर्भ ठेवून दिला आहे. (१-१६४-३३)

## रत्न ७१ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि. विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

पृच्छामि त्वा परमन्तं पृथिव्याः पृच्छामि यत्र भुवनस्य नाभिः ।
पृच्छामि त्वा वृष्णो अश्वस्य रेतः पृच्छामि वाचः परमं व्योम ॥

॥ १-१६४-३४ ॥

**श्रौ. वि. ( अश्वमेध ) ब्रह्मोद्यसंवाद** **स्मा. वि. तत्वज्ञान**

इयं वेदिः परो अन्तः पृथिव्या अयं यज्ञो भुवनस्य नाभिः ।
अयं सोमो वृष्णो अश्वस्य रेतो ब्रह्मायं वाचः परमं व्योम ॥

॥ १-१६४-३५ ॥

## रत्न ७२ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अपाङ् प्राङेति स्वधया गृभीतोऽमर्त्यो मर्त्येना सयोनिः ।
ता शश्वन्ता विषूचीना वियन्ता न्यऽन्यं चिक्युर्न नि चिक्युरन्यम् ॥

॥ १-१६४-३८ ॥

**श्रौ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र :** **स्मा. वि. तत्वज्ञान**

## रत्न ७३ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

ऋचो अक्षरे परमे व्योमन्यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः ।
यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते ॥

॥ १-१६४-३९ ॥

**श्रौ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र,** **स्मा. वि. तत्वज्ञान**

## रत्न ७१ वें

हे ऋत्विजा ! मी तुला विचारतों कीं, या पृथ्वीची अंतिम मर्यादा कोणती ! जगाचा मध्य तो कोणता ? वळू घोड्याचें रेत कोणतें आणि वाणीचें श्रेष्ठस्थान कोणतें ? हें सर्व मी तुला विचारतों. (१–१६४–३४) ही वेदि तीच पृथ्वीची अंतिम सीमा होय. आणि हा जो यज्ञ, तोच जगाचा मध्य. हा सोमरस तेंच वर्षाव करणाऱ्या घोड्याचें रेत आणि हा जो ब्रह्म तेंच वाणीचें परम श्रेष्ठस्थान होय. ( १–१६४–३५ ).

## रत्न ७२ वें

आत्मा हा या मर्त्य देहाबरोबरच जन्म पावतो. तो सुखोपभोगाच्या इच्छेनें केव्हां खालीं या लोकीं तर केव्हां वर स्वर्गलोकीं जातो. हे दोन्ही जीव व देह नित्य एकत्र राहत असून, ते इहलोकीं व परलोकीं मिळूनच संचार करीत असतात. हें खरें असलें तरी मनुष्य फक्त देह तेवढाच जाणतो आणि देहाव्यतिरिक्त आत्मा मात्र जाणत नाहीं. ( १–१६४–३८ ).

## रत्न ७३ वें

अत्युच्च अशा स्वर्लोकीं वास करणाऱ्याप्रमाणेंच वेदांतील ऋच्यांच्या अक्षरांत सर्व देवांनीं वास केला आहे, तर असें जें ऋचेचें अक्षर तें ज्याला अर्थरूपानें समजत नाहीं, त्याला नुसता वेद तोंडानें पाठ म्हणून काय लाभावयाचें आहे ? ज्यांनीं तें अक्षरगत तत्त्व अर्थतः ओळखिलें ते ज्ञानीच पूर्ण सुखी होतात. ( १–१६४–३९ ).

## रत्न ७४ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

गौरीर्मिमाय सलिलानि तक्षत्येकपदी द्विपदी सा चतुष्पदी ।
अष्टापदी नवपदी बभूवुषी सहस्राक्षरा परमे व्योमन् ॥

॥ १-१६४-४१ ॥

**औ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र, स्मा. वि. तत्त्वज्ञान**

## रत्न ७५ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

चत्वारि वाक्परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।
गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचोमनुष्या वदन्ति ॥

॥ १-१६४-४५ ॥

**औ. वि. ( वाग्देवपशु ) अनुवाक्या. स्मा. वि. तत्त्वज्ञान**

## रत्न ७६ वें

**दीर्घतमा औचथ्य-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद**

इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान् ।
एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥

॥ १-१६४-४६ ॥

**औ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र, स्मा. वि. सौरजप; तत्त्वज्ञान**

कृष्णं नियानं हरयः सुपर्णा अपो वसाना दिवमुत्पतन्ति ।
त आववृत्रन्त्सदनादृतस्यादिद्घृतेन पृथिवी व्युद्यते ॥

॥ १-१६४-४७ ॥

**औ. वि. ( वर्षकामेष्टि ) अनुवाक्या.**

## रत्न ७४ वें

ही तेजस्वी ( मेघाची ) वाणी उदक निर्माण करीत असतांना निनादत असते. तिला एक पाय, किंवा दोन, अथवा चार, अथवा आठ किंवा नऊ देखील असतात, किंवा तिला अनंत अक्षरें असून ती अति उच्च अशा स्वर्गांत राहणारी आहे. ( १–१६४–४१ ).

## रत्न ७५ वें

वाणीचे एकंदर चार प्रकार गणले आहेत. ते सर्व प्रकार जे ब्राह्मण ज्ञानसंपन्न आहेत, त्यांना मात्र अवगत असतात. त्यांपैकीं तीन प्रकार गुप्त असल्यामुळें ते आकलन करण्यांत येत नाहींत. पण जो चौथा एक प्रकार आहे, तो मात्र लोक तोंडानें बोलत असतात.( १-१६४–४५ ).

## रत्न ७६ वें

त्या आदित्यालाच कोणी इन्द्र, कोणी मित्र, कोणी वरुण, कोणी अग्नि असें म्हणतात. देवलोकीं राहणारा सुंदर पंखाचा पक्षी म्हणजे तो हाच. तो वस्तुतः एकच आहे, तरी ज्ञानीजन त्याला अनेक नांवांनीं आळवितात. त्याला अग्नि, यम, मातरिश्वा असें म्हणतात. (१–१६४–४६ ) उदकाचें शोषण करणारे सूर्यांचे किरण पाण्याला कृष्णवर्ण मेघाचें पांघरूण घालून वर आदित्यमंडलाप्रत जातात, आणि उदकस्थानभूत अशा त्या आदित्य-मंडलांतून पुनः ते परत येतात. तदनतर पृथ्वी ही लागलीच पावसानें भिजून चिंब होते. ( १–१६४--४७ ).

## रत्न ७७ वें

**दीर्घतमा-ऋषि; सरस्वती-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

यस्ते स्तनः शशयो यो मयोभूर्येन विश्वा पुष्यसि वार्याणि ।
यो रत्नधा वसुविद्यः सुदत्रः सरस्वति तमिह धातवे कः ॥

॥ १-१६४-४९ ॥

**श्रौ. वि. १ ( प्रवर्ग्य ) अभिष्टव; स्मा. वि. स्तनपान**

## रत्न ७८ वें

**दीर्घतमा-ऋषि, सूर्य-देवता, अनुष्टुप्-छंद**

समानमेतदुदकमुच्चैत्यव चाहभिः ।
भूमिं पर्जन्या जिन्वन्ति दिवं जिन्वन्त्यग्नयः ॥

॥ १-१६४-५१ ॥

**श्रौ. वि. ( महाव्रत ) वैश्वदेवशस्त्र.**

## रत्न ७९ वें

**दीर्घतमा-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

दिव्यं सुपर्णं वायसं बृहन्तमपां गर्भं दर्शतमोषधीनाम् ।
अभीपतो वृष्टिभिस्तर्पयन्तं सरस्वन्तमवसे जोहवीमि ॥

॥ १-१६४-५२ ॥

**श्रौ. वि. १ ( सरस्वत पशु ) वपायाज्या;**

## रत्न ८० वें

**लोपामुद्रा ऋषि, रति-देवता, त्रिष्टुप्-छंद**

पूर्वीरहं शरदः शश्रमाणा दोषा वस्तोरुषसो जरयन्तीः ।
मिनाति श्रियं जरिमा तनूनामप्यू नु पत्नीर्वृषणो जगम्युः ॥

॥ १-१७९-१ ॥

ये चिद्धि पूर्व ऋतसाप आसन्त्साकं देवेभिरवदन्नृतानि ।
ते चिदवासुर्नह्यन्तमापुः समू नु पत्नीर्वृषभिर्जगम्युः ॥

॥ १-१७९-२ ॥

## रत्न ७७ वें

हे सरस्वति ! अनुपभक्त, सुखदायक, रत्नधारक, धनवेत्तक, कल्याण-कारक असा जो तुझा स्तन आहे व ज्या स्तनानें तूं सर्व प्राणिमात्रांचें पोषण करतेस, तो तुझा स्तन मला या लोकीं प्यावयास मिळेल असें कर ! ( १--१६४--४९ ).

## रत्न ७८ वें

पाणी हें सर्वत्र सारखेंच असून तें ग्रीष्मकालीन उष्ण दिवसांच्या योगानें बाफ होऊन वर जातें आणि पुढें वर्षाकालीन दिवसांत पुनः खालीं येतें. याप्रमाणें पर्जन्य हा पृथ्वीला सुखवितो. आणि यज्ञीय अग्नि हे स्वर्गस्थ देवांना सुखवितात. ( १–१६४--५१ ).

## रत्न ७९ वें

द्युलोकांत राहणारा, सुंदर पंखाचा, शीघ्र गमनाचा, अत्यंत थोर, उद-काचा गर्भ, ओषधींचा उत्पादक, पाऊस पाडून ज्याला संतोषविणारा, तटाकादि जलाशयें पावसानें तुडुंब भरणारा, असा जो सूर्य नारायण त्यास आम्ही आमच्या संरक्षणार्थ पुनः पुनः बोलावीत आहों. (१–१६४–५२).

## रत्न ८० वें

लोपामुद्राः—हे अगस्ते ! रात्रंदिवस दक्ष राहून मी तुझी पुष्कळ वर्षे सेवाचाकरी सारखी करीत आलें आहें. प्रत्येक उषःकाल म्हातारपण जवळ आणीत आहे. आणि हें म्हातारपण म्हणजे माझ्या शरीराची शोभा नाहींसें करणारें आहे. मग आतां काय केलें पाहिजे असें म्हणशील तर पतींनीं आपल्या पत्नींशीं रतिप्रसंग करावा. ( १-१७९-१) प्राचीनकाळीं जे कोणी सत्यव्रत ऋषी होऊन गेले व जे देवांशीं सत्यच बोलत असत त्यांनीं देखील प्रजा उत्पन्न केलीच कीं नाहीं ? ब्रह्मचर्येची अखेर त्यांना सुद्धां गांठतां आली नाहीं ! म्हणून म्हणतें कीं आपल्या स्त्रियांबरोबर पतींनीं रतिसुखाचा उपभोग घ्यावा. ( १–१७९–२ ).

## रत्न ८१ वें

**अगस्त्य मैत्रावरुण-ऋषि, रति-देवता, त्रिष्टुप्-छंद**

न मृषा श्रान्तं यदवन्ति देवा विश्वा इत्स्पृधो अभ्यश्नवाव ।
जयावेदत्र शतनीथमाजिं यत्सम्यञ्चा मिथुनावभ्यजाव ॥
॥ १-१७९-३ ॥

नदस्य मा रुधतः काम आगन्नित आजातो अमुतः कुतश्चित् ।
लोपामुद्रा वृषणं नी रिणाति धीरमधीरा धयति श्वसन्तम् ॥
॥ १-१७९-४ ॥

## रत्न ८२ वें

**अगस्त्यशिष्य-ऋषि, रति-देवता, ५ बृहती, ६ त्रिष्टुप्-छंद**

इमं नु सोममन्तितो हृत्सु पीतमुप ब्रुवे ।
यत्सीमागश्चकृमा तत्सु मृळतु पुलुकामो हि मर्त्यः ॥
॥ १-१७९-५ ॥

अगस्त्यः खनमानः खनित्रैः प्रजामपत्यं बलमिच्छमानः ।
उभौ वर्णावृषिरुग्रः पुपोष सत्या देवेष्वाशिषो जगाम ॥
॥ १-१७९-६ ॥

**स्मा. वि. भुक्तान्नपाचन**

## रत्न ८३ वें

**अगस्त्य मैत्रावरुण-ऋषि, अन्न-देवता, अनुष्टुबगर्भा उष्णिक्-छंद.**

पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् ।
यस्य त्रितो व्योजसा वृत्रं विपर्वमर्दयत् ॥ १-१८७-१ ॥

**श्रौ. वि. विषनाशन सूक्त, स्मा. वि. अन्नोपस्थान.**

## रत्न ८१ वें

अगस्तिः-हे लोपामुद्रे ! आपण कांहीं व्यर्थ श्रम केले नाहींत. देव आमच्या तपानें सुप्रसन्न होऊन आमचें रक्षण करीत असल्यामुळें आमच्या सर्व इच्छा आम्ही पूर्ण करून घेऊं. आम्ही उभयता मिळून जर प्रयत्न करूं तर या संसारांतील अनेक अडी-अडचणींतून पार होऊन जाऊं. (१-१७९-३) हे भार्ये ! जपमग्न व ब्रह्मचर्यनिष्ठ असा जो मी त्या माझा काम या ना त्या कारणानें आतां वाढत चालला आहे. तर लोपामुद्रेनें आतां खुशाल आपल्या संगमोत्सुक पतीजवळ यावें ! कारण अधीर झालेल्या या स्त्रीनें धीर व महाबल अशा मज पुरुषाला सर्वस्वीं कामवश करून सोडलें आहे. ( १-१७९-४ )

## रत्न ८२ वें

शिष्य म्हणतो:—आम्हीं सोमरस पिऊन तो अंतःकरणांत सांठवून ठेविला आहे. त्याच्याजवळ माझी अशी प्रार्थना आहे कीं, आम्ही जो गुरूचा प्रेमप्रलाप ऐकून पापप्रसंग ओढवून घेतला, त्याची आम्हांस त्यानें क्षमा करावी. कारण हा जो मनुष्य आहे त्याला भल्याबुऱ्या अशा अनेक वासना असतातच ! ( १-१७९-५ ) भृत्यादि परिवार, पुत्रादि संतति, व सामर्थ्य यांची इच्छा करणारा व योग्य साधनद्वारा इष्ट फलप्राप्ति साध्य करून घेणारा असा हा महानुभाव अगस्त्य ऋषि संसारांत राहूनहि निष्पाप होत्साता काम व तप या दोन वर्णांचा उत्कर्ष करता झाला आणि देवांकडून सत्य आशीर्वाद मिळविता झाला. ( १-१७९-६ ).

## रत्न ८३ वें

ज्या अन्नाच्या सामर्थ्यानें इन्द्र हा वृत्रासुरासारख्या प्रबल शत्रूला तीन ठिकाणीं छिन्नविच्छिन्न करून ठार मारता झाला, अशा त्या महान् व बलसंपन्न अन्नाचें मी ( अगस्त्य ) स्तोत्र गातों. ( १-१८७-१ ).

## रत्न ८४ वें

**अगस्त्य मैत्रावरुण-ऋषि, अन्न-देवता, अनुष्टुप्-छंद.**

त्वे पितो महानां देवानां मनो हितम् ।
अकारि चारु केतुना तवाहिमवसावधीत् ॥ १-१८७-६ ॥

**औ. वि. विषनाशन सूक्त, स्मा. वि. अन्नोपस्थान.**

यद्दो पितो अजगन्विवस्व पर्वतानाम् ।
अत्रा चिन्नो मधो पितोऽरं भक्षाय गम्याः ॥ १-१८७-७ ॥

## रत्न ८५ वें

**अगस्त्य मैत्रावरुण-ऋषि, अन्न-देवता, गायत्री-छंद.**

यदपामोषधीनां परिंशमारिशामहे ।
वातापे पीव इद्भव ॥ ॥ १-१८७-८ ॥

**औ. वि. निषनाशन सूक्त, स्मा. वि. अन्नोपस्थान.**

यत्ते सोम गवाशिरो यवाशिरो भजामहे ।
वातापे पीव इद्भव ॥ ॥ १-१८७-९ ॥
करम्भ ओषधे भव पीवो वृक्क उदारथिः ।
वातापे पीव इद्भव ॥ ॥ १-१८७-१० ॥

## रत्न ८६ वें

**अगस्त्य मैत्रावरुण-ऋषि, अन्न-देवता, बृहती-छंद**

तं त्वा वयं पितो वचोभिर्गावो न हव्या सुषूदिम ।
देवेभ्यस्त्वा सधमादमस्मभ्यं त्वा सधमादम् ॥
॥ १-१८७-११ ॥

**औ. वि. विषनाशन. स्मा. वि.. अन्नोपस्थान.**

## रत्न ८४ वें

हे अन्ना ! थोर अशा देवांचें मन तुझ्या ठायीं आसक्त झालें आहे. तुझ्या सुंदर प्रज्ञेच्या सहाय्यानें व रक्षणानें इन्द्र हा अहीचा वध करता झाला. ( १–१८७–६ ) हे अन्ना ! जेव्हां मेघाचें उदक वृष्टिद्वारा इकडे येईल, तेव्हां, हे मधुर रसा ! तूं आमच्या भक्षणार्थ भरपूर असा ये ! (१–१८७–७)

## रत्न ८५ वें

ज्या अर्थी उदकाचा व औषधींचा सुखकारक असा अन्नांश आम्ही सेवन करतों, त्या अर्थी हे शरीरा ! त्या अन्नोदकसारानें तूं पुष्ट हो. ( १-१८७·८ ) हे सोमा ! तुझा जो अंश गायींच्या दुधांत अगर यवाच्या पिठांत मिश्रित झाला आहे त्याचा आम्ही यथेच्छ उपभोग घेऊं ! हे शरीरा ! तूं त्या रसानें चांगलें पुष्ट हो ! ( १–१८७–९ ) हे औषधे ! तूं करंभ आहेस. अतएव तूं आम्हांस पुष्टिप्रद व आरोग्यकर हो ! तशीच पण उत्साह-वर्धकहि हो ! हे शरीरा ! तूं पुष्ट हो ! ( १–१८७–१० )

## रत्न ८६ वें

हे सोमा ! गाई दूध देतात त्याप्रमाणें स्तोत्र गाऊन आम्ही तुझ्यापासून रस काढीत आहों. तूं देवांना आनंद देणारा आहेस. त्याचप्रमाणें आम्हांसहि आनंदित कर ! ( १ –१८७–११ )

## रत्न ८७ वें

**अगस्त्य-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अग्ने नयं सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ।
युयोध्य१स्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥
॥ १-१८९-१ ॥

**श्रौ. वि. १ ( अग्नि ) प्रातरनुवाक, स्मा. वि. अग्नि उपस्थान; ब्रह्मयज्ञ.**

अग्ने त्वं पारया नव्यो अस्मान्त्स्वस्तिभिरति दुर्गाणि विश्वा ।
पूश्च पृथ्वी बहुला न उर्वी भवा तोकाय तनयाय शं योः ॥
॥ १-१८९-२ ॥

अग्ने त्वमस्मद्युयोध्यमीवा अनग्नित्रा अभ्यमन्त कृष्टीः ।
पुनरस्मभ्यं सुविताय देव क्षां विश्वेभिरमृतेभिर्यजत्र ॥
॥ १-१८९-३ ॥

पाहि नो अग्ने पायुभिरजस्रैरुत प्रिये सदन आ शुशुक्वान् ।
मा ते भयं जरितारं यविष्ठ नूनं विदन्मापरं सहस्वः ॥
॥ १-१८९-४ ॥

मा नो अग्नेऽव सृजो अघायाविष्यवे रिपवे दुच्छुनायै ।
मा दत्वते दशते मादते नो मा रीषते सहसावन्परा दाः ॥
॥ १-१८९-५ ॥

## रत्न ८८ वें

**अगस्त्य-ऋषि, अप्तृणसूर्य-देवता, अनुष्टुप्-छंद.**

कङ्कतो न कङ्कतोऽथो सतीनकङ्कतः ।
द्वाविति प्लुषी इति न्य१दृष्टा अलिप्सत ॥
॥ १-१९१-१ ॥

**श्रौ. वि. विषपरिहार सूक्त, विषघ्नोपनिषत्**

## रत्न ८७ वें

हे अग्निदेवा ! तूं सर्व कर्मांचें रहस्य जाणणारा आहेस. अतएव कर्मानुष्ठान करणाऱ्या आम्हांस यज्ञफलरूप स्वर्ग-संपत्तीकडे ने ! आमच्या कर्मानुष्ठानास विघ्न आणणारें असें जें पाप असेल तें आम्हांपासून दूर कर ! आम्ही तुझें पुष्कळ नमस्कारमंत्रांनीं पूजन करतों. (१-१८९-१) हे पूजनीय अग्ने ! आम्हांला सर्व आपत्ति-विपत्तींतून तूं पार घेऊन जा ! आमचा गांव वृद्धिंगत होवो आणि आमचीं शेतें फलधान्यदिकांनीं सुसमृद्ध होवोत ! तूं आमच्या पुत्रपौत्रादिकांना सुखदायक व भयहारक हो ! (१-१८९-२). हे अग्ने ! तूं आम्हांपासून रोगराई दूर कर ! ज्यांचा अग्नि हा रक्षक नाहीं असे लोक आम्हांस विरुद्ध असणारच. तर तशा दुष्टांचाहि तूं निरोध कर ! हे पूज्य देवा ! आमचें कल्याण व्हावें एतदर्थ तूं सर्व दिव्यविबुधांना बरोबर घेऊन या आमच्या पृथ्वीवर आगमन कर ! ( १-१८९-३ ) हे अग्ने ! तूं आम्हांस पुनः पुनः वरप्रसाद देऊन आमचें रक्षण कर ! आणि या तुझ्या यागगृहांत उत्तम प्रकाशमान हो ! हे अत्यंत तरुण अग्निदेवा ! तुझा भक्त जो मी त्या मला आज भय प्राप्त न होवो ! आणि पुढें केव्हांहि तें मला न शिवो ! ( १-१८९-४ ) हे अग्ने ! तूं आम्हांला पातकी, क्रूर व दुष्ट अशा दुर्जनांच्या स्वाधीन करूं नकोस ! तसेंच दंष्ट्रा असलेल्या व दंश करणाऱ्या अशा सर्पादिकांच्या व दंतहीन पण शिंगादिकांनीं इजा करणाऱ्या प्राण्यांच्या स्वाधीन करूं नकोस! त्याचप्रमाणें चोर, राक्षसादि हिंसक लोकांच्या हवालीहि पण करूं नकोस ! हे बलवान् अग्ने ! आम्हांस अपमान व पराभव सर्वथा न शिवतील असें कर ! (१-१८९-५)

## रत्न ८८ वें

जमिनीवर आणि पाण्यांत राहणारे असे जे अल्पविषारी आणि महाविषारी प्राणी किंवा अदृश्य असे जे सूक्ष्म विषारी जिवाणू आहेत, त्यांनीं मला विषांनीं मारून सोडलें आहे. (१-१९१-१).

अदृष्टान्हन्त्यायत्यथो हन्ति परायती ।
अथो अवघ्नती हन्त्यथो पिनष्टि पिंषती ॥
॥ १-१९१-२ ॥

शरासः कुशरासो दर्भासः सैर्या उत ।
मौञ्जा अदृष्टा वैरिणाः सर्वे साकं न्यलिप्सत ॥
॥ १-१९१-३ ॥

नि गावो गोष्ठे असदन्नि मृगासो अविक्षत ।
नि केतवो जनानां न्यदृष्टा अलिप्सत ॥
॥ १-१९१-४ ॥

एत उ त्ये प्रत्यदृश्यन्प्रदोषं तस्कराइव ।
अदृष्टा विश्वदृष्टाः प्रतिबुद्धा अभूतन ॥
॥ १-१९१-५ ॥

द्यौर्वः पिता पृथिवी माता सोमो भ्रातादितिः स्वसा ।
अदृष्टा विश्वदृष्टास्तिष्ठतेलयता सु कम् ॥
॥ १-१९१-६ ॥

ये अंस्या ये अङ्ग्याः सूचीका ये प्रकङ्कताः ।
अदृष्टाः किं चनेह वः सर्वे साकं नि जस्यत ॥
॥ १-१९१-७ ॥

उत्पुरस्तात्सूर्य एति विश्वदृष्टो अदृष्टहा ।
अदृष्टान्त्सर्वाञ्जम्भयन्त्सर्वाश्च यातुधान्यः ॥
॥ १-१९१-८ ॥

उदपप्तदसौ सूर्यः पुरु विश्वानि जूर्वन् ।
आदित्यः पर्वतेभ्यो विश्वदृष्टो अदृष्टहा ॥ १-१९१-९ ॥

मजकडे येणारी ही औषधि अदृष्ट विषाराला पार मारून टाकते. आणि जाणारी औषधिहि मारून टाकते. त्याचप्रमाणें आपटली जाणारी औषधि त्याला मारून टाकते व चुरडली जाणारी औषधि त्याला पण चुरडून टाकते. (१-१९१-२).

शर, कुशर, दर्भ, सैर्य, मुंज आणि वैरण यांत राहणाऱ्या सर्व अदृश्य विषारांनीं मिळून मला विषबाधा केली आहे. (१-१९१-३) गाई गोठ्यांत बसल्या आहेत, प्राणी आपापल्या जागीं बसले आहेत, लोकांचें ज्ञान अंतर्मुख झालें आहे, अशा वेळीं अदृश्य विषारांनीं मला विषानें घेरून टाकलें आहे. (१-१९१-४).

रात्रीं चोर दिसावेत त्याप्रमाणें सर्वांना पाहणारे ते हे अदृश्य साप आतां दिसूं लागले आहेत. तर, हे लोकहो ! तुम्ही जागृत रहा ! (१-१९१-५) हे सर्पांनो ! द्युलोक हा तुमचा पिता, पृथ्वी ही तुमची माता, सोम हा तुमचा भ्राता, व अदिति ही तुमची भगिनी आहे. अहो, हें सर्व पाहणारे पण कोणालाच न दिसणारे विषार हो ! तुम्ही आपापल्या जागींच रहा, अगर मला सोडून खुशाल दुसरीकडे जा. (१-१९१-६) जे भुजांनीं चालणारे, जे अंगानें सरपटणारे, जे नांगी मारणारे, जे जहाल विषारी, तसेच जे अदृश्य पण विषारी असे इतर जंतु आहेत, अशा सर्व विषारांनो ! तुम्ही सर्व मला सोडून येथून चालते व्हा कसे ! (१-१९१-७) सर्व विश्वाला पाहणारा व सर्व अदृश्य विषारी प्राण्यांचा नाश करणारा असा हा भगवान् सूर्यदेव पूर्वेकडे उदय पावत आहे. तो सर्व अदृश्य विषारी प्राणी व दुष्ट चेटके यांचा पार नाश करणारा आहे. (१-१९१-८) हा अदितीचा पुत्र भगवान् श्रीसूर्यनारायण या विश्वाचें अवलोकन करीत आणि अदृष्ट विषारी प्राण्यांचा नाश करीत वर आकाशांत चढत आहे. (१-१९१-९).

## रत्न ८९ वें

**अगस्त्य-ऋषि, अप्तृणसूर्य-देवता, महापंक्ति-छंद.**

सूर्ये विषमा सजामि दृतिं सुरावतो गृहे ।
सो चिन्नु न मराति नो वयं मरामारे अस्य
योजनं हरिष्ठा मधु त्वा मधुला चकार ॥ १-१९१-१० ॥

**औ. वि. विषघ्नोपनिषत्, स्मा. वि. मधुविद्या.**

इयत्तिका शकुन्तिका सका जघास ते विषम् ।
सो चिन्नु न मराति नो वयं मरामारे अस्य
योजनं हरिष्ठा मधु त्वा मधुला चकार ॥ १-१९१-११ ॥

त्रिः सप्त विष्पुलिङ्गका विषस्य पुष्यमक्षन् ।
ताश्चिन्नु न मरन्ति नो वयं मरामारे अस्य
योजनं हरिष्ठा मधु त्वा मधुला चकार ॥ १-१९१-१२ ॥

## रत्न ९० वें

**अगस्त्य-ऋषि, अप्तृणसूर्य-देवता, महाबृहती-छंद.***

नवानां नवतीनां विषस्य रोपुषीणाम् ।
सर्वासामग्रभं नामारे अस्य
योजनं हरिष्ठा मधु त्वा मधुला चकार ॥ १-१९१-१३ ॥

## रत्न ९१ वें

**अगस्त्य-ऋषि, अप्तृणसूर्य-देवता, अनुष्टुप्-छंद.**

त्रिः सप्त मयूर्यः सप्त स्वसारो अग्रुवः ।
तास्ते विषं वि जभ्रिर उदकं कुम्भिनीरिव ॥ १-१९१-१४ ॥

इयत्तकः कुषुम्भकस्तकं भिनद्म्यश्मना ।
ततो विषं प्र वावृते पराचीरनु संवतः ॥ १-१९१-१५ ॥

कुषुम्भकस्तदब्रवीद्गिरेः प्रवर्तमानकः ।
वृश्चिकस्यारसं विषमरसं वृश्चिक ते विषम् ॥ १-१९१-१६ ॥

**औ. वि. विषघ्नोपनिषत्, स्मा. वि. विषघ्नोपनिषत्.**

## रत्न ८९ वें

कलालाच्या घरीं दारूचा बुधला ठेवावा त्याप्रमाणें मी या सूर्यमंडळांत हे विष ठेवून देतों. असें केल्यानें तो देव तर मरत नाहींच आणि आम्हीहि पण मरणार नाहीं. कारण पिवळ्या घोड्यावर बसलेला तो सूर्य, जरी दूर असला तरी, त्या विषाला तो गांठणारच. हे विषा ! निर्विषकारिणी या मधुविद्येनें तुझें अमृतच करून टाकलें ! ( १-१९१-१० ) त्या छोट्याशा कपिंजलीनें तुझें विष पार खाऊन टाकलें. ती तर मरणार नाहींच. आणि आम्हीहि पण मरणार नाही. पिवळ्या घोड्यावर बसलेला तो सूर्य त्या विषाला गांठणारच. हे विषा ! या मधुविद्येनें तुझें अमृत बनवून सोडलें ! ( १-१९१-११ ) एकवीस पाकोळ्या असलेले पक्षी माझ्या विषाचा वाढता जोर कमी करोत ! त्या तर मरणार नाहींतच. त्याचप्रमाणें आम्हीहि पण मरणार नाहीं. कारण पिवळ्या अश्वावर बसलेला सूर्य त्या विषाला गांठून दूर नेता झाला. हे विषा ! मधुविद्येनें पार तुझें मधुर अमृत करून टाकलें ! ( १-१९१-१२)

## रत्न ९० वें

विषाचा नाश करणाऱ्या त्या नव्याण्णव नद्या, त्या सर्वांचा मी नामोच्चार करतों. पिवळ्या घोड्यावर बसलेला तो सूर्य त्या विषाला गांठून दूर नेता झाला. हे विषा ! मधुविद्येनें तुला मधुर अमृत बनविलें ! ( १-१९१-१३ ).

## रत्न ९१ वें

एकवीस मयूरी व सात वाहणाऱ्या नद्या या सर्व मिळून, हे शरीरा ! तुझ्यातील विष स्त्रीनें घागरींतून पाणी न्यावें त्याप्रमाणें तुझ्यातून घेऊन जावोत ! ( १-१९१-४ ) तो लहानसा मुंगूस तुझें विष हरण करो ! नाहीं तर मी त्याला दगडानें चेंचून पार मारून टाकीन. अतएव तें माझें शरीरांतील विष आतां उतार पावो ! आणि कोठें तरी दूर निघून जावो ! ( १-१९१-१५ ) अगस्त्याच्या आज्ञेवरून मुंगूस पर्वतामधून बाहेर येऊन म्हणाला कीं, हें विंचवाचें विष अगदीं दुर्बल आहे. हे विंचवा ! तुझें विष अगदींच लेचेंपेचें आहे ! ( १-१९-१६ )

## रत्न ९२ वें

मा बिभेर्न मरिष्यसि परि त्वा पामि सर्वतः ।
घनेन हन्मि वृश्चिकमहिं दण्डेनागतम् ॥

( खिल २-१ )

आदित्यरथवेगेन विष्णुबाहुबलेन च ।
गरुडपक्षनिपातेन भूमिं गच्छ महायशाः ॥

( खिल २-२ )

गरुडस्य पातमात्रेण त्रयो लोकः प्रकंपिताः ।
प्रकम्पिता मही सर्वा सशैलवनकानना ॥

( खिल २-३ )

गगनं नष्ट-चन्द्रार्कं ज्योतिषं न प्रकाशते ।
देवता भयभीताश्च मारुतो न प्लवायति ॥

( खिल २-४ )

भो सर्प भद्र भद्रं ते दूरं गच्छ महाविष ।
जन्मेजयस्य यज्ञान्ते आस्तीकवचनं स्मर ॥

( खिल २-५ )

आस्तीक-वचनं श्रुत्वा यः सर्पो न निवर्तते ।
शतधा भिद्यते मूर्ध्नि शिशवृक्षफलं यथा ॥

( खिल २-६ )

नर्मदायै नमः प्रातर्नर्मदायै नमो निशि ।
नमो अस्तु नर्मदे तुभ्यं त्राहि मां विषसर्पतः ॥

( खिल २-७ )

## रत्न ९२ वें

हे विषबाधित मनुष्या ! भिऊं नकोस ! तूं कांहीं मरत नाहींस ! कारण मी तुझें सर्व बाजूंनीं रक्षण करीत आहें. जाड व भरीव काठीनें मी विंचवास मारून ठार करीत आहें. त्याचप्रमाणें सापासहि मारून टाकीत आहें ( १-१९१-खिल. २-१ ).

सुकीर्तिमान् असा तूं सूर्याच्या रथवेगानें, विष्णूच्या बाहुबलानें आणि गरुडाच्या पक्षगतीनें तूं आतां भूमीवर जा. (१–१९१–खिल. २–२).

गरुडाचे पंख हलूं लागले म्हणजे तीनहि लोक हादरूं लागतात. त्याचप्रमाणें पर्वत व अरण्यें यांसह ही सर्व पृथ्वी कंपायमान होते (१-१९१–खिल. २-३).

आकाशांत चंद्र-सूर्य दिसेनासे होतात. ग्रहनक्षत्रें निष्प्रभ बनतात, देवता भयभीत होतात आणि वायु वाहीनासा होतो ! (१-१९१-खिल. २-४).

हे भल्या सर्पा ! तुझें कल्याण असो ! हे महाविषा, तूं दूर जा ! जनमेजयाच्या सर्पसत्राच्या शेवटीं झालेलें आस्तिकवचनाचें स्मरण कर ! ( १-१९१- खिल. २-५).

आस्तिकाचें वचन ऐकून जो साप परत फिरत नाहीं, त्याच्या डोक्याचे पिकलेल्या सिताफळाप्रमाणें शतधा तुकडे तुकडे होवोत ! (१-१९१-खिल. २-६).

नर्मदेला प्रातःकाळीं नमस्कार असो ! नर्मदेला रात्रीं नमस्कार असो ! हे नर्मदे ! तुला माझा नमस्कार असो ! तूं माझें विषारी सापापासून रक्षण कर (१-१९१-खिल. २-७ ).

यो जरत्कारुणा जातो जरत्कार्वां महायशाः ।
तस्य स्मरामि भद्रं ते दूरं गच्छ महाविष ॥

( खिल २-८ )

असितिं चार्थसिद्धिं च सुनीतिं चापि यः स्मरेत् ।
दिवा वा यदि वा रात्रौ नास्य सर्पभयं भवेत् ॥

( खिल २-९ )

अगस्तिर्माधवश्चैव मुचुकुन्दो महामुनिः ।
कपिलो मुनिरास्तीकः पञ्चैते सुखशायिनः ॥

( खिल २-१० )

---

जो साप जरत्कारूपासून जरत्कन्येचे ठिकाणीं जन्मला आहे त्याचें मी स्मरण करतों. हे महाविषा ! तुझें कल्याण असो ! तूं दूर चालता हो ! (१-१९१ खिल. २-८).

असिति, अर्थसिद्धि, व सुनीति यांचें जो स्मरण करतो त्याला रात्रीं अगर दिवसां सर्पाचें भय नाहीं ! (१-१९१-खिल. २-९).

अगस्ति, माधव, मुचुकुंद, कपिलमहामुनि व आस्तिक मुनि हे पांच सुखानें झोपणारे आहेत (१-१९१ खिल. २-१०).

मंडल पहिलें समाप्त



# मण्डल दुसरें

## रत्न ९३ वें

अङ्गिरस गृत्समद-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद

त्वम॑ग्ने द्युभि॒स्त्वमा॑शुशु॒क्षणि॒स्त्वम॒द्भ्यस्त्वम॒श्मन॒स्परि॑ ।
त्वं वने॑भ्य॒स्त्वमोष॑धीभ्य॒स्त्वं नृ॒णां नृ॑पते जायसे॒ शुचि॑ः ॥
॥ २-१-१ ॥

श्रौ. वि. प्रातरनुवाक; उपाकरण-उत्सर्जन. स्मा. वि. अग्निसूक्त.

तवा॑ग्ने हो॒त्रं तव॑ पो॒त्रमृ॒त्वियं॒ तव॑ ने॒ष्ट्रं त्वम॒ग्निदृ॑तायतः ।
तव॑ प्रशा॒स्त्रं त्वम॑ध्वरीयसि ब्र॒ह्मा चासि॑ गृ॒हप॑तिश्च नो॒ दमे॑ ॥
॥ २-१-२ ॥

## ( मराठी भावार्थ )

### रत्न ९३ वें

हे लोकाधिप अग्निदेवा, जेव्हां तूं प्रतिदिवशीं यागार्थ मंथनद्वारा यज्ञगृहांत जन्म पावतोस, तेव्हां तूं सर्व बाजूंनीं तेजःपुंज असाच जन्मतः असतोस. त्याचप्रमाणें तूं आकाशस्थ उदकापासून, कठीण पाषाणापासून किंवा निबिड अरण्यापासून अथवा वनस्पतीपासूनहि जन्म पावत असतोस. (२–१–१) हे अग्ने ! आमच्या घरांतील यज्ञाचें होत्रकर्म हें तुझेंच म्हणजे तुजसाठींच आहे. पोतृकर्म व ऋत्विजकर्महि तुझेंच आहे. तसेंच नेष्टृकर्महि तुझेंच असून, आग्निध्राचा मानहि पण तुझाच आहे. यजमानाच्या यज्ञांतील प्रशास्तृकर्महि तुजकडेच असून, अध्वर्यूचा अधिकार गाजविणाराहि पण तूंच आहेस. त्याचप्रमाणें ब्रह्माहि तूंच आणि गृहपतिहि पण तूंच आहेस (२–१–२).

त्वमग्न इन्द्रो वृषभः सतामसि त्वं विष्णुरुरुगायो नमस्यः ।
त्वं ब्रह्मा रयिविद्ब्रह्मणस्पते त्वं विधर्तः सचसे पुरंध्या ॥

॥ २-१-३ ॥

त्वमग्ने राजा वरुणो धृतव्रतस्त्वं मित्रो भवसि दस्म ईड्यः ।
त्वमर्यमा सत्पतिर्यस्य संभुजं त्वमंशो विदथे देव भाजयुः ॥

॥ २-१-४ ॥

त्वमग्ने त्वष्टा विधते सुवीर्यं तव ग्नावो मित्रमहः सजात्यम् ।
त्वमाशुहेमा ररिषे स्वश्व्यं त्वं नरां शर्धो असि पुरूवसुः ॥

॥ २-१-५ ॥

त्वमग्ने रुद्रो असुरो महो दिवस्त्वं शर्धो मारुतं पृक्ष ईशिषे ।
त्वं वातैररुणैर्यासि शंगयस्त्वं पूषा विधतः पासि नु त्मना ॥

॥ २-१-६ ॥

त्वमग्ने द्रविणोदा अरंकृते त्वं देवः सविता रत्नधा असि ।
त्वं भगो नृपते वस्व ईशिषे त्वं पायुर्दमे यस्तेऽविधत् ॥

॥ २-१-७ ॥

त्वामग्ने दम आ विश्पतिं विशस्त्वां राजानं सुविदत्रमृञ्जते ।
त्वं विश्वानि स्वनीक पत्यसे त्वं सहस्राणि शता दश प्रति ॥

॥ २-१-८ ॥

हे अग्ने! सज्जनांचें मनोरथ पूर्ण करणारा जो इन्द्र तो इन्द्र देवहि तूच आहेस! बहुजनस्तुत व परमपूज्य असा जो विष्णु तो विष्णु देवहि तूंच आहेस! हे मंत्ररक्षक ब्रह्मणस्पते! तूं मनवेत्ता असा ब्रह्मा आहेस. हे विविध कर्मधारक अग्ने! तू विविधस्तोत्रांनीं भक्तजनांकडून स्तविला जातोस (२-१-३). हे अग्ने! व्रतनियमांचें पालन करणारा राजा जो वरुण, तो तूंच आहेस! शत्रुसंहारक व प्रशंसनीय असा जो मित्र तो देवहि तूंच आहेस! सज्जन-संरक्षक आर्यमाहि तूच असून, सूर्य-मंडलावरचा अंशुनामक देवहि पण तूंच आहेस! अतएव, हे देवा! तूं आमच्या यज्ञांत फल देणारा हो! (२-१-४). हे अग्ने! उपासकांना पराक्रमी पुत्र देणारा त्वष्टा देवहि तूच आहेस! जीं काय स्तोत्रें आहेत तीं सर्व तुझींच आहेत. हे हितकर प्रकाशसंपन्न अग्निदेवा! तू आमच्या बंधु-त्वाचा स्वीकार कर. शीघ्र प्रेरणा देणारा तू आम्हांस उत्तम घोड्यांनीं युक्त अशी सुंदर संपत्ति देतोस. आणि ऐश्वर्यसंपन्न असा तूंच लोकांचें बलहि आहेस (२-१-५). हे अग्ने! त्रैलोक्यातील शत्रूंचें निर्दालन कर-णारा बलवान रुद्र देवहि तूंच आहेस! मरुतांचें वायुरूप बलहि पण तुझेंच आहे! यज्ञांतील हविरन्नाचा अधिपतिहि तूंच! म्हणून मंगलधाम असा तूं वायुसदृश अशा अरुणकांति अश्वावर आरूढ होऊन आमच्या यज्ञ-स्थानाप्रत येतोस आणि सर्वपोषक पूषा होऊन स्वयंस्फूर्तीनें यजमानांचें तूंच परिपालन करतोस (२-१-६). तुला पूजनार्चनादिद्वारें अलंकृत करणाऱ्या भक्तांना द्रव्य देणारा द्रविणोदा देव तो तूंच आहेस! उत्तमोत्तम संपत्ति धारण करणारा सविता देवहि तूंच आहेस! हे लोकपालक अग्ने! तूं भगदेव असून, भक्तांना संपत्ति देण्यास तूंच सर्वसमर्थ आहेस! आणि त्याचप्रमाणें वेदीवर जो तुझी भक्तिपूर्वक उपासना करतो, त्याचा तूं सर्व-प्रकारें संरक्षकहि पण होतोस! (२-१-७). हे अग्ने! सर्व आर्यजन तुझी घरांत स्थापना करून पूजा-अर्चादि सत्कर्मांनें तुला प्रसन्न करतात. कारण कीं, देवा! तूं कांतिमान व बुद्धिमान आहेस. हे तेजःपुंज अग्ने! तूं यज्ञगृहांतील सर्व हविरन्नाचा स्वामी आहेस. तसाच दहांनीं, शंभरांनीं, नव्हे तर हजारांनीं मौल्यवान वस्तु भक्तांना बहाल करणारा असा मोठा उदारदाताहि पण तूंच आहेस! (२-१-८).

त्वाम॑ग्ने पि॒तर॑मि॒ष्टिभि॒र्नर॒स्त्वां भ्रा॒त्राय॒ शम्या॑ तनू॒रुच॑म् ।
त्वं पु॒त्रो भ॑वसि॒ यस्तेऽवि॑ध॒त्त्वं सखा॑ सु॒शेव॑: पास्या॒धृष॑: ॥
॥ २-१-९ ॥

त्वम॑ग्न ऋ॒भुरा॒के न॑म॒स्य१॒स्त्वं वाज॑स्य क्षु॒मतो॑ रा॒य ई॑शिषे ।
त्वं वि भा॒स्यनु॑ दक्षि दा॒वने॒ त्वं वि॒शिक्षु॑रसि य॒ज्ञमा॒तनि॑: ॥
॥ २-१-१० ॥

त्वम॑ग्ने॒ अदि॑ति॒र्दे॑व दा॒शुषे॒ त्वं होत्रा॒ भार॑ती वर्धसे गि॒रा ।
त्वमिळा॑ श॒तहि॑मासि॒ दक्ष॑से॒ त्वं वृ॑त्र॒हा व॑सुपते॒ सर॑स्वती ॥
॥ २-१-११ ॥

त्वम॑ग्ने॒ सुभृ॑त उ॒त्तमं॒ वय॒स्तव॑ स्पा॒र्हे व॒र्ण आ सं॒दृशि॒ श्रिय॑: ।
त्वं वाज॑: प्र॒तर॑णो बृ॒हन्न॑सि॒ त्वं र॒यिर्ब॑हु॒लो वि॒श्वत॑स्पृ॒थु: ॥
॥ २-१-१२ ॥

त्वाम॑ग्न आदि॒त्यास॑ आ॒स्यं१॒ त्वां जि॒ह्वां शुच॑यश्चक्रिरे कवे ।
त्वां रा॑ति॒षाचो॑ अध्व॒रेषु॑ सश्चिरे॒ त्वे दे॒वा ह॒विर॑द॒न्त्याहु॑तम् ॥
॥ २-१-१३ ॥

त्वे अ॑ग्ने॒ विश्वे॑ अ॒मृता॑सो अ॒द्रुह॑ आ॒सा दे॒वा ह॒विर॑द॒न्त्याहु॑तम् ।
त्वया॒ मर्ता॑सः स्वदन्त आसु॒तिं त्वं गर्भो॑ वी॒रुधां॑ जज्ञिषे॒ शुचि॑: ॥
॥ २-१-१४ ॥

हे अग्निदेवा ! पित्याप्रमाणें पालन करणाऱ्या तुझें यजमान लोक यज्ञयागादिकांनीं पूजन करतात. त्याचप्रमाणें शरीरांत राहून प्रकाशणाऱ्या अशा तुला भ्रातृत्वाकरितां यजनादिकांनीं प्रसन्न करतात. हे अग्ने ! जो तुझी विधिपूर्वक आराधना करतो त्याचें तूं पुत्राप्रमाणें परिपालन करतोस आणि मित्राप्रमाणें हितकारक व सुखकारक होऊन, भक्तांचें दृढभावानें संरक्षणहि पण करतोस ( २–१–९ ). हे अग्निदेवा ! तूं ऋभुप्रमाणें मेधावी असून स्तोत्रादिकांनीं पूजनीय आहेस ! तूं जगप्रसिद्ध अन्नाचा व संपत्तीचा स्वामी आहेस ! अंधःकाराचा नाश करण्यासाठीं तूं समिधादि लांकडें खाऊन झगझगीत प्रकाश देतोस. भक्ताकरितां तूं यज्ञ सिद्धीस नेतोस आणि त्याचें फलहि त्यांना अर्पण करतोस ( २–१–१० ). हे अग्निदेवा ! तूं यजमानाला अदितीप्रमाणें परिपालन करणारा आहेस ! त्याचप्रमाणें तूं होत्रा आणि भारती असून स्तुतिनें संवर्धन पावतोस; तूं अपरिमित काळ टिकून राहणारी इळा ( भूमि ) असून, यजमानास दान देण्यास तूंच समर्थ आहेस. हे वसुपते ! वृत्रहंताहि तूंच आणि सरस्वतीहि पण तूंच आहेस ! (२–१–११). हे अग्ने ! सुपुष्ट असा तूं उत्तमोत्तम अन्न देणारा आहेस. तुझ्या स्पृहणीय व प्रेक्षणीय अशा रक्तशुभ्रवर्ण सुंदर कांतीत मोठें ऐश्वर्य आहे. तूं अन्न प्राप्त करून देणारा व पापांतून तारण करणारा असून थोर महात्मा आहेस ! तसाच तूं अपार संपत्तिमान् असून तुझी कीर्ति दिगंत पसरली आहे (२–१–१२ ). हे अग्ने ! आदितिपुत्र इन्द्रादि देवांनीं तुला आपलें मुख केलें आहे ! हे कवे ! त्याचप्रमाणें त्या तेजस्वी देवांनीं तुला आपली जिव्हाहि केली आहे ! म्हणून उदारधी देव यज्ञांत तुझीच प्रतीक्षा करतात आणि तुझ्या ठायीं अर्पण केलेलें हविरन्नच भक्षण करतात. (२–१-१३). हे अग्ने ! सर्व अमर व निर्वैर असे देव त्यांना उद्देशून हवन केलेला हविर्भाव तुझ्याच मुखानें भक्षण करतात. मर्त्यमानवहि तुझ्याच साहाय्यानें रसात्मक अन्नाचा आस्वाद घेतात. शुद्ध असणारा तूंच वृक्षलतादिकांच्या पोटांत राहून सर्व प्रकारचें अन्न उत्पन्न करतोस ( २–१–१४ ).

त्वं तान्त्सं च प्रति चासि मज्मनाग्ने सुजात प्र च देव रिच्यसे ।
पृक्षो यदत्र महिना वि ते भुवदनु द्यावापृथिवी रोदसी उभे ॥
॥ २-१-१५ ॥

ये स्तोतृभ्यो गोअग्रामश्वपेशसमग्ने रातिमुपसृजन्ति सूरयः ।
अस्माञ्च तांश्च प्र हि नेपि वस्य आ बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥
॥ २-१-१६ ॥

## रत्न ९४ वें

**गृत्समद-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद.**

यज्ञेन वर्धत जातवेदसमग्निं यजध्वं हविषा तना गिरा ।
समिधानं सुप्रयसं स्वर्णरं द्युक्षं होतारं वृजनेषु धूर्षदम् ॥
॥ २-२-१ ॥

**श्रौ. वि. प्रातरनुवाक; अश्विनशस्त्र.**

दा नो अग्ने बृहतो दाः सहस्रिणो दुरो न वाजं श्रुत्या
अपा वृधि । प्राची द्यावापृथिवी ब्रह्मणा कृधि
स्व१र्ण शुक्रमुषसो वि दिद्युतुः ॥ २-२-७ ॥

उभयासो जातवेदः स्याम ते स्तोतारो अग्ने सूरयश्च
शर्मणि । वस्वो रायः पुरुश्चन्द्रस्य भूयसः प्रजावतः
स्वपत्यस्य शग्धि नः ॥ २-२-१२ ॥

हे अग्ने! शक्तिरूपानें तूं सर्व देवांशीं मिळून असतोस. आणि त्याच वेळेस त्यांच्यापासून तूं स्वतंत्रहि पण राहतोस हे सुजात अग्निदेवा! सर्व देवांहून तूं सामर्थ्यानें श्रेष्ठ आहेस. कारण तुला अर्पण केलेलें हविरन्न तुझ्या प्रभावानें सर्व द्यावापृथ्वीभर पसरून राहतें (२-१-१५). हे अग्ने! जे शहाणे यजमान आम्हां स्तोतृजनांना गवाश्वादि पशु दक्षिणा म्हणून देतात त्यांना व त्यांच्याबरोबरच आम्हालाहि तूं स्वर्गासारख्या श्रेष्ठ स्थानाप्रत ने. वीरपुत्रादिकांनीं युक्त होतसाते आम्ही यज्ञशालेंत तुझा थोर महिमा स्तोत्ररूपानें सदैव गात राहू (२-१-१६).

## रत्न ९४ वें

अहो ऋत्विज हो! सर्व वस्तुजातांचें ज्याला ज्ञान आहे अशा अग्निदेवाला तुम्ही संवर्धन करा! त्यास पुरोडाशादि हवि अर्पण करून व विस्तृत स्तोत्रें गाऊन त्याचें आराधन करा! तो देव म्हणजे अत्यंत प्रज्वल, शोभमान, बहुस्तुत, तेजस्वी, होमसंपादक व बलदायक असा आहे! (२-२-१). हे अग्निदेवा! तूं आम्हांला गवाश्वादि पशूंनीं संपन्न अशी फार मोठी संपत्ति दे! आणि हजारांनीं पुत्रपौत्र व चाकरनोकर आम्हांस लाभतील असें कर! तुझी कीर्ति सर्वत्र वाढावी म्हणून तूं आम्हांसाठीं अन्नाचा दरवाजा उघड. आणि प्रार्थनेनें द्यावापृथिवी आम्हांस अनुकूल होतील असें कर. तेजस्वी अशा तुला उषःकाल सुप्रकाशित करोत! (२-२-७). हे जातवेद अग्निदेवा! तुझें स्तुतिस्तोत्र गाणारे आम्ही ऋत्विज व तसाच हा आमचा मेधावी यजमान असे आम्ही उभयतां तुझ्या कृपेनें सुखांत राहावें असें घडो! आणि तूं आम्हांस उत्तम घरदार, गाईघोडे इत्यादि पशु, विपुल संपत्ति, दासभृत्यादिकांचा मोठा परिवार व अनेक पुत्रपौत्रादि संतति यांचा मोठा लाभ करून दे! (२-२-१२).

## रत्न ९५ वें

गृत्समद-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

घृतं मिमिक्षे घृतमस्य योनिर्घृते श्रितो घृतम्वस्य धाम ।
अनुष्वधमा वह मादयस्व स्वाहाकृतं वृषभ वक्षि हव्यम् ॥

॥ २-३-११ ॥

**श्रौ. वि. ( पशु ) आप्रीसूक्त.** **स्मा. वि. घृतस्तान.**

## रत्न ९६ वें

गृत्समद-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.

यो जात एव प्रथमो मनस्वान्देवो देवान्क्रतुना पर्यभूषत् ।
यस्य शुष्माद्रोदसी अभ्यसेतां नृम्णस्य मन्हा स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-१ ॥

**श्रौ. वि. ( अभिप्लवक ) निष्केवल्यशस्त्र.** **स्मा. वि. इन्द्रसूक्त.**

यः पृथिवीं व्यथमानामदृंहद्यः पर्वतान्प्रकुपिताँ अरम्णात् ।
यो अन्तरिक्षं विममे वरीयो यो द्यामस्तभ्नात्स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-२ ॥

यो हत्वाहिमरिणात्सप्त सिन्धून्यो गा उदाजदपधा वलस्य ।
यो अश्मनोरन्तरग्निं जजान संवृक्समत्सु स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-३ ॥

येनेमा विश्वा च्यवना कृतानि यो दासं वर्णमधरं गुहाकः ।
श्वघ्नीव यो जिगीवाँ लक्षमाददर्यः पुष्टानि स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-४ ॥

यं स्मा पृच्छन्ति कुह सेति घोरमुतेमाहुर्नैषो अस्तीत्येनम् ।
सो अर्यः पुष्टीर्विजइवा मिनाति श्रदस्मै धत्त स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-५ ॥

## रत्न ९५ वें

मी ह्या अग्नीमध्यें घृत सिंचन करतों. कारण घृत हें ह्याचें उत्पत्तिस्थान आहे. उत्पन्न झाल्यावर घृतामध्येंच तो आश्रय करून राहतो आणि घृत हेंच त्याचें तेज आहे. हे कामपूरक अग्निदेवा ! आमचा हविर्भाग ग्रहण करण्यासाठीं तूं देवांना बोलावून आण आणि त्यांना संतृप्त कर.स्वाहा म्हणून अर्पण केलेला हा हविर्भाग तूं देवांना नेऊन पोंचता कर (२–३–११).

## रत्न ९६ वें

जन्मल्याबरोबर जो देवांतला प्रमुख, पराक्रमी व तेजस्वी देव बनला, स्वतःच्या पराक्रमाच्या योगानें जो सर्व देवांना भूषणभूत झाला, ज्याचा प्रचंड पराक्रम पाहून द्यावा-पृथ्वी हीं भयानें कंपायमान झालीं, व जो आपल्या बलाच्या महिम्यानें युक्त आहे तोच, हे लोक हो, इन्द्र होय ! (मी नव्हें) (२–१२--१). ज्यानें डळमळणाऱ्या पृथ्वीला सावरून स्थिर केलें, इकडे तिकडे हलणाऱ्या पर्वतास जेथल्या तेथें रोखून धरलें, ज्यानें हें विशाल अंतरिक्ष निर्माण केलें आणि द्युलोकाला आधार दिला तोंच, हे जनहो ! इन्द्र होय ! (मी नव्हें), (२–१२–२). ज्यानें अहीला मारून सप्तसिंधूंना मोकळें केलें, ज्यानें वलासुराच्या बंदिशाळेंत डांबून ठेविलेल्या गायी बंधमुक्त केल्या, ज्यानें अत्यंत मृदु अशा मेघांत विद्युद्रूप अग्नि उत्पन्न केला, आणि संग्रामांत जो शत्रूंचा सप्पा उडवितो, तोच हे लोक हो ! इन्द्र होय ! (मी नव्हें) (२-१२-३). ज्यानें हीं नश्वर भुवनें स्थिर केलीं, ज्यानें नीच अशा दास व असुर जातीचा धुव्वा उडवून त्यांना गुहेंत डांबून ठेविलें, व्याध सावज पकडतो त्याप्रमाणें ज्यानें शत्रूंवर जय मिळवून त्यांची संपत्ति लुटून फस्त केली, तोच, हे लोक हो ! इन्द्र होय ! (२ १२–४) शत्रुघातक असा तो उग्र इंद्र आहे तरी कोठें ? अर्थात् तो नाहींच ! असें त्याला न ओळखणारे कांहीं अश्रद्ध लोक त्याच्याविषयी संशयोद्गार उघड काढीत असतात. पण पक्ष्यांचा थवा ज्याप्रमाणें सहज उधळून लावावा त्याप्रमाणें जो शत्रूंची गवाश्वादिक संपत्ति संपूर्ण नाश करून टाकतो त्याच्याच ठिकाणीं तुम्ही दृढ विश्वास ठेवा ! कारण तोच, हे लोक हो ! इन्द्र होय ! (२–१२–५).

यो रध्रस्य चोदिता यः कृशस्य यो ब्रह्मणो नाधमानस्य कीरेः ।
युक्तग्राव्णो योऽविता सुशिप्रः सुतसोमस्य स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-६ ॥

यस्याश्वासः प्रदिशि यस्य गावो यस्य ग्रामा यस्य विश्वे रथासः ।
यः सूर्यं य उषसं जजान यो अपां नेता स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-७ ॥

यं क्रन्दसी संयती विह्वयेते परेऽवर उभया अमित्राः ।
समानं चिद्रथमातस्थिवांसा नाना हवेते स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-८ ॥

यस्मान्न ऋते विजयन्ते जनासो यं युध्यमाना अवसे हवन्ते ।
यो विश्वस्य प्रतिमानं बभूव यो अच्युतच्युत्स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-९ ॥

यः शश्वतो मह्येनो दधानानमन्यमानाञ्छर्वा जघान ।
यः शर्धते नानुददाति शृध्यां यो दस्योर्हन्ता स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-१० ॥

यः शम्बरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविन्दत् ।
ओजायमानं यो अहिं जघान दानुं शयानं स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-११ ॥

यः सप्तरश्मिर्वृषभस्तुविष्मानवासृजत्सर्तवे सप्त सिन्धून् ।
यो रौहिणमस्फुरद्वज्रबाहुर्द्यामारोहन्तं स जनास इन्द्रः ॥

॥ २-१२-१२ ॥

श्रीमान् असो वा दरिद्र असो, कीर्तन करणारा ब्राह्मण असो, वा याचक असो, या सर्वांनाच जो धनाविषयीं प्रेरणा करतो आणि त्याच-प्रमाणें सोमरस काढण्याकरितां ग्रावे (सोम कुटण्याचे दगड) जुळवून ठेवणारा आणि कुटलेला सोमरस गाळून स्वच्छ करणारा अशा दोघांचेंहि जो रक्षण करतो, तोच हे जन हो, इन्द्र होय! (२-१२-६). ज्याच्या आज्ञेत सर्व अश्व व सर्व गायी राहतात आणि ज्याच्या आज्ञेत सर्व लोक आणि सर्व रथी वीर वागतात, ज्यानें सूर्य उत्पन्न केला व उषेसहि जन्म दिला व जो उदकांचा प्रेरक आहे, तोच हे लोकहो! इन्द्र होय! (मी नव्हें) (२-१२-७). गंभीर सिंहगर्जना करणारे व एकमेकांस जाऊन भिडलेले असे एकमेकांचें शत्रुत्व करणारे उभय पक्षाचे सैनिक लोक ज्याचा सारखाच धांवा करतात व रथांत बसलेले उभय बाजूंचे वीरहि आपल्याकडे येण्यासाठीं ज्यास हांक मारतात, तोच, हे लोक हो, इन्द्र होय! (२-१२-८). ज्याच्याशिवाय लढाईत जय मिळूं शकत नाहीं, रणांत गुंतलेले वीर आपल्या रक्षणासाठीं ज्याचा धांवा करतात, जो या विश्वाचा प्रतिनिधि आहे आणि जो अचळ अस-लेल्यालाहि चाळवितो तोच, हे लोकहो! इन्द्र होय! (२-१२-९). जो महापातक्यांना व अट्टल इन्द्रनिन्दक नास्तिकांना वज्रानें ठार मारता झाला, बढाईखोरांना जो फुशारकी मारूं देत नाहीं व जो दस्यूंचा संहारकर्ता आहे, तोच हे जनहो इन्द्र होय! (२-१२-१०). ज्यानें पर्वतामध्यें दडून बसलेल्या शंबराला चाळिसाव्या वर्षी शोधून काढलें व ज्यानें पडूनच पराक्रम गाजवूं पाहणाऱ्या त्या दानवाची मुसंडी वळली तोच, हे लोकहो! इन्द्र होय! (२-१२-११). जो विविध प्रकारच्या सात रश्मींनीं युक्त आहे, जो अभीष्टवर्षक आणि तसाच जो बलवानहि आहे, ज्यानें गंगादि सप्त नद्यांचे प्रवाह वाहते केले, आणि ज्यानें स्वर्गावर चालून जाणाऱ्या रौहिणेयाला आपल्या वज्रबाहूंनीं ठार मारलें, तोच हे लोक हो, इन्द्र होय! (२-१२-१२).

द्यावा चिदस्मै पृथिवी नमेते शुष्माच्चिदस्य पर्वता भयन्ते ।
यः सोमपा निचितो वज्रबाहुर्यो वज्रहस्तः स जनास इन्द्रः ॥
॥ २-१२-१३ ॥

यः सुन्वन्तमवति यः पचन्तं यः शंसन्तं यः शशमानमूती ।
यस्य ब्रह्म वर्धनं यस्य सोमो यस्येदं राधः स जनास इन्द्रः ॥
॥ २-१२-१४ ॥

यः सुन्वते पचते दुध्र आ चिद्वाजं दर्दर्षि स किलासि सत्यः ।
वयं त इन्द्र विश्वह प्रियासः सुवीरासो विदथमा वदेम ॥
॥ २-१२-१५ ॥

## रत्न १७ वें

**गृत्समद-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

प्र घा न्वस्य महतो महानि सत्या सत्यस्य करणानि वोचम् ।
त्रिकद्रुकेष्वपिबत्सुतस्यास्य मदे अहिमिन्द्रो जघान ॥
॥ २-१५-१ ॥

**श्रौ. वि. ( दशरात्र ) अच्छावाकशस्त्र.** **स्मा. वि. इन्द्रसूक्त.**

अवंशे द्यामस्तभायद्बृहन्तमा रोदसी अपृणदन्तरिक्षम् ।
स धारयत्पृथिवीं पप्रथच्च सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-२ ॥

सद्मेव प्राचो वि मिमाय मानैर्वज्रेण खान्यतृणन्नदीनाम् ।
वृथासृजत्पथिभिर्दीर्घयाथैः सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-३ ॥

स प्रवोळ्हन्परिगत्या दभीतेर्विश्वमधागायुधमिद्धे अग्नौ ।
सं गोभिरश्वैरसृजद्रथेभिः सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-४ ॥

ज्याला द्यावा-पृथिवी नमून असतात, ज्याच्या प्रतापाला पर्वतहि भिऊन राहतात, जो सोमरस प्राशन करतो, ज्याचे बाहू वज्रासारखे कठीण आहेत आणि ज्याच्या हातात वज्र आहे, तोच, हे लोकहो,इन्द्र होय! (२-१२-१३). जो सोमरस काढणाऱ्यांचें संरक्षण करतो, तसेंच हविरन्न तयार करणाऱ्याचें, स्तुतिस्तोत्र गाणाऱ्यांचें, आणि गुणसंकीर्तन करणाऱ्यांचेंहि जो संरक्षण करतो आणि स्तोत्रगान हें ज्यास आनंदकर व सोम व हविर्दान हें ज्यास उल्हास-प्रद आहे तोच, हे लोकहो, इन्द्र होय ! (२-१२-१४). हे इन्द्रदेवा ! तूं दुर्धर आहेस ! तरी सोमरस व हविरन्न तयार करून तुला अर्पण कर-णाऱ्या भक्ताला तूं सामर्थ्यसंपन्न करतोस. तूं खरोखर सत्य स्वरूप आहेस. तर देवा ! आम्ही आमच्या पुत्रपौत्रादिकांसहित सदैव तुझ्या सुप्रसन्न मर्जीत राहून तुझें अखंड नामसंकीर्तन करीत रहावें असें घडो ! (२-१२-१५).

## रत्न ९७ वें

या श्रेष्ठ इन्द्रदेवाचे थोर पराक्रम व त्याचप्रमाणें त्या सत्यस्वरूपी भगवंताच्या सत्यकथा यांचें मी आतां वर्णन करतों. ' त्रिकद्रुक ' नांवाच्या अभिप्लवह यज्ञांत पिळून तयार केलेल्या सोमरसाचें इन्द्रानें पान केलें आणि त्याच्या हर्षोन्मादांत अहीला यमलोक दाखविला ! (२-१५-१). निराधार अशा द्युलोकाला आकाशांत आधार देऊन त्यानें स्थिर केलें ! विशाल आकाश व द्यावा-पृथ्वी यांना आपल्या तेजानें भरून सोडलें ! आणि पृथ्वीला धारण करून तिचा विस्तार केला ! या सर्व गोष्टी त्यानें सोमरसाच्या उल्हास-भरांत घडवून आणल्या ! (२-१५-२). घर मापून आखून टाकावें त्याप्रमाणें त्यानें पूर्वादि दिशांचें मोजमाप करून त्यांची मर्यादा ठरवून टाकली! वज्रानें जमीन खोदून नदीच्या प्रवाहांना त्यानेंच वाट करून दिली आणि दीर्घमार्गांनीं वाहत जाणाऱ्या नद्यांना सहज लीलेनें त्यानेंच निर्माण केलें ! या सर्व गोष्टी त्यानें सोमरसाच्या हर्षनिर्भरांतच केल्या ! (२-१५-३). दभीति ऋषीला पकडून घेऊन जाणाऱ्या चुमुरि धुनि इत्यादि आसुरांना मध्येंच गांठून त्यांचीं सर्व हत्यारें अग्नींत टाकून भस्मसात् केलीं ! नंतर त्या दभीतीला त्या शत्रूची गायी,घोडे,रथ इत्यादि संपत्ति देऊन त्याला समृद्ध केलें! या सर्व गोष्टी त्या इन्द्रानें सोमपानभरांतच केल्या! (२१-५-४).

स ईं महीं धुनिमेतोररम्णात्सो अस्नातॄनपारयत्स्वस्ति ।
त उत्स्नाय रयिमभि प्र तस्थुः सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-५ ॥

सोदञ्चं सिन्धुमरिणान्महित्वा वज्रेणान उषसः सं पिपेष ।
अजवसो जविनीभिर्विवृश्चन्त्सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-६ ॥

स विद्वाँ अपगोहं कनीनामाविर्भवन्नुदतिष्ठत्परावृक् ।
प्रति श्रोणः स्थाद्व्य१नगचष्ट सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-७ ॥

भिनद्वलमङ्गिरोभिर्गृणानो वि पर्वतस्य दृंहितान्यैरत् ।
रिणग्रोधांसि कृत्रिमाण्येषां सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-८ ॥

स्वप्नेनाभ्युप्या चुमुरिं धुनिं च जघन्थ दस्युं प्र दभीतिमावः ।
रम्भी चिदत्र विविदे हिरण्यं सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
॥ २-१५-९ ॥

**श्रौ. वि. ( एकाह ) निष्केवल्य.**

नूनं सा ते प्रति वरं जरित्रे दुहीयदिन्द्र दक्षिणा मघोनी ।
शिक्षा स्तोतृभ्यो माति धग्भगो नो बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥
॥ २-१५-१० ॥

## रत्न ९८ वें

**गृत्समद-ऋषि, इन्द्र-देवता, जगती-छंद.**

वृषा ते वज्र उत ते वृषा रथो वृषणा हरी वृषभाण्यायुधा ।
वृष्णो मदस्य वृषभ त्वमीशिष इन्द्र सोमस्य वृषभस्य तृष्णुहि ॥
॥ २-१६-६ ॥

पाण्यानें दुथडी भरून वाहणाऱ्या पापनाशक अशा त्या विशाल परुष्णी नदीला उतार करून ती तरून जाण्यास सुगम केली आणि पलीकडे जाण्यास असमर्थ अशा ऋषींना सुखरूप पैलतीरास नेऊन पोंचविलें! या सर्व गोष्टी त्या इन्द्रानें सोमपानभरांतच केल्या! (२-१५-५). पश्चिमेकडे वाहणाऱ्या सिंधूला त्यानें आपल्या प्रभावानें उत्तरेकडे वाहावयास लाविलें! तसेंच उषेच्या रथाचा आपल्या वज्रानें चक्काचूर करून टाकला! आणि मोठ्या वेगानें चाल करून जाणाऱ्या आपल्या सेनेनें शत्रूच्या बलहीन सेनेला उधळून लावलें! या सर्व गोष्टी त्या इन्द्रानें सोमभरांतच कल्या! (२-१५-६). त्या तरुण कन्यका परावृज ऋषीला पाहून लपून बसल्या होत्या.तें ठिकाण इन्द्राच्या कृपेनें त्या परावृजास उमगलें आणि तो तेथें जाऊन त्यांच्या पुढें उभा राहिला. आश्चर्य हें कीं तो ऋषि पांगळा असूनहि चालू लागला व आंधळा असूनहि पाहूं लागला! हीं सर्व अलौकिक कृत्यें त्या इन्द्रानें सोमाच्या हर्षनिर्भरांतच केलीं! (२-१५-७). अंगिरा ऋषींच्या स्तोत्रगायनानें प्रसन्न होऊन त्यानें वलासुरास ठार मारलें! गाईंना प्रतिबंधांत ठेविलेल्या पर्वतांतील दुर्गाचीं शिलांनीं बंद केलेलीं बळकट द्वारें फोडून तीं सताड उघडीं केली! हीं कृत्यें त्या इन्द्रानें सोमाच्या उन्मादांतच केलीं!(२-१५-८). हे इन्द्रा! तूं चुमुरि व धुनि या असुरद्वयांना निद्रेनें घेरून त्यांना ठार मारून टाकलेंस! आणि त्यांच्याशीं लढत असलेल्या दभीति राजर्षीचें रक्षण केलेंस. या युद्धांत त्या असुरद्वयांची अलोट संपत्ति त्या दभीतीच्या रंभीनामक दंडधारक सेवकाला प्राप्त झाली! हीं सर्व महत्कृर्ये त्या इन्द्रानें सोमभरांतच केलीं! (२-१५-९). तर आतां, हे इन्द्र देवा! तुझी ती औदार्यशील दक्षिणा धेनु स्तोत्याला सर्वोत्तम संपत्ति देवो! भजनीय असा तूं आम्हां स्तोतृजनांनाहि ती दाक्षिणा देण्याची कृपा कर! आम्हांस वगळून दुसऱ्यांस देऊ नकोस. सुंदर पुत्रपौत्रांनीं युक्त होत्साते आम्हीं तुझें या यज्ञगृहांत महद्यश गायन करू (२-१५-१०).

## रत्न ९८ वें

हे भक्तकामपूरक इन्द्रदेवा! तुझें वज्र भक्तमनोरथ पूर्ण करणारें आहे. तुझा रथहि भक्तकामकल्पद्रुम आहे! तुझे घोडे आणि तुझीं आयुधें हींहि पण भक्तांचें मनोवांच्छित तृप्त करणारीं आहेत! बलवर्धक व मदकारक अशा सोमरसाचा तूं स्वामी आहेस! तर हे इन्द्रदेवा! हा वीर्यसंपन्न सोमरस प्राशन करून तूं संतृप्त हो! (२-१६-६).

## रत्न ९९ वें

**गृत्समद-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

प्राता रथो नवो योजि सस्निश्चतुर्युगस्त्रिकशः सप्तरश्मिः ।
दशारित्रो मनुष्यः स्वर्षाः स इष्टिभिर्मतिभी रंह्यो भूत् ॥

॥ २-१८-१ ॥

**श्रौ. वि. प्रातरनुवाक** **स्मा. वि. इन्द्रसूक्त**

सास्मा अरं प्रथमं स द्वितीयमुतो तृतीयं मनुषः स होता ।
अन्यस्या गर्भमन्य ऊं जनन्त सो अन्येभिः सचते जेन्यो वृषा ॥

॥ २-१८-२ ॥

हरी नु कं रथ इन्द्रस्य योजमायै सूक्तेन वचसा नवेन ।
मो षु त्वामत्र बहवो हि विप्रा नि रीरमन्यजमानासो अन्ये ॥

॥ २-१८-३ ॥

आ द्वाभ्यां हरिभ्यामिन्द्र याह्या चतुर्भिरा षड्भिर्हूयमानः ।
आष्टाभिर्दशभिः सोमपेयमयं सुतः सुमख मा मृधस्कः ॥

॥ २-१८-४ ॥

आ विंशत्या त्रिंशता याह्यर्वाङा चत्वारिंशता हरिभिर्युजानः ।
आ पञ्चाशता सुरथेभिरिन्द्रा षष्ट्या सप्तत्या सोमपेयम् ॥

॥ २-१८-५ ॥

आशीत्या नवत्या याह्यर्वाङा शतेन हरिभिरुह्यमानः ।
अयं हि ते शुनहोत्रेषु सोम इन्द्र त्वाया परिषिक्तो मदाय ॥

॥ २-१८-६ ॥

## रत्न ९९ वें

हा पहा ! नवा व अभीष्टदाता असा हा यज्ञ रथ प्रातःसवनांतील सोमपानार्थ जोडून तयार झाला आहे. त्याला चार घोडे जोडले असून, चाबूक तीन आणि लगाम सात आहेत. त्या रथाला दहा चाकें (दशग्रह) असून, तो मनुष्यांना हितकारक व स्वर्गप्रापक असा आहे. असा हा इन्द्ररथ याग व स्तोत्रें यांच्या योगानें चालूं लागतो (२–१८–१). इन्द्राप्रीत्यर्थ तयार केलेला हा सोमरस त्याला प्रातःसवनांत तृप्त करण्यास पुरेसा आहे. मध्यंदिन सवनांत तृप्त करण्यास पुरेसा आहे. आणि तृतीय म्हणजे सायंसवनांतहि तृप्त करण्यास पुरेसा आहे. तो सोम मनुष्यांना शुभ प्राप्त करून देणारा आहे, पण मौज ही कीं, तो आहे पृथ्वीचा गर्भ आणि त्याला जन्म देतात ते दुसरेंच ! मनोरथपूरक व जयशील असा हा यज्ञ इन्द्रादि देवांबरोबर असतो (२–१८–२). या इन्द्ररथाला आमच्याकडे सुखानें येण्यासाठीं हरीनामक अश्वांची एक जोडी मीं एक सुंदर असें नवें सूक्त म्हणून चटकन् जोडून टाकली. या आमच्या यज्ञांत, हे इन्द्रदेवा ! तुझें स्तोत्र गाणारे पुष्कळ स्तोतृजन आहेत. तर तूं आतां दुसरीकडे कोठेंच जाऊं नकोस (२–१८–३). हे इन्द्रदेवा ! आम्हां भक्तांच्या हांकेला ओ देऊन तूं आपल्या रथाला दोन घोडे जोडून सोमपानार्थ आमच्या यज्ञाकडे ये कीं ! किंवा चार घोडे जोडूनहि ये ! वाटल्यास सहा जोड अथवा आठ किंवा दहा जोडलेस तरी चालतील. पण तूं इकडे येच. तुझ्यासाठीं म्हणून आम्ही हा सोमरस पिळून तयार ठेविला आहे. तर हे सुधन इन्द्रदेवा ! हा आमचा यज्ञ निरर्थक करूं नकोस ( २–१८–४ ). तुला जर तशी इच्छा झाली तर वीस काय, तीस काय, अथवा चाळीस काय, तितके घोडेहि तूं आपल्या रथाला जोड आणि लवकर इकडे सोमपानार्थ धावत ये कसा ! हे इन्द्रा ! तुझ्या मर्जीप्रमाणें तूं आपले शीघ्रगामी असे पन्नास, साठ, किंबहुना सत्तर घोडे झाले तरी रथास जोड, पण त्वरित आमच्याकडे निघून ये! (२-१८-५).

फार काय सांगूं ! ऐंशी, नव्वद, किंवा शंभर घोडे झाले तरी रथास जोडून ये. तुझ्याकरितां या 'शुनहोत्र' पात्रांत आम्ही सोमरस ओतून ठेविला आहे. तो तुला प्रसन्न करण्याकरितांच सिद्ध केला आहे (२-१८-६).

मम ब्रह्मेन्द्र याह्यच्छा विश्वा हरी धुरि धिष्वा रथस्य ।
पुरुत्रा हि विहव्यो बभूथास्मिञ्छूर सवने मादयस्व ॥
॥ २-१८-७ ॥

न म इन्द्रेण सख्यं वि योषदस्मभ्यमस्य दक्षिणा दुहीत ।
उप ज्येष्ठे वरूथे गभस्तौ प्रायेप्राये जिगीवांसः स्याम ॥
॥ २-१८-८ ॥

नूनं सा ते प्रति वरं जरित्रे दुहीयदिन्द्र दक्षिणा मघोनी ।
शिक्षा स्तोतृभ्यो माति धग्भगो नो बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥
॥ २-१८-९ ॥

## रत्न १०० वें

**गृत्समद-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

विश्वजिते धनजिते स्वर्जिते सत्राजिते नृजित उर्वराजिते ।
अश्वजिते गोजिते अब्जिते भरेन्द्राय सोमं यजताय हर्यतम् ॥
॥ २-२१-१ ॥

**औ. वि. ( तृतीय पर्याय ) शस्त्र; याज्या.** **स्मा. वि. इन्द्रसूक्त**

इन्द्र श्रेष्ठानि द्रविणानि धेहि चित्तिं दक्षस्य सुभगत्वमस्मे ।
पोषं रयीणामरिष्टिं तनूनां स्वाद्मानं वाचः सुदिनत्वमह्नाम् ॥
॥ २-२१-६ ॥

**स्मा. वि. इन्द्र-आवाहन.**

हे इन्द्रदेवा ! माझ्या स्तोत्रस्तवनाकडे लक्ष देऊन तूं आमच्याकडे ये. तुझे असतील नसतील तितके घोडे तूं आपल्या रथाच्या धुरेला जोड. तुला अनेक भक्तजन आपल्याकडे येण्यास आग्रहानें बोलावीत असतील, तर हे शूरा ! तिकडे न जाता आमच्याच यज्ञांत येऊन, हा आमचा सोमरस पिऊन तूं तुष्ट व हृष्ट हो ! (२-१८-७). माझें इन्द्रदेवाशीं असलेलें परम सख्य तें कधींहि नष्ट न होवो ! या इन्द्राची दक्षिणा धेनु आम्हांस सदैव वांच्छित फल देवो ! त्याच्या संकटनिवारक बाहूंच्या आश्रयाखालीं आम्हीं सदैव असावें ! आणि ज्या ज्या वेळीं तो सोमपानार्थ आमच्याकडे येईल त्या त्या वेळीं आम्ही लढाईत विजयी होऊं असें घडो ! ( २-१८-८ ). जी तुझी भाग्यशालिनी दक्षिणा, हे इन्द्रदेवा ! स्तोतृजनांना अभीष्ट वरप्रदान करणारी आहे, ती आम्हांस लाभेल असें कर ! तू वंद्य आहेस ! आम्हाला वगळून तूं दुसऱ्यांना ती देऊं नकोस. शूर पुत्रादिकांनीं युक्त होत्साते आम्ही तुझी या यज्ञसमारंभांत मोठी स्तुति गात राहूं (२-१८-९).

## रत्न १०० वें

अहो अध्वर्यूंहो ! तुम्ही त्या पूजार्ह इन्द्रदेवाप्रीत्यर्थ त्याला प्रिय असा सोमरस संपादन करा ! तो इन्द्र म्हणजे असा आहे कीं, तो विश्व-जेता आहे ! तो शत्रूंचा धनजेता आहे ! तो स्वर्गजेता आहे ! तो शाश्वत विजयशाली आहे ! तो अखिल मानवकुलांचा स्वामी आहे ! तो पृथ्वीचा प्रभु आहे ! तो अश्वजेता, गोजेता व अब्जेताहि पण आहे ! (२-२१-१).

हे इन्द्रदेवा ! तूं आम्हांस श्रेष्ठ संपत्ति आणून दे ! आम्ही यज्ञकर्म-तत्पर आहों अशी आमची प्रसिद्धी कर ! आम्हांस सौभाग्य दे ! आम-च्यांत धनसमृद्धि होईल असें कर ! शरीर रोगरहित राहील असें कर ! आमची वाणी माधुर्ययुक्त होईल असें घडो ! आणि आम्हांस सतत सुदिन लाभत जातील असे होवो ! ( २-२१-६ ).

## रत्न १०१ वें

**गृत्समद-ऋषि, ब्रह्मणस्पति-देवता, जगती-छंद.**

गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।
ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम् ॥

॥ २-२३-१ ॥

**श्रौ. वि.** (प्रवर्ग्य) अभिष्टव. **स्मा. वि.** मंत्रपुष्पांजलि; गणपति आवाहन.

## रत्न १०२ वें

**गृत्समद-ऋषि, बृहस्पति-देवता, जगती--छंद.**

बृहस्पते अति यदर्यो अर्हाद् द्युमद्विभाति क्रतुमज्जनेषु ।
यद्दीदयच्छवस ऋतप्रजात तदस्मासु द्रविणं धेहि चित्रम् ॥

॥ २-२३-१५ ॥

## रत्न १०३ वें

**गृत्समद-ऋषि, ब्रह्मणस्पति-देवता, जगती-छंद.**

ब्रह्मणस्पते त्वमस्य यन्ता सूक्तस्य बोधि तनयं च जिन्व ।
विश्वं तद्भद्रं यदवन्ति देवा बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥

॥ २-२३-१९ ॥

## रत्न १०४ वें

**गृत्समद-ऋषि, आदित्य-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

इमं स्तोमं सक्रतवो मे अद्य मित्रो अर्यमा वरुणो जुषन्त ।
आदित्यासः शुचयो धारपूता अवृजिना अनवद्या अरिष्टाः ॥

॥ २-२७-२ ॥

**श्रौ. वि.** ( पशु ) वपा याज्या.

## रत्न १०१ वें

हे ब्रह्मणस्पते ! तूं देवादिगणाचा प्रमुख नेता आहेस. ऋषींतला श्रेष्ठ ऋषि आहेस. अन्नवंतातला तूं श्रेष्ठ अन्नवान् आहेस. तूं उत्तमोत्तम मंत्राचा स्वामी आहेस. असा जो तूं त्या तुला आम्ही हांक मारीत आहों ! तर हे देवा ! ती आमची स्तुति ऐकून तुं आपल्या संरक्षणशक्तिनिशीं इकडे ये आणि या यज्ञगृहांत बैठक मार ( २-२३-१ ).

## रत्न १०२ वें

हे बृहस्पति देवा ! तूं सत्यापासून उत्पन्न झाला आहेस, तर हे देवा ! तूं आम्हांस ब्रह्मवर्चसरूप असें ऐश्वर्य दे कीं ज्याची श्रेष्ठ ब्राह्मण पूजा करतो, जें लोकांमध्यें देदीप्यमान आहे, जें यज्ञादि सत्कर्मांचें साधन आहे, आणि जें बलाने विलसत आहे. अशा प्रकारचें अद्भुत ऐश्वर्य तूं आम्हांस दे ! ( २-२३-१५ ).

## रत्न १०३ वें

हे ब्रह्मणस्पति देवा ! तूं या जगाचा नियामक आहेस. तर हे देवा ! तूं या आमच्या ब्रह्मणस्पति सूक्ताचा मथितार्थ ओळख आणि आमच्या पुत्रपौत्रादिकांना संतुष्ट कर ! कारण तुझ्यासारखे देव ज्यांचें रक्षण करतात त्या सर्वांचें कल्याणच होतें, आणि म्हणून आम्ही वीर्यशाली पुत्रपौत्रादिकांनीं संपन्न होत्साते, तुझें या यज्ञांत मोठें स्तोत्र गात राहूं (२-२३-१९).

## रत्न १०४ वें

समान बुद्धींचे असे जे मित्रादि देव आहेत ते आज या माझ्या स्तोत्राचा स्वीकार करोत. ते देव अदितीचे पुत्र असून, तेजस्वी, मेघधारेप्रमाणें निर्मळ, सर्वांवर अनुग्रह करणारे, पापरहित व कोणाकडूनहि हिंसित न होणारे असे आहेत ( २-२७-२ ).

तिस्रो भूमीर्धारयन् त्रीँरुत द्यून्त्रीणि व्रता विदथे अन्तरेषाम् ।
ऋतेनादित्या महि वो महित्वं तदर्यमन्वरुण मित्र चारु ॥

॥ २-२७-८ ॥

श्री. वि. ( पशु ) पुरोडाश याज्या.

न दक्षिणा वि चिकिते न सव्या न प्राचीनमादित्या नोत पश्चा ।
पाक्या चिद्वसवो धीर्या चिद्युष्मानीतो अभयं ज्योतिरश्याम् ॥

॥ २-२७-११ ॥

श्री. वि. ( पशु ) हविर्याज्या.

## रत्न १०५ वें

गृत्समद-ऋषि, वरुण-देवता, त्रिष्टुप्-छंद.

इदं कवेरादित्यस्य स्वराजो विश्वानि सान्त्यभ्यस्तु मन्हा ।
अति यो मन्द्रो यजथाय देवः सुकीर्तिं भिक्षे वरुणस्य भूरेः ॥

॥ २-२८-१ ॥

श्री. वि. ऋणदारिद्र्यदुःख नाशन.

तव व्रते सुभगासः स्याम स्वाध्यो वरुण तुष्टुवांसः ।
उपायन उषसां गोमतीनामग्नयो न जरमाणा अनु द्यून् ॥

॥ २-२८-२ ॥

तव स्याम पुरुवीरस्य शर्मन्नुरुशंसस्य वरुण प्रणेतः ।
यूयं नः पुत्रा अदितेरदब्धा अभि क्षमध्वं युज्याय देवाः ॥

॥ २-२८-३ ॥

यो मे राजन्युज्यो वा सखा वा स्वप्ने भयं भीरवे मह्यमाह ।
स्तेनो वा यो दिप्सति नो वृको वा त्वं तस्माद्वरुण पाह्यस्मान् ॥

॥ २-२८-१० ॥

आदित्य देव पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग या तीनहि लोकांचें धारण करतात. आणि त्याचप्रमाणें तेजस्वी असे अग्नि, वायु व सूर्य यांसहि धारण करतात. या आदित्य देवांचीं यज्ञगृहांत प्रातर्माध्यंदिनसायं अशीं तीन सवनव्रतें आहेत. हे आदित्य देव हो ! सत्याच्या योगानें तुमचा महिमा फार मोठा आहे आणि तसाच तो सर्वोत्कृष्टहि आहे (२-२७-८). अहो आदित्य हो ! मला उजवीकडे दिसत नाहीं किंवा डावीकडेहि दिसत नाहीं. त्याचप्रमाणें मला पुढेंहि दिसत नाहीं व मागेंहि दिसत नाहीं. मी अज्ञान असल्यामुळें फार भयभीत झालों आहे. तरी हे आदित्यानो ! तुमच्या मार्गदर्शत्वाखालीं मी वाटचाल केल्यास खात्रीनें मला भयरहित अशा तुमच्या ज्ञानमय प्रकाशाचा लाभ होईल. (२-२७-११).

## रत्न १०५ वें

परमज्ञानी व स्वयंप्रकाश अशा अदितिपुत्र वरुण देवाचें हें स्तोत्र आहे. तो आपल्या पराक्रमानें हें सर्व भूतजात जिकून घेतो. तो देव आपल्या उपासकाला अत्यंत आनंद प्राप्त करून देतो. म्हणून त्या समर्थ वरुण देवाची सुंदर कीर्ति मला मिळण्याबद्दल त्याजपाशीं याचना करीत आहें (२-२८-१) हे वरुण देवा ! आम्ही मनःपूर्वक मंगल ध्यान करून तुझें स्तवन करीत आहों. तर आतां हे देवा, तुझ्या सेवेंत तत्पर असणारे आम्हीं अत्यंत भाग्यशाली होऊं असें कर ! आणि त्याचप्रमाणें तेजःपुंज कांतीनें झळकणाऱ्या उषा उदय पावतांच अग्निहोत्रार्थ जसे अग्नि प्रज्वलित केले जातात तद्वत् दररोज तुझें स्तोत्र गाणारे आम्हींहि ज्ञानतेजानें संपन्न होऊ असें घडो ! (२-२८-२) हे सर्व जगाच्या प्रणेत्या! हे वरुण देवा! तुझ्याजवळ असंख्य वीर आहेत आणि तुझी स्तुति सर्वतोमुखी झाली आहे. तर देवा ! आम्ही तुझ्या कृपाछत्राखालीं राहूं असें कर ! अदितीचे मित्रादिपुत्र हे शत्रूंना दुर्धर आहेत. अतएव हे देवहो ! तुमच्याशीं सख्य करूं इच्छिणाऱ्या आम्हांना आमच्या कृतापराधाची क्षमा करा ! (२-२८-३). हे वरुण राजा ! माझा आप्त किंवा मित्र स्वप्नांत पाहिलेलें तुझ्याविषयींचें भय मज भिऱ्याला घालूं पाहील अथवा जो चोर किंवा लांडगा माझा घात करूं इच्छील त्या सर्वांपासून तूं आमचें रक्षण कर ! (२-२८-१०).

## रत्न १०६ वें

**गृत्समद-ऋषि, सिनीवाली-देवता, जगती-छंद.**

सिनीवालि पृथुष्टुके या देवानामसि स्वसा ।
जुषस्व हव्यमाहुतं प्रजां देवि दिदिड्ढि नः ॥ २-३२-६ ॥

**श्रौ. वि. ( सिनीवाली-याग ) याज्या व अनुवाक्या.**

या सुबाहुः स्वङ्गुरिः सुषूमा बहुसूवरी ।
तस्यै विश्पत्न्यै हविः सिनीवाल्यै जुहोतन ॥ २-३२-७ ॥
या गुङ्गूर्या सिनीवाली या राका या सरस्वती ।
इन्द्राणीमह्व ऊतये वरुणानीं स्वस्तये ॥ २-३२-८ ॥

## रत्न १०७ वें

**गृत्समद-ऋषि, रुद्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

आ ते पितर्मरुतां सुम्नमेतु मा नः सूर्यस्य संदृशो युयोथाः ।
अभि नो वीरो अर्वति क्षमेत प्र जायेमहि रुद्र प्रजाभिः ॥
॥ २-३३-१ ॥

**श्रौ. वि. ( रुद्रयज्ञ ) दिशोपस्थान; स्मा. वि. रुद्रसूक्त.**

त्वादत्तेभी रुद्र शंतमेभिः शतं हिमा अशीय भेषजेभिः ।
व्य१स्मद्द्वेषो वितरं व्यंहो व्यमीवाश्चातयस्वा विषूचीः ॥
॥ २-३३-२ ॥
श्रेष्ठो जातस्य रुद्र श्रियासि तवस्तमस्तवसां वज्रबाहो ।
पर्षि णः पारमंहसः स्वस्ति विश्वा अभीती रपसो युयोधि ॥
॥ २-३३-३ ॥
मा त्वा रुद्र चुक्रुधामा नमोभिर्मा दुष्टुती वृषभ मा सहूती ।
उन्नो वीराँ अर्पय भेषजेभिर्भिषक्तमं त्वा भिषजां शृणोमि ॥
॥ २-३३-४ ॥

## रत्न १०६ वें

हे सिनीवाली ! हे विशालजघने ! तूं देवांची बहीण आहेस. तर हे देवि तुला अर्पण केलेला हा हविर्भाग तूं ग्रहण कर आणि आम्हांस संततीचा लाभ करून दे ! ( २–३२–६ ). जिचे बाहू सुंदर आहेत आणि जिची बोटें कोमल आहेत, जिची कूस चांगली आहे, जिला विपुल संतति आहे आणि जी जनांची पालनकर्त्री त्या सिनीवालीला या आमच्या यज्ञसमारंभांत हवि अर्पण करा ! (२–३२–७). गुंगू, सिनीवाली, राका, सरस्वती, इन्द्र-पत्नी इन्द्राणी व वरुणपत्नी वरुणानी या देवतांना आमच्या रक्षणार्थ व कल्याणार्थ आम्ही या आमच्या यज्ञगृहांत पाचारण करतों (२–३२–८).

## रत्न १०७ वें

हे मरुतांच्या पित्या, हे रुद्रदेवा ! तुझें सुख आम्हांकडे येवो ! आम्हांस सूर्यदर्शनापासून दूर करूं नकोस ! आमचे वीरपुत्र शत्रूचा पराभव करोत ! आणि हे देवा, आम्ही पुत्रपौत्रादि प्रजाजनांनीं सुसमृद्ध होऊं असें कर ! (२-३३-१). हे रुद्रदेवा ! तूं दिलेल्या अत्यंत सुखकारक औषधाच्या योगानें आम्ही शंभर वर्षें सुखांत काढूं असें होऊं दे ! आमचे जे द्वेष्टे आहेत त्यांचा नायनाट कर ! आमचें जें पाप आहे त्याचा परिहार कर ! आमचे जे विविध रोग आहेत त्यांचा नाश कर ! ( २–३३–२ ). हे वज्रबाहो रुद्रदेवा ! सर्व जगामध्यें ऐश्वर्यानें तूंच तेवढा श्रेष्ठ आहेस ! त्याचप्रमाणें बलवानांतला बलवानहि तूंच आहेस ! तर तूं आम्हांस सर्व संकटांतून सुखरूप पार ने ! आणि आमचे 'सर्व प्रकारचे रोग नाहींसे कर ! ( २–३३–३ ). हे रुद्रदेवा ! आम्हीं तुला कसा तरी नमस्कार केला म्हणून तूं आमच्या-वर रागावूं नकोस ! तसेंच तुझें स्तोत्रगायनांत कांहीं प्रमाद घडला म्हणून अगर भलत्याच देवाबरोबर तुला हाक मारली म्हणून तूं रागावूं नकोस ! आमच्या वीरपुत्रादिकांस तुझें औषध देऊन त्यांना चांगले ठणठणीत कर ! कारण तूं वैद्यांतला श्रेष्ठ वैद्यराज आहेस असें आम्ही ऐकतों (२-३३-४).

हवीमभिर्हवते यो हविर्भिरव स्तोमेभी रुद्रं दिषीय ।
ऋदूदरः सुहवो मा नो अस्यै बभ्रुः सुशिप्रो रीरधन्मनायै ॥
॥ २-३३-५ ॥

उन्मा ममन्द वृषभो मरुत्वान्त्वक्षीयसा वयसा नाधमानम् ।
घृणीव च्छायामरपा अशीया विवासेयं रुद्रस्य सुम्नम् ॥
॥ २-३३-६ ॥

क्व१स्य ते रुद्र मृळयाकुर्हस्तो यो अस्ति भेषजो जलाषः ।
अपभर्ता रपसो दैव्यस्याभी नु मा वृषभ चक्षमीथाः ॥
॥ २-३३-७ ॥

प्र बभ्रवे वृषभाय श्वितीचे महो महीं सुष्टुतिमीरयामि ।
नमस्या कल्मलीकिनं नमोभिर्गृणीमसि त्वेषं रुद्रस्य नाम ॥
॥ २-३३-८ ॥

**श्रौ. वि. (रुद्रयज्ञ) वपायाज्या**

स्थिरेभिरङ्गैः पुरुरूप उग्रो बभ्रुः शुक्रेभिः पिपिशे हिरण्यैः ।
ईशानादस्य भुवनस्य भूरेर्न वा उ योषद्रुद्रादसुर्यम् ॥
॥ २-३३-९ ॥

अर्हन्बिभर्षि सायकानि धन्वार्हन्निष्कं यजतं विश्वरूपम् ।
अर्हन्निदं दयसे विश्वमभ्वं न वा ओजीयो रुद्र त्वदस्ति ॥
॥ २-३३-१० ॥

जो रुद्रदेव चरुपुरोडाशादि हवींनीं आणि स्तुतिस्तोत्रांनीं आळविला जातो त्या रुद्रदेवाचा राग आम्ही सुंदर स्तोत्र गाऊन शांत करूं या. जो मृदु अंतःकरणाचा आहे, भक्ताच्या हांकेकडे ज्याचें सहज लक्ष वेधतें, जो पिंगट वर्णाचा व सुंदर किरीटी आहे असा तो रुद्रदेव आम्हांस हिंस्र बुद्धीच्या मनुष्याच्या हवालीं न करो ! (२-३३-५). भक्तमनोरथ पूर्ण करणारा व मरुद्गणांनीं युक्त असा हा रुद्रदेव याचना करणाऱ्या मज भक्ताला तेजस्वी अन्न देऊन संतुष्ट करो ! उन्हानें तापलेला मनुष्य सावलीचा आश्रय करून विश्रांत पावतो, तद्वत् मी निष्पाप होत्साता रुद्रदेवाच्या सुखाचा उपभोग घ्यावा. एतदर्थ मी त्या रुद्रदेवाची परिचर्या करीत आहें (२-३३-६). हे रुद्रदेवा ! तुझा तो सुखकारक हात कोठें आहे कीं जो व्याधिनिवारक व सुखदायक आहे ! आणि हे भक्तमनोरथपूरका ! तूं देवकृत पापाचा विनाशक आहेस. तर मीं केलेल्या अपराधाची तूं लवकर क्षमा कर ! (२-३३-७). विश्वंभर, भक्तकामकल्पद्रुम व श्वेतवर्ण अशा त्या रुद्रदेवाप्रीत्यर्थ मी एक सर्वोत्कृष्ट स्तोत्र म्हणतों. हे स्तोत्या ! सर्व किल्मिषाचा नाश करणारें असें ज्याचें तेज आहे अशा त्या रुद्रदेवाचें नमस्कारमंत्रांनीं पूजन कर ! आणि आम्हीहि त्या महादेवाच्या तेजस्वी नामाचें संकीर्तन करतों (२-३३-८). सुदृढ अवयवांनीं युक्त, बहुरूपी, अत्यंत तेजस्वी, पिंगट वर्णाचा असा तो रुद्रदेव तेजस्वी सुवर्णालंकारांनीं विराजत आहे. या विश्वाचा शास्ता व भूतजाताचा भर्ता जो हा रुद्रदेव, त्याचें सामर्थ्य क्षीण झालें असें कधींहि होत नाहीं (२-३३-९). हे रुद्रदेवा ! तूं पूजनार्ह असून हातांत धनुष्यबाण धारण करतोस. त्याचप्रमाणें पूजनीय व विविधरूपात्मक असा सुवर्णहारहि गळ्यांत धारण करतोस. या अखिल विशाल जगाचा तूं रक्षणकर्ता आहेस. हे रुद्रदेवा ! आतां खरेंच बोलायचें म्हणजे तुझ्यापेक्षां बलवान् असा दुसरा कोणीच नाहीं ! (२-३३-१०).

स्तुहि श्रुतं गर्तसदं युवानं मृगं न भीममुपहत्नुमुग्रम् ।
मृळा जरित्रे रुद्र स्तवानोऽन्यं ते अस्मन्नि वपन्तु सेनाः ॥

॥ २-३३-११ ॥

कुमारश्चित्पितरं वन्दमानं प्रति नानाम रुद्रोपयन्तम् ।
भूरेर्दातारं सत्पतिं गृणीषे स्तुतस्त्वं भेषजा रास्यस्मे ॥

॥ २-३३-१२ ॥

**स्मा. वि. स्कंद आवाहन.**

या वो भेषजा मरुतः शुचीनि या शंतमा वृषणो या मयोभु ।
यानि मनुरवृणीता पिता नस्ता शं च योश्च रुद्रस्य वश्मि ॥

॥ २-३३-१३ ॥

परि णो हेती रुद्रस्य वृज्याः परि त्वेषस्य दुर्मतिर्मही गात् ।
अव स्थिरा मघवद्भ्यस्तनुष्व मीढ्वस्तोकाय तनयाय मृळ ॥

॥ २-३३-१४ ॥

एवा बभ्रो वृषभ चेकितान यथा देव न हृणीषे न हंसि ।
हवनश्रुन्नो रुद्रेह बोधि बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥

॥ २-३३-१५ ॥

हे स्तोत्या ! सुविख्यात अशा रुद्रदेवाचें स्तवन कर, कीं जो देव रथारूढ आहे, जो नित्य तरुण, सिंहाप्रमाणें भयंकर, शत्रूंना ठार मारणारा व जो उग्र आहे. हे रुद्रदेवा ! आम्हीं तुझें स्तोत्र गात आहों. तर त्या आम्हा स्तोतृजनांना तूं सुखी कर आणि तुझी जी सेना आहे ती आम्हांला सोडून इतरांचा म्हणजे शत्रूचा निःपात करो ! (२-३३-११). आशीर्वाद देत असतांना मुलगा जसा बापाला वंदन करतो तद्वत् आमच्या जवळ येत असलेल्या रुद्रदेवाला आम्ही नमस्कार करतों. आणि पुष्कळ धन देणाऱ्या आणि सज्जनांचें पालन करणाऱ्या रुद्राचें मी स्तवन करतों. हे रुद्रदेवा ! तुझें स्तवन करून झालें म्हणजे तूं आम्हास आरोग्यकर औषध दे ! (२-३३-१२). हे रुद्रपुत्र मरुतांनो ! हे बलसंपन्न देवांनो ! तुमच्याजवळ जीं शुद्ध औषधें आहेत, त्याचप्रमाणें जीं सुखकारक व कल्याणकारक आहेत आणि जीं आमचा पिता जो मनु त्या मनूनें पसंत केलीं तीं आणि तशींच रुद्रदेवाचीं तीं रोगशामक व भयहारक औषधें यांची आम्ही तुमच्यापाशीं याचना करतों (२-३३-१३). रुद्रदेवाचीं आयुधें आम्हांस सोडून दुसरीकडे जावोत ! त्याचप्रमाणें त्या तेजस्वी देवाचा दुःखदायक असा भयंकर क्रोध आम्हांस स्पर्श न करतां इतरत्र जावो ! हे उदार रुद्रदेवा ! तुला हविर्भाग देणाऱ्या यजमानाप्रीत्यर्थ तुझें तें सज्ज धनुष्य दोरी सोडून शिथिल कर ! आणि आमच्या पुत्रपौत्रादिकांस सुखांत ठेव ! (२-३३-१४).

हे जगद्रक्षका ! हे भक्तमनोरथपूरका ! हे सर्वज्ञ देवा ! कृपा करून तूं आमच्यावर रागावूं नकोस ! आणि आम्हांला मारूंहि नकोस ! हे रुद्र भगवंता ! भक्तांची प्रार्थना ऐकण्यास तूं आमच्याजवळ येऊन ही आमची प्रार्थना ऐक ! आम्ही वीरपुत्रादिकांनीं युक्त होत्साते या यज्ञगृहांत तुझी महान् कीर्ति वर्णन करीत राहूं ! (२-३३-१५).

## रत्न १०८ वें

**गृत्समद-ऋषि, सविता-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

उदु ष्य देवः सविता सवाय शश्वत्तमं तदपा वह्निरस्थात् ।
नूनं देवेभ्यो वि हि धाति रत्नमथाभजद्वीतिहोत्रं स्वस्तौ ॥

॥ २-३८-१ ॥

विश्वस्य हि श्रुष्टये देव ऊर्ध्वः प्र बाहवा पृथुपाणिः सिसर्ति ।
आपश्चिदस्य व्रत आ निमृग्रा अयं चिद्वातो रमते परिज्मन् ॥

॥ २-३८-२ ॥

आशुभिश्चिद्यान्वि मुचाति नूनमरीरमदतमानं चिदेतोः ।
अह्यर्षूणां चिन्न्ययाँ अविष्यामनु व्रतं सवितुर्मोक्यागात् ॥

॥ २-३८-३ ॥

पुनः समव्यद्वितं वयन्ती मध्या कर्तोर्न्यधाच्छक्म धीरः ।
उत्संहायास्थाद्व्यृ१तूँरदर्धररमतिः सविता देव आगात् ॥

॥ २-३८-४ ॥

नानौकांसि दुर्यो विश्वमायुर्वि तिष्ठते प्रभवः शोको अग्नेः ।
ज्येष्ठं माता सूनवे भागमाधादन्वस्य केतमिषितं सवित्रा ॥

॥ २-३८-५ ॥

## रत्न १०८ वें

विश्वाला प्रेरणा देणारा व जगन्नायक असा हा तेजस्वी सविता देव लोकांना स्वकर्तव्य करण्यास प्रेरणा करण्यासाठीं म्हणून प्रत्यहीं उदय पावत असतो. स्तोतृजनांना धन देणारा तोच असून यज्ञोपासक यजमानास अक्षय्य कल्याणाचा भागीदार करण्याचें श्रेयहि त्याचेंच आहे (२-३८-१). तो सविता देव विशाल हाताचा असून जगाच्या सुखवर्धनार्थ वर अंतरिक्षांत उंच आरोहण करून आपले रश्मिरूप दीर्घबाहू पृथ्वीवर पसरतो. त्याच्या प्रेरणेनेंच पाणी नदीरूपानें शुद्ध व निर्मल वाहूं लागतें व वायु झाला तरी अंतरिक्षामध्यें विहार करीत फिरत असतो (२-३८-२). किरणपुंजा-पासून जेव्हां तो मोकळा होतो तेव्हां प्रवास करणारे वाटसरू आपला पुढील प्रवास थांबवितात. त्याचप्रमाणें शत्रूवर हिरीरीनें चालून जाणाऱ्या वीरांचा वीरावेशहि तो थोपटून धरतो. सवित्याचें दैनिक कर्म विराम पावलें म्हणजे रात्र ही मग आपला अम्मल गाजविण्यास पुढें सरसावते ( २-३८-३ ).

वस्त्र विणणाऱ्या स्त्रीप्रमाणें रात्र ही आपला अंधःकाररूपी पडदा जगा-वर पसरण्यास प्रारंभ करते. त्यासरशीं ज्ञानी लोक आपलें उपासनाकर्म पुढें चालू ठेवतां येण्यासारखें असूनहि मध्येंच थोपवून धरतात. पण पुढें थोड्याच वेळानें झोंपेंतून उठून आपली शय्या सोडून राहिलेलें कर्म करण्यास पुनः उठून बसतात. इतक्यांत विश्रांति ज्यास माहीत नाहीं असा तो सूर्यदेव उदयाचलावर चमकूं लागतो. त्यानेंच ऋतूंचे निरनिराळे कालहि पण एकदांचे ठरवून टाकले आहेत ( २-३८-४ ). त्या प्रज्वलित झालेल्या गृह्याग्नीचें तेज यजमानाच्या घराच्या निरनिराळ्या भागांवर व तेथील सर्व अन्नसंचयावर प्रकाशून राहतें. माता उषा ही सूर्याचा प्रेषित जो अग्नि त्याचा अग्निहोत्र नांवाचा जो प्रथम भाग तो आपल्या मुलाला म्हणजे त्या अग्निनारायणाला प्रातःकालीं अर्पण करते ( २-३८-५ ).

समाववर्ति विष्ठितो जिगीषुर्विश्वेषां कामश्चरताममाभूत् ।
शश्वाँ अपो विकृतं हित्व्यागादनु व्रतं सवितुर्दैव्यस्य ॥

॥ २-३८-६ ॥

त्वया हितमप्यमप्सु भागं धन्वान्वा मृगयसो वि तस्थुः ।
वनानि विभ्यो नकिरस्य तानि व्रता देवस्य सवितुर्मिनन्ति ॥

॥ २-३८-७ ॥

याद्राध्यं१ वरुणो योनिमप्यमनिशितं निमिषि जर्भुराणः ।
विश्वो मार्ताण्डो व्रजमा पशुर्गात्स्थशो जन्मानि सविता व्याकः ॥

॥ २-३८-८ ॥

न यस्येन्द्रो वरुणो न मित्रो व्रतमर्यमा न मिनन्ति रुद्रः ।
नारातयस्तमिदं स्वस्ति हुवे देवं सवितारं नमोभिः ॥

॥ २-३८-९ ॥

भगं धियं वाजयन्तः पुरंधिं नराशंसो ग्नास्पतिर्नो अव्याः ।
आये वामस्य संगथे रयीणां प्रिया देवस्य सवितुः स्याम ॥

॥ २-३८-१० ॥

अस्मभ्यं तद्दिवो अद्भ्यः पृथिव्यास्त्वया दत्तं काम्यं राध आ गात् ।
शंयत्स्तोतृभ्य आपये भवात्युरुशंसाय सवितर्जरित्रे ॥

॥ २-३८--११ ॥

विजयसंपादनार्थ उतावीळ झालेला वीर संग्रामांत दूर गेलेला असला तरी सूर्यदेव अस्ताचलाकडे वळल्यावर तो परत आपल्या शिबिराकडे वळतो. त्याचप्रमाणें दिवसां इतस्ततः फिरणाऱ्या सर्व प्राणिमात्रांचें लक्ष आपल्या विश्रांतिस्थानाकडे वेधलें जातें. काम करणारे लोकहि आपापलें काम मध्येंच टाकून विश्रांतीसाठीं आपल्या घरचा रस्ता सुधारूं लागतात. या सर्व गोष्टी आकाशांतील सूर्यदेवाच्या अस्तमयकालीन नियमाला अनुसरूनच होत असतात. (२-३८-६). हे सवितृ-देवा ! अंतरिक्षामध्यें तुझा जो पाण्याचा सांठा सांठवून ठेवण्यांत आला आहे, तो निर्जल प्रदेशांत इकडेतिकडे फिरणाऱ्या मृगादिकांना पर्जन्यरूपानें प्राप्त होतो. त्याचप्रमाणें अरण्यांतील जो वृक्षसमुदाय आहे, तो झाला तरी पक्ष्यांना वास करून राहण्यासाठीं म्हणूनच दिलेला आहेस. हीं जी सविता देवाचीं सत्कृत्यें आहेत, तीं कोणीहि नाश करूं शकत नाहींत ( २-३८-७ ). सवित्याचा अस्त झाला म्हणजे वरुण हा प्रवाशांना इष्ट, प्रापणीय व सुखकर स्थान देतो. तीव्र धावणारे पक्षी आपल्या घरट्यांकडे वळतात, आणि पशु आपापल्या निवाऱ्याच्या स्थानीं परत येतात. अर्थात् तो सविता सर्व प्राण्यांना विश्रांतीसाठीं म्हणून जागजागीं अलग अलग करतो ( २-३८-८ ). त्या सवितृ-देवाच्या कार्याला इन्द्र काय, वरुण काय, अर्यमा काय किंवा रुद्र झाला तरी काय, कोणीच विघात करीत नाहींत, मग असुरांची गोष्ट कशास पाहिजे ! अशा या सवितृ देवाला नमस्कार करून आमचे कल्याणार्थ आम्हीं त्याची प्रार्थना करतों ( २-३८-९ ). भजनीय, ध्यानयोग्य, बहुप्रज्ञ अशा सवित्याला हवि अर्पण करणारे जे आम्ही त्या आमचें तो प्रशंसनीय व छंदोपति सविता देव वत्सलतेनें रक्षण करो ! आम्हांस संपत्ति व पशु यांचा लाभ व्हावा म्हणून आम्ही त्यास प्रिय होऊन राहावें ( २-३८-१० ).

## रत्न १०९ वें

**गृत्समद-ऋषि, विश्वेदेव-देवता, गायत्री-छंद.**

विश्वे देवास आ गत शृणुता म इमं हवम् ।
एदं बर्हिर्नि षीदत ॥ २-४१-१३ ॥

**श्रौ. वि. ( आग्रयणेष्टि ) वैश्वदेव अनुवाक्या.**

**स्मा. वि. ब्रह्मयज्ञ, विश्वेदेव आवाहन**

तीव्रो वो मधुमाँ अयं शुनहोत्रेषु मत्सरः ।
एतं पिबत काम्यम् ॥ २-४१-१४ ॥
इन्द्रज्येष्ठा मरुद्गणा देवासः पूषरातयः ।
विश्वे मम श्रुता हवम् ॥ २-४१-१५ ॥

## रत्न ११० वें

**गृत्समद-ऋषि, सरस्वती-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अम्बितमे नदीतमे देवितमे सरस्वति ।
अप्रशस्ता इव स्मसि प्रशस्तिमम्ब नस्कृधि ॥
॥ २-४१-१६ ॥

**श्रौ. वि. ( दशरात्र ) प्रउगशस्त्र.** **स्मा. वि. सरस्वतीप्रार्थना.**

त्वे विश्वा सरस्वति श्रितायूंषि देव्याम् ।
शुनहोत्रेषु मत्स्व प्रजां देवि दिदिड्ढि नः ॥ २-४१-१७ ॥

## रत्न १११ वें

**गृत्समद-ऋषि, सरस्वती-देवता, बृहती-छंद.**

इमा ब्रह्म सरस्वति जुषस्व वाजिनीवति ।
या ते मन्म गृत्समदा ऋतावरि प्रिया देवेषु जुह्वति ॥
॥ २-४१-१८ ॥

## रत्न १०९ वें

अहो विश्वेदेवांनो ! तुम्ही आमच्या इकडे या ! ही माझी प्रार्थना ऐका ! आणि येऊन या दर्भासनावर बसा ! ( २–४१–१३ ) अहो विश्वेदेवांनो ! हा तीक्ष्ण व मधुर असा सोमरस खास तुमच्यासाठीं म्हणून या शुनहोत्राच्या यज्ञशालेंत तयार केला आहे. तर तुम्ही तो सुंदर सोम प्राशन करा ! ( २–४१–१४ ) इन्द्र हा ज्यांच्यामध्यें अग्रेसर आहे, जे मरुत्समूहरूप आहेत आणि पूषा हा ज्यांच्यांत दाता आहे असे जे तुम्ही ते, हे विश्वेदेव हो ! सर्व तुम्ही ही माझी हांक ऐका ( २–४१–१५ ).

## रत्न ११० वें

हे श्रेष्ठ माते ! हे श्रेष्ठ नदी ! हे श्रेष्ठ देवी ! हे सरस्वति ! आम्ही धनाभावामुळें दरिद्र्यासारखें झालों आहोंत. तर हे माते ! आम्हांस धन-संपन्न करून प्रसिद्धीस आण ( २–४१–१६ ) हे सरस्वति ! तुझ्या कृपानुग्रहबुद्धीवरच आम्हा सर्वांचीं आयुष्यें अवलंबून राहिलीं आहेत. तर तूं या शुनहोत्राच्या घरीं येऊन सोमग्रहण करून संतुष्ट हो ! आणि आम्हांला पुत्रपौत्रादि संततीचा लाभ दे ! (२-४१-१७).

## रत्न १११ वें

हे अन्नसंपन्न व उदकसंपन्न सरस्वति ! स्वीकारण्यास योग्य व देवांना प्रिय अशीं हविर्द्रव्यें आम्हीं गृत्समद तुला अर्पण करीत आहोंत. तर तूं त्यांचा स्वीकार कर (२–४१–१८).

## रत्न ११२ वें

**गृत्समद-ऋषि, शकुन्त-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

कनिक्रदज्जनुषं प्रब्रुवाण इयर्ति वाचमरितेव नावम् ।
सुमङ्गलश्च शकुने भवासि मा त्वा का चिदभिभा
विश्व्या विदत् ॥ २-४२-१ ॥

**स्मा. वि. ( विवाह ) वरागमन; गृहप्रवेश.**

मा त्वा श्येन उद्वधीन्मा सुपर्णो मा त्वा विद-
दिषुमान्वीरो अस्ता । पित्र्यामनु प्रदिशं कनि-
क्रदत्सुमङ्गलो भद्रवादी वदेह ॥ २-४२-२ ॥

अव क्रन्द दक्षिणतो गृहाणां सुमङ्गलो भद्रवादी शकुन्ते ।
मा नः स्तेन ईशत माघशंसो बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥
॥ २-४२-३ ॥

## रत्न ११३ वें

**गृत्समद-ऋषि, शकुन्त-देवता, १ व ३ जगती, २ अष्टि-छंद.**

प्रदक्षिणिदभि गृणन्ति कारवो वयो वदन्त ऋतुथा शकुन्तयः ।
उभे वाचौ वदति सामगा इव गायत्रं च त्रैष्टुभं चानु राजति ॥
॥ २-४३-१ ॥

**स्मा. वि. ( विवाह ) वाङ्निश्चयास जातांना म्हणावयाचा मंत्र.**

उद्गातेव शकुने साम गायसि ब्रह्मपुत्र इव सवनेषु शंससि ।
वृषेव वाजी शिशुमतीरपीत्या सर्वतो नः शकुने भद्रमा वद
विश्वतो नः शकुने पुण्यमा वद ॥ २-४३-२ ॥

आवदंस्त्वं शकुने भद्रमा वद तूष्णीमासीनः सुमतिं चिकिद्धि नः ।
यदुत्पतन्वदसि कर्करिर्यथा बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥
॥ २-४३-३ ॥

### रत्न ११२ वें

वारंवार शब्द करीत आणि भविष्य सुचवीत हा कपिंजल पक्षी, नावाडी नाव हाकारतो त्याप्रमाणें आपला आवाज खुलवून काढीत आहे. हे कपिंजल पक्ष्या ! तूं आम्हांस मंगल शकुन कर, कसलेंहि संकट तुझ्यावर कोणत्याहि दिशेंनें कधीहि न येवो ! ( २-४२-१ ). श्येन तुझा घात न करो ! त्याचप्रमाणें गरुडहि तुझ्यावर झडप न घालो ! धनुर्धारी वीराकडूनहि तुला उपसर्ग न पोंचो ! तूं पितृदिशेला म्हणजे दक्षिण दिशेला पुनः पुनः शब्द करून, आम्हांला मंगलकारक व शुभकारक असा शकुन सुचीव (२-४२-२). हे कपिंजल पक्ष्या ! मंगल व शुभ बोलणारा तूं आमच्या घराच्या दक्षिणेकडे बसून शब्द कर. चोरांची सत्ता आमच्यावर न चालो ! दुष्ट दुर्जनांचीहि न चालो ! आम्हीं सुंदर वीरपुत्रांनीं युक्त होत्साते आमच्या यज्ञगृहांत देवांचें मोठें स्तोत्र गात राहूं असें घडो ! (२-४२-३).

### रत्न ११३ वें

वेळोवेळीं अन्न सूचित करणारे हे कपिंजल पक्षी स्तोत्याप्रमाणें दक्षिणेकडे बसून सुस्वर शुभमंगल सुचवीत आहेत. सामगायन करणारा जसा गायत्री व त्रैष्टुभ छंदांत गायन करतो तद्वत् तो (पक्षी) दोन्ही स्वरांत गोड आवाज काढतो आणि श्रोत्यांचें मनरंजन करतो! ( २-४३-१ ). हे कपिंजला ! उद्गाता जसा सामगायन करतो तद्वत् तूंहि गानस्वर काढतोस आणि ब्राह्मणाच्छंसी जसा यज्ञांत शस्त्रें गातो त्याप्रमाणें तूं यथाकाल सुस्वर शब्द करतोस. तरुण घोडा घोडीजवळ जाऊन जसा हुंकारतो तद्वत् तूंहि आमच्या सर्व बाजूंनीं मंगल स्वर काढ, आणि आमचें भाग्य आम्हांस स्पष्ट सूचित कर ( २-४३-२ ). हे कपिंजला ! ज्या वेळीं तूं बोलूं लागशील त्या वेळीं शुभ शकुनच बोल. तूं स्वस्थ बसल्यावेळीं आमचें शुभमंगलच चिंतन कर. जेव्हां तूं उडूं लागशील त्या वेळीं कर्करी वाद्याप्रमाणें मंगल ध्वनि काढीत जा. आणि आम्ही सुपुत्रादिकांनीं युक्त होत्साते आमच्या यज्ञशालेंत देवांचें बृहद्यश गात राहूं असें घडो ! (२-४३-३).

## रत्न ११४ वें

## परिशिष्ट ( खिल ४ )

भद्रं वद दक्षिणतो भद्रमुत्तरतो वद ।
भद्रं पुरस्तान्नो वद भद्रं पश्चात् कपिंजल ॥ १ ॥
भद्रं वद पुत्रैर्भद्रं वद गृहेषु च ।
भद्रमस्माकं नो वद भद्रं नो अभयं वद ॥ २ ॥
भद्रमधस्तान्नो वद भद्रमुपरिष्टान्नो वद ।
भद्रं भद्रं न आ वद भद्रं नः सर्वतो वद ॥ ३ ॥
असपत्नः पुरस्तान्नः शिवं दक्षिणतस्कृधि ।
अभयं सततं पश्चाद् भद्रमुत्तरतो गृहे ॥ ४ ॥
यौवनानि महयसि जिग्युषामिव दुंदुभिः ।
शकुंतक प्रदक्षिणं शतपत्राभि नो वद ॥ ५ ॥
आवदंस्त्वं शकुने भद्रमा वद तूष्णीमासीनः सुमतिं चिकिद्धि नः
यदुत्पतन् वदसि कर्करिर्यथा बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥ ६ ॥

## रत्न ११४ वें

हे कपिंजल पक्ष्या ! तुं दक्षिणेकडे मंगल शकुन बोल ! उत्तरेकडेहि मंगलच बोल ! पूर्वेकडे शुभशकुन बोल आणि पश्चिमेकडेहि शुभच बोलत रहा ! (२-४३खिल४-१).आमच्या मुलांबाळांविषयीं शुभ बोल, आमच्या घरादाराविषयीं शुभ बोल आणि त्याचबरोबर आम्हांस अभय प्राप्त होईल असे शब्दहि पण बोल (२-४३ खिल ४-२). आमच्या-खालून आणि आमच्यावरून शुभ शकुन बोलत रहा. नेहमीं आमच्याविषयीं शुभच बोलत जा. सर्व बाजूंनीं आम्हांविषयीं शुभ शब्दच उच्चारत ऐस (२-४३ खिल ४-३). आमच्या घरची पुढील बाजू शत्रुरहित कर ! दक्षिण बाजू शुभदायक कर ! मागची बाजू भयरहित असूं दे ! आणि उत्तर बाजू कल्याणप्रद होऊं दे ! (२-४३ खिल ४-४). दुंदुभि जशी वीराचा उत्साह वाढविते तद्वत् तूं आमच्यांत उत्साह खुलीव ! हे शकुने ! तूं माझ्या उजव्या बाजूनें जा आणि मंगल शकुन कर ! (२-४३ खिल ४-५). हे शकुने ! तूं बोलूं लागलास म्हणजे मंगल शब्दच बोलत रहा ! आणि स्वस्थ असशील तेव्हां आमचें मंगलच चिंतीत जा ! तूं उडूं लागलास म्हणजे कर्करीप्रमाणें मंगल ध्वनिच काढत असावास ! आम्ही पुत्रपौत्रादिकांनीं युक्त होत्साते यज्ञमंडपांत देवांचें महद्यश गात राहूं असें घडो ! (२-४३ खिल ४-६).

---



# मण्डल तिसरें

## रत्न ११५ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

इमं यज्ञं सहसावन् त्वं नो देवत्रा धेहि सुक्रतो रराणः ।
प्र यंसि होतर्बृहतीरिषो नोऽग्ने महि द्रविणमा यजस्व ॥

॥ ३-१-२२ ॥

**श्रौ. वि. प्रातरनुवाक अश्विनशस्त्र.**

इळामग्ने पुरुदंसं सनिं गोः शश्वत्तमं हवमानाय साध ।
स्यान्नः सूनुस्तनयो विजावाऽग्ने सा ते सुमतिर्भूत्वस्मे ॥

॥ ३-१-२३ ॥

**श्रौ. वि. ( पशु ) स्विष्टकृत् परोनुवाक्या.**

## ( मराठी भावार्थ )

### रत्न ११५ वें

हे बलशाली व पराक्रमशाली अग्निदेवा ! तूं आनंदभरित होऊन हा आमचा यज्ञ देवांप्रत नेऊन पोंचव. हे देवांना यज्ञगृहांत बोलावून आणणाऱ्या देवा ! आम्हांला विपुल अन्न दे ! आणि त्याचप्रमाणें महान् ऐश्वर्यहि दे ! (३-१-२२).

हे अग्ने ! गोधनादि प्राप्त करून देणारी व अनेक सत्कर्मांची साधनभूत अशी भूमि आम्हां स्तोतृजनांना चिरकाल लाभेल असें कर ! आमचे पुत्र-पौत्र हे आमचा वंश-विस्तार करणारे होवोत ! हे अग्ने ! तुझी अनुग्रहबुद्धि सतत आम्हांवर पाखर घालील असें कर ! ( ३-१-२३ ).

## रत्न ११६ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

दिवश्चिदा ते रुचयंत रोका उषो विभातीरनु भासि पूर्वीः ।
अपो यदग्न उशधग्वनेषु होतुर्मन्द्रस्य पनयन्त देवाः ॥

॥ ३-६-७ ॥

## रत्न ११७ वें

**विश्वामित्र-ऋषि, यूपदेवता, त्रिष्टुप्-छंद**

अञ्जन्ति त्वामध्वरे देवयन्तो वनस्पते मधुना दैव्येन ।
यदूर्ध्वस्तिष्ठा द्रविणेह धत्ताद्यद्वा क्षयो मातुरस्या उपस्थे ॥

॥ ३-८-१ ॥

**श्रौ. वि. यूपांजन**

## रत्न ११८ वें

**विश्वामित्र-ऋषि, यूप-देवता, अनुष्टुप्-छंद**

उच्छ्र्यस्व वनस्पते वर्ष्मन्पृथिव्या अधि ।
सुमिती मीयमानो वर्चो धा यज्ञवाहसे ॥

॥ ३-८-३ ॥

**श्रौ. वि. यूपोच्छ्रयण**

## रत्न ११९ वें

**विश्वामित्र-ऋषि, यूप-देवता, त्रिष्टुप्-छंद**

युवा सुवासाः परिवीत आगात्स उ श्रेयान्भवति जायमानः ।
तं धीरासः कवय उन्नयन्ति स्वाध्यो३ मनसा देवयन्तः ॥

॥ ३-८-४ ॥

**श्रौ. वि. यूपपरिव्ययण** **स्मा. वि. (उपनयन)**

## रत्न ११६ वें

हे अग्ने ! जेव्हां तूं अरण्यांतील लांकडें जाळूं लागतोस तेव्हां तुझ्या ज्वाला सूर्यापेक्षांहि अधिक देदीप्यमान असतात. तेजस्वी व प्राचीन अशा उषांचा उदय झाल्यावरच तुझें तेज यज्ञगृहांत प्रकाशूं लागतें. आनंददायक व देवांना बोलावणारा अशा तुझ्या तेजाचें यज्ञशालेंत ऋत्विजलोक स्तुतिस्तोत्र गाऊं लागतात ( ३–६–७ ).

## रत्न ११७ वें

हे वनस्पते ( यूपा ! ) या यज्ञसमारंभात देवप्रेमी जे अध्वर्युप्रभृति पुरोहित, ते तुला तूप माखून सुशोभित करतात. तूं उभा राहिलेला अस किंवा मातृभूत पृथ्वीच्या पृष्ठभागावर आडवा निजलेला अस, कसा असलास तरी आम्हांस येथें धनदान कर ! ( ३–८–१ ).

## रत्न ११८ वें

हे वृक्षराजा ! भूमीच्या या उत्कृष्ट स्थानावर तूं उभा रहा. तुझें आम्हीं उत्तम काळजीपूर्वक माप घेतलें आहे. तर या यज्ञनिर्वाहक यजमानाला तूं अन्न लाभेल असें कर ( ३–८–३ ).

## रत्न ११९ वें

हा पहा, हा तरुण ( यूप ) उत्तम वस्त्रानें परिवेष्टित होत्साता इकडेच येत आहे. तो सर्व वनस्पतींत अत्यंत उत्कृष्ट आहे ! अशा या यूपाला प्राज्ञ, देवभक्त, ध्याननिष्ठ व ज्ञानी असे ऋत्विज यज्ञशालेंत रोवून उंच उभा करतात (३–८–४).

## रत्न १२० वें

**विश्वामित्र-ऋषि, स्थाणु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

वन॑स्पते श॒तव॑ल्शो॒ वि रो॑ह स॒हस्र॑वल्शा॒ वि व॒यं रु॑हेम ।
यं त्वाम॒यं स्वधि॑ति॒स्तेज॑मानः प्रणि॒नाय॑ मह॒ते सौभ॑गाय ॥
॥ ३-८-११ ॥

## रत्न १२१ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद**

अ॒ग्निर्होता॑ पु॒रोहि॑तोऽध्व॒रस्य॒ विच॑र्षणिः ।
स वे॑द य॒ज्ञमा॑नु॒षक् ॥ ३-११-१ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) प्रातरनुवाक** **स्मा. वि. अग्निसूक्त**

स ह॑व्य॒वाळम॑र्त्य उ॒शिग्दू॒तश्चनो॑हितः ।
अ॒ग्निर्धि॒या सम्॑ण्वति ॥ ३-११-२ ॥
अ॒ग्निर्धि॒या स चे॑तति के॒तुर्य॒ज्ञस्य॑ पू॒र्व्यः ।
अर्थं॒ ह्य॑स्य त॒रणि॑ ॥ ३-११-३ ॥
अ॒ग्निं सू॒नुं सन॑श्रुतं॒ सह॑सो जा॒तवे॑दसम् ।
वह्निं॑ दे॒वा अ॑कृण्वत ॥ ३-११-४ ॥
अदा॑भ्यः पुरए॒ता वि॒शाम॒ग्निर्मा॑नु॒षीणा॑म् ।
तू॒र्णी॒ रथः॑ स॒दा॒ नवः॑ ॥ ३-११-५ ॥
सा॒ह्वान्विश्वा॑ अभि॒युजः॒ क्रतु॑र्दे॒वाना॒मम॑ृक्तः ।
अ॒ग्निस्तु॒विश्र॑वस्तमः ॥ ३-११-६ ॥
अ॒भि प्रयां॑सि॒ वाह॑सा दा॒श्वाँ अ॑श्नोति॒ मर्त्यः॑ ।
क्षयं॑ पाव॒कशो॑चिषः ॥ ३-११-७ ॥
प॒रि विश्वा॑नि॒ सुधि॑ता॒ऽग्नेर॑श्याम॒ मन्म॑भिः ।
विप्रा॑सो जा॒तवे॑दसः ॥ ३-११-८ ॥

## रत्न १२० वें

हे वृक्षराजा ! तुला आम्हीं जेथें तोडलें आहे, तेथून तूं पुनः शतांकुर होऊन वृद्धिंगत हो ! त्याचप्रमाणें आमचा वंशहि पुत्रपौत्रादिक परंपरेनें सहस्रांकुरांनीं अंकुरून चांगला वाढीस लागो ! ही जी तीक्ष्ण कुऱ्हाड ती तुला मोठें सौभाग्य प्राप्त करून देती झाली ( ३-८-११ ).

## रत्न १२१ वें

अग्निदेव हा देवांचा आमंत्रक असून, तो यज्ञशालेंत पूर्वदिशेस आह्वनीय रूपानें स्थापन करण्यांत आला आहे. तो यज्ञावर विशेष देखरेख करणारा असून, आमचा यज्ञ तो यथाक्रम पूर्ण जाणतो ( ३-११-१ ). देवांना अर्पण केलेला हविर्भाग त्या त्या देवाप्रत तो अचूक वाहून नेणारा आहे. तो अमर असून, हविप्रिय आहे. तो देवांचा दूत असून, हविर्लक्षण अन्न हें त्यास हितकर आहे. असा तो अग्निदेव प्रज्ञेनें संपन्न आहे ( ३-११-२ ). यज्ञाचा ध्वज असा तो सनातन अग्निदेव आपल्या बुद्धिसामर्थ्यानें सर्व कांहीं जाणतो. त्याचा जो प्रकाश आहे, तो आकाशांतील अंधःकाराचा नाश करणारा आहे (३-११-३). अग्नि हा बलपुत्र असून, तो पुराणप्रसिद्ध व जातप्रज्ञ असा आहे. हविरन्न-भक्षणेच्छु देवांनीं त्याची आपला हविर्भाग वाहून आणण्याच्या कामीं योजना केली आहे ( ३-११-४ ). हा अग्नि म्हणजे अजिंक्य आहे. तो लोकांचा पुढारी असून मनुष्यांत मोठा कर्तव्यदक्ष आहे. रथाप्रमाणें तो सदोदित नित्य नवा असाच असतो (३-११-५). शत्रूच्या सर्व सेनेचा तो आपल्या बलानें दणदणीत पराभव करणारा आहे आणि म्हणून तो रणांत अखंडित असा असतो. तो देवांचा पोषक असून, बहुविध अन्नानें सदैव संपन्न असाच असतो ( ३-११-६ ). हविर्दान करणारा यजमान हविर्वाहक अग्नीच्या प्रसादानें सर्व बाजूंनीं अन्न प्राप्त करून घेतो. आणि तसेंच त्या शोधक व तेजस्वी अग्नीपासूनच रहावयास उत्तम घर-दारहि मिळवितो (३-११-७). त्या सर्वज्ञ अग्निदेवाचें सुंदर स्तुतिस्तोत्र गाऊन आम्ही सर्व इच्छित वस्तु प्राप्त करून घेऊं ! ( ३-११-८ ).

अग्ने विश्वानि वार्या वाजेषु सनिषामहे ।
त्वे देवास एरिरे ।। ३-११-९ ।।

## रत्न १२२ वें

**विश्वामित्र-ऋषि, इन्द्राग्नी-देवता, गायत्री-छंद.**

इन्द्राग्नी आ गतं सुतं गीर्भिर्नभो वरेण्यम् ।
अस्य पातं धियेषिता ।। ३-१२-१ ।।

**आै. वि. ( अग्नि ) अच्छावाक शस्त्रयाज्या.**

इन्द्राग्नी जरितुः सचा यज्ञो जिगाति चेतनः ।
अया पातमिमं सुतम् ।। ३-१२-२ ।।
इन्द्रमग्निं कविच्छदा यज्ञस्य जूत्या वृणे ।
ता सोमस्येह तृम्पताम् ।। ३-१२-३ ।।

## रत्न १२३ वें

**उत्कील-ऋषि, अग्नि-देवता, बृहती-छंद**

मा नो अग्नेऽमतये मावीरतायै रीरधः ।
मागोतायै सहसस्पुत्र मा निदेऽप द्वेषांस्या कृधि ।।
।। ३-१६-५ ।।

## रत्न १२४ वें

**उत्कील ऋषि, अग्नि-देवता, सतोबृहती छंद**

शग्धि वाजस्य सुभग प्रजावतोऽग्ने बृहतो अध्वरे ।
सं राया भूयसा सृज मयोभुना तुविद्युम्न यशस्वता ।।
।। ३-१६-६ ।।

हे अग्ने ! सर्व देव तुझ्यात समाविष्ट होऊन राहिल्यामुळें, लढाईत आम्ही शत्रूची सर्व उत्तम संपत्ति तुझ्या कृपेनें लूट म्हणून मिळवूं असें घडो ! ( ३-११-९ ).

## रत्न १२२ वें

हे इन्द्रा ! आणि हे अग्ने ! आम्ही अत्यंत श्रेष्ठ असा हा सोमरस ग्राव्यांनीं वांटून तुम्हाप्रीत्यर्थ तयार करून ठेविला आहे. तो सोमरस पिण्यासाठीं म्हणून आम्ही तुम्हांला स्तोत्र म्हणून हांक मारीत आहों. तर तुम्ही स्वर्गातून येथें या आणि येऊन आमच्या भक्तीनें प्रसन्न होत्साते, तो मधुर रस प्राशन करा ! ( ३-१२-१ ). हे इन्द्राग्नींनो ! तुमच्या स्तोत्याचा यज्ञसाधनभूत व मनोल्हादकारी असा हा सोमरस आहे आणि तो तुम्हांकडे येत आहे. तर आमच्या स्तुतिस्तोत्रानें आळविलेले तुम्ही या आमच्या यज्ञांत येऊन त्या रसानें प्राशन करा ! ( ३-१२-२ ). यज्ञसाधनभूत अशा या सोमाच्या प्रेरणेनें प्रोत्साहित झालेला हा मी यजमान स्तोत्रगायकांचे मनोरथ पूर्ण करणारे असे जे तुम्ही त्या तुम्हांला या यज्ञांत येण्याविषयीं पाचारीत आहें. तर तुम्ही कृपा करून येथें येऊन हा सोमरस प्राशन करून संतृप्त व्हा ! ( ३-१२-३ ).

## रत्न १२३ वें

हे बलपुत्र अग्निदेवा ! तूं आम्हांस दुष्ट शत्रूच्या हवालीं करूं नकोस ! तसेंच आम्हांस संततिहीन करूं नकोस ! आणि गवाश्वादि पशुहीनहि करूं नकोस ! आम्ही निंदेस पात्र होऊं असा प्रसंग आम्हांवर आणू नकोस ! त्याबरोबरच, हे देवा ! आमच्यांतील सर्व द्वेषबुद्धीचें तूं उच्चाटण कर ! ( ३-१६-५ ).

## रत्न १२४ वें

हे भाग्यसंपन्न अग्निदेवा ! आमच्या या यज्ञांत आम्हांस विपुल संतति व अन्न प्राप्त होईल असें कर ! आणि हे बहुधनयुक्त अग्ने ! त्याबरोबरच आम्हांस सुख, यश व विपुल संपत्ति यांचाहि लाभ मिळवून दे ! ( ३-१६-६ ).

## रत्न १२५ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अग्निरस्मि जन्मना जातवेदा घृतं मे चक्षुरमृतं म आसन् ।
अर्कस्त्रिधातू रजसो विमानोऽजस्रो घर्मो हविरस्मि नाम ॥

॥ ३-२६-७ ॥

**श्रौ. वि. (अग्निचयन) अग्न्यनुशंसन. स्मा. वि. अग्निध्यान; भुक्तान्नपाचन**

## रत्न १२६ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद**

अस्तीदमधिमन्थनमस्ति प्रजननं कृतम् ।
एतां विश्पत्नीमा भराग्निं मन्थाम पूर्वथा ॥

॥ ३-२९-१ ॥

**श्रौ. वि. अग्निप्रणयन.**

## रत्न १२७ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अरण्योर्निहितो जातवेदा गर्भ इव सुधितो गर्भिणीषु ।
दिवेदिव ईड्यो जागृवद्भिर्हविष्मद्भिर्मनुष्येभिरग्निः ॥

॥ ३-२९-२ ॥

उत्तानायामव भरा चिकित्वान्त्सद्यः प्रवीता वृषणं जजान ।
अरुषस्तूपो रुशदस्य पाज इळायास्पुत्रो वयुनेऽजनिष्ट ॥

॥ ३-२९-३ ॥

## रत्न १२७ (अ) वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद**

इळायास्त्वा पदे वयं नाभा पृथिव्या अधि ।
जातवेदो नि धीमह्यग्ने हव्याय वोळ्हवे ॥ ॥ ३-२९-४ ॥

## रत्न १२५ वें

मी हा जो अग्नि, तो जन्मतःच सर्वज्ञ आहें. घृत हा माझा डोळा असून, माझ्या मुखांत अमृत आहे. प्राण, अपान व व्यान एतत्त्रयात्मक जो प्राण, तो प्राण मी आहें. त्याचप्रमाणें अंतरिक्षांत अधिष्ठित असलेला वायुहि पण मीच आणि निरंतर प्रकाशणारा द्युलोकस्थ सूर्यदेव, तोहि मीच ! किंबहुना आज्य पुरोडाशादि जें हविरन्न तें देखील मीच आहें ! (३–२६–७ ).

## रत्न १२६ वें

अहो ऋत्विजहो ! हें अग्नीसाठीं यूपशकल इथें आहे. तसेंच अरणीवर ठेवण्याचा मंथा व घुसळण्यासाठीं रज्जु इत्यादि साहित्य येथेंच आहे. आणि अग्निसाधनभूत दर्भहि येथेंच आहेत. आतां ती अरणी घेऊन या. म्हणजे पूर्वीप्रमाणें मंथन करून आपण तद्वारा अग्नि निर्माण करूं या ( ३–२९–१ ).

## रत्न १२७ वें

गर्भिणी स्त्रीच्या पोटांत जसा गर्भ सुव्यवस्थित ठेविलेला असतो तद्वत् सर्व विषयजात जाणणारा हा अग्नि अरणीमध्यें गर्भरूपानें देवांनीं स्थापन करून ठेविला आहे. हविष्मान् व जागरूक अशा आम्हां मनुष्यांच्या स्तुतिस्तोत्रास तो नित्य पात्र आहे ( ३–२९–२ ). हे ज्ञानवान अध्वर्यो ! या उताण्या अधरारणीवर ती उत्तरारणि म्हणजे वरची अरणि अधोमुख करून धर. म्हणजे ती अधरारणि लवकरच गर्भवती होऊन अभीष्टदायक अग्निदेवास जन्म देणारी होईल. त्या अग्नीचा प्रकाश तमोनाशक असून, इळेचा तो शुभ्र तेजस्वी मुलगा त्या अरणीपासून उत्पन्न होतो ( ३–२९–३ ).

## रत्न १२७ (अ) वें

हे जातप्रज्ञ अग्निदेवा ! आम्ही अध्वर्युप्रभृति ऋत्विग्जन भूमीवर मध्य-भागीं उत्तरवेदीच्या स्थानांत तुझी देवांना हवि वाहून नेण्यासाठीं म्हणून स्थापना करीत आहों ( ३–२९–४ ).

## रत्न १२८ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मन्थता नरः कविमद्वयन्तं प्रचेतसममृतं सुप्रतीकम् ।
यज्ञस्य केतुं प्रथमं पुरस्तादग्निं नरो जनयता सुशेवम् ॥

॥ ३-२९-५ ॥

**श्रौ. वि. अग्निमंथन**

## रत्न १२९ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

जातो अग्नी रोचते चेकितानो वाजी विप्रः कविशस्तः सुदानुः ।
यं देवास ईड्यं विश्वविदं हव्यवाहमदधुरध्वरेषु ॥

॥ ३-२९-७ ॥

सीद होतः स्व उ लोके चिकित्वान्त्सादया यज्ञं सुकृतस्य योनौ ।
देवावीर्देवान्हविषा यजास्यग्ने बृहद्यजमाने वयो धाः ॥

॥ ३-२९-८ ॥

**श्रौ. वि. ( उत्तरवेदींत ) अग्निस्थापन.**

## रत्न १३० वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अयं ते योनिर्ऋत्वियो यतो जातो अरोचथाः ।
तं जानन्नग्न आ सीदाथा नो वर्धया गिरः ॥

॥ ३-२९-१० ॥

**श्रौ. वि. ( अरणींत ) अग्निसमारोपण.** **स्मा. वि. अग्निसमारोप.**

## रत्न १२८ वें

अहो अध्वर्युप्रभृति ऋत्विजहो ! दूरदर्शी, निष्कपटी, पूर्णप्रज्ञ, अमर, सुंदर अशा अग्निदेवास मंथन करून उत्पन्न करा. अहो ऋत्विज हो ! यज्ञाचा प्रज्ञापक, सर्वांत प्रमुख व उत्तम सुखदाता अशा अग्नीस यज्ञानुष्ठानाच्या प्रारंभींच अरणींतून घुसळून प्रकट करा ! ( ३-२९-५ ).

## रत्न १२९ वें

अग्निदेव हा मंथनद्वारा अरणींतून उत्पन्न होतांच प्रकाशमान होतो. तो सर्व जाणणारा, सततगमनशील, कर्मकुशल, होतृजनस्तुत व दान देण्यांत मोठा उदार असा आहे. तो हें सर्व वस्तुजात जाणणारा असल्यामुळें देवांनीं त्याला यज्ञांतील आपला हविर्वाहक प्रतिनिधि म्हणून नेमला आहे. इन्द्रादि सर्व देव त्याची कीर्ति गात असतात ( ३-२९-७ ). हे होमनिष्पादक अग्निदेवा ! तूं आपल्या स्थानावर म्हणजे उत्तरवेदीच्या मध्यभागीं बैस. आणि ज्ञानी असा तूं या यज्ञकर्त्या यजमानालाहि यज्ञगृहांत उत्तम स्थानीं बसव. त्यानंतर देवांचा रक्षक असा तूं त्या त्या देवांना हविर्भाग पोंचवून त्यांना संतुष्ट कर आणि यज्ञ करणाऱ्या या यजमानाला विपुल अन्न प्रदान करून त्यासहि सुसंपन्न कर ! ( ३-२९-८ ).

## रत्न १३० वें

हे अग्निदेवा ! प्रत्येक यागकालीं उत्पन्न होण्याचें हें तुझें जन्मस्थान आहे. तेथून तूं उत्पन्न होतांच प्रकाशत आला आहेस. तूं तें जाणून तेथें आतां विराजमान हो आणि आमच्या स्तुतिस्तोत्रानें सुपुष्ट हो ! ( ३-२९-१० ).

## रत्न १३१ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद**

तनूनपादुच्यते गर्भ आसुरो नराशंसो भवति यद्विजायते ।
मातरिश्वा यदमिमीत मातरि वातस्य सर्गो अभवत्सरीमणि ॥

॥ ३-२९-११ ॥

## रत्न १३२ वें

**विश्वामित्र-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अजीजनन्नमृतं मर्त्यासोऽस्रेमाणं तरणिं वीळुजम्भम् ।
दश स्वसारो अग्रुवः समीचीः पुमांसं जातमभि सं रभन्ते ॥

॥ ३-२९-१३ ॥

यदद्य त्वा प्रयति यज्ञे अस्मिन्होतश्चिकित्वोऽवृणीमहीह ।
ध्रुवमया ध्रुवमुताशमिष्ठाः प्रजानन्विद्वाँ उप याहि सोमम् ॥

॥ ३-२९-१६ ॥

## रत्न १३३ वें

**विश्वामित्र-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

शासद्वह्निर्दुहितुर्नप्त्यं गाद्विद्वाँ ऋतस्य दीधितिं सपर्यन् ।
पिता यत्र दुहितुः सेकमृञ्जन्त्सं शग्म्येन मनसा दधन्वे ॥

॥ ३-३१-१ ॥

**श्रौ. वि. ( माध्यंदिनसवन ) अच्छावाक शस्त्र**

न जामये तान्वो रिक्थमारैक्चकार गर्भं सनितुर्निधानम् ।
यदी मातरो जनयन्त वह्निमन्यः कर्ता सुकृतोरन्य ऋन्धन् ॥

॥ ३-३१-२ ॥

## रत्न १३१ वें

जेव्हां अग्नि हा अरणीमध्यें गर्भरूपानें असतो तेव्हां त्याला तनूनपात् असें म्हणतात. जेव्हां तो प्रत्यक्ष जन्मतो, तेव्हां त्याला असुरान्तक नराशंस असें आभिधान लाभतें. जेव्हां तो अंतरिक्षांत आपलें तेज प्रकट करतो, तेव्हां तो मातरिश्वा या नांवानें ओळखला जातो. आणि एवंविध अग्नि भरधांव दौडूं लागला म्हणजे वायूची उत्पत्ति होते (३-२९-११).

## रत्न १३२ वें

मर्त्य मनुष्यांनीं अमर, अक्षय, दृढदन्त व भक्तोद्धारक अशा अग्नि-देवाला मंथनद्वारा उत्पन्न केला. त्या अग्नीला जन्मलेला पाहून बहिणी-प्रमाणें एकोप्यानें वागणाऱ्या दहा अंगुली जणूं कांहीं पुत्रच जन्मला अशा भावनेनें आनंदघोष करत्या झाल्या ( ३-२९-१३ ). हे होमसंपादका! हे यज्ञकर्मज्ञापका! हे अग्निदेवा! ज्या अर्थी आम्हीं तुला या प्रस्तुत यज्ञानुष्ठानांत वरिलें आहे त्या अर्थी तूं या यज्ञांत देवांना उद्देशून दिलेला हविर्भाग त्यांचा त्यांना अचूक नेऊन पोंचीव आणि स्वस्थपणें विश्रांति घे. त्यानंतर या आमच्या कर्मानुष्ठानाचें मर्म जाणून सोमपानार्थ सूज्ञ असा तूं आमच्याजवळ ये! ( ३-२९-१६ ).

## रत्न १३३ वें

पुत्रसंतति नसलेला बाप आपल्या मुलीचें लग्न करून देतांना तिच्या पोटीं जन्मणारा मुलगा आपल्या पिंडोदक क्रियेचा अधिकारी होईल, असा करार करतो. आणि तदाधारें तिच्या उदरीं जन्मणारा पुत्र आपला उत्तर-क्रियाकर्मादि करणारा होईल असा भरवसा धरून, तो आपल्या जामाताचा वस्त्रालंकारादिकांच्या योगानें आदरसत्कार करतो. तो जामात तिच्या ठिकाणीं गर्भाधान करील या आशेवर तो बाप पुढें सुखासमाधानानें आपली जीवनयात्रा चालवितो ( ३-३१-१ ). औरसपुत्र हा आपल्या बहिणीला दायभाग देत नाहीं. तर तिला आपल्या पतीचें गर्भाधानाचें स्थान करतो. आईबाप स्त्रीपुत्र संतति निर्माण करीत असले तरी त्यांपैकीं पुत्र हा पिंडोदक कर्मांचा अधिकारी होतो आणि कन्या ही वस्त्रालंकारादिकांनीं भूषित करून दुसऱ्यास लग्न करून दिली जाते ( ३-३१-२ ).

## रत्न १३४ वें

यज्ञो हि त इन्द्र वर्धनो भूदुत प्रियः सुतसोमो मियेधः ।
यज्ञेन यज्ञमव यज्ञियः सन्यज्ञस्ते वज्रमहिहत्य आवत् ॥

॥ ३-३२-१२ ॥

## रत्न १३५ वें

**विश्वामित्र-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

ब्रह्मणा ते ब्रह्मयुजा युनज्मि हरी सखाया सधमाद आशू ।
स्थिरं रथं सुखमिन्द्राधितिष्ठन्प्रजानन्विद्वाँ उप याहि सोमम् ॥

॥ ३-३५-४ ॥

**श्रौ. वि. (माध्यंदिनसवन) ब्राह्मणाच्छंसी शस्त्र. स्मा. वि. ब्रह्म-आवाहन**

## रत्न १३६ वें

**विश्वामित्र-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

शंसा महामिन्द्रं यस्मिन्विश्वा आ कृष्टयः सोमपाः काममव्यन् ।
यं सुक्रतुं धिषणे विभ्वतष्टं घनं वृत्राणां जनयन्त देवाः ॥

॥ ३-४९-१ ॥

**श्रौ. वि. (दशरात्र) मरुत्वतीय शस्त्र;**

## रत्न १३७ वें

**विश्वामित्र-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

जायेदस्तं मघवन्त्सेदु योनिस्तदित्त्वा युक्ता हरयो वहन्तु ।
यदा कदा च सुनवाम सोममग्निष्ट्वा दूतो धन्वात्यच्छ ॥

॥ ३-५३-४ ॥

## रत्न १३४ वें

हे इन्द्रदेवा ! हा आमचा यज्ञ तुझें संवर्धन करणारा असा झाला आणि सोमरसानें युक्त असल्यामुळें तो तुला तसाच प्रियहि झाला. ज्या अर्थी तूं यज्ञार्ह आहेस त्या अर्थी या यज्ञाच्या योगानें तूं या यज्ञकर्त्या यजमानाचें रक्षण कर. आणि हा आमचा यज्ञ वृत्रहननाच्या वेळीं तुझ्या वज्राचें रक्षण करो ! ( ३–३२–१२ ).

## रत्न १३५ वें

हे इन्द्रा ! मंत्राच्या योगानें आपोआप जोडले जाणारे व लढाईंत अत्यंत चपलगतीनें धांवणारे, असे तुझे हरी नांवाचे घोडे मी मंत्र म्हणून तुझ्या रथास जोडतों. देवा, आतां ऊठ ! ज्ञानी व सूज्ञ असा तूं आपल्या सुदृढ व सुखकारक रथावर आरूढ होऊन, सोमपानार्थ इकडे येण्याची कृपा कर ! ( ३–३५–४ ).

## रत्न १३६ वें

हे होत्या ! ज्याच्या आश्रयाखालीं सर्व मनुष्यें यज्ञगृहांत सोमपान करून आपले स्वर्गादि इष्ट मनोरथ प्राप्त करून घेतात व ज्याला समर्थ द्यावा-पृथ्वी व देव हे उत्पन्न करते झाले, अशा त्या इन्द्राचें शस्त्र म्हणून स्तवन कर. तो इन्द्र म्हणजे मोठा पराक्रम करणारा, वृत्राला मारणारा आणि विभूनें जगदाधि-पति म्हणून स्थापन केलेला असा आहे ( ३–४९–१ ).

## रत्न १३७ वें

हे मघवन् ! इन्द्रदेवा ! पत्नी म्हणजेच घर होय आणि तीच पुरुषाचें उत्पत्तिस्थान. म्हणून त्या गृहाकडेच तुला तुझ्या रथाचे घोडे घेऊन येवोत. जेव्हां जेव्हां आम्ही सोमरस तयार करूं तेव्हां तेव्हां अग्नि हा तुझ्याकडे आमचा दूत होऊन अवश्य येत राहील ( ३–५३–४ ).

रूपं रूपं मघवा बोभवीति मायाः कृण्वानस्तन्वं१ परि स्वाम् ।
त्रिर्यद्दिवः परि मुहूर्तमागात्स्वैर्मन्त्रैरनृतुपा ऋतावा ॥

॥ ३-५३-८ ॥

## रत्न १३८ वें

**विश्वामित्र-ऋषि, इंद्र-देवता, बृहती-छंद**

बलं धेहि तनूषु नो बलमिन्द्रानळुत्सु नः ।
बलं तोकाय तनयाय जीवसे त्वं हि बलदा असि ॥

॥ ३-५३-१८ ॥

## रत्न १३९ वें

**प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मो षू णो अत्र जुहुरन्त देवा मा पूर्वे अग्ने पितरः पदज्ञाः ।
पुराण्योः सद्मनोः केतुरन्तर्महद्देवानामसुरत्वमेकम् ॥

॥ ३-५५-२ ॥

वि मे पुरुत्रा पतयन्ति कामाः शम्यच्छा दीद्ये पूर्व्याणि ।
समिद्धे अग्नावृतमिद्वदेम महद्देवानामसुरत्वमेकम् ॥

॥ ३-५५-३ ॥

विष्णुर्गोपाः परमं पाति पाथः प्रिया धामान्यमृता दधानः ।
अग्निष्टा विश्वा भुवनानि वेद महद्देवानामसुरत्वमेकम् ॥

॥ ३-५५-१० ॥

निष्षिध्वरीस्त ओषधीरुतापो रयिं त इन्द्र पृथिवी बिभर्ति ।
सखायस्ते वामभाजः स्याम महद्देवानामसुरत्वमेकम् ॥

॥ ३-५५-२२ ॥

हा उदार इन्द्रदेव त्याला जीं जीं रूपें घ्यावींशीं वाटतात तीं तीं रूपें तत्काल धारण करतो. कारण, त्याच्याजवळ अनेक रूप धारण करण्याचें अलौकिक सामर्थ्य असल्यामुळें तो आपलें शरीर नानाविध रूपांचें करूं शकतो. तो स्तोत्र म्हणून बोलावितांच प्रातर्माध्यंदिनसायं-सवनांत स्वर्गांतून चटदिशीं धावून येतो. केवळ तो योग्य वेळींच सोम पितो असें नसून, अवेळीसुद्धां तो सोमपान करूं शकतो ( ३–५१–८ ).

## रत्न १३८ वें

हे इन्द्रदेवा ! तूं आम्हांला व आमच्या बैलांना सामर्थ्यसंपन्न कर ! तसेंच आमच्या पुत्रपौत्रांनाहि चिरंजीवनार्थ आयुर्बल दे ! कारण तूं बलदाता आहेस ( ३–५३–१८ ).

## रत्न १३९ वें

हे अग्ने ! स्वर्गांतील देव झाले काय किंवा पुण्याचरण करून देवपद प्राप्त करून घेतलेले आमचे प्राचीन पितर झाले काय, आम्हांस इजा न करोत ! त्याचप्रमाणें प्राचीन अशा स्वर्ग व पृथ्वी यांमध्यें प्रकाशणारा सूर्यदेवहि आम्हांस इजा न करो ! कारण देवांचें सामर्थ्य म्हणजे मोठें अद्भुत आहे ! ( ३–५५–२ ). माझ्या विविध कामना विविध दिशांकडे सारख्या धाव घेत आहेत. अग्निष्टोमादि यज्ञकर्मांत हजर राहून मी पुरातन अशीं स्तोत्रें प्रकाशांत आणीत आहें. जेव्हां अग्निनारायण प्रदीप्त होईल तेव्हां आम्ही वाणीनें सत्य तेंच बोलूं. कारण देवांचें माहात्म्य फार मोठें आहे ! ( ३–५५–३ ). त्रैलोक्य व्यापून असणारा, सर्वांचें रक्षण करणारा, आणि लोकधारक अशा उदकांना धारण करणारा हा अग्निदेव उदकांचें स्थान जें अंतरिक्ष, त्या अंतरिक्ष लोकांचें रक्षण करतो. तो अग्निदेवच हें सर्व भूतजात पूर्ण ओळखून आहे. कारण देवांचें माहात्म्य हें फार मोठें आहे ! ( ३–५५–१० ). हे इन्द्रदेवा ! ओषधि तुझ्या माहात्म्यामुळेंच फलसंपन्न होतात. आणि तुझ्यापासूनच उदक वाहूं लागतें. व पृथ्वी तुझ्या भोगासाठींच ऐश्वर्य धारण करते. आम्ही–जे तुझे स्तुतिपाठक मित्र–ते त्या तुझ्या सर्वोत्तम संपत्तीचे वांटेकरी होऊं असें घडो ! कारण देवांचा महिमा मोठा अद्भुत आहे ! ( ३–५–२२ ).

## रत्न १४० वें

**विश्वमित्र-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

त्रिरुत्तमा दूणशा रोचनानि त्रयो राजन्त्यसुरस्य वीराः ।
ऋतावान इषिरा दूळभासस्त्रिरा दिवो विदथे सन्तु देवाः ॥
॥ ३-५६-८ ॥

## रत्न १४१ वें

**विश्वामित्र-ऋषि, मित्र-देवता, गायत्री-छंद**

मित्रस्य चर्षणीधृतोऽवो देवस्य सानसि ।
द्युम्नं चित्रश्रवस्तमम् ॥ ३-५९-६ ॥

**श्रौ. वि. मैत्रावरुणशस्त्र**

अभि यो महिना दिवं मित्रो बभूव सप्रथाः ।
अभि श्रवोभिः पृथिवीम् ॥ ॥ ३-५९-७ ॥
मित्राय पञ्च येमिरे जना अभिष्टिशवसे ।
स देवान्विश्वान्बिभर्ति ॥ ॥३-५९-८ ॥

**श्रौ. वि. ( प्रातर्होम ), अनुवाक्या.**

मित्रो देवेष्वायुषु जनाय वृक्तबर्हिषे ।
इषे इष्टव्रता अकः ॥ ॥ ३-५९-९ ॥

## रत्न १४२ वें

**विश्वामित्र-ऋषि, सविता-देवता, गायत्री-छंद**

तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात् ॥ ३-६२-१० ॥

**श्रौ. वि. (दशरात्र) वैश्वदेव शस्त्र;**

**स्मा. वि. प्राणायाम; गायत्री जप; अर्घ्यदान, मार्जन, आज्य होम. इत्यादि.**

देवस्य सवितुर्वयं वाजयन्तः पुरंध्या ।
भगस्य रातिमीमहे ॥ ॥ ३-६२-११ ॥

## रत्न १४० वें

कोणाकाहि नाश करता येणार नाहीं असे भगवंताचे अत्यंत तेजस्वी व परम श्रेष्ठ असे तीन लोक असून, तेथें सर्वसमर्थ अशा संवत्सर कालात्म्याचे अग्नि, वायु व सूर्य असे तीन पुत्र प्रकाशत असतात. सत्यवान्, शीघ्रगामी व दुर्दमनीय असे हे तीन देव आमच्या यज्ञामध्यें तीनहि सवनांत उपस्थित होवोत ! ( ३-५६-८ ).

## रत्न १४१ वें

मनुष्यांना धारण करणाऱ्या मित्र देवाचें अन्न व श्रेष्ठ कीर्तियुक्त धन हें सर्वांनीं मिळवावें असेंच आहे ( ३-५९-६ ). तो मित्र देवच आपल्या महिम्यानें अंतरिक्षाचा अध्यक्ष झाला आहे. आणि त्याचप्रमाणें अन्न देऊन पृथ्वीचाहि अध्यक्ष बनला आहे ( ३-५९-७ ). पंचजन हे अशा त्या शत्रुंजय मित्र देवाला हवि अर्पण करून त्याचें पूजन करतात. कारण तो देव सर्व देवांचा रक्षक आहे ( ३-५९-८ ). भगवान् आदित्य देव हा तेजस्वी जनांमध्यें जो देवांना हविर्भाग अर्पण करतो अशा त्या ऋत्विग्जनाला इष्ट कार्य सिद्धीस नेणारीं अशीं अन्नें प्रदान करतो ( ३-५९-९ ).

## रत्न १४२ वें

जो आम्हांस सत्कर्माच्या ठायीं प्रेरणा करतो अशा त्या सवितृ-देवाच्या सर्वश्रेष्ठ तेजाचें आम्ही ध्यान करतों ( ३-६२-१० ). अन्नाची इच्छा करणारे आम्ही त्या तेजस्वी सवितृ-देवापाशीं त्याची स्तुति करून आम्हांस धनदान करण्याविषयीं सद्भावपूर्वक प्रार्थना करीत आहों ( ३-६२-११ ).

## रत्न १४३ वें

**विश्वामित्र-ऋषि, मित्रावरुण-देवता, गायत्री-छंद.**

गृणाना जमदग्निना योनावृतस्य सीदतम् ।
पातं सोममृतावृधा ॥ ॥ ३-६२-१८ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) मैत्रावरुण ग्रहयाज्या.**

( तिसरें मंडल समाप्त )

## रत्न १४३ वें

हे मित्रावरुण देवांनो ! या जमदग्नीच्या स्तोत्रानें प्रसन्न होऊन या पवित्र यज्ञस्थानावर विराजमान व्हा. आणि यज्ञफलाचें वर्धन करणारे देवहो ! मीं अर्पण केलेल्या या सोमरसाचा आस्वाद घ्या !
( ३-६२-१८ ).

### तिसरें मंडल समाप्त

---



# मंडल चौथें

## रत्न १४४ वें

वामदेव-ऋषि, अग्नि-देवता, अष्टि-छंद

त्वां ह्यग्ने सदमित्समन्यवो देवासो देवमरतिं न्येरिर इति क्रत्वा न्येरिरे। अमर्त्यं यजत मर्त्येष्वा देवमादेवं जनत प्रचेतसं विश्वमादेवं जनत प्रचेतसम्॥ ४-१-१ ॥

श्री. वि. मंडलादि होर.

## रत्न १४५ वें

वामदेव-ऋषि, अग्नि-देवता, अतिजगती-छंद

स भ्रातरं वरुणमग्न आ ववृत्स्व देवाँ अच्छा सुमती यज्ञवनसं ज्येष्ठं यज्ञवनसम्। ऋतावानमादित्यं चर्षणीधृतं राजानं चर्षणीधृतम्॥

॥ ४-१-२ ॥

## ( मराठी भावार्थ )

### रत्न १४४ वें

हे अग्निदेवा ! आपल्या शत्रूंशीं स्पर्धा करणारे इन्द्रादि देव तेजस्वी व अत्यंत चपल अशा तुला सदैव युद्धासाठीं प्रेरणा करीत असतात. तद्वत् तुझे भक्त हे यजमानहि तुझें स्तुतिस्तोत्र गाऊन या यज्ञांत देवांना घेऊन येण्यासाठीं तुला प्रेरित आहेत. हे पूज्य अग्ने ! अमर, सर्व बाजूंनीं प्रकाशणारा, ज्ञानी, कर्मज्ञ, अशा मनुष्यांत जाणाऱ्या तुला देवांनीं हविरन्न तयार करण्यासाठीं म्हणून उत्पन्न केला. (४-१-१).

### रत्न १४५ वें

हे अग्ने ! अशा प्रकारचा जो तूं तो तूं यज्ञेच्छु, अत्यंत प्रशस्त, सत्यवन्त, मनुष्यपोषक, अशा अदितिपुत्र वरुण राजाला यज्ञांत स्तुतिपाठकांच्या समोर आणून बसव. (४-१-२).

## रत्न १४६ वें

**वामदेव-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

त्वं नो अग्ने वरुणस्य विद्वान्देवस्य हेळोऽव यासिसीष्ठाः ।
यजिष्ठो वन्हितमः शोशुचानो विश्वा द्वेषांसि प्र मुमुग्ध्यस्मत् ॥

॥ ४-१-४ ॥

**श्रौ. वि. प्रातरनुवाक, अवभृथेष्टि; अग्निवारुणीष्टि-याज्यानुवाक्या**
**स्मा. वि. अग्नि-नमस्कार; यजमान-अभिषेक; मार्जन; आज्यहोम.**

स त्वं नो अग्नेऽवमो भवोती नेदिष्ठो अस्या उषसो व्युष्टौ ।
अव यक्ष्व नो वरुणं रराणो वीहि मृळीकं सुहवो न एधि ॥

॥ ४-१-५ ॥

## रत्न १४७ वें

**वामदेव-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

रक्षा णो अग्ने तव रक्षणेभी रारक्षाणः सुमख प्रीणानः ।
प्रति ष्फुर वि रुज वीड्वंहो जहि रक्षो महि चिद्वावृधानम् ॥

॥ ४-३-१४ ॥

**श्रौ. वि. ( अग्निष्टोम ) प्रातरनुवाक.**

## रत्न १४८ वें

**वामदेव-ऋषि, रक्षोहा अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

कृणुष्व पाजः प्रसितिं न पृथ्वीं याहि राजेवामवाँ इभेन ।
तृष्वीमनु प्रसितिं द्रूणानोऽस्तासि विध्य रक्षसस्तपिष्ठैः ॥

॥ ४-४-१ ॥

**श्रौ. वि. ( अग्निष्टोम ) प्रातरनुवाक; स्मा. वि. रक्षोघ्नसूक्त, शांतिपाठ.**

## रत्न १४६ वें

हे अग्निदेवा ! सर्व पुरुषार्थांचे साधनोपाय जाणणारा असा तूं आम्हां-विषयक वरुण देवाचा राग नाहींसा कर ! हे देवा ! तूं अत्यंत पूजनीय आहेस. तसाच तूं देवांचा हविर्वाहक आहेस. आणि त्याचप्रमाणें अत्यंत तेजःपुंजहि आहेस. अतएव जे आमचा द्वेष करणारे आहेत त्या सर्वांचा तूं पार फडशा पाड ! ( ४–१–४ ). हे अग्ने ! आपल्या संरक्षण–शक्ती-निशी आमचा रक्षक होऊन, प्रातःसमयीं यज्ञकर्मसिध्यर्थ तूं आमच्याजवळ रहा. आणि वरुणकृत आमचा जलोदरादि रोग नाहींसा कर ! यजमानाला अभीष्टफल देणारा तूं सुखकारक असें हें हविरन्न भक्षण कर आणि आमच्या हांकेसरशीं सहज धांवून येणारा असा हो ! ( ४–१–५ ).

## रत्न १४७ वें

हे सुयज्ञ अग्निदेवा ! तुझें आम्हीं रक्षण केलें आहे आणि हवि अर्पण करून तुला प्रसन्नहि केला आहे. तर हे देवा ! तूं आतां आपल्या संरक्षण-शक्तीनिशी आमचें पालन कर ! आमच्यासाठीं प्रकाश पाड ! आमच्या महापातकांचा नाश कर ! आणि शिरजोर होऊन आम्हांस छळणाऱ्या राक्षसादिकांचा पार फन्ना उडवून दे ! ( ४–३–१४ ).

## रत्न १४८ वें

हे अग्ने ! पारधी जसा पक्ष्यांना पकडण्यासाठीं आपलें विस्तीर्ण जाळें पसरतो, तद्वत् तूंहि आपल्या ज्वालारूप शक्तीचा प्रसार कर ! सैन्य बरोबर घेऊन हत्तीवर बसून शत्रूवर चाल करून जाणाऱ्या राजाप्रमाणें तूंहि शत्रूवर चाल करून जा ! वायुगतीनें पलायन करणाऱ्या शत्रुसेनेचा पाठलाग करून त्यांची तूं दाणादाण कर आणि आपल्या तप्त आयुधांनीं राक्षसांना चांगला चोप दे ! ( ( ४–४–१ ).

तव भ्रमास आशुया पतन्त्यनु स्पृश धृषता शोशुचानः ।
तपूंष्यग्ने जुह्वा पतङ्गानसंदितो वि सृज विष्वगुल्काः ।।

|| ४-४-२ ||

प्रति स्पशो वि सृज तूर्णितमो भवा पायुर्विशो अस्या अदब्धः ।
यो नो दूरे अघशंसो यो अन्त्यग्ने माकिष्टे व्यथिरा दधर्षीत् ।।

|| ४-४-३ ||

उदग्ने तिष्ठ प्रत्या तनुष्व न्य१मित्राँ ओषतात्तिग्महेते ।
यो नो अरातिं समिधान चक्रे नीचा तं धक्ष्यतसं न शुष्कम् ।।

|| ४-४-४ ||

ऊर्ध्वो भव प्रति विध्याध्यस्मदाविष्कृणुष्व दैव्यान्यग्ने ।
अव स्थिरा तनुहि यातुजूनां जामिमजामिं प्र मृणीहि शत्रून् ।।

|| ४-४-५ ||

## रत्न १४९ वें

**वामदेव-ऋषि, वैश्वानर अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अभ्रातरो न योषणो व्यन्तः पतिरिपो न जनयो दुरेवाः ।
पापासः सन्तो अनृता असत्या इदं पदमजनता गभीरम् ।।

|| ४-५-५ ||

## रत्न १५० वें

**वामदेव-ऋषि, आत्मा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अहं मनुरभवं सूर्यश्चाहं कक्षीवाँ ऋषिरस्मि विप्रः ।
अहं कुत्समार्जुनेयं न्यृञ्जेऽहं कविरुशना पश्यता मा ।।

|| ४-२६-१ ||

• हे अग्ने! तुझे भ्रमण करणारे असे ते शीघ्रगामी ज्वालासमूह सर्व बाजूंनीं फोफावणारे आहेत. तर अत्यंत प्रकाशमान असा तूं आपल्या प्रचंड तेजोराशीनें शत्रूंना एकामागून एक असे भाजून होरपळून काढ! हे अग्ने! शत्रूंमध्यें तूं अनिरुद्ध आहेस. अतएव आपले प्रखर ज्वालासमूह, ठिणग्या व उल्का यांचा सर्व बाजूंनीं वर्षाव करून राक्षसपिशाचादि शत्रूंची दाणादाण कर! (४–४–२). हे अग्ने! शीघ्र गतिमान् असा तूं आपले तापदायक ज्वालासमूह शत्रूवर सोड! अहिंसित असा तूं या आम्हां प्रजेचा पालक हो! जो आमचा निंदक आहे–मग तो जवळ असो वा दूर असो–त्यापासून आमचें रक्षण कर! तुझे भक्त जे आम्ही त्या आम्हांवर तुटून पडण्याचें धारिष्ट आमचा शत्रु न करो! (४-४-३). हे अग्ने! राक्षसास मारण्यासाठीं उठून उभा रहा! शत्रूवर तुझ्या प्रखर ज्वालासंघाचा भडिमार कर! हे तीक्ष्ण ज्वालायुक्त अग्निदेवा! त्या तुझ्या तीक्ष्ण ज्वालासंघानें शत्रूंना पार होरपळून काढ! त्याचप्रमाणें हे देदीप्यमान अग्नि देवा! ज्याप्रमाणें वठलेल्या वृक्षास तूं जाळून खाक करून टाकतोस त्याप्रमाणें जो आमच्याशीं शत्रुत्व करतो त्याला जमिनीवर लोळवून पार त्याची राखरांगोळी कर! (४–४–४). हे अग्ने! शत्रूला मारण्यासाठीं सज्ज हो! आमच्यावर टपून बसलेल्या शत्रूंना सपाटून चोप दे! यज्ञयागादि देवसंबंधीं कर्मानुष्ठानाला प्रकट कर! राक्षसादिकांचीं सज्ज धनुष्यें त्यांची दोरी सोडून शिथिल कर! आणि ताडण केलेल्या व न केलेल्या शत्रूंना पुनः पुनः ताडण कर! (४–४–५).

### रत्न १४९ वें

भ्रात्रादि बंधुरहित स्त्रीप्रमाणें जे आडमार्गानें जाणारे आहेत व पतीचा द्वेष करणाऱ्या स्त्रीप्रमाणें जे दुराचरणी आहेत अशा पापी, विचारभ्रष्ट व वाचाभ्रष्ट दुर्जनांनीं हें अगाध नरक स्थान उत्पन्न केलें आहे! (४–५–५).

### रत्न १५० वें

हें सर्व जाणणारा जो प्रजापति तो म्हणजे मी वामदेवच आहें! सर्वांना प्रेरणा करणारा सूर्यहि मीच! महाज्ञानी असा कक्षीवान ऋषिहि मीच! अर्जुनीचा पुत्र कुत्स ऋषि तोहि मीच! आणि त्रिकालज्ञ उशना ऋषि झाला तरी तो मीच आहें! हे जनहो, सर्वात्मक अशा मला पहा. (४–२६–१).

**श्रौ. वि. ( श्येन एकाह ) मरुत्वतीय शस्त्र. स्मा. वि. आत्मज्ञान;**

अहं भूमिमददामार्यायाहं वृष्टिं दाशुषे मर्त्याय ।
अहमपो अनयं वावशाना मम देवासो अनु केतमायन् ॥
॥ ४-२६-२ ॥

अहं पुरो मन्दसानो व्यैरं नव साकं नवतीः शम्बरस्य ।
शततमं वेश्यं सर्वताता दिवोदासमतिथिग्वं यदावम् ॥
॥ ४-२६-३ ॥

## रत्न १५१ वें

**वामदेव-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

गर्भे नु सन्नन्वेषामवेदमहं देवानां जनिमानि विश्वा ।
शतं मा पुर आयसीररक्षन्नध श्येनो जवसा निरदीयम् ॥
॥ ४-२७-१ ॥

**श्रौ. वि. ( श्येन एकाह ) निष्केवल्यशस्त्र. स्मा. वि. आत्मज्ञान.**

न घा स मामप जोषं जभाराऽभीमास त्वक्षसा वीर्येण ।
ईर्मा पुरन्धिरजहादरातीरुत वाताँ अतरच्छूशुवानः ॥
॥ ४-२७-२ ॥

अव यच्छ्येनो अस्वनीदध द्योर्वि यद्यदि वात ऊहुः पुरंधिम् ।
सृजद्यदस्मा अव ह क्षिपज्ज्यां कृशानुरस्ता मनसा भुरण्यन् ॥
॥ ४-२७-३ ॥

ऋजिप्य ईमिन्द्रावतो न भुज्युं श्येनो जभार बृहतो अधि ष्णोः ।
अन्तः पन्तत्पतत्र्यस्य पर्णमध यामनि प्रसितस्य तद्वेः ॥
॥ ४-२७-४ ॥

मीं होऊनच ही पृथ्वी आर्याला बक्षीस दिली. यजनशील उदार देवभक्तासाठीं मीच आकाशांतून वृष्टि पाडीत आहें! धो धो शब्द करीत वाहणाऱ्या उदकांना म्हणजे नद्यांना पृथ्वीवर मींच वाट करून दिली आहे. अग्नि प्रभृति देव झाले तरी माझ्याच इच्छेप्रमाणें वागत आहेत! ( ४–२६–२ ). तो मी वामदेवच इन्द्ररूप धारण करून सोमपानानें उत्साहभरित होत्साता, शंबरासुराचीं नव्याण्णव नगरें फोडून पार उध्वस्त करून टाकिलीं! पण शंभरावें नगर मात्र दिवोदासासाठीं सुरक्षित राखून ठेविलें. त्या वेळीं यज्ञामध्यें अतिथिग्व दिवोदास राजर्षीचें मींच रक्षण केलें. ( ४–२६–३ ).

## रत्न १५१ वें

( पुनः सांगतों कीं ) मी वामदेव गर्भात असतांनाच या इन्द्रादि देवांचे सर्व जन्म यथापूर्व जाणले आहेत. याच्यापूर्वी अनेक लोहमय अभेद्य शरीरें माझें रक्षण करतीं झालीं. आतां मी श्येनाप्रमाणें वेगानें शरीरांतून बाहेर आलों आहें. ( ४–२७–१ ). माझी गर्भावस्था मला मोहवश करूं शकली नाहीं. पण मीं हें गर्भस्थ दुःख मात्र ज्ञानसामर्थ्यानें पराभूत केलें. सर्वांचा प्रेरक व शरीराचा धारक असा तो परमात्मा गर्भस्थ शत्रूंचा त्याग करून, परिपूर्ण होत्साता, गर्भात क्लेश देणाऱ्या वायूंना तरून पार जाता झाला. ( ४–२७–२ ). जेव्हां सोमहरण–कालीं त्या श्येन पक्ष्यानें स्वर्गातून खाली उतरत असतांना आनंदघोष केला, आणि जेव्हां त्या सोमरक्षकांनीं त्याला सोम घेऊन जातांना पाहिलें, तेव्हां त्यांच्यापैकीं कृशानु नांवाचा सोमपाल मनोवेगानें त्याचा पाठलाग करून धनुष्यावर दोरी चढवून त्या पक्ष्यावर बाण मारता झाला ( ४–२७–३ ). ज्याप्रमाणें अश्विनी इन्द्ररक्षक प्रदेशांतून भुज्यूला सुरक्षित घेऊन आले त्याप्रमाणें तो सरळ उडणारा श्येन त्या मोठ्या स्वर्गलोकावर असणाऱ्या त्या सोमाला तेथून सरळ पृथ्वीवर घेऊन आला. मात्र त्या वेळीं त्या कृशानूच्या चकमकींत बाण लागून त्या धांवणाऱ्या पक्ष्याच्या पंखांतील एक पीस मात्र तुटून खालीं पडलें. ( ४–२७–४ ).

## रत्न १५२ वें

**वामदेव-ऋषि, इन्द्र-देवता, शक्वरी-छंद**

अध श्वेतं कलशं गोभिरक्तमापिप्यानं मघवा शुक्रमन्धः ।
अध्वर्युभिः प्रयतं मध्वो अग्रमिन्द्रो मदाय प्रति धत्पिबध्यै शूरो
मदाय प्रति धत्पिबध्यै ॥ ४-२७-५ ॥

## रत्न १५३ वें

**वामदेव-ऋषि, इन्द्र-देवता, गायत्री-छंद**

कया नश्चित्र आ भुवदूती सदावृधः सखा ।
कया शचिष्ठया वृता ॥ ४-३१-१ ॥

**श्रौ. वि. (अग्निष्टोम) स्तोत्रिया (वरुणप्रघास) अनुवाक्या**

**स्मा. वि. शांतिपाठ; राहु-आवाहन.**

कस्त्वा सत्यो मदानां मंहिष्ठो मत्सदन्धसः ।
दृळहा चिदारुजे वसु ॥ ४-३१-२ ॥
अभी षु णः सखीनामविता जरितॄणाम् ।
शतं भवास्यूतिभिः ॥ ४-३१-३ ॥

## रत्न १५४ वें

**वामदेव-ऋषि, ऋभु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

यदारमक्रन्नृभवः पितृभ्यां परिविष्टी वेषणा दंसनाभिः ।
आदिद्देवानामुप सख्यमायन्धीरासः पुष्टिमवहन्मनायै ॥
॥ ४-३३-२ ॥

**श्रौ. वि. (दशरात्र) वैश्वदेवशस्त्र,**

**स्मा. वि. ऋभुसूक्त**

पुनर्ये चक्रुः पितरा युवाना सना यूपेव जरणा शयाना ।
वाजो विभ्वाँ ऋभुरिन्द्रवन्तो मधुप्सरसो नोऽवन्तु यज्ञम् ।
॥ ४-३३-३ ॥

## रत्न १५२ वें

तर आतां शूर असा हा उदार इन्द्र देव दुग्धमिश्रित, पौष्टिक व माधुर्ययुक्त असा हा शुभ्र कलशांतील सोमरस, कीं जो अध्वर्यूनीं भक्तिभावपूर्वक अर्पण केला आहे, त्याचा, पान करण्यासाठीं म्हणून, स्वीकार करो! (४-२७-५).

## रत्न १५३ वें

सतत वर्धनशील, पूजनीय, मित्रभूत असा इन्द्र देव अशा कोणत्या तर्पणानें आमच्याजवळ राहणारा असा होईल? अशा कोणत्या श्रेष्ठ यागकर्मानें तो आमच्याजवळ राहील? (४-३१-१). हे इन्द्र देवा! मादक पेयांमध्यें असा कोणता पूज्य सोमरस तुला खात्रीनें मदोन्मत्त करूं शकेल, कीं ज्याच्या योगानें शत्रूचें कठीण धन फोडून चूरचूर करण्याचा तुला आवेश येईल (४-३१-२). हे इन्द्रा! तूं मित्रांचा आणि तसाच तुझें स्तोत्र गाणाऱ्या भक्तजनांचा कैवारी आहेस. तर हे देवा! तूं आपल्या संरक्षक साधनांनिशीं आमच्याजवळ रहा! (४-३१-३).

## रत्न १५४ वें

जेव्हां ऋभूंनीं आपल्या जरठ मातापितरांची परिचर्या करून, त्या म्हाताऱ्यांना तरुण करून आणि चमसनिर्माणादि कौशल्यपूर्ण इतर कलाकृति निर्माण करून पूर्ण कृतार्थता मिळविली, तेव्हांच ते इन्द्रादि देवांचें सख्यत्व प्राप्त करून घेते झाले. आणि त्या ज्ञानी ऋभूंनीं यजमानासाठीं म्हणून गवादि पुष्टि धारण केली (४-३३-२). जे जुन्या खांबाप्रमाणें निश्चेष्ट पडून राहिलेल्या आपल्या वृद्ध आईबापांना पुनः सदैव तरुण करते झाले, ते इन्द्रासमवेत असणारे व मधुर सोमरस प्राशन करणारे वाज, विभ्वा व ऋभु असे बंधुत्रय या आमच्या यज्ञाचें रक्षण करोत! (४-३३-३).

सत्यमूचुर्नर एवा हि चक्रुरनु स्वधामृभवो जग्मुरेताम् ।
विभ्राजमानांश्चमसाँ अहेवावेनत्त्वष्टा चतुरो ददृश्वान् ॥

॥ ४-३३-६ ॥

## रत्न १५५ वें

**वामदेव-ऋषि, ऋभु-देवता, त्रैष्टुप्-छंद.**

नापाभूत न वोऽतीतृषामानिःशस्ता ऋभवो यज्ञे अस्मिन् ।
समिन्द्रेण मदथ सं मरुद्भिः सं राजभी रत्न-धेयाय देवाः ॥

॥ ४-३४-११ ॥

## रत्न १५६ वें

वामदेव-ऋषि, ऋभु-देवता, त्रिष्टुप्-छंद.

इह प्रजामिह रयिं रराणा इह श्रवो वीरवत्तक्षता नः ।
येन वयं चितयेमात्यन्यान्तं वाजं चित्रमृभवो ददा नः ॥

॥ ४-३६-९ ॥

**श्रौ. वि. ( आभिप्लविक ) वैश्वदेवशस्त्र; स्मा. वि. ऋभुसूक्त.**

## रत्न १५७ वें

**वामदेव-ऋषि, दधिक्रा-देवता, अनुष्टुप्-छंद.**

दधिक्राव्णो अकारिषं जिष्णोरश्वस्य वाजिनः ।
सुरभि नो मुखा करत्प्र ण आयूंषि तारिषत् ॥

॥ ४-३९-६ ॥

**श्रौ. वि. ( पवित्रेष्टि) पुरोनुवाक्या; स्मा. वि. दधिस्नान, दधिभक्षण;**

ऋभु हे मनुष्यच खरे पण ते सत्य बोलले. कारण जसें ते बोलले तसेंच त्यांनीं करून दाखविलें. आणि मग त्यांना तृतीय सवनांतील मधुर सोम-रसाचा भाग प्राप्त झाला. त्वष्टयाला ते त्यांनीं केलेले सूर्याप्रमाणें चमकणारे चार चमस पाहून परम समाधान झालें. ( ४–३३–६ ).

## रत्न १५५ वें

हे ऋभु देव हो ! तुम्ही निराश होऊन परत जाऊं नका. आम्ही तुम्हांस फार वेळ तृषाक्रांत ठेवणार नाहीं. हे अनिंद्य ऋभू हो ! या आमच्या यज्ञांत इन्द्र, मरुत् व इतर देव यांबरोबरच सोमपान करून तृप्त व्हा. हेतु हा कीं, सोमपान करून तृप्त झाल्यावर तुम्हीं रमणीय धन आमच्या पदरांत टाकावें. ( ४–३४–११ ).

## रत्न १५६ वें

हे ऋभू हो ! या आमच्या यज्ञांत प्रसन्न झालेले तुम्ही प्रजा, धन, व भृत्यादि परिवारसहित सत्कीर्तिहि आम्हांस द्या ! त्याचप्रमाणें आम्हीं दुसऱ्यावर ताण करूं, असें अन्नसामर्थ्यहि आम्हांस बहाल करा ! ( ४–३६–९ ).

## रत्न १५७ वें

जयशील, व्यापक व वेगवान् अशा दधिक्रावा देवाची स्तुति आम्हीं केली आहे. तर तो देव आमचीं मुखादि इन्द्रियें सुगंधयुक्त करो ! आणि आमचें आयुष्य दीर्घकाल वाढवो ! ( ४–३९–६ ).

## रत्न १५८ वें

**वामदेव-ऋषि, सूर्य-देवता, जगती-छंद**

हंसः शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ।
नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतम् ॥

॥ ४-४०-५ ॥

**श्रौ. वि. (दशरात्र) मैत्रावरुणशस्त्र;** **स्मा. वि. सौरजप; अर्घ्यदान; ब्रह्मयज्ञ; सूर्योपस्थान**

## रत्न १५९ वें

**त्रसदस्यु-ऋषि, आत्मा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मम द्विता राष्ट्रं क्षत्रियस्य विश्वायोर्विश्वे अमृता यथा नः ।
क्रतुं सचन्ते वरुणस्य देवा राजामि कृष्टेरुपमस्य वव्रेः ॥

॥ ४-४२-१ ॥

**श्रौ. वि. (अभिप्लविक) मैत्रावरुणशस्त्र.** **स्मा. वि. आत्मज्ञान.**

अहं राजा वरुणो मह्यं तान्यसुर्याणि प्रथमा धारयन्त ।
क्रतुं सचन्ते वरुणस्य देवा राजामि कृष्टेरुपमस्य वव्रेः ॥

॥ ४-४२-२ ॥

अहमिन्द्रो वरुणस्ते महित्वोर्वी गभीरे रजसी सुमेके ।
त्वष्टेव विश्वा भुवनानि विद्वान्त्समैरयं रोदसी धारयं च ॥

॥ ४-४२-३ ॥

अहमपो अपिन्वमुक्षमाणा धारयं दिवं सदन ऋतस्य ।
ऋतेन पुत्रो अदितेर्ऋतावोत त्रिधातु प्रथयद्वि भूम ॥

॥ ४-४२-४ ॥

## रत्न १५८ वें

तो आदित्यप्रकाशांत राहणारा सूर्यरूपी हंस आहे. तोच अंतरिक्षांत राहणारा वायुरूप वसु आहे. तोच वेदीमध्यें राहून देवांना बोलावणारा अग्नि आहे. गार्हपत्य रूपानें गृहांत राहणारा तोच पूज्य अतिथि आहे. तसाच तोच चैतन्यरूपानें मनुष्याच्या अंतःकरणांत आणि आदित्यरूपानें श्रेष्ठ सूर्यमंडळांत राहणारा आहे. इतकेंच काय, तो यज्ञांत राहतो, आकाशांत राहतो, उदकांत जन्मतो, किरणांत जन्मतो, सत्यांत जन्मतो, उदयाचलावर जन्मतो. अर्थात् तो आदित्यच सर्वाधिष्ठानभूत परब्रह्म आहे! (४–४०–५).

## रत्न १५९ वें

क्षत्रियकुलोत्पन्न व सर्व मानवाधीश असा जो मी विश्वात्मा त्या माझें पृथ्वी व स्वर्ग असें द्विविध राष्ट्र आहे. आणि म्हणून ज्याप्रमाणें सर्व देव हे माझेच आहेत, त्याप्रमाणें ही सर्व प्रजाहि माझीच आहे. देव मला वरुणाच्या व्रतार्शी संयुक्त करतात. जवळ असलेल्या सर्व रूपवान् मनुष्यांवर मी राज्य चालवितों (४–४२–१). मी जो त्रसदस्यु तोच राजा वरुण आहें. माझ्यासाठींच देव हे असुरविध्वंसक असें बळ धारण करतात. देव वरुणाच्या इच्छेप्रमाणें चालतात. मी सर्व लोकांचा व वस्तुमात्राचा राजा आहें (४–४२–२). मी जो त्रसदस्यु तोच इन्द्रहि आहें आणि वरुणहि आहें. महिम्यानें विस्तीर्ण, अगाध व सुंदर अशी ती द्यावापृथ्वीहि मीच आहें. मी ज्ञानी असून प्रजापतीप्रमाणें सर्व भूतमात्राला प्रेरणा मीच करतों आणि द्यावापृथ्वींना सांवरून धरणाराहि पण मीच होय! (४-४२-३). ओलावा करणाऱ्या उदकांचा वर्षाव सर्वत्र मीच करीत असतों. उदकांचें निवासस्थान असें जें आकाश, त्या आकाशाला मीच धारण करतों. उदकाच्या निमित्तानें अदितीचा पुत्र म्हणून उदक धारण करणाराहि मीच झालों आहें. आणि आकाशाचा त्रिविधरूपानें मींच विस्तार केला आहे! (४–४२–४).

मां नरः स्वश्वा वाजयन्तो मां वृताः समरणे हवन्ते ।
कृणोम्याजिं मघवाहमिन्द्र इयर्मि रेणुमभिभूत्योजाः ॥

॥ ४-४२-५ ॥

अहं ता विश्वा चकरं नकिर्मा दैव्यं सहो वरते अप्रतीतम् ।
यन्मा सोमासो ममदन्यदुक्थोभे भयेते रजसी अपारे ॥

॥ ४-४२-६ ॥

## रत्न १६० वें

**वामदेव-ऋषि, बृहस्पति-देवता, त्रिष्टुप्-छंद**

एवा पित्रे विश्वदेवाय वृष्णे यज्ञैर्विधेम नमसा हविर्भिः ।
बृहस्पते सुप्रजा वीरवन्तो वयं स्याम पतयो रयीणाम् ॥

॥ ४-५०-६ ॥

**औ. वि.** (अग्नि) वैश्वदेवशस्त्र, (बार्हस्पत्य) पशुयाज्या.

**स्मा. वि.** घंटानाद; मनुष्यगंध-निवारण.

## रत्न १६१ वें

**वामदेव-ऋषि, पुरोहित-देवता, त्रिष्टुप्-छंद**

स इद्राजा प्रतिजन्यानि विश्वा शुष्मेण तस्थावभि वीर्येण ।
बृहस्पतिं यः सुभृतं बिभर्ति वल्गूयति वन्दते पूर्वभाजम् ॥

॥ ४-५०-७ ॥

**औ. वि.** पुरोहितप्रशंसा

**स्मा. वि.** पुरोहितप्रशंसा

स इत्क्षेति सुधित ओकसि स्वे तस्मा इळा पिन्वते विश्वदानीम् ।
तस्मै विशः स्वयमेवा नमन्ते यस्मिन्ब्रह्मा राजनि पूर्व एति ॥

॥ ४-५०-८ ॥

उमद्या अश्वांवर स्वार झालेले युयुत्सु वीर व शत्रूंच्या गराड्यांत सांपडलेले शूर योद्धे हे संग्रामांत आपल्या बाजूनें येऊन लढण्यास माझाच धांवा करतात. धनसंपन्न असा जो मी इन्द्र तोच रणसंग्राम गाजविणारा असून, प्रत्यक्ष लढाईत मोठा पराक्रम करून रणभूमीवर सर्वत्र मीच धुळीचे लोळ उठवितों ! ( ४-४२-५ ). मी जो हा त्रसदस्यु, त्यानेंच हे सर्व पराक्रम गाजविले आहेत. हें जें माझें दैवी सामर्थ्य आहे, त्याला कोणीच प्रतिकार करूं शकत नाहींत! जेव्हां सोमरस व सामगायन हीं मला प्रोत्साहित करतात, तेव्हां या अपार द्यावापृथ्वी माझा वीरावेश पाहून, भीतीनें चळचळ कांपूं लागतात ! (४-४२-६ ).

## रत्न १६० वें

जगत्पालक, सर्वदेवात्मक व वीर्यसंपन्न अशा बृहस्पति देवाला होम-हवनादिकांनीं, आज्यपुरोडाशादि हवींनीं, व नमस्कारमंत्रांनीं याप्रमाणें आम्ही त्यास प्रसन्न करूं या. हे बृहस्पति देवा ! तुझ्या कृपाप्रसादानें आम्ही पुत्रपौत्रादिकांनीं उत्तम प्रजावंत व उत्तम बलवंत होऊन, श्रेष्ठ संपत्तीचे मालक होऊं असें घडो ! ( ४-५०-६ ).

## रत्न १६१ वें

जो राजा आपल्या पुरोहिताचें अन्नवस्त्रादि देऊन संपोषण करतो, त्याची प्रशंसा करतो, त्याला वंदन करतो व योग्य संभावना करून त्याचा सर्वांत प्रथम आदरसत्कार करतो तोच राजा आपल्या सामर्थ्यानें व पराक्रमानें शत्रुसैन्यास पराभूत करण्यास समर्थ होतो ! ( ४-५०-७ ). ज्या राजाच्या पदरीं पूज्य असा विद्वान् ब्राह्मण असतो तोच राजा आपल्या राजवाड्यांत सुखानें नांदतो, त्यालाच भूमाता धान्यसमृद्धि देऊन, सुसमृद्ध करते आणि त्यालाच प्रजा आपखुषीनें करभार आणून देते ! ( ४-५०-८ ).

अप्रतीतो जयति सं धनानि प्रतिजन्यान्युत या सजन्या।
अवस्यवे यो वरिवः कृणोति ब्रह्मणे राजा तमवन्ति देवाः॥
॥ ४-५०-९ ॥

## रत्न १६२ वें

**वामदेव-ऋषि, उषा-देवता, गायत्री-छंद**

प्रति ष्या सूनरी जनी व्युच्छन्ती परि स्वसुः।
दिवो अदर्शि दुहिता॥ ४-५२-१ ॥

**श्रौ. वि.** प्रातरनुवाक. **स्मा. वि.** उषासूक्त.

अश्वेव चित्रारुषी माता गवामृतावरी।
सखाभूदश्विनोरुषाः॥ ४-५२-२ ॥
उत सखास्यश्विनोरुत माता गवामसि।
उतोषो वस्व ईशिषे॥ ४-५२-३ ॥
यावयद्द्वेषसं त्वा चिकित्वित्सूनृतावरि।
प्रति स्तोमैरभुत्स्महि॥ ४-५२-४ ॥
प्रति भद्रा अदृक्षत गवां सर्गा न रश्मयः।
ओषा अप्रा उरु ज्रयः॥ ४-५२-५ ॥
आपप्रुषी विभावरि व्यावर्ज्योतिषा तमः।
उषो अनु स्वधामव॥ ४-५२-६ ॥
आ द्यां तनोषि रश्मिभिरान्तरिक्षमुरु प्रियम्।
उषः शुक्रेण शोचिषा॥ ४-५२-७ ॥

**श्रौ. वि.** उषा-अनुवाक्या.

जो राजा धनरहित विद्वान् ब्राह्मणाला धनसहाय्य करतो, तो अव्याहतपणें शत्रूंची व तशीच स्वजनांचीहि संपत्ति हिरावून घेण्यास समर्थ होतो. अशा राजाचेंच रक्षण करण्यास देव सदैव तयार असतात ! ( ४–५०–९ ).

## रत्न १६२ वें

ती पहा ! स्वर्गाची सुंदर कन्या उषा देवी ही आपली भगिनी जी रात्र तिच्या मागून प्रकाश उधळीत प्रादुर्भूत झाली आहे ! ती प्राणिमात्राची मार्गदर्शक असून, फलादिकांची जननी आहे ( ४–५२–१ ). अशाप्रमाणें सुंदर, तेजस्विनी, प्रकाशाची माता व यज्ञदेवता अशी ही उषा अश्वी देवांची सखी आहे ! ( ४–५२–२ ). हे उषे ! तूं अश्विनी देवांची सखी आहेस व प्रकाशाची जननी आहेस. त्याचप्रमाणें तूं ऐश्वर्यांची स्वामिनीहि पण आहेस ! ( ४–५२–३ ), हे सुमधुर भाषण करणारे उषे ! आमच्या द्वेष्ट्यांना पिटाळून लावणारी व आमच्यांत चैतन्य स्फुरविणारी अशी जी तूं त्या तुला आम्ही स्तोत्र म्हणून जागृत करीत आहोंत ( ४–५२–४ ). सुमंगल असे किरण पावसाच्या धारांप्रमाणें दिसत आहेत. अहाहा ! उषेनें हें जग सगळें आपल्या महत्तेजानें गच्च भरून टाकलें आहे ! ( ४–५२–५ ). हे तेजस्विनि उषे ! केवढा चमत्कार हा ! कीं तूं आपला दिव्य प्रकाश जगभर पसरून रात्रीचा कुट्ट अंधःकार पार पिटाळून लावलास ! तर तूं आतां आमचें हविरन्नाचें रक्षण कर ! ( ४–५२–६ ). हे उषे ! तूं आपल्या सुरुचिर कांतीनें स्वर्गलोक भरून टाकतेस आणि त्याचबरोबर विस्तीर्ण व प्रिय असा अंतरिक्षलोकहि व्यापून सोडतेस ! ( केवढा अद्‌भुत प्रभाव हा तुझा ! ) ( ४–५२–७ ).

## रत्न १६३ वें

**वामदेव-ऋषि, सविता-देवता, जगती-छंद**

अभूद्देवः सविता वन्द्यो नु न इदानीमह्न उपवाच्यो नृभिः ।
वि यो रत्ना भजति मानवेभ्यः श्रेष्ठं नो अत्र द्रविणं यथा दधत् ॥
॥ ४-५४-१ ॥

**श्रौ. वि. (अग्निष्टोम) वैश्वदेवशस्त्र. स्मा. वि. सवितासूक्त.**

देवेभ्यो हि प्रथमं यज्ञियेभ्योऽमृतत्वं सुवसि भागमुत्तमम् ।
आदिद्दामानं सवितर्व्यूर्णुषेऽनूचीना जीविता मानुषेभ्यः ॥
॥ ४-५४-२ ॥

अचित्ती यच्चकृमा दैव्ये जने दीनैर्दक्षैः प्रभूती पूरुषत्वता ।
देवेषु च सवितर्मानुषेषु च त्वं नो अत्र सुवतादनागसः ॥
॥ ४-५४-३ ॥

## रत्न १६३ (अ) वें

**वामदेव-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

को वस्त्राता वसवः को वरूता द्यावाभूमी अदिते त्रासीथां नः ।
सहीयसो वरुण मित्र मर्तात् को वोऽध्वरे वरिवो धाति देवाः ॥
॥ ४-५५-१ ॥

## रत्न १६४ वें

**वामदेव-ऋषि, क्षेत्रपति-देवता, अनुष्टुप्-छंद**

क्षेत्रस्य पतिना वयं हितेनेव जयामसि ॥
गामश्वं पोषयित्न्वा स नो मृळातीदृशे ॥ ४-५७-१ ॥

**श्रौ. वि. (आप्तोर्याम) मैत्रावरुण परिधानीया; स्मा. वि. शांतिपाठ-क्षेत्र-पति-आवाहन.**

## रत्न १६३ वें

तो हा सविता देव उदय पावला आहे. तो आम्हांस आतां वंदनीय असाच आहे. तो यागकालीं तृतीय सवनांत आमच्या स्तुतिपाठकांकडून स्तवनीय झाला आहे. ज्या अर्थी तो देव यज्ञोपासकांना रमणीय धन विभागून देतो, त्या अर्थी तो आम्हांस या कर्मानुष्ठानांत श्रेष्ठ संपत्ति देवो! ( ४–५४–१ ). हे सवितृ देवा! प्रथम तूं यज्ञार्ह देवांना सर्वोत्कृष्ट सोमभाग म्हणजे अमृतत्व देतोस. तदनंतर हविर्दात्या यजमानासाठीं दिवस प्रकाशतोस आणि मनुष्यांना पितापुत्रपौत्रादि क्रमानें आयुष्य देतोस. ( ४–५४–२ ). हे सवितृ देवा! आम्ही अगर आमचे पुत्रभृत्यादि दीनदुर्बल जन किंवा आमच्यांतील प्रबुद्ध लोक यांनीं अज्ञानामुळें, अगर ऐश्वर्यमदानें, अगर उन्मत्तपणानें अगर स्खलनशील मानवस्वभावामुळें तुझ्याविषयीं अगर इतर देवांविषयीं अगर मनुष्यांविषयीं जें कांहीं पाप केलेलें असेल, तें सर्व पाप या कर्मानुष्ठानांत नाहीसें करून, आम्हांस निष्पाप कर! ( ४–५४–३ ).

## रत्न १६३ (अ) वें

अहो देवहो! तुमच्यांत आमचें तारण करणारा असा कोण आहे? आणि कोण आमचें दुःख निवारण करील? हे अखंडनीय द्यावापृथ्वींनो! तुम्ही आमचें रक्षण करा! हे वरुणा! हे मित्र देवा! तुम्ही आमचें बलाढ्य मानवशत्रूपासून रक्षण करा! अहो देवहो! आमच्या या यज्ञांत आम्हांस धन देणारा असा तुमच्यांत कोण देव आहे? ( ४–५५–१ ).

## रत्न १६४ वें

मित्र असा जो क्षेत्रपति त्या क्षेत्रपतीच्या साहाय्यानें आम्ही सुपीक शेती मिळवूं या. तो आम्हांस बैल, घोडे आणि अन्न देवो! आणि अशा प्रकारच्या देणगीनें तो आम्हांस सुखी करील. ( ४–५७–१ ).

## रत्न १६५ वें

**वामदेव-ऋषि, क्षेत्रपति-देवता, त्रिष्टुप्-छंद**

क्षेत्रस्य पते मधुमन्तमूर्मिं धेनुरिव पयो अस्मासु धुक्ष्व ।
मधुश्चुतं घृतमिव सुपूतमृतस्य नः पतयो मृळयन्तु ॥
॥ ४-५७-२ ॥

**श्रौ. वि. (आप्तोर्याम) मैत्रावरुण परिधानीया. स्मा. वि. शांतिपाठ**

मधुमतीरोषधीर्द्याव आपो मधुमन्नो भवत्वन्तरिक्षम् ।
क्षेत्रस्य पतिर्मधुमान्नो अस्त्वरिष्यन्तो अन्वेनं चरेम ॥
॥ ४-५७-३ ॥

## रत्न १६६ वें

**वामदेव-ऋषि, शुन-देवता, अनुष्टुप्-छंद**

शुनं वाहाः शुनं नरः शुनं कृषतु लाङ्गलम् ।
शुनं वरत्रा बध्यन्तां शुनमष्ट्रामुदिङ्गय ॥ ४-५७-४ ॥

## रत्न १६७ वें

**वामदेव-ऋषि, शुनासीर-देवता, पुरउष्णिक्-छंद**

शुनासीराविमां वाचं जुषेथां यद्दिवि चक्रथुः पयः ।
तेनेमामुप सिञ्चतम् ॥ ४-५७-५ ॥

**श्रौ. वि. (शुनासीरिय) अनुवाक्या**

## रत्न १६८ वें

**वामदेव-ऋषि, सीता-देवता, अनुष्टुप्-छंद**

अर्वाची सुभगे भव सीते वन्दामहे त्वा ।
यथा नः सुभगाससि यथा नः सुफलाससि ॥ ४-५७-६ ॥
इन्द्रः सीतां नि गृण्हातु तां पूषानु यच्छतु ।
सा नः पयस्वती दुहामुत्तरामुत्तरां समाम् ॥ ४-५७-७ ॥

## रत्न १६५ वें

हे क्षेत्रपते ! गाय जशी दूध देते तद्वत् तूं आम्हांला मधुस्रावी व घृताप्रमाणें परमशुद्ध असें सुमधुर व समृद्ध उदक दे. उदकपति आम्हांस सुखी राखोत ! (४–५७–२). शेतांतील धान्याचीं पिकें आम्हांसाठीं अत्यंत चवदार होवोत ! त्याचप्रमाणें स्वर्ग, आप व अंतरिक्षहि आम्हांस सुखकर होवोत ! त्याचप्रमाणें क्षेत्रपतिहि आम्हांस क्षेमकर होवो ! अप्रतिहत असे होत्साते आम्ही क्षेत्रपतीला अनुसरून वागूं असें घडो ! ( ४–५७–३ ).

## रत्न १६६ वें

बैल सुखानें नांगर ओढोत, लोक आनंदानें काम करोत, नांगर सुखानें जमीन नांगरोत. जुंपण्या सुखानें बांधा आणि चाबूक सुखानें धरा. ( ४–५७–४ ).

## रत्न १६७ वें

हे शुनासीर हो ! या माझ्या स्तुतीनें प्रसन्न व्हा ! आणि तुम्ही आकाशांत जें उदक उत्पन्न केलें आहे त्या उदकानें आमची ही जमीन भिजून चिंब होईल असें करा ! ( ४–५७–५ ).

## रत्न १६८ वें

हे भाग्यवती सीते ! तूं आम्हांकडे ये ! आम्ही तुझी स्तुति करीत आहों. तेणेंकरून तूं आम्हांस सुमंगल भाग्य देणारी आणि सुसमृद्ध धान्य देणारी अशी होशील. ( ४–५७–६ ). इन्द्र सीतेला धारण करो आणि पूषा तिचें नियमन करो ! उदकवती अशी ती आम्हांस वर्षांनुवर्षें मधुर उदकाचा भरपूर पुरवठा करणारी होवो ! ( ४–५७–७ ).

## रत्न १६९ वें

**वामदेव-ऋषि, शुनासीर-देवता, त्रिष्टुप्-छंद**

शुनं नः फाला वि कृषन्तु भूमिं शुनं कीनाशा अभि यन्तु वाहैः।
शुनं पर्जन्यो मधुना पयोभिः शुनासीरा शुनमस्मासु धत्तम्॥

॥ ४-५७-८ ॥

## रत्न १७० वें

**वामदेव-ऋषि, अग्नि, सूर्य, आप, गो वा घृत देवता त्रिष्टुप्-छंद**

समुद्रादूर्मिर्मधुमाँ उदारदुपांशुना सममृतत्वमानट् ।
घृतस्य नाम गुह्यं यदस्ति जिह्वा देवानाममृतस्य नाभिः ॥

॥ ४-५८-१ ॥

**श्रौ. वि. ( दशरात्र ) आज्यशस्त्र.** **स्मा. वि. पूर्णाहुति.**

वयं नाम प्र ब्रवामा घृतस्यास्मिन्यज्ञे धारयामा नमोभिः ।
उप ब्रह्मा शृणवच्छस्यमानं चतुःशृङ्गोऽवमीद्गौर एतत् ॥

॥ ४-५८-२ ॥

चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्याँ आ विवेश ॥

॥ ४-५८-३ ॥

**स्मा. वि. अग्निध्यान.**

त्रिधा हितं पणिभिर्गुह्यमानं गवि देवासो घृतमन्वविन्दन् ।
इन्द्र एकं सूर्य एकं जजान वेनादेकं स्वधया निष्टतक्षुः ॥

॥ ४-५८-४ ॥

एता अर्षन्ति हृद्यात्समुद्राच्छतव्रजा रिपुणा नावचक्षे ।
घृतस्य धारा अभि चाकशीमि हिरण्ययो वेतसो मध्य आसाम् ॥

॥ ४-५८-५ ॥

## रत्न १६९ वें

फाळ आमच्या भूमि सुखानें नांगरोत! शेतकरी सुखानें बैलाबरोबर जावोत! पर्जन्य सुखानें मधुर उदकांचा वर्षाव करो! हे शुनासीरांनो! तुम्ही आम्हाला सुखांत ठेवा! (४-५७-८).

## रत्न १७० वें

मधुर असें हें उदक अंतरिक्षापासून उत्पन्न झालें आहे. सूर्यकिरणानें मनुष्य अमृतत्व प्राप्त करून घेतो. घृताचें गुह्य असें जें नांव आहे तें म्हणजे देवांची जिव्हा होय आणि तेंच पण अमृताची नाभिही आहे (४-५८-१) आम्ही यजमान घृताच्या नांवाचें स्तवन करतो. आणि या यज्ञानुष्ठानांत आम्ही त्याचें नमस्कार-मंत्र म्हणून धारण करतों. चार शिंगांचा ब्रह्मा हें आमचें स्तोत्र गात असतांना श्रवण करो आणि गौरवर्ण देव हें आमचें कर्मानुष्ठान पूर्ण करो! (४-५८-२). या यज्ञस्वरूप अग्निदेवाला ब्रह्मा होतादि चार ऋत्विज शृंगस्थानीं आहेत. ऋग्यजुःसाम हे तीन वेद त्याच्या पादस्थानीं आहेत. हविर्धान व प्रवर्ग्य हीं दोन शिरस्थानीं व गायत्र्यादि सात छंद त्याच्या हस्तस्थानीं असून तो देव प्रातर्माध्यंदिनसायं अशा तीन सवनांनीं बद्ध झाला आहे. तो अभीष्ट वस्तूंचा वर्षाव करणारा असून गंभीर-ध्वनि आहे. अशा प्रकारचा तो सर्वश्रेष्ठ अग्निदेव मनुष्यांच्या अंतःकरणांत प्रवेश करून राहता झाला. (४-५८-३). पणींनीं छपवून ठेवलेलें व दुग्ध, दधि व आज्य या तीन प्रकारांनीं गायींमध्यें ठेविलेलें घृत देवांनीं शोधून काढिलें. त्यांपैकीं एकाला (दुधाला) इन्द्रानें आणि एकाला (दह्याला) सूर्यानें उत्पन्न केलें. आणखी एकाला म्हणजे घृताला देवांनीं कांतिमान् अग्नीपासून हवीसाठीं म्हणून निर्माण केलें (४-५८-४). या असंख्य मार्गांनीं वाहणाऱ्या जलधारा शत्रूच्या म्हणजे वृत्राच्या दृष्टीस न पडतां त्या हृदयानंदकारी धारा अंतरिक्षांतून खालीं सळसळ कोसळत आहेत. त्या मी पाहत असून त्यांमध्यें विद्युद्रूपानें चमकणाऱ्या अग्नीची वेतासारखी सुंदर सुवर्णकोर स्पष्ट दिसत आहे. (४-५८-५).

सम्यक्स्रवन्ति सरितो न धेना अन्तर्हृदा मनसा पूयमानाः।
एते अर्षन्त्यूर्मयो घृतस्य मृगा इव क्षिपणोरीषमाणाः ॥

॥ ४-५८-६ ॥

सिन्धोरिव प्राध्वने शूघनासो वातप्रमियः पतयन्ति यह्वाः।
घृतस्य धारा अरुषो न वाजी काष्ठा भिन्दन्नूर्मिभिः पिन्वमानः ॥

॥ ४-५८-७ ॥

अभि प्रवन्त समनेव योषाः कल्याण्यः स्मयमानासो अग्निम्।
घृतस्य धाराः समिधो नसन्त ता जुषाणो हर्यति जातवेदाः ॥

। ४-५८-८ ॥

कन्या इव वहतुमेतवा उ अञ्ज्यञ्जाना अभि चाकशीमि।
यत्र सोमः सूयते यत्र यज्ञो घृतस्य धारा अभि तत्पवन्ते ॥

॥ ४-५८-९ ॥

अभ्यर्षत सुष्टुतिं गव्यमाजिमस्मासु भद्रा द्रविणानि धत्त।
इमं यज्ञं नयत देवता नो घृतस्य धारा मधुमत्पवन्ते ॥

॥ ४-५८१० ॥

## रत्न १७१ वें

**वामदेव-ऋषि, आप्-देवता, जगती-छंद.**

धामन्ते विश्वं भुवनमधि श्रितमन्त समुद्रे हृद्य१न्तरायुषि।
अपामनीके समिथे य आभृतस्तमश्याम मधुमन्तं त ऊर्मिम् ॥

॥ ४-५८-११ ॥

**श्रौ. वि. ( करीरिष्टि ) याज्या.**

**मंडल चौथें समाप्त.**

अंतःकरणांतील सद्भावनेनें परिशुद्ध केलेल्या त्या घृतधारा हृदया-नंदकारक नद्यांप्रमाणें अग्नीवर अविरत पाझरत आहेत. पाठीस लागलेल्या पारध्यापासून जीव घेऊन पलायन करणाऱ्या मृगा-प्रमाणें त्या घृतधारा अग्नीकडे वेगानें धांवत चालल्या आहेत. ( ४–५८–६ ). सखल प्रदेशांतून वाहणाऱ्या नदीच्या वेगाप्रमाणें आणि वायूच्या शीघ्र गतीप्रमाणें या घृतधारा अग्नीवर कोसळून पडत आहेत. आणि ज्याप्रमाणें मस्तावलेला घोडा दौडत सुटतो तद्वतच या धारा झाल्यातरी परिधीरूपी बांध फोडून उचंबळून पुढें चालल्या आहेत. ( ४–५८–७ ). प्रेमळ, सुंदर व सुहास्यवदन स्त्रिया जशा आपल्या पतीकडे उत्सुकतेनें जातात, तद्वत् घृताच्या या तेजस्वी धारा अग्नीकडे निघाल्या आहेत. त्या पहा समिधांशीं आतां संलग्न झाल्या आणि अग्निदेव त्यांचें सेवन करून संतुष्ट झाला. ( ४–५८–८ ). सुंदर अलंकारांनीं सजून विवाहास निघालेल्या कन्यकांप्रमाणें त्या घृतधारा मला दिसत आहेत. जेथें सोमरस पिळून तयार करतात व जेथें यज्ञ समारंभ थाटला जातो, तिकडेच या घृत-धारा धांवत चालल्या आहेत. ( ४–५८–९ ). हे माझे ऋत्विज हो ! गोसमूहाचें उगमस्थान असलेल्या सुंदर स्तोत्राकडे वळा ! आम्हास कल्याणकारक अशी संपत्ति द्या ! जेथें घृताच्या धारा माधुर्यभरानें वाहत आहेत, असा हा आमचा यज्ञ देवांना पोंचेल असें करा! (४–५८–१०).

## रत्न १७१ वें

हे अग्ने ! हें सर्व जग तुझ्या तेजःस्थानाचा आश्रय करून राहिलें आहे. मग तें स्थान समुद्रांत असो, प्राण्यांच्या हृदयांत असो, किंवा भूत-मात्रांच्या जीवनांत असो अथवा जलौघांत अगर रणसंग्रामांत असो. त्या तुझ्या स्थानांत जो मधुर रस आहे, तो आम्हास सतत उपभोगावयास मिळेल असें कर ! ( ४–५८–११ ).

## चतुर्थ मंडल समाप्त

---



# मंडल पांचवें

## रत्न १७२ वें

बुध व गविष्ठिर आत्रेय-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

अबोध्यग्निः समिधा जनानां प्रति धेनुमिवायतीमुषासम् ।
यह्वा इव प्र वयामुज्जिहानाः प्र भानवः सिस्रते नाकमच्छ ॥

॥ ५-१-१ ॥

श्रौ. वि. ( अग्नि ) प्रातरनुवाक. स्मा. वि. शिरोन्यास.

## रत्न १७३ वें

कुमारआत्रेय-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

शुनश्चिच्छेपं निदितं सहस्राद्यूपादमुञ्चो अशमिष्ट हि षः ।
एवास्मदग्ने वि मुमुग्धि पाशान्होतश्चिकित्व इह तू निषद्य

॥ ५-२-७ ॥

श्रौ. वि. ( अंजःसव ) आहवनीयोपस्थान.

## ( मराठी भावार्थ )

### रत्न १७२ वें

उषःकालीं हा अग्निदेव ऋत्विजांनीं अर्पण केलेल्या समिधांच्या योगानें धेनूप्रमाणें जागृत झाला आहे. आपल्या लांब शाखा वर आकाशांत उंच बाढविणाऱ्या मोठ्या वृक्षाप्रमाणें त्याच्या ज्वाला उंच आकाशांत फोंफावत आहेत. ( ५-१-१ )

### रत्न १७३ वें

हे अग्निदेवा ! बद्ध केलेल्या शुनःशेपाला तूं हजार खांबांपासून मुक्त केलेंस. कारण त्यानें तुझा बहुत प्रकारें धांवा केला. तर आतां तूं येथें या वेदीमध्यें उपविष्ट होऊन, आम्हांसहि आमच्या बंधनापासून मुक्त कर ना ! ( ५-२-७ ).

## रत्न १७४ वें

**वसुश्रुत आत्रेय-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

जुष्टो दमूना अतिथिर्दुरोण इमं नो यज्ञमुप याहि विद्वान् ।
विश्वा अग्ने अभियुजो विहत्या शत्रूयतामा भरा भोजनानि ॥

॥ ५-४-५ ॥

**श्रौ.वि.(पवित्रेष्टि) स्विष्टकृत् अनुवाक्या. स्मा.वि. (वैश्वदेव)अग्नि-आवाहन.**

विश्वानि नो दुर्गहा जातवेदः सिन्धुं न नावा दुरिताति पर्षि ।
अग्ने अत्रिवन्नमसा गृणानोऽस्माकं बोध्यविता तनूनाम् ॥

॥ ५-४-९ ॥

**स्मा. वि. अग्नि-प्रार्थना.**

यस्त्वा हृदा कीरिणा मन्यमानोऽमर्त्यं मर्त्यो जोहवीमि ।
जातवेदो यशो अस्मासु धेहि प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम् ॥

॥ ५-४-१० ॥

यस्मै त्वं सुकृते जातवेद उ लोकमग्ने कृणवः स्योनम् ।
अश्विनं स पुत्रिणं वीरवन्तं गोमन्तं रयिं नशते स्वस्ति ॥

॥ ५-४-११ ॥

**स्मा. वि. पुण्याहवाचन, अग्नि-उपस्थान.**

## रत्न १७५ वें

**प्रयस्वन्त आत्रेय-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद.**

यमग्ने वाजसातम त्वं चिन्मन्यसे रयिम् ।
तं नो गीर्भिः श्रवाय्यं देवत्रा पनया युजम् ॥

॥ ५-२०-१ ॥

**श्रौ. वि. प्रातरनुवाक.**

## रत्न १७४ वें

प्रसन्न, उदार व अतिथिप्रमाणें घरांत पूज्य असा तूं या आमच्या यज्ञ-गृहांत आगमन कर. हे सर्वज्ञ अग्निदेवा! आमच्यावर चाल करून येणाऱ्या शत्रूंचा पार धुव्वा उडवून दे, व त्या दुष्टांची संपत्ति तूं आमच्याकडे लुटून घेऊन ये! (५–४–५). हे अग्ने! सहन करण्यास अत्यंत कठीण अशीं जीं दुःखें आहेत, त्या सर्व दुःखांतून नावाडी जसा नदी तरून जातो त्याप्रमाणें तूं आम्हांस पार करून ने! अत्रिऋषीनें ज्याप्रमाणें तुझें स्तवन केलें त्याप्रमाणेंच आम्ही तुझें स्तवन करीत आहों. तर हे देवा! तूं आमच्या शरीराचें रक्षण कर! (५–४–९). मरणधर्मा जो मी तो अमर अशा तुला स्तुतिभरित व भक्तियुक्त अंतःकरणानें आळवीत आहे. तर, हे जात-वेदा! तूं आम्हांस यश दे! आणि तुझ्या अनुग्रहानें मिळालेल्या प्रजेच्या योगानें आम्ही अमर होऊं असें घडो! (५–४–१०). हे सर्वज्ञ अग्नि-देवा! ज्या पुण्यकृत् यजमानावर तूं अनुग्रहबुद्धि करतोस तो अश्वयुक्त, पुत्रयुक्त, वीरयुक्त, गोयुक्त अशी अविनाशी संपत्ति प्राप्त करून घेतो. (५–४–११).

## रत्न १७५ वें

हे अत्यंत सामर्थ्य देणाऱ्या अग्निदेवा! जें हविर्धन तुला मान्य आहे आणि जें स्तुतींनीं युक्त आहे असें तें आम्हीं अर्पण केलेलें हविर्धन तूं देव-लोकांप्रत नेऊन पोंचीव. (५–२०–१).

## रत्न १७६ वें

बन्धु-ऋषि, अग्नि-देवता, द्विपदा विराट्-छंद.

अग्ने त्वं नो अन्तम उत त्राता शिवो भवा वरूथ्यः ।
वसुरग्निर्वसुश्रवा अच्छा नक्षि द्युमत्तमं रयिं दाः ॥

॥ ५-२४-१ ॥

श्रौ. वि. (महापितृयज्ञ) आहवनीय जप, स्मा. वि. अग्नि-उपस्थान.

## रत्न १७७ वें

वसूयव आत्रेय, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद.

अग्निर्देवेषु राजत्यग्निर्मर्तेष्वाविशन् ।
अग्निर्नो हव्यवाहनोऽग्निं धीभिः सपर्यत ॥

॥ ५-२५-४ ॥

अग्निस्तुविश्रवस्तमं तुविब्रह्माणमुत्तमम् ।
अतूर्तं श्रावयत्पतिं पुत्रं ददाति दाशुषे ॥

॥ ५-२५-५ ॥

श्रौ. वि (पुत्रकामेष्टि) स्विष्टकृत् याज्या.

अग्निर्ददाति सत्पतिं सासाह यो युधा नृभिः ।
अग्निरत्यं रघुष्यदं जेतारमपराजितम् ॥

॥ ५-२५-६ ॥

श्रौ. वि. (पुत्रकामेष्टि) स्विष्टकृत् अनुवाक्या.

## रत्न १७६ वें

हे पूजनीय अग्ने ! तूं आमच्या अगदीं जवळ रहा आणि आमचा रक्षक हो. तसाच आम्हांस सुख देणाराहि पण हो ! तूं आम्हांस गृह देणारा, आम्हां सर्वांचा पुढारी व आम्हांस अन्न देणारा असा असून, आमच्या सन्निध येऊन रहा. आणि आम्हांस अत्यंत तेजस्वी असें ज्ञान-धन दे ! ( ५-२४-१ ).

## रत्न १७७ वें

अग्निदेव हा देवांमध्यें प्रकाशतो आणि तोच मनुष्यामध्येंहि प्रविष्ट होतो. तोच आम्हीं अर्पण केलेले हवि देवांप्रत वाहून नेतो. अशा अग्नि-देवाची, हे यजमान हो ! तुम्ही स्तुतिस्तोत्र गाऊन परिचर्या करा ! ( ५-२५-४ ). अग्निदेव हवि अर्पण करणाऱ्या यजमानास अन्नसंपन्न, सर्वोत्तम, अहिंसित व पितरांचें नांव सुविख्यात करणारा असा सत्पुत्र देवो ! ( ५-२५-५ ). सज्जनांचा प्रतिपाल करणारा व आपल्या लोकांच्या साह्यायानें युद्धांत शत्रूचा पाडाव करणारा असा सुपुत्र अग्निदेव आम्हांस देवो ! त्याचप्रमाणें जलद चालणारा, शत्रूवर जय मिळविणारा व शत्रूला हार न जाणारा असा घोडाहि आम्हांस देवो ! ( ५-२५-६ ).

## रत्न १७८ वें

**वसूयव आत्रेय-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद.**

अग्ने पावक रोचिषा मन्द्रया देव जिव्हया ।
आ देवान्वक्षि यक्षि च ॥ ५-२६-१ ॥

**प्रातरनुवाक : (आधान) हविर्याज्या, स्मा. वि. अग्नि-उत्तरण.**

तं त्वा घृतस्नवीमहे चित्रभानो स्वर्दृशम् ।
देवाँ आ वीतये वह ॥ ५-२६-२ ॥
वीतिहोत्रं त्वा कवे द्युमन्तं समिधीमहि ।
अग्ने बृहन्तमध्वरे ॥ ५-२६-३ ॥

## रत्न १७९ वें

**अवस्यु आत्रेय-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

त्वमपो यदवे तुर्वशायाऽरमयः सुदुघाः पार इन्द्र ।
उग्रमयातमवहो ह कुत्सं सं ह यद्वामुशनारन्त देवाः ॥
॥ ५-३१-८ ॥

## रत्न १८० वें

**अत्रिभौम-ऋषि, सूर्य-देवता, अनुष्टुप्-छंद.**

यत्त्वा सूर्य स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः ।
अक्षेत्रविद्यथा मुग्धो भुवनान्यदीधयुः ॥ ५-४०-५ ॥

**स्मा. वि. सूर्यग्रहण.**

## रत्न १७८ वें

हे पावन करणाऱ्या अग्निदेवा ! तूं आपल्या तेजस्वी व देवांना आनंद-दायक अशा ज्वालारूप जिव्हेनें देवांना येथें बोलावून आण आणि त्यांचें पूजन कर. (५-२६-१).हे घृतोत्पन्न व रंगीबेरंगी किरण असलेल्या देवा ! सर्व द्रष्टा असा जो तूं त्या तुझी आम्ही प्रार्थना करतों, कीं हविभक्षणार्थ तूं देवांना या आमच्या यज्ञगृहांत घेऊन ये ! (५-२६-२). हे प्रज्ञासंपन्न अग्निदेवा ! हवि हें तुझें अन्न असून तूं स्वतः दीप्तिमान् व परम थोर आहेस. अशा त्या तुला आम्ही यज्ञांत समिधांच्या योगानें प्रदीप्त करतों. (५-२६-३).

## रत्न १७९ वें

हे इन्द्रा ! यदु व तुर्वश या राजांना पैलतीरावर आणण्यासाठीं म्हणून तूं नदीच्या त्या प्रचंड महापुराला आवरून धरता झालास. तसेंच तूं व कुत्स मिळून त्या प्रबळ शुष्णाकडे गेल्यावर तूं त्या असुराला पार ठार करून टाकलेंस आणि जेव्हां उशना व देव तुमच्याकडे धांवून आले तेव्हां तूं त्या कुत्साला सुरक्षित त्याच्या घरीं नेऊन पोंचविता झालास. (५-३१-८).

## रत्न १८० वें

हे सूर्या ! असुरपुत्र जो स्वार्भानु त्यानें जेव्हां तुला अंधःकारानें वेढून सोडलें, तेव्हां सर्व भुवनें मूढ होऊन आपण कोठें आहोंत याची त्यांना भ्रांति पडल्यासारखी झाली. (५-४०-५)

## रत्न १८१ वें

**अत्रिभौम-ऋषि, अत्रि-देवता, त्रिष्टुप्-छंद, ९ अनुष्टुप्.**

स्वर्भानोरध यदिन्द्र माया अवो दिवो वर्तमाना अवाहन् ।
गूळ्हं सूर्यं तमसापव्रतेन तुरीयेण ब्रह्मणाविन्ददत्रिः ॥
॥ ५-४०-६ ॥

**स्मा. वि. सूर्यग्रहण.**

मा मामिमं तव सन्तमत्र इरस्या द्रुग्धो भियसा नि गारीत् ।
त्वं मित्रो असि सत्यराधास्तौ मेहावतं वरुणश्च राजा ॥
॥ ५-४०-७ ॥

ग्राव्णो ब्रह्मा युयुजानः सपर्यन् कीरिणा देवान्नमसोपशिक्षन् ।
अत्रिः सूर्यस्य दिवि चक्षुराधात्स्वर्भानोरप माया अघुक्षत् ॥
॥ ५-४०-८ ॥

## रत्न १८२ वें

**अत्रिभौम-ऋषि, अत्रिदेवता, अनुष्टुप-छंद.**

यं वै सूर्यं स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः ।
अत्रयस्तमन्वविन्दन्नह्य१न्ये अशक्नुवन् ॥ ५-४०-९ ॥

**स्मा. वि. सूर्यग्रहण.**

## रत्न १८३ वें

**अत्रिभौम-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

विसर्माणं कृणुहि वित्तमेषां ये भुञ्जते अपृणन्तो न उक्थैः ।
अपव्रतान्प्रसवे वावृधानान्ब्रह्मद्विषः सूर्याद्यावयस्व ॥
॥ ५-४२-९ ॥

## रत्न १८१ वें

हे इन्द्रा! आकाशांत त्या स्वर्भानूनें सूर्याखालीं पसरलेल्या निबिड अंधःकाराचा जेव्हां तूं विध्वंस केलास तेव्हां त्या अंधःकारांत दडून गेलेल्या सूर्याला अत्रिऋषीनें चवथ्या मंत्राच्या साहाय्यानें शोधून काढलें. (५-४०-६) (सूर्य म्हणतो) हे अत्रे! हा मी-जो तुझा आहे-त्या मला त्या असुरानें अन्नाच्या इच्छेनें भयजनक अंधकार पसरून गिळंकृत करूं नये. हे मित्रा! तूं मित्र आहेस आणि सत्य हेंच तुझें धन आहे. सबब तूं व राजा वरुण दोघे मिळून माझें आतां रक्षण करा! (५-४०-७) तेव्हां त्या ज्ञानी अत्रीनें ग्रावे एकत्र करून, देवांना स्तुतिस्तोत्रांनीं प्रसन्न करून आणि नमस्कार-मंत्रांनीं त्यांचें पूजन करुन, त्या सूर्यरुपी नेत्राची आकाशांत पुनः स्थापना केली. याप्रमाणें त्या ऋषीनें त्या स्वर्भानूच्या कपटजालाचा सर्वस्वीं बीमोड केला. (५-४०-८)

## रत्न १८२ वें

असुरपुत्र स्वर्भानूनें ज्या सूर्याला निबिड अंधकारांत गाडून टाकलें होतें, त्या सूर्याला अत्रीच्या वंशजांनीं सोमयाग, देवतास्तोत्र व नमस्कारमंत्र इत्यादिकांच्या योगानें पुनः शोधून काढलें. इतरांना हें शक्य झालें नाहीं. (५-४०-९)

## रत्न १८३ वें

स्तुतिस्तोत्रादिकांनीं विशिष्ट अशा आम्हां ब्राह्मणांस जे दानदक्षिणादिकांनीं संतुष्ट न करता आपण स्वतःच चैन करतात, अशा कवडीचुंबकांचें धन, हे ब्रह्मणस्पते, तूं क्षणभंगुर कर! आणि जे लोक या मनुष्यलोकांत कर्मभ्रष्ट होऊन भरभराटत आहेत, व जे ब्राह्मणांचा द्वेष करणारे आहेत, अशांना सूर्यापासून दूर ठेव! (५-४२-९)

## रत्न १८४ वें

**अवत्सार काश्यप-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद.**

यादृगेव ददृशे तादृगुच्यते सं छायया दधिरे सिध्रयाप्स्वा ।
महीमस्मभ्यमुरुषामुरु ज्रयो बृहत्सुवीरमनपच्युतं सहः ॥

॥ ५-४४-६ ॥

**श्रौ. वि. (वाजपेय) अतिरिक्तोथशस्त्र.**

## रत्न १८५ वें

**अवत्सार काश्यप-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद,**

यो जागार तमृचः कामयन्ते यो जागार तमु सामानि यन्ति ।
यो जागार तमयं सोम आह तवाहमस्मि सख्ये न्योकाः ॥

॥ ५-४४-१४ ॥

अग्निर्जागार तमृचः कामयन्तेऽग्निर्जागार तमु सामानि यन्ति ।
अग्निर्जागार तमयं सोम आह तवाहमस्मि सख्ये न्योकाः ॥

॥ ५-४४-१५ ॥

**श्रौ. वि. (वाजपेय) अतिरिक्तोथशस्त्र.**

## रत्न १८६ वें

**प्रतिरथ अत्रेय-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

तदस्तु मित्रावरुणा तदग्ने शं योरस्मभ्यमिदमस्तु शस्तम् ।
अशीमहि गाधमुत प्रतिष्ठां नमो दिवे बृहते सादनाय ॥

॥ ५-४७-७ ॥

**स्मा. वि. देवता प्रतिष्ठापन.**

## रत्न १८४ वें

तो परमात्मा जसा आम्हांस दिसला, त्याप्रमाणें आम्ही त्याचें वर्णन करीत आहों. ते देव अमोघ कांतीसह पाण्यांत आपलें रूप धारण करतात. ते देव पूजनीय व विपुल असें धन, मोठा उत्साह, पुष्कळ पुरुष संतति आणि अक्षय बल हीं आम्हांस देवोत ! ( ५–४४–६ )

## रत्न १८५ वें

जो सदैव जागृत असतो, त्याचीच ऋचा अपेक्षा करतात. जो सदैव जागृत असतो, त्याजकडेच सामसूक्तें येतात. आणि जो सदैव जागृत असतो, त्यालाच सोम म्हणतो कीं, मी सदैव तुझ्या सख्यांतच रहात आहें. ( ५–४४–१४ ) अग्नि हा सदैव जागरूक असतो, आणि म्हणून ऋचा त्याचीच इच्छा करतात. अग्नि हा सदैव जागृत असतो, आणि म्हणून सामसूक्तें त्याच्याकडेच येतात. अग्नि हा सदैव जागृत असतो, आणि म्हणून सोम त्याला म्हणतो कीं, मी सदैव तुझ्या मैत्रींतच राहतों. ( ५–४४–१५ )

## रत्न १८६ वें

मित्रावरुणांनो ! हें सूक्त आम्हीं स्तविलें आहे ! हे अग्ने ! हें सूक्त आम्हीं स्तविलें आहे! आणि तें आम्हांस सुखकारक व दुःखहारक असें होवो ! आम्हांस आधार व स्थैर्य लाभो ! त्या थोर व विश्वाधार अशा सूर्यदेवाला मी नमस्कार करतों. (५–४७–७)

## रत्न १८७ वें

स्वस्ति·अत्रेय-ऋषि, विश्वेदेव·देवता, अनुष्टुप्-छंद.

विश्वो देवस्य नेतुर्मर्तो वुरीत सख्यम् ।
विश्वो राय इषुध्यति द्युम्नं वृणीत पुष्यसे ॥

॥ ५-५०-१ ॥

औ. वि. ( अभिप्लव षडह ) वैश्वदेवशास्त्र.

## रत्न १८८ वें

स्वस्ति अत्रेय-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद.

स्वस्ति नो मिमीतामश्विना भगः स्वस्ति देव्यदितिरनर्वणः ।
स्वस्ति पूषा असुरो दधातु नः स्वस्ति द्यावापृथिवी सुचेतना ॥

॥ ५-५१-११ ॥

औ. वि. (पृष्ठयाह) वैश्वदेवशस्त्र, स्मा. वि. शांतिपाठ.
(बृहस्पतिसव) वैश्वदेव निविद्धान्.

स्वस्तये वायुमुप ब्रवामहै सोमं स्वस्ति भुवनस्य यस्पतिः ।
बृहस्पतिं सर्वगणं स्वस्तये स्वस्तय आदित्यासो भवन्तु नः ॥

॥ ५-५१-१२ ॥

विश्वे देवा नो अद्या स्वस्तये वैश्वानरो वसुरग्निः स्वस्तये ।
देवा अवन्त्वृभवः स्वस्तये स्वस्ति नो रुद्रः पात्वंहसः ॥

॥ ५-५१-१३ ॥

## रत्न १८९ वें

स्वस्ति आत्रेय-ऋषि, विश्वेदेव-देवता, अनुष्टुप्-छंद.

स्वस्ति मित्रावरुणा स्वस्ति पथ्ये रेवति ।
स्वस्ति न इन्द्रश्चाग्निश्च स्वस्ति नो अदिते कृधि ॥

॥ ५-५१-१४ ॥

## रत्न १८७ वें

सर्व लोक त्या जगन्नायक अशा सूर्यदेवाचें सख्य जोडूं इच्छितात; त्याचप्रमाणें सर्व जन त्याच्यापासून धन मिळविण्याची इच्छा करतात आणि म्हणून प्रत्येकानें आपल्या कुटुंबपोषणार्थ त्याचा अनुग्रह संपादून, त्याजपासून भरपूर धनधान्य-संपत्ति मिळवावी. ( ५-५०-१ )

## रत्न १८८ वें

अहो अश्विदेवहो ! आमचें अक्षय क्षेम होईल, असें करा ! भगदेव आमचें अक्षय हित करो ! देवी अदिति आमचें अक्षय मंगल करो ! दुर्दम्य असा जो शत्रूचा पाडाव करणारा पूषा, तो आमची भरभराट करो ! आणि सुजाण द्यावापृथ्वीहि पण आमचें अखंड मंगल करोत ! ( ५-५१-११ ) आमचें कल्याण व्हावें, म्हणून आम्ही वायूची स्तुति करतों. विश्वपालक अशा सोमाचीहि स्तुति करतों. आणि सर्वदेव-गणोपेत अशा बृहस्पति देवाचीहि पण स्तुति करतों. अदितीचे पुत्र जे बारा आदित्य ते आमचे कल्याणार्थ झटोत ! ( ५-५१-१२ ) सर्व देव आम्हांस आज या यागदिनीं मंगलप्रद होवोत ! सर्व लोकांचा नायक व गृहदाता अग्निदेव आमचें कल्याण करो ! ऋभुदेव आमच्या अभिवृध्द्यर्थ तत्पर असोत आणि दुःखहारक असा रुद्रदेव आमचें कल्याण व्हावें म्हणून आमचें पापापासून रक्षण करो ! ( ५-५१-१३ )

## रत्न १८९ वें

हे मित्रावरुणांनो ! तुम्ही आमचें कल्याण करा ! हे मार्गदेवते ! हे धनदेवते ! आमचें अक्षय मंगल कर ! हे इन्द्रदेवा ! हे अग्निनारायणा ! तुम्हीहि आमचें क्षेम करा ! तसेंच हे अदिते देवि ! तूंहि पण आमचें शुभमंगल कर ! ( ५-५१-१४ )

स्वस्ति पन्थामनु चरेम सूर्याचन्द्रमसाविव ।
पुनर्ददताघ्नता जानता सं गमेमहि ॥

॥ ५-५१-१५ ॥

**श्रौ. वि. (वैश्वदेवशस्त्र) निविद्धान, स्मा. वि. शांतिपाठ.**

## रत्न १९० वें

**उरुचक्रि अत्रेय-ऋषि, मित्रावरुणदेवता, त्रिष्टुप्-छंद.**

प्रातर्देवीमदितिं जोहवीमि मध्यंदिन उदिता सूर्यस्य ।
राये मित्रावरुणा सर्वतातेळे तोकाय तनयाय शं योः ॥

॥ ५-६९-३ ॥

## रत्न १९१ वें

**अत्रिभौम-ऋषि, अश्वी-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

प्रातर्यावाणा प्रथमा यजध्वं पुरा गृध्रादररुषः पिबातः ।
प्रातर्हि यज्ञमश्विना दधाते प्र शंसन्ति कवयः पूर्वभाजः ॥

॥ ५-७७-१ ॥

**श्रौ. वि. (प्रातरनुवाक) आश्विनशस्त्र, स्मा. वि. प्रातःस्मरण.**

प्रातर्यजध्वमश्विना हिनोत न सायमस्ति देवया अजुष्टम् ।
उतान्यो अस्मद्यजते वि चावः पूर्वःपूर्वो यजमानो वनीयान् ॥

॥ ५-७७-२ ॥

हिरण्यत्वङ् मधुवर्णो घृतस्नुः पृक्षो वहन्ना रथो वर्तते वाम् ।
मनोजवा अश्विना वातरंहा येनातियाथो दुरितानि विश्वा ॥

॥ ५-७७-३ ॥

सूर्य व चंद्र हे जसे अंतराळांतील आपला मार्ग निर्वेध अनुसरतात तद्वत् आम्हीहि आमचा मार्ग सुखरूपपणें आक्रमण करूं. आणि उदार, अहिंसित व आपुलकीची जाणीव असलेल्या अशा बांधवांशीं आमचा सहवास घडो ! ( ५-५१-१५)

रत्न १९० वें

मी प्रातःकाळीं देवमाता अदिति देवीस हांक मारतों. त्याचप्रमाणें मध्यान्हकाळींहि हांक मारतों. अहो मित्रावरुणांनो ! आम्हांला धन, पुत्र, पौत्र, अरिष्टनाश व सुख लाभावें म्हणून आम्ही तुम्हांला या यज्ञांत स्तुति-स्तोत्र गाऊन आळवितों. ( ५-६९-३ )

रत्न १९१ वें

अहो ऋत्विजहो ! प्रातःकाळी यज्ञगृहांत येणाऱ्या प्रमुख अश्विनीकुमारांचें पूजन करून, त्यांना हविर्द्रव्य अर्पण करा. अधाशी व कंजूष अशा राक्षस-प्रभृति दुष्टजनापूर्वींच हे देव सोमरसाचें पान करोत; कारण प्रातःकाळीं ते यज्ञगृहांत येऊन आपला हविर्भाग स्वीकारतात. प्राचीन ऋषी झाले तरी प्रातःकाळीं यांचेंच स्तोत्र-गायन करीत असत. ( ५-७७-१ ) अतएव ऋत्विज हो ! तुम्ही प्रातःकाळींच अश्विनीदेवांना हविर्भाग अर्पण करा, कारण सायंकाळीं दिलेला हवि देव स्वीकारीत नाहीत. तो तेव्हां असेव्य असतो. आमच्याप्रमाणेंच इतर जनहि यज्ञ करून त्यांचें पूजन करीत असतात. पण जे सर्वांच्या अगोदर त्यांना हविर्भाग अर्पण करतात, ते सद्भक्तच देवांना फार प्रिय होतात. ( ५-७७-२ ) हे अश्विनीदेव हो ! तुमच्या रथाला सोन्याचें आस्तरण असून, तो फारच मनोहर दिसतो. तो आमच्याकडे अन्न घेऊन येणारा असून, शिवाय तो जलवर्षाव करणारा, मनोजव व प्रभंजनाप्रमाणें सोसाट्यानें धांवणारा आहे. म्हणूनच त्या रथांतून तुम्ही सर्व बिकट स्थानांतून सुरक्षित पार होऊन जातां. ( ५-७७-३ )

यो भूयिष्ठं नासत्याभ्यां विवेष चनिष्ठं पित्वो ररते विभागे ।
स तोकमस्य पीपरच्छमीभिरनूर्ध्वभासः सदमित्तुतुर्यात् ।।
।। ५-७७-४ ।।

समश्विनोरवसा नूतनेन मयोभुवा सुप्रणीती गमेम ।
आ नो रयिं वहतमोत वीराना विश्वान्यमृता सौभगानि ॥
।। ५-७७-५ ।।

## रत्न १९२ वें

**सप्तवध्रि आत्रेय-ऋषि, आश्वी-देवता, अनुष्टुप्-छन्द.**

वि जिहीष्व वनस्पते योनिः सूष्यन्त्या इव ।
श्रुतं मे अश्विना हवं सप्तवध्रिं च मुञ्चतम् ।। ५-७८-५ ।।

**स्मा. वि. गर्भस्राविणी उपनिषत्.**

भीताय नाधमानाय ऋषये सप्तवध्रये ।
मायाभिरश्विना युवं वृक्षं सं च वि चाचथः ।। ५-७८-६ ।।

यथा वातः पुष्करिणीं समिङ्गयति सर्वतः ।
एवा ते गर्भ एजतु निरैतु दशमास्यः ।। ५-७८-७ ।।

यथा वातो यथा वनं यथा समुद्र एजति ।
एवा त्वं दशमास्य सहावेहि जरायुणा ।। ५-७८-८ ।।

दश मासाञ्छशयानः कुमारो अधि मातरि ।
निरैतु जीवो अक्षतो जीवो जीवन्त्या अधि ।। ५-७८-९ ।।

जो दिवसाच्या प्रत्येक भागांत अश्विनी देवांप्रीत्यर्थ सोमरसादि विपुल हविरन्न तयार करून तें अन्न त्यांना अर्पण करतो, तो त्या सत्कर्माच्या योगानें आपल्या पुत्राचें पालन करतो. इतकेंच नव्हे तर जे यजनशील नाहींत त्यांचें तो सदैव मर्दन करणारा होतो. ( ५–७७–४ ) आम्ही अश्विनीच्या नूतन रक्षणानें व त्यांच्या सुखकारी अनुग्रहबुद्धीनें संयुक्त व्हावें. अहो अमर अश्विदेव हो ! तुम्ही आम्हांस संपत्ति घेऊन या आणि वीरपुत्राचा लाभ करून द्या ! त्याचप्रमाणें सर्व सौभाग्य-वस्तु आणून आम्हांस अर्पण करा ! ( ५–७७–५ )

## रत्न १९२ वें

हे वनस्पते ! प्रसूतीस बसलेल्या स्त्रीच्या योनीप्रमाणें तूं विकास पाव. तदर्थ हे अश्विनीदेवांनो ! ही माझी प्रार्थना ऐका. हा मी–जो सप्तवध्रि ऋषि आहें–त्याला लवकर पेटींतून मुक्त करा ! ( ५–७८–५ ) भयभीत झालेल्या व मुक्ततेची प्रार्थना करणाऱ्या या सप्तवध्रीला, हे अश्विनीदेवहो ! तुम्ही आपल्या अपूर्व कौशल्यानें पेटीजवळ येऊन, मला तेथून मुक्त केलेंत. ( ५–७८–६ ) वारा ज्यप्रमाणें सरोवराला चौबाजूंनीं हलवितो तद्वत् दहा महिने पोटांत राहिलेला हा गर्भ आतां इतस्ततः चळवळ करो ! आणि तो चटदिशीं तेथून निसटून बाहेर येवो ! ( ५–७८–७ ) ज्याप्रमाणे वाऱ्यानें वन हलतें अगर समुद्र चलबिचल करूं लागतो तद्वत्, हे दहा महिने उदरांत राहिलेल्या गर्भा! आतां तूं मातेच्या कुशींतून वारेसह लवकर बाहेर पड पाहूं ! ( ५–७८–८ ) मातेच्या कुशींत दहा महिने ठाण मांडून बसलेला हा कुमार आतां जिवंत मातेच्या गर्भांतून जिवंत असा सुखरूप बाहेर येवो ! आणि जननीहि जिवंत राहो ! ( ५–७८–९ )

## रत्न १९३ वें

**श्यावाश्व आत्रेय-ऋषि, सविता-देवता, जगती-छंद.**

युञ्जते मन उत युञ्जते धियो विप्रा विप्रस्य बृहतो विपश्चितः ।
वि होत्रा दधे वयुनाविदेक इन्मही देवस्य सवितुः परिष्टुतिः ॥
॥ ५-८१-१ ॥

**श्रौ. वि. (पृष्ठ्याभिप्लवषडह) सावित्री निविद्धान.**

## रत्न १९४ वें

**श्यावाश्व आत्रेय--ऋषि, सविता-देवता, अनुष्टुप्-छंद.**

तत्सवितुर्वृणीमहे वयं देवस्य भोजनम् ।
श्रेष्ठं सर्वधातमं तुरं भगस्य धीमहि ॥ ५-८२-१ ॥

**श्रौ. वि. (अग्नि) वैश्वदेवशस्त्र.**

## रत्न १९५ वें

**श्यावाश्व-ऋषि, सविता-देवता, गायत्री-छंद.**

अस्य हि स्वयशस्तरं सवितुः कच्चन प्रियम् ।
न मिनन्ति स्वराज्यम् ॥ ५-८२-२ ॥

स हि रत्नानि दाशुषे सुवाति सविता भगः ।
तं भागं चित्रमीमहे ॥ ५-८२-३ ॥

अद्या नो देव सवितः प्रजावत्सावीः सौभगम् ।
परा दुःष्वप्न्यं सुव ॥ ५-८२-४ ॥

**श्रौ. वि. ( दुःस्वप्नदर्शन ) आज्यहोम,**

विश्वानि देव सवितर्दुरितानि परा सुव ।
यद्भद्रं तन्न आ सुव ॥ ५-८२-५ ॥

**स्मा. वि. दम्पती अभिषेक,**

अनागसो अदितये देवस्य सवितुः सवे ।
विश्वा वामानि धीमहि ॥ ५-८२-६ ॥

## रत्न १९३ वें

जो बुद्धिमान्, महान्, व ज्ञानवान् आहे, अशा त्या सविता देवाच्या प्रेरणेनें सुज्ञ ऋत्विज व यजमान हे आपलें मन यज्ञानुष्ठानांत नियुक्त करून, आपापलीं कार्ये साधतात.कारण तो एक सवितादेवच त्यांचीं विविध कर्तव्यें यथायोग्य जाणणारा असून, तोच एकटा तीं तीं कर्में पृथक् पृथक् निश्चित करीत असतो. सविता देवाची स्तुति फार मोठी आहे. (५-८१-१)

## रत्न १९४ वें

जगत्प्रेरक सवितादेवाचें उपभोगण्यास योग्य असें जें धन आहे, त्याची आम्ही याचना करतों. आणि त्या देवाच्या अनुग्रहानें श्रेष्ठ, सर्व भोगप्रद आणि शत्रुहिंसक असें जें धन, त्याचा आम्ही उपभोग घेऊं असें घडो ! ( ५-८२-१ )

## रत्न १९५ वें

त्या सवितादेवाचें लोकविख्यात, सर्वप्रिय व स्वयंप्रकश असें जें धन आहे, त्याचा कोणींहि नाश करूं शकत नाहीं. ( -५-८२-२ ) तो जगत्प्रेरक भगदेव आम्हां हविर्दात्या भक्तांना सुंदर सुंदर रत्नें बहाल करतो. म्हणून आम्ही तें भोग्य व अद्भुत धन आम्हांस देण्याविषयीं त्या भगदेवाची प्रार्थना करतों. ( ५-८२-३ ) हे सवितृदेवा ! आम्हांस आज या यागप्रसंगीं पुत्रपौत्रादियुक्त असें सुंदर धन प्रदान कर ! आणि दुःस्वप्नाप्रमाणें दुःख देणारें दारिद्र्य आम्हांपासून दूर कर ! ( ५-८२-४ ) हे सवितृदेवा ! तूं आमच्यापासून सर्व संकटें दूर कर ! आणि जें कल्याणप्रद आहे तें आम्हांकडे घेऊन ये ! ( ५-८२-५ ) सवितादेवाच्या अनुज्ञेवरून आम्ही अदितीच्या ( भूमीच्या ) ठायीं निष्पाप राहूं आणि सर्व अभिलषणीय संपत्तीचा उपभोग घेऊं ! ( ५-८२-६ )

## रत्न १९६ वें

**एवयामरुत् अत्रेय-ऋषि, मरुत्-देवता, अतिजगती-छंद.**

गन्ता नो यज्ञं यज्ञियाः सुशमि श्रोता हवमरक्ष एवयामरुत् ।
ज्येष्ठासो न पर्वतासो व्योमनि यूयं तस्य प्रचेतसः स्यात
दुर्धर्तवो निदः ॥ ५-८७-९ ॥

**स्मा. वि. विवाहहोम.**

---

# परिशिष्ट (श्रीसूक्त)

## रत्न १९७ वें

**अनुष्टुप्-छंद.**

हिरण्यवर्णां हरिणीं सुवर्णरजतस्रजाम् ।
चन्द्रां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो म आ वह ॥ १ ॥

**स्मा. वि. श्रीसूक्त, देवीसूक्त,**

तां म आ वह जातवेदो लक्ष्मीमनपगामिनीम् ।
यस्यां हिरण्यं विन्देयं गामश्वं पुरुषानहम् ॥ २ ॥
अश्वपूर्वां रथमध्यां हस्तिनादप्रमोदिनीम् ।
श्रियं देवीमुप ह्वये श्रीर्मा देवी जुषताम् ॥ ३ ॥

**बृहती-छंद.**

कां सोस्मितां हिरण्यप्राकारामार्द्रां ज्वलन्तीं तृप्तां तर्पयन्तीम् ।
पद्मेस्थितां पद्मवर्णां तामिहोप ह्वये श्रियम् ॥ ४ ॥

## रत्न १९६ वें

हे पूजार्ह मरुतांनो ! आमच्या या यज्ञाभिवर्धनार्थ म्हणून तुम्ही या यज्ञशालेंत आगमन करा. आणि राक्षसवर्जित असे तुम्ही या एवयामरुताची प्रार्थना ऐका. विंध्याद्रिपर्वताप्रमाणें विशाल बादलेले, अंतरिक्षांत राहणारे व पूर्णप्रज्ञ असे तुम्ही जे निंदक आहेत त्यांना दुर्धर असे व्हा. (५-८७-९)

———

# परिशिष्ट ( श्रीसूक्त )

## रत्न १९७ वें

हे अग्ने ! जिची सुवर्णासारखी सुंदर कांति आहे, जिचा वर्ण पिवळट आहे, जिनें सोन्यारुप्याच्या विविध पुष्पामाला धारण केल्या आहेत, जिचा प्रकाश चन्द्राप्रमाणें मनोल्हादकारी आहे, जिचें रूप सुवर्णासारखें तकतकीत आहे, अशा त्या श्रीदेवीला माझ्यासाठीं बोलावून आण ! (५-८७, खिल ११-१) हे जातवेद अग्निदेवा ! जिच्यापासून कधीं कोणाला अपाय पोंचत नाहीं, अशा लक्ष्मीदेवीला मजकडे घेऊन ये ! कीं जी आली म्हणजे आम्हांला विपुल सोनें, गाई, घोडे व पुष्कळ पुत्रमित्रादि आप्तजन आणि दासदासी यांचा लाभ होईल. (५-८७ खिल २) जिच्यापुढें अश्व आहे, मध्यें रथ आहे, जी हत्तीच्या नादावरून ओळखिली जाते, जी तेजस्वी व सेनारूप आहे, अशा त्या श्रीदेवीला जवळ येण्यासाठीं मी हांक मारतों. ती देवी मजवर प्रसन्न होवो ! (५-८७ खिल ११-३) जी ब्रह्मस्वरूपिणी आहे, जी मंदहासानें विलसत आहे, जी सुवर्णाकृति आहे, जी आर्द्रानक्षत्रावर जन्मली आहे, जिची कांति उज्ज्वल आहे, जिचे मनोरथ पूर्ण झाले आहेत, जी भक्तांना त्यांचे मनोरथ पुरवून तृप्त करते, व जी कमलासनस्थ व कमलवर्ण आहे, अशा सुप्रसिद्ध श्रीदेवीला मी हांक मारतों. (५-८७ खिल ११-४)

**त्रिष्टुप्-छंद,**

चन्द्रां प्रभासां यशसा ज्वलन्तीं श्रियं लोके देवजुष्टामुदाराम् ।
तां पद्मिनीमीं शरणं प्रपद्येऽलक्ष्मीर्मे नश्यतां त्वा वृणे ॥ ५ ॥

आदित्यवर्णे तपसोऽधि जातो वनस्पतिस्तव वृक्षोऽथ बिल्वः ।
तस्य फलानि तपसा नुदन्तु या अन्तरा याश्च बाह्या
अलक्ष्मीः ॥ ६ ॥

**अनुष्टुप्-छंद.**

उपैतु मां देवसखः कीर्तिश्च मणिना सह ।
प्रादुर्भूतोऽस्मि राष्ट्रेऽस्मिन् कीर्तिमृद्धिं ददातु मे ॥ ७ ॥

क्षुत्पिपासामलां ज्येष्ठामलक्ष्मीं नाशयाम्यहम् ।
अभूतिमसमृद्धिं च सर्वां निर्णुद मे गृहात् ॥ ८ ॥

गन्धद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीम् ।
ईश्वरीं सर्वभूतानां तामिहोप ह्वये श्रियम् ॥ ९ ॥

**स्मा. वि. गंधस्नान.**

मनसः काममाकूतिं वाचः सत्यमशीमहि ।
पशूनां रूपमन्नस्य मयि श्रीः श्रयतां यशः ॥ १० ॥

कर्दमेन प्रजा भूता मयि संभव कर्दम ।
श्रियं वासय मे कुले मातरं पद्ममालिनीम् ॥ ११ ॥

आपः सृजन्तु स्निग्धानि चिक्लीत वस मे गृहे ।
नि च देवीं मातरं श्रियं वासय मे कुले ॥ १२ ॥

आर्द्रां पुष्करिणीं पुष्टिं पिङ्गलां पद्ममालिनीम् ।
चन्द्रां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो म आ वह ॥ १३ ॥

जी चंद्राप्रमाणें मनोल्हादकर आहे, जिची शरीरकांति झगझगीत आहे, जी यशानें तळपत आहे, जी इन्द्रादि देवांना अत्यंत प्रिय आहे, जी उदार आहे, जिचें रूप पद्मसदृश आहे, अशा श्रीदेवीला मी शरण आलों आहें. अतएव माझें दारिद्र्य आतां पार निपटून जावो ! मी तुझा स्वीकार करतों. (५-८७ खिल ११-५ ) हे सूर्यप्रभे ! हे श्रीदेवी! तुझ्या तपापासूनच बिल्व नांवाचा वनस्पति वृक्ष उत्पन्न झाला असून, त्याचीं फळें तुझ्या अनुग्रहानें हृदयस्थ अज्ञान व बाहेरील दारिद्र्य यांचा नाश करोत ! ( ५-८७ खिल ११-६) हे लक्ष्मीदेवी ! देवसखा जो कुबेर, तशाचि दक्षकन्या जी कीर्ति व चिंतामणि यांसह मी या राष्ट्रांत उत्पन्न झालों आहें. तर तो देवसखा मला कीर्ति व समृद्धि देईल असें घडो ! ( ५-८७ खिल ११-७ ) भूक व तहान यांनीं मलिन झालेली अशी जी तुझी वडील बहीण अलक्ष्मी ( म्हणजे दारिद्र्य ) तिचा मी नाश करून टाकतों. हे श्रीदेवी ! तूं आमचें दारिद्र्य व दुर्भिक्ष्य यांना पार घालवून दे ! ( ५-८७ खिल ११-८) जी सुगंधसंपन्न आणि तशीच दुर्जय आहे, जी सदैव पुष्ट असते, जी गवाश्वादि पशूंनी सुसमृद्ध व सर्व प्राणिमात्रांची स्वामिनी, अशा त्या श्रीदेवीला मी येथें पाचारण करतों. ( ५-८७ खिल ११-९ ) हे श्रीदेवी ! मनांतील इच्छा, संकल्प, साधुवाणी, गाई-म्हशीचें दूध, व्रीहियवादि अन्न यांचा मला लाभ होवो ! त्याचप्रमाणें संपत्ति व कीर्ति याहि माझ्या आश्रयास येऊन राहोत ! ( ५-८७ खिल ११-१० ) हे देवि ! तुला कर्दम नांवाचा एक उत्कृष्ट असा पुत्र आहे. हे श्रीपुत्र कर्दमा ! तूं आमच्या घरीं येऊन रहा आणि ती श्रीदेवीहि तुजबरोबरच आमच्या जवळ येऊन राहील असें कर ! ( ५-८७ खिल ११-११ ) आपोदेवी या स्नेहयुक्त कार्य उत्पन्न करोत ! हे चिक्लीत नामक श्रीपुत्रा ! तूं आमच्या घरीं रहा. आणि ती श्रीदेवीहि पण आमचे जवळ राहील असें कर ! (५-८७ खिल ११-१२)ओलसर, हत्तीचा शुंडाग्र जिच्याकडे वळला आहे व जी हातांत कमल धारण करते आणि जी पुष्टिरूप व पिंगट वर्णाची आहे, अशा श्रीदेवीला, हे अग्निनारायणा! तूं माझ्या घरीं बोलावून घेऊन ये ! ( ५-८७ खिल ११-१३ )

आर्द्रां यःकरिणीं यष्टिं सुवर्णां हेममालिनीम् ।
सूर्यां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो म आ वह ॥ १४ ॥

**आस्तारपंक्ति-छंद.**

तां म आ वह जातवेदो लक्ष्मीमनपगामिनीम् ।
यस्यां हिरण्यं प्रभूतं गावो दास्योऽश्वान् विन्देयं पुरुषानहम् ॥ १५ ॥

**अनुष्टुप्-छंद.**

यः शुचिः प्रयतो भूत्वा जुहुयादाज्यमन्वहम् ।
सूक्तं पञ्चदशर्चं च श्रीकामः सततं जपेत् ॥ १६ ॥

पद्मानने पद्मविपद्मपत्रे पद्मप्रिये पद्मदलायताक्षि ।
विश्वप्रिये विष्णुमनोऽनुकूले त्वत्पादपद्मं मयि सं नि धत्स्व ॥ १७ ॥

पद्मानने पद्मऊरु पद्माक्षि पद्मसंभवे ।
तन्मे भजसि पद्माक्षि येन सौख्यं लभाम्यहम् ॥ १८ ॥

अश्वदायि गोदायि धनदायि महाधने ।
धनं मे जुषतां देवि सर्वकामांश्च देहि मे ॥ १९ ॥

पुत्रपौत्रधनं धान्यं हस्त्यश्वादिगवे रथम् ।
प्रजानां भवसि माता आयुष्मन्तं करोतु मे ॥ २० ॥

धनमग्निर्धनं वायुर्धनं सूर्यो धनं वसुः ।
धनमिन्द्रो बृहस्पतिर्वरुणो धनमश्विना ॥ २१ ॥

वैनतेय सोमं पिब सोमं पिबतु वृत्रहा ।
सोमं धनस्य सोमिनो मह्यं ददातु सोमिनः ॥ २२ ॥

न क्रोधो न च मात्सर्यं न लोभो नाशुभा मतिः ।
भवन्ति कृतपुण्यानां भक्त्या श्रीसूक्तजापिनाम् ॥ २३ ॥

आर्द्र वेत्र हातांत धारण करणारी, व जी दंडस्वरूपिणी, सुंदर वर्णाची रुक्मिणी, गळ्यांत सुवर्णहार धारण केलेली, सूर्यप्रभा, व सुवर्ण कांतीची, अशा लक्ष्मी देवीला हे अग्ने ! तू आमच्या घरीं बोलावून आण ! (५-८७ खिल ११-१४) हे अग्ने ! कधींहि परत न जाणारी अशा लक्ष्मीला तूं आम्हांकडे आण, की जिचा कृपाप्रसाद झाला म्हणजे आम्हांला पुष्कळ सोनें, गाई, घोडे, दासदासी, पुत्रमित्रादि प्रियजन यांचा लाभ होईल. (५-८७ खिल ११-१५) ज्याला ही लक्ष्मीदेवी प्रसन्न व्हावी असें वाटतें, त्यानें शुचिर्भूत होऊन, अग्नि सुसंस्कृत करून, त्या देवी-प्रीत्यर्थ दररोज त्यांत आज्याहुति देऊन शिवाय वर वरील पंधरा मंत्रांचा जप करावा. (५-८७ खिल ११-१६)

हे कमलनयने ! हे पद्मोरु ! हे सरसिजनेत्रे ! हे कमलोद्भवे ! मला तूं असा वरप्रसाद दे कीं, ज्यायोगें मला उदंड सुख लाभेल ! (५-८४ खिल ११-१८). हे महाधने ! तूं अश्व देणारी, गाई, बैल देणारी व धन देणारी अशी आहेस ! तर, हे देवि ! तूं मला उत्कृष्ट संपत्ति दे ! आणि माझे सर्व मनोरथ पूर्ण होतील असें कर ! (५-८४ खिल ११-१९) पुत्रपौत्र, धनधान्य, हत्ती, घोडे, गाई, रथ इत्यादि तूं मला देणारी अशी हो. प्रजेची तूं माता आहेस, अतएव मला तूं आयुष्यमान् कर ! (५-८४ खि. ११-२०). मला अग्निदेव धन देवो ! वायु धन देवो ! सूर्य धन देवो! वसु धन देवो ! इन्द्र धन देवो ! बृहस्पति, वरुण व अश्विनीदेव मला धन देवोत ! (५-८४ खि. ११-२१). हे गरुडा ! तूं सोम प्राशन कर ! शत्रुसंहारक इंद्रहि सोमपान करो ! सोम व धन यांनीं युक्त असलेल्या मला तुम्ही सोम व धन द्या ! (५-८४ खि. ११-२२). क्रोध काय, मत्सर काय, लोभ काय, अशुभ भावना काय असले सर्व दुष्ट विकार जे श्रीसूक्त जपणारे आहेत, अशा पुण्यशील देवभक्तांना शिवत नाहींत. (५-८४ खि. ११-२३).

सरसिजनिलये सरोजहस्ते धवलतरांशुकगंधमाल्यशोभे ।
भगवति हरिवल्लभे मनोज्ञे त्रिभुवनभूतिकरि प्रसीद
मह्यम् ।। २४ ।।

विष्णुपत्नीं क्षमां देवीं माधवीं माधवप्रियाम् ।
लक्ष्मीं प्रियसखीं भूमिं नमाम्यच्युतवल्लभाम् ।। २५ ।।

महालक्ष्म्यै च विद्महे विष्णुपत्न्यै च धीमहि ।
तन्नो लक्ष्मीः प्रचोदयात् ।। २६ ।।

आनन्दः कर्दमः श्रीदश्चिक्लीत इति विश्रुताः ।
ऋषयः श्रियः पुत्राश्च श्रीर्देवीर्देवता मताः ।। २७ ।।

ऋणरोगादिदारिद्र्यपापक्षुदपमृत्यवः ।
भयशोकमनस्तापा नश्यन्तु मम सर्वदा ।। २८ ।।

श्रीवर्चस्वमायुष्यमारोग्यमाविधाच्छोभमानं महीयते ।
धनं धान्यं पशुं बहुपुत्रलाभं शतसंवत्सरं दीर्घमायुः ।।
।। २९ ।।

**पांचवें मंडल समाप्त**

---

हे कमलनिवासिनि ! हे पद्महस्ते ! शुभ्र गंधमालादिकांनीं शोभणारे ! हरिप्रिये ! मनोरमे ! त्रैलोक्याला संपन्न करणारे ! हे भगवति ! तूं मला प्रसन्न हो ! ( ५-८४ खि. ११-२४ ). विष्णुपत्नी, क्षमादेवी, माधवी, माधवप्रिया, प्रियसखी, अच्युतवल्लभा अशा लक्ष्मीदेवीला मी नमस्कार करतों. ( ५-८४ खि. ११-२५ ). महालक्ष्मीला आम्ही ओळखतों. विष्णुपत्नीचें ध्यान करतों. ती लक्ष्मी देवी आम्हांस सत्कार्यास प्रेरणा करो ! ( ५-८४ खि. ११-२६ ). आनंद, कर्दम, श्रीद, चिक्लीत असे हे विख्यात ऋषी श्रीचे पुत्र होत. आणि श्रीदेवी ही देवता आहे असें मानतात. ( ५-८४ खि. ११-२७ ). ऋण, रोग, दारिद्य, पाप, भूक, तहान, अपमृत्यु, भय, शोक, मनस्ताप हीं सर्व माझीं सदासर्वकाल नाश होऊन जावोत ! ( ५-८४ खि. ११-२८ ). संपत्ति, वर्चस्व, आयुष्य व आरोग्य, यांनीं शोभणारा मनुष्य श्रेष्ठतेस पावतो. म्हणून धन, धान्य, पशु, बंधु, बहुपुत्रलाभ, शंभर वर्षांचें उदंड आयुष्य हीं सर्व मला प्राप्त होवोत ! ( ५-८४ खि. ११-२९ ).

**पांचवें मंडल समाप्त.**





# मंडल सहावें

## रत्न १९८ वें

बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद

त्वं ह्यग्ने प्रथमो मनोताऽस्या धियो अभवो दस्म होता ।
त्वं सीं वृषन्नकृणोर्दुष्टरीतु सहो विश्वस्मै सहसे सहध्यै ॥

॥ ६-१-१ ॥

श्रौ. वि. (प्रातरनुवाक) आग्नेयक्रतु; उपाकरण, स्मा. वि. उपाकरण

## मराठी भावार्थ

### रत्न १९८ वें

हे अग्निदेवा ! देवांमध्यें तूंच प्रथम उत्पन्न झालेला असून, देवांचें मन वेधून घेतलेला असा आहेस. त्याचप्रमाणें, हे दर्शनीय देवा ! या यज्ञकर्मांत देवांना बोलावणारा होताहि पण तूंच आहेस. हे मनोरथपूरका ! काय सांगूं तुझा प्रभाव ! जितके म्हणून बलाढ्य शत्रू आहेत त्या सर्वांचा बीमोड करण्याकरितां सर्व बाजूंनी तूं आपलें दुर्दम्य सामर्थ्य सारखा प्रकट करीत आला आहेस. ( ६-१-१ ).

## रत्न १९९ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप् छंद**

नू नो अग्नेऽवृकेभिः स्वस्ति वेषि रायः पथिभिः पर्ष्यंहः ।
तां सूरिभ्यो गृणते रासि सुम्नं मदेम शतहिमाः सुवीराः ॥

॥ ६-४-८ ॥

## रत्न २०० वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, अग्नि देवता, त्रिष्टुप्-छंद**

यो नः सनुत्यो अभिदासदग्ने यो अन्तरो मित्रमहो वनुष्यात् ।
तमजरेभिर्वृषभिस्तव स्वैस्तपा तपिष्ठ तपसा तपस्वान् ॥

॥ ६-५-४ ॥

**श्रौ. वि. ( प्रवर्ग्य ) अभिष्टव.**

यस्ते यज्ञेन समिधा य उक्थैरर्केभिः सूनो सहसो ददाशत् ।
स मर्त्येष्वमृत प्रचेता राया द्युम्नेन श्रवसा वि भाति ॥

॥ ६-५-५ ॥

स तत्कृधीषितस्तूयमग्ने स्पृधो बाधस्व सहसा सहस्वान् ।
यच्छस्यसे द्युभिरक्तो वचोभिस्तज्जुषस्व जरितुर्घोषि मन्म ॥

॥ ६-५-६ ॥

अश्याम तं काममग्ने तवोती अश्याम रयिं रयिवः सुवीरम् ॥
अश्याम वाजमभि वाजयन्तोऽश्याम द्युम्नमजराजरं ते ॥

॥ ६-५-७ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि-काम ) याज्या.**

## रत्न १९९ वें

हे अग्निदेवा ! चोरादि रहित अशा निर्धोक मार्गांनीं सुंदर संपत्ति तूं आमच्याकडे सुखरूपपणें घेऊन ये ! आम्हांला संकटांतून पार कर ! आम्ही —जे तुझे भक्त—त्या आम्हां स्तोतृजनांना सुख लाभेल असें कर ! आणि तसेंच, हे देवा ! आम्ही पुत्रपौत्रादिकांसमवेत शंभर वर्षे कालक्रमणा करूं असें घडो ! ( ६–४–८ ).

## रत्न २०० वें

हे अग्निदेवा ! जो शत्रु गुप्त ठिकाणी राहून आमची हिंसा करूं पाहतो किंवा आमच्यामध्येंच लपून राहून आमचा घात करूं इच्छितो अशा उभय शत्रूंना, हे अत्यंत प्रखर देवा ! तूं आपल्या क्षयरहित व जलवर्षावक अशा तीक्ष्ण तेजानें चांगला होरपळून काढ ! ( ६–५–४ ). हे बलपुत्रा ! हे अग्ने ! जो भक्त यज्ञयागादिकांनीं अथवा समिधा अर्पण करून किंवा तुझें गोड स्तुतिस्तोत्र गाऊन तुझी परिचर्या करितो, तो सद्भक्त मनुष्यांमध्यें मोठा ज्ञानी होत्साता, सुंदर धन व उज्वल कीर्ति यांनीं चमकूं लागतो ! ( ६–५–५ ). हे अग्निनारायणा ! आमची प्रार्थना संपल्याबरोबर तूं ताबडतोब असें कर कीं, जे शत्रू तुझ्याशीं झुंज घालीत आहेत त्यांना बल-वान् असा तूं आपल्या दुर्दम्य अशा तेजानें पार नाहींसे करून टाक ! तसेंच दिव्य तेजानें चमकणारा असा तूं, तुजप्रीत्यर्थ यजमानांनीं गाइलेल्या मननीय स्तोत्रांचा प्रेमपूर्वक स्वीकारहि कर ! (६–५–६). हे अग्निदेवा ! तुझ्या संरक्षणछत्राखालीं आमचे ते सर्व मनोरथ परिपूर्ण होवोत ! हे ऐश्वर्यवंता ! आम्हांस सामर्थ्यसंपन्न अशी सुंदर पुत्रपौत्रादिसंतति व तसेंच धन हीं प्राप्त होवोत ! त्याचप्रमाणें अन्नाची इच्छा करणारे जे आम्ही त्या आम्हांला अन्नलाभहि घडो ! हे जरारहिता ! आणि तशीच तुझी अक्षय्य अशी जी कीर्ति आहे, तिचाहि आम्हांस लाभ घडो ! ( ६–५–७ ).

## रत्न २०१ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, वैश्वानर अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मूर्धानं दिवो अरतिं पृथिव्या वैश्वानरमृत आ जातमग्निम् ।
कविं सम्राजमतिथिं जनानामासन्ना पात्रं जनयन्त देवाः ॥

॥ ६-७-१ ॥

**श्रौ. वि. (विषुवान्) आग्निमारुतशस्त्र, स्मा. वि. शिखान्यास, मंत्रपुष्पांजलि, श्राद्धमंत्र**

नाभिं यज्ञानां सदनं रयीणां महामाहावमभि सं नवन्त ।
वैश्वानरं रथ्यमध्वराणां यज्ञस्य केतुं जनयन्त देवाः ॥

॥ ६-७-२ ॥

त्वद्विप्रो जायते वाज्यग्ने त्वद्वीरासो अभिमातिषाहः ।
वैश्वानर त्वमस्मासु धेहि वसूनि राजन् त्स्पृहयाय्याणि ॥

॥ ६-७-३ ॥

## रत्न २०२ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, वैश्वानर अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अहश्च कृष्णमहरर्जुनं च वि वर्तेते रजसी वेद्याभिः ।
वैश्वानरो जायमानो न राजाऽवातिरज्ज्योतिषाग्निस्तमांसि ॥

॥ ६-९-१ ॥

**श्रौ. वि. (व्यूळ्ह दशरात्र) आग्निमारुतशस्त्र-वैश्वानर निविद्धान**

नाहं तन्तुं न वि जानाम्योतुं न यं वयन्ति समरेऽतमानाः ।
कस्य स्वित् पुत्र इह वक्त्वानि परो वदात्यवरेण पित्रा ॥

॥ ६-९-२ ॥

## रत्न २०१ वें

द्युलोकाच्या शिरोभागीं असणारा, पृथ्वीवर जाणारा, मानवमात्रांचा हितकर्ता, प्रामुख्यानें यज्ञार्थ जन्मलेला, त्रिकालज्ञानी, सुंदर प्रकाशणारा, भक्तजनांचा पूज्य अतिथि, देवांच्या मुखस्थानीं असलेला, व भक्तांचें रक्षण करणारा अशा अग्निदेवास यज्ञपुरोहितांनीं अरणीपासून निर्माण केला. ( ६-७-१ ). यज्ञाचा बंधक, संपत्तीचें आगर, हविरन्नाचें मोठें निधान, एवंविध अग्निदेवाचें स्तोतृजन सभोंवतीं जमून स्तुतिस्तोत्र गायन करतात. लोकांचा हितकर्ता, रथीप्रमाणें यज्ञाचा नेता व यज्ञाचा ज्ञाता अशा अग्निदेवास ऋत्विजांनी मंथनद्वारा उत्पन्न केला. ( ६-७-२ ). हे अग्ने! तुला हवि अर्पण करणारा यजमान हा तुझ्यापासूनच ज्ञान प्राप्त करून घेतो आणि तुझ्या प्रसादानेंच शत्रूंचा पाडाव करणारे वीरपुरुष त्याला प्राप्त होतात. अतएव हे वैश्वानर अग्निदेवा! हे राजन्! तुझे भक्त जे आम्हीं त्या आम्हांला स्पृहणीय अशी धनपुत्रादि संपत्ति बहाल कर! (६-७-३).

## रत्न २०२ वें

कृष्णवर्ण रात्र व शुक्लवर्ण दिवस हीं द्यावापृथ्वीभर आलटून-पालटून फिरत असतात. वैश्वानर अग्नि हा प्रकट होतांच राजाप्रमाणें आपल्या प्रकाशानें अंधकाराचा नाश करतो! ( ६-९-१ ). यज्ञरूप वस्त्राचे उभे धागे कोणते तें मी जाणत नाही. आणि आडवे कोणते तेंहि जाणत नाहीं. इतकेंच काय, तर यज्ञकार्यात सतत दक्ष राहून ऋत्विजांनीं त्या उभ्या व आडव्या धाग्यांनीं विणून तयार केलेलें तें यज्ञरूपी वस्त्रहि पण मी जाणत नाहीं. ( ६-९-२ ).

स इत् तन्तुं स वि जानात्योतुं स वक्त्वान्यृतुथा वदाति ।
य ईं चिकेतदमृतस्य गोपा अवश्चरन् परो अन्येन पश्यन् ॥

॥ ६-९-३ ॥

अयं होता प्रथमः पश्यतेममिदं ज्योतिरमृतं मर्त्येषु ।
अयं स जज्ञे ध्रुव आ निषत्तोऽमर्त्यस्तन्वा३ वर्धमानः ॥

॥ ६-९-४ ॥

ध्रुवं ज्योतिर्निहितं दृशये कं मनो जविष्ठं पतयत्स्वन्तः ।
विश्वे देवाः समनसः सकेता एकं क्रतुमभि वि यन्ति साधु ॥

॥ ६-९-५ ॥

वि मे कर्णा पतयतो वि चक्षुर्वी३दं ज्योतिहृदय आहितं यत् ।
वि मे मनश्चरति दूर आधीः किं स्विद् वक्ष्यामि किमु नू मनिष्ये ॥

॥ ६-९-६ ॥

## रत्न २०३ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, वैश्वानर-देवता, प्रस्तार-पंक्ति-छंद**

विश्वे देवा अनमस्यन् भियानास्त्वामग्ने तमसि तस्थिवांसम् ।
वैश्वानरोऽवतूतये नोऽमर्त्योऽवतूतये नः ॥ ६-९-७ ॥

या यज्ञरूप वस्त्राचे उभे धागे कोणते व आडवे धागे कोणते हें तो वैश्वानर अग्निदेवच जाणतो. आणि जें जें सांगावयाचें तें तें तो वेळोवेळीं सांगत असतो ! हा वैश्वानर अग्नि उदकाचें रक्षण करणारा असून तोच या पृथ्वीवर संचार करीत असतो. आणि स्वर्गावर सूर्यरूपानें राहून जगावर नजर फिरवीत सर्वत्र पहात असतो. ( ६–९–३ ). हा वैश्वानर अग्निच आद्य होता आहे. अहो मनुष्य हो ! या वैश्वानर अग्निदेवाचें भक्तिपूर्वक दर्शन घ्या ! लक्षांत ठेवा कीं, या मरणधर्मीय शरीरामध्यें अमर अशी ही वैश्वानराख्य ज्योति तेवत आहे. हा अग्नि निश्चल व सर्वव्यापी असून मरणरहित असा आहे. तरी तो शरीर धारण करून जन्मतो व वर्धन पावतो. (६–९–४). हा वैश्वानर अग्नि निश्चल असून तसें म्हणाल तर मनापेक्षांहि तो वेगवान् आहे ! अशी ही दिव्य ज्योति प्रजापतीनें प्राणिमात्रांच्या अंतःकरणांत नीट स्थापन करून ठेविली आहे ! एकाच मनाचे व एकाच विचाराचे असे जे यज्ञ-पुरोहित आहेत, ते या प्रमुख व सत्कर्मकारक देवाचें विविध प्रकारें पूजन करतात. ( ६–९–५ ). या वैश्वानर देवाचे जे अनंत गुण आहेत, ते ऐकावयाची इच्छा करणारे माझे कान इकडे तिकडे धांवपळ करीत आहेत. तसेंच त्याचीं बहुविध रूपें पाहण्यासाठीं हपापलेले माझे डोळे सैरावैरा धांवत आहेत. त्या देवाचें यथार्थ ज्ञान करून घ्यावें म्हणून माझ्या अंतःकरणांत ठेविलेली बुद्धिरूप ज्योति सारखी चोहोंकडे वळत आहे. इतकेंच नव्हे, तर दूरदूरच्या विषयाचें ध्यान करणारें माझें मन देखील विविध प्रकारें चळवळ करीत आहे. याप्रमाणें अहमहमिकेनें माझीं इन्द्रियें धडपड करीत असतां त्या वैश्वानर देवाचें रूप कसें आहे हें मी काय सांगूं ? आणि मनानें तरी काय समजूं ? ( छे ! माझ्यासारख्या मंदबुद्धीला नाहींच तें जुळणार ) ! (६–९–६).

## रत्न २०३ वें

हे वैश्वानर अग्निदेवा ! अंधकारांत स्थित असलेल्या तुला पाहून त्या अंधकारानें भयभीत झालेले हे सर्व शाहणे ऋत्विज लोक तुला नमस्कार करीत आहेत ! अशा प्रकारचा हा वैश्वानर अग्निदेव आपल्या संरक्षणशक्तीनिशी आमचें रक्षण करो ! ( ६–९–७ ).

## रत्न २०४ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद**

समिद्धमग्निं समिधा गिरा गृणे शुचिं पावकं पुरो अध्वरे ध्रुवम् ।
विप्रं होतारं पुरुवारमद्रुहं कविं सुम्नैरीमहे जातवेदसम् ॥

॥ ६-१५-७ ॥

**श्रौ. वि. (दशरात्र) जातवेद-निविद्धान**

त्वां दूतमग्ने अमृतं युगेयुगे हव्यवाहं दधिरे पायुमीड्यम् ।
देवासश्च मर्तासश्च जागृविं विभुं विश्पतिं नमसा नि षेदिरे ॥

॥ ६-१५-८ ॥

विभूषन्नग्न उभयाँ अनु व्रता दूतो देवानां रजसी समीयसे ।
यत् ते धीतिं सुमतिमावृणीमहेऽध स्मा नस्त्रिवरूथः शिवो भव ॥

॥ ६-१५-९ ॥

अग्निर्होता गृहपतिः स राजा विश्वा वेद जनिमा जातवेदाः ।
देवानामुत यो मर्त्यानां यजिष्ठः स प्र यजतामृतावा ॥

॥ ६-१५-१३ ॥

**श्रौ. वि. (पत्नीसंयाज)-अनुवाक्या**

अग्ने विश्वेभिः स्वनीक देवैरूर्णावन्तं प्रथमः सीद योनिम् ।
कुलायिनं घृतवन्तं सवित्रे यज्ञं नय यजमानाय साधु ॥

॥ ६-१५-१६ ॥

**श्रौ. वि. (अग्निप्रणयन) अनुवाक्या**

## रत्न २०४ वें

समिधा अर्पून प्रज्वलित केलेल्या अग्निदेवाचें मी आतां स्तुतिस्तोत्र गातों. त्याचप्रमाणें जो स्वयंशुद्ध असून इतरांना पावन करणारा व निश्चल आहे, अशा त्या देवाला मी यज्ञांत अग्रभागीं स्थापन करतों. आणि मेधावी, होता, बहुजनप्रिय, द्रोहरहित, त्रिकालज्ञ व जातप्रज्ञ, अशा त्या अग्नि-देवाजवळ आम्हीं धन देण्याविषयीं प्रार्थना करतों. (६-१५-७). हे अग्ने ! अमर, हविर्वाहक, जगत्पालक व स्तुत्य अशा तुला देव व मनुष्य या दोघांनींहि आपापला प्रतिनिधि म्हणून नेमून घेतला आहे. आणि जागरण-शील, सर्वव्यापक, व लोकपालक, अशा तुझें हविरन्नानें पूजन करण्यांत येतें. ( ६-१५-८ ) हे अग्ने ! देव व मनुष्य या उभयतांनाहि विभूषित करणारा असा तूं यज्ञयागादि कर्मानुष्ठानांत देवांचा प्रतिनिधि होऊन द्यावा-पृथ्वीभर संचार करीत असतोस, आणि ज्या अर्थी आम्हीं तुझ्याप्रीत्यर्थ यज्ञकर्म व स्तुतिस्तोत्र इत्यादि करीत असतों त्या अर्थीं त्रैलोक्यांत असणारा तूं आम्हांस सुखकर हो ! ( ६-१५-९ ). देवांचा आमंत्रक असा तो अग्निराज आमच्या गृहांचा अधिपति आहे. तसाच तो जन्मतःच ज्ञानी असल्यामुळें हें सर्व भूतजात तो उत्तम जाणत असतो. देव व मनुष्य यांमध्यें तोच एक अत्यंत पूजनीय व सत्यव्रत असून, देवांना तो या यज्ञानुष्ठानांत संतृप्त करो ! (६-१५-१३). हे सुंदर ज्वालांनी सुमंडित असणाऱ्या अग्ने ! सर्व देवांत तूंच प्रमुख आहेस. अतएव सर्व देवांना बरोबर घेऊन या सुगंध-द्रव्यांपेत व घृतसमृद्ध अशा उत्तर वेदीवर विराजमान हो ! आणि या-प्रमाणें तूं विराजमान झालास म्हणजे मग हवि अर्पण करणाऱ्या या यजमानाचा यज्ञ आर्जवपूर्वक त्या त्या देवांना नेऊन पोंचव ! ( ६-१५-१६ ).

वयमु त्वा गृहपते जनानामग्ने अकर्म समिधा बृहन्तम् ।
अस्थूरि नो गार्हपत्यानि सन्तु तिग्मेन नस्तेजसा सं शिशाधि ॥
॥ ६-१५-१९ ॥

## रत्न २०५ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद**

अग्न आ याहि वीतये गृणानो हव्यदातये ।
नि होता सत्सि बर्हिषि ॥ ६-१६-१० ॥

**श्री. वि. (दर्शपूर्णिमास) सामिधेनी**

तं त्वा समिद्भिरङ्गिरो घृतेन वर्धयामसि ।
बृहच्छोचा यविष्ठ्य ॥ ॥ ६-१६-११ ॥
स नः पृथु श्रवाय्यमच्छा देव विवाससि ।
बृहदग्ने सुवीर्यम् ॥ ॥ ६-१६-१२ ॥
त्वामग्ने पुष्करादध्यथर्वा निरमन्थत ।
मूर्ध्नो विश्वस्य वाघतः ॥ ॥ ६-१६-१३ ॥

**श्री. वि. अग्निमंथन**

तमु त्वा दध्यङ्ङृषिः पुत्र ईधे अथर्वणः ।
वृत्रहणं पुरंदरम् ॥ ॥ ६-१६-१४ ॥
तमु त्वा पाथ्यो वृषा समीधे दस्युहन्तमम् ।
धनंजयं रणेरणे ॥ ॥ ६-१६-१५ ॥
सुवीरं रयिमा भर जातवेदो विचर्षणे ।
जहि रक्षांसि सुक्रतो ॥ ॥ ६-१६-२९ ॥

हे गृहपालक अग्निदेवा! सर्व लोकांमध्यें आम्हींच तुला समिधा अर्पण करून संवर्धन केलें आहे. आणि म्हणून, देवा! प्रार्थना ही कीं, आमचीं गृहकृत्यें पुत्रपशुधनादिकांनीं परिपूर्ण होवोत! आणि आम्हांस तीक्ष्ण तेजानें सुतेजस्वी कर! (६–१५–१९).

## रत्न २०५ वें

हे अग्निदेवा! हविभक्षणार्थ म्हणून तूं आमच्याकडे ये. तसेंच देवांना हवि पोंचविण्यासाठीं म्हणूनहि इकडे आगमन कर. आणि स्तविला जाणारा तूं येथें अंथरलेल्या दर्भासनावर येऊन होता होऊन बैस! (६–१६–१०). हे अङ्गिरसपुत्रा! तुला आम्ही लांकडें घालून व तूप ओतून संवर्धन करीत आहों; तर, हे अत्यंत तरुण देवा! तूं चांगला प्रकाशमान हो!(६-१६-११). हे तेजस्वी अग्ने! देणारच असशील तर आम्हांस विस्तीर्ण, प्रशस्त, महान् व वीर्यशाली असें धन आणून दे! (६–१६–१२). हे अग्ने! शिराप्रमाणें धारण करणाऱ्या व सर्व जगाला वाहून नेणाऱ्या पुष्करपर्णापासून अथर्वा ऋषीनें मंथनद्वारा तुला निर्माण केला. (६–१६–१३) त्याचप्रमाणें अथर्वणपुत्र दध्यङ् ऋषीनें शत्रूचा कर्दनकाळ व असुरपुराचा चक्काचूर करणारा अशा तुझें संदीपन केलें. (६–१६–१४). आणि त्याचप्रमाणें दस्यूचें मर्दन करणारा व युद्धांत शत्रूंची संपत्ति लुटणारा अशा तुला पाथ्यवृषा नामक ऋषीनें चांगलें प्रज्वलित केलें. (६–१६–१५). हे जातवेद अग्ने! हे विश्वद्रष्ट्या अग्ने! आतां आमची प्रार्थना ही कीं पुत्रपौत्रादिकांनीं युक्त असें सुंदर धन आम्हांसाठीं म्हणून घेऊन ये आणि हे सुकर्मन् देवा! आम्हांस त्रास देणाऱ्या राक्षसादिकांचा पार फडशा उडवून टाक! (६–१६–२९).

त्वं नः पाह्यंहसो जातवेदो अघायतः ।
रक्षा णो ब्रह्मणस्कवे ॥ ॥ ६-१६-३० ॥

यो नो अग्ने दुरेव आ मर्तो वधाय दाशति ।
तस्मान्नः पाह्यंहसः ॥ ॥ ६-१६-३१॥

त्वं तं देव जिह्वया परि बाधस्व दुष्कृतम् ।
मर्तो यो नो जिघांसति ॥ ॥ ६-१६-३२ ॥

आ यं हस्ते न खादिनं शिशुं जातं न बिभ्रति।
विशामग्निं स्वध्वरम् ॥ ॥ ६-१६-४० ॥

**श्रौ. वि. (अग्निमंथन) अनुवाक्या**

प्र देवं देववीतये भरता वसुवित्तमम् ।
आ स्वे योनौ नि षीदतु ॥ ॥ ६-१६-४१ ॥

**श्रौ. वि. (अग्निमंथन) प्रहरणकालीन मंत्र**

आ जातं जातवेदसि प्रियं शिशीतातिथिम् ।
स्योन आ गृहपतिम् ॥ ॥ ६-१६-४२ ॥

## रत्न २०६ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद**

आ ते अग्न ऋचा हविर्हृदा तष्टं भरामसि ।
ते ते भवन्तूक्षण ऋषभासो वशा उत ॥ ६-१६-४७ ॥

अग्निं देवासो अग्रियमिन्धते वृत्रहन्तमम् ।
येना वसून्याभृता तृळ्हा रक्षांसि वाजिना ॥ ६-१६-४८ ॥

पुनः आणखी, हे जातवेद अग्ने ! आमचें पापापासून रक्षण कर ! आणि तसेंच, हे मंत्रप्रेरका ! आमचें वाईट इच्छिणाऱ्या शत्रूपासूनहि आमचा बचाव कर ! ( ६-१६-३० ). फार काय सांगावें, देवा ! जो दुष्टबुद्धि मनुष्य आमच्यावर हत्यार चालवून आम्हांस चीत करूं पाहतो, अशा त्या दुर्जनापासून व दुरितापासूनहि आमचें रक्षण कर ! ( ६-१६-३१ ). अर्थात् उपरोक्त दुष्कर्म करणाऱ्या दुर्जनाला व आमचा घात करण्यास उद्युक्त झालेल्या शत्रूला तूं आपल्या प्रखर ज्वालेनें जाळून भस्म करून टाक ! ( ६-१६-३२ ). अहो अध्वर्यू हो ! धनवेत्त्या त्या अग्निदेवाला यज्ञसाधनार्थ म्हणून येथें आहवनीय अग्नी-कडे घेऊन या. तो आपल्या योग्य स्थानीं येऊन बसो ! (६-१६-४० ). नुकताच प्रकट झालेला, अतिथीप्रमाणें प्रिय व गृहाचा स्वामी, अशा त्या अग्नीला जातप्रज्ञ व सुखकर अशा आहवनीय अग्नींत आणून स्थापन करा ! ( ६-१६-४१ ). मंथनापासून उत्पन्न झालेल्या अशा त्या अग्निदेवाला जन्मलेल्या पुत्राप्रमाणें म्हणा अगर वाघासारख्या क्रूर प्राण्याप्रमाणें म्हणा, अध्वर्युलोक काळजीपूर्वक धारण करोत! हे ऋत्विज हो ! भक्तजनांच्या यज्ञ-यागादि मंगल कृत्याचा निष्पादक अशा त्या अग्निदेवाची आतां परिचर्या करा ! ( ६-१६-४२ ).

## रत्न २०६ वें

हे अग्निदेवा ! हा ऋग्रूप हवि आम्ही तुला अंतःकरणपूर्वक अर्पण करीत आहोंत. तर तुला तो हवि तरुण जवान बैलाप्रमाणें आणि वांझ गायीप्रमाणें सुसेवनीय असा होवो ! ( ६-१६-४७ ). असुरवृंदांनीं अप-हार करून नेलेली संपत्ति पुनः ज्यानें त्यांच्यापासून हरण करून परत आणली व ज्या प्रबल वीरानें यज्ञविरोधक राक्षसादिकांचा पार फन्ना उड-वून दिला, अशा त्या प्रमुख व शत्रुघातक अग्नीला देव प्रज्वलित करतात. ( ६-१६-४८ ).

## रत्न २०७ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

न यं जरन्ति शरदो न मासा न द्याव इन्द्रमवकर्शयन्ति ।
वृद्धस्य चिद् वर्धतामस्य तनूः स्तोमेभिरुक्थैश्च शस्यमाना ॥
॥ ६-२४-७ ॥

न वीळवे नमते न स्थिराय न शर्धते दस्युजूताय स्तवान् ।
अज्रा इन्द्रस्य गिरयश्चिदृष्वा गम्भीरे चिद् भवति गाधमस्मै ॥
॥ ६-२४-८ ॥

## रत्न २०८ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

नहि त्वा शूरो न तुरो न धृष्णुर्न त्वा योधो मन्यमानो युयोध ।
इन्द्र नकिष्ट्वा प्रत्यस्त्येषां विश्वा जातान्यभ्यसि तानि ॥
॥ ६-२५-५ ॥

## रत्न २०९ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

किमस्य मदे किम्वस्य पीताविन्द्रः किमस्य सख्ये चकार ।
रणा वा ये निषदि किं ते अस्य पुरा विविद्रे किमु नूतनासः ॥
॥ ६-२७-१ ॥

सदस्य मदे सद्वस्य पीताविन्द्रः सदस्य सख्ये चकार ।
रणा वा ये निषदि सत् ते अस्य पुरा विविद्रे सदु नूतनासः ॥
॥ ६-२७-२ ॥

## रत्न २०७ वें

ज्या इन्द्राला संवत्सर जीर्ण करूं शकत नाहींत, महिने क्षीण करूं शकत नाहींत आणि दिवस लहान करूं शकत नाहींत, अशा त्या प्रवृद्ध इन्द्र-देवाचें शरीर आमच्या स्तुतिस्तोत्रांनीं व शस्त्रांनीं गाइलें असतां संवर्धन पावो! ( ६–२४–७ ). आमच्याकडून स्तविला जाणारा इन्द्रदेव हा कसल्याहि बलाढ्य माणसाला नमत नाहीं! युद्धांत स्थिर राहून लढणाऱ्या वीरालाहि दाद देत नाहीं! त्याचप्रमाणें उत्साही व दस्यूप्रेरित यजमानाला-हि कसल्याच प्रकारची भीक घालीत नाहीं! इतकेंच काय, पण मोठमोठे पर्वत सुद्धां त्याला सुगमच होतात आणि अगाध अशा स्थानांत देखील त्याला थारा असा मिळतोच! (६–२४–८).

## रत्न २०८ वें

हे इन्द्रा! तुझ्याबरोबर कसलाहि योद्धा लढूं शकत नाहीं! कसलाहि क्रूर व घातकी मनुष्य झुंज घालूं शकत नाहीं! कसलाहि धाडसी मनुष्य धड टिकाव धरूं शकत नाहीं! या सर्व शूर व बलाढ्य लोकांमध्यें तुझ्या तोडीचा, देवा! खरोखर असा दुसरा कोणीच नाहीं! या सर्व लोकांचा तूं सणसणीत पराभव करणारा आहेस! ( ६–२५–५ ).

## रत्न २०९ वें

( भरद्वाज इंद्राविषयीं आक्षेप घेऊन म्हणतो-) सोमाच्या मदांत इन्द्रानें काय केलें? सोम पिऊन तरी त्यानें काय केलें? आणि सोमाच्या सहवासांत राहून तरी काय केलें? यज्ञगृहांत जे पूर्वींचे स्तोतृजन होते त्यांना तरी हे इन्द्रा? तुझ्यापासून काय मिळालें? नि आतांच्या स्तोत्यांना तरी काय फायदा झाला? ( ६–२७–१ ). ( भरद्वाजाची इच्छा इंद्रानें पूर्ण केल्यावर पुनः तोच वरील आक्षेपाचें पुढीलप्रमाणें निराकरण करतो.) इन्द्रानें सोमाच्या मदांत जें काय केलें तें चांगलेंच केलें! सोमपान केल्या-वरहि त्यानें शुभ असेंच केलें! त्या सोमाच्या सख्यांत देखील जें केलें तें सत्कर्मच केलें! जे स्तोते यज्ञगृहांत पूर्वी होते, त्यांनीं, हे इन्द्रा! तुझ्या-पासून शुभ गोष्टीच मिळविल्या आणि आतांचे स्तोते झाले तरी तुजपासून शुभ फलच प्राप्त करून घेते झाले! (६–२७–२ ).

नहि नु ते महिमनः समस्य न मघवन् मघवत्त्वस्य विद्म ।
न राधसोराधसो नूतनस्येन्द्र नकिर्ददृश इन्द्रियं ते ॥
॥ ६-२७-३ ॥

एतत् त्यत् त इन्द्रियमचेति येनावधीर्वरशिखस्य शेषः ।
वज्रस्य यत्ते निहतस्य शुष्मात् स्वनाच्चिदिन्द्र परमो ददार ॥
॥ ६-२७-४ ॥

वधीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन् ।
वृचीवतो यद्धरियूपीयायां हन् पूर्वे अर्धे भियसापरो दर्त् ॥
॥ ६-२७-५ ॥

त्रिंशच्छतं वर्मिण इन्द्र साकं यव्यावत्यां पुरुहूत श्रवस्या ।
वृचीवन्तः शरवे पत्यमानाः पात्रा भिन्दाना न्यर्थान्यायन् ॥
॥ ६-२७-६ ॥

यस्य गावावरुषा सूयवस्यू अन्तरू षु चरतो रेरिहाणा ।
स सृञ्जयाय तुर्वशं परादाद् वृचीवतो दैववाताय शिक्षन् ॥
॥ ६-२७-७ ॥

हे भगवन् ! तुझा जो महिमा आहे तो सगळा आम्ही खचित जाणूं शकत नाहीं! तुझ्या ऐश्वर्याचाहि आम्हांस थांग लागणें शक्य नाहीं ! स्तुत्य असें जें तुझें रत्नभांडार आहे तें सगळें समजणें, हें देखील आम्हांस साध्य नाही ! आणि त्यांतल्या त्यांत विशेष सांगावयाचें म्हणजे हें कीं,तुझें जें दिव्य सामर्थ्य आहे, तें तर, हे इन्द्रा ! कोणालाच आकलन होण्यासारखें नाहीं!(६–२७–३). मात्र ज्या सामर्थ्यानें तू वरशिखाच्या मुलांचा निःपात केलास तें तेवढें तुझें सामर्थ्य, हे इन्द्रदेवा ! आम्ही खात्रीनें ओळखितों. केवढा प्रभाव तो तुझा ! तूं जोरानें फेकलेल्या वज्राचा नुसता आवाज ऐकूनच त्या वरशिखाच्या मुलांतला एक अति बलाढ्य मुलगा पटकन् गत-प्राण होऊन धपकन् खालीं पडला कीं ! ( ६–२७–४). (त्याच्या परा-क्रमाचा आणखी एक मासला पहावयाचा असल्यास तर तो हा पहा ) चयमान राजाचा मुलगा अभ्यावर्ती नांवाचा असून त्याला या इन्द्रानें संपत्ति देऊन, त्या वरशिखाच्या हजारों पुत्रांना एकजात जमिनीवर लोळ-विलें ! हरियूपिया नदीच्या पूर्वभागीं उभे असलेल्या वृचीवान कुलोत्पन्न वरशिखाच्या हजारों पुत्रांचा त्यानें जेव्हां चक्काचूर केला, तेव्हां दुसऱ्या तीरावर उभा असलेला त्याचा ज्येष्ठ पुत्र, तो त्या इन्द्राचा अद्भुत पराक्रम पाहून नुसत्या धडकीनेंच गतप्राण होऊन खालीं आपटला ! (६–२७–५). हे बहुस्तुत इन्द्रा ! कीर्तीच्या लोभानें युद्धांत तुला हाणून पाडून आपण कीर्ति मिळवूं अशा घमेंडीत तुला मारण्यासाठीं तुझ्यावर चालून आलेले, यज्ञोपकरणांची फोडतोड करीत सुटलेले, व कवच धारण केलेले असे त्या वरशिखाचे तीन हजार वीरपुत्र त्या हरियूपिया नदीतीरावर बिचारे फुकट प्राणास मुकले ! देवा ! फुकट प्राणास मुकले ! ! ( ६–२७–६ ). शिवाय आणखी, त्या इन्द्रानें तुर्वश राजाचा पराभव करून त्याचा शत्रु जो सृंजय त्या सृंजयाच्या स्वाधीन त्यास केलें ! आणि वरशिखाच्या लोकांचा पराभव करून, त्यांची सगळी संपत्ति अभ्यावर्ती चायमानास बक्षीस म्हणून दिली ! त्या इन्द्राचे तेजस्वी, चांगल्या गवताची इच्छा करणारे व अत्यंत वेगानें धांवणारे असे जे घोडे आहेत, ते अंतरिक्षांतून संचार करीत असतात. (हा सर्व इन्द्राचा महिमा काय लहानसहान आहे ?) ( ६–२७–७ ).

द्वयाँ अग्ने रथिनो विंशतिं गा वधूमंतो मघवा मह्यं सम्राट्।
अभ्यावर्ती चायमानो ददाति दूणाशेयं दक्षिणा पार्थवानाम्॥
॥ ६-२७-८ ॥

## रत्न २१० वें

**बार्हस्पत्य भरद्वाज ऋषि, गो-देवता, त्रिष्टुप्-छंद**

आ गावो अग्मन्नुत भद्रमक्रन् त्सीदन्तु गोष्ठे रणयन्त्वस्मे।
प्रजावतीः पुरुरूपा इह स्युरिन्द्राय पूर्वीरुषसो दुहानाः॥
॥ ६-२८-१ ॥

**श्रौ. वि. गो-उपस्थान** **स्मा. वि. गो-स्तुति**

## रत्न २११ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, गो-देवता, जगती-छंद**

इन्द्रो यज्वने पृणते च शिक्षत्युपेद् ददाति न स्वं मुषायति।
भूयोभूयो रयिमिदस्य वर्धयन्नभिन्ने खिल्ये नि दधाति देवयुम्॥
॥ ६-२८-२ ॥

न ता नशन्ति न दभाति तस्करो नासामामित्रो व्यथिरा दधर्षति।
देवाँश्च याभिर्यजते ददाति च ज्योगित्ताभिः सचते गोपतिः
सह ॥ ६-२८-३ ॥

न ता अर्वा रेणुककाटो अश्नुते न संस्कृतत्रमुप यन्ति ता अभि।
उरुगायमभयं तस्य ता अनु गावो मर्तस्य वि चरन्ति यज्वनः॥
॥ ६-२८-४ ॥

( भरद्वाज हा अभ्यावर्ती चायमानाची दानस्तुति अग्नीपुढें पुढीलप्रमाणें करतो-) हे अग्ने! त्या धनवान् अशा पृथुकुलोत्पन्न अभ्यावर्ती चायमान सम्राटानें रथ, व स्त्रिया यांनीं युक्त अशा गाईच्या वीस जोडया मला दक्षिणा म्हणून दिल्या! ती ही दाक्षिणा कोणीहि नाश करूं शकणार नाहीं !! (६–२७–८).

## रत्न २१० वें

गायी आमच्या घरीं येवोत! आणि आमचें कल्याण करोत! त्या आमच्या गोठ्यांत बसोत आणि तेथेंच रममाण होवोत! नाना रूपाच्या अशा त्यांना आमच्या गोठ्यांतच पुष्कळ वांसरें होवोत आणि उषःकालीं इन्द्राप्रीत्यर्थ त्या नित्य दूध देणाऱ्या होवोत! ( ६–२८–१ ).

## रत्न २११ वें

इन्द्रदेव हा यजन करणाऱ्या व स्तुति करून त्यास प्रसन्न करणाऱ्या अशा यजमानाला धन देतो. आणि त्या यजमानाचें व स्तोत्याचें मालकीचें धन तो कधींहि अपहार करीत नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्याच्या खुद्द मालकीचें व आपण स्वतः दिलेलें असें उभयविध धन तो पुनः पुनः वाढवीतच असतो. आणि इन्द्रनिष्ठ भक्तजनांस शत्रूला अभेद्य अशा स्थानीं नेऊन ठेवितो. ( ६–२८–२ ). त्या गायी आमच्यापासून नष्ट न होवोत! चोर त्यांची हिंसा न करोत! शत्रूचें हत्यार त्यांजवर न चालो! ज्यांच्या साहाय्यानें देवांचें यजन करतात व ज्यांना इंद्राप्रीत्यर्थ अर्पण करतात, अशा गायींसह तो गोपति चिरकाल नांदो! ( ६–२८–३ ). आपल्या टापांनीं धूळ उडविणारा व युद्धार्थ निघालेला असा खंदा घोडा त्या गायी मिळवूं शकत नाहीं. तसेंच यज्ञानुष्ठानकर्मांतहि त्यांचे विच्छेदनादि संस्कार करण्यांत येत नाहींत. यजमानाच्या त्या गायी निर्भय अशा विशाल कुरणांत जाऊन यथेच्छ संचार करोत! ( ६–२८–४ ).

## रत्न २१२ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, गो-देवता, त्रिष्टुप्-छंद**

गावो भगो गाव इन्द्रो मे अच्छान् गावः सोमस्य प्रथमस्य भक्षः ।
इमा या गावः स जनास इन्द्र इच्छामीद्धृदा मनसा चिदिन्द्रम् ॥
॥ ६-२८-५ ॥

**श्रौ. वि. गो-उपस्थान** **स्मा. वि. गो-स्तुति**

यूयं गावो मेदयथा कृशं चिदश्रीरं चित् कृणुथा सुप्रतीकम् ।
भद्रं गृहं कृणुथ भद्रवाचो बृहद्वो वय उच्यते सभासु ॥
॥ ६-२८-६ ॥

प्रजावतीः सूयवसं रिशन्तीः शुद्धा अपः सुप्रपाणे पिबन्तीः ।
मा व स्तेन ईशत माघशंसः परि वो हेती रुद्रस्य वृज्याः ॥
॥ ६-२८-७ ॥

## रत्न २१३ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, गो-देवता, अनुष्टुप्-छंद**

उपेदमुपपर्चनमासु गोषूप पृच्यताम् ।
उप ऋषभस्य रेतस्युपेन्द्र तव वीर्ये ॥ ६-२८-८ ॥

## रत्न २१४ वें

**गर्ग भारद्वाज-ऋषि, सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद**

स्वादुष्किलायं मधुमाँ उतायं तीव्रः किलायं रसवाँ उतायम् ।
उतो न्व१स्य पपिवांसमिन्द्रं न कश्चन सहत आहवेषु ॥
॥ ६-४७-१ ॥

**श्रौ. वि. आग्निमारुत शस्त्र**

## रत्न २१२ वें

भगदेव आम्हांला गायी देवो ! इन्द्रदेव आम्हांला गायी देवो ! या गायी सोमाचे भक्ष्य होवोत ! हे जन हो ! या गायी म्हणजे इन्द्रच होत ! म्हणून मी श्रद्धायुक्त अंतःकरणानें त्या इन्द्रदेवाची इच्छा करतों. ( ६-२८-५ ). हे गायींनो ! जो कृश झाला आहे, त्यास तुम्ही पुष्ट करतां ! आणि जो निस्तेज पडला आहे त्याला सतेज बनवितां ! अहो मंगल-ध्वनि गोमातांनो ! तुम्ही आमचें घर मंगलमय कराना ! विद्वत्परिषदेंत तुमचें श्रेष्ठ अन्न असें प्रशंसिलें जातें. ( ६-२८-६ ). गायींनो ! तुम्ही सर्व सवत्स अशा व्हा ! भक्षणार्थ चांगलें गवत चरत जा ! आणि तलावांतील शुद्ध व निर्मल उदक प्राशन करा ! चोरादिकांची मात्रा तुमच्यावर न चालो ! आणि व्याघ्रादि दुष्ट प्राण्यांची सत्ताहि तुमच्यावर न गाजो ! आणि तसेंच रुद्रदेवाचें शस्त्रहि तुम्हांस सोडून दूर जावो ! ( ६-२८-७ ).

## रत्न २१३ वें

पाणी मारून तयार केलेलें हें सोमरसाचें मिश्रण या गायींच्या उदरांत जाऊन मिडूं दे ! तसेंच तें त्यांच्या गर्भाशयांतील वृषभाच्या रेताशींहि मिसळूं दे ! हे इन्द्रा ! तुझें शक्ति वाढविणारें असें जें त्या गायीच्या ठिकाणीं असणारें दूध त्या दुधांतहि तें मिश्रण जाऊन मिसळूं दे ! ( ६-२८-८ ).

## रत्न २१४ वें

हा नुकताच पिळून तयार केलेला सोमरस मोठा स्वादिष्ट असून, तितकाच तो मधुरहि पण आहे. आणि तसाच तो तीक्ष्ण असून अगदीं अर्कातला अर्क आहे ! अतएव त्याचें प्राशन करणाऱ्या इन्द्राला लढाईत पराभव करण्यास या साऱ्या त्रिभुवनांत असा कोणीच समर्थ नाहीं ! ( ६-४७-१ ).

अयं स्वादुरिह मदिष्ठ आस यस्येन्द्रो वृत्रहत्ये ममाद ।
पुरूणि यश्च्यौत्ना शम्बरस्य वि नवतिं नव च देह्यो३हन् ॥

॥ ६-४७-२ ॥

अयं मे पीत उदियर्ति वाचमयं मनीषामुशतीमजीगः ।
अयं षळुर्वीरमिमीत धीरो न याभ्यो भुवनं कच्चनारे ॥

॥ ६-४७-३ ॥

अयं स यो वरिमाणं पृथिव्या वर्ष्माणं दिवो अकृणोदयं सः ।
अयं पीयूषं तिसृषु प्रवत्सु सोमो दाधारोर्व१न्तरिक्षम् ॥

॥ ६-४७-४ ॥

अयं विदच्चित्रदर्शीकमर्णः शुक्रसद्मनामुषसामनीके ।
अयं महान् महता स्कम्भनेनोद् द्यामस्तम्नाद् वृषभो मरुत्वान् ॥

॥ ६-४७-५ ॥

इन्द्र मृळ मह्यं जीवातुमिच्छ चोदय धियमयसो न धाराम् ।
यत्किं चाहं त्वायुरिदं वदामि तज्जुषस्व कृधि मा देववन्तम् ॥

॥ ६-४७-१० ॥

## रत्न २१५ वें

**गर्ग भारद्वाज-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

त्रातारमिन्द्रमवितारमिन्द्रं हवेहवे सुहवं शूरमिन्द्रम् ।
ह्वयामि शक्रं पुरुहूतमिन्द्रं स्वस्ति नो मघवा धात्विन्द्रः ॥

॥ ६-४७-११ ॥

**श्रौ. वि. (आयुष्कामेष्टि)-पुरोनुवाक्या स्मा. वि. शांतिपाठ; इन्द्र-नमस्कार**

हा सोम प्राशन केला म्हणजे तो मोठा उत्साहवर्धक होतो. वृत्रहननाच्या वेळीं इंद्र हा तो सोम पिऊनच मोठा मत्त झाला! तो सोमच शम्बरासुराच्या असंख्य सेनेचा पार धुव्वा उडविता झाला आणि त्या असुराचीं नव्याण्णव पुरेंहि त्यानेंच अखेर धुळींत मिसळलीं! ( ६–४७–२ ). हा सोम प्राशन केला म्हणजे माझी वाचा स्फुरण पावते आणि सुंदर बुद्धि उजळूं लागते! ज्याच्या पलीकडे भूतजात असें कांहींच असूं व राहूं शकत नाहीं, अशा द्यावापृथिव्यादि सहा घटकांस या बुद्धिमान् सोमानेंच उत्पन्न केलें! ( ६–४७–३ ). ज्यानें ही पृथ्वी विशाल केली आणि द्युलोक दृढ धरला तो म्हणजे खरोखर हा सोमच होय! तो सोमच ओषधींत, उदकांत व गायींत मधुर रसाची उत्पत्ति करतो आणि अंतरिक्ष लोक सावरून धरतो! ( ६–४७–४ ). विचित्रस्वरूप व विश्वप्रेरक अशा सूर्यदेवास निर्मल अंतरिक्षांत राहणाऱ्या उषांच्या उदयकालीं हा सोमच प्राप्त करून घेता झाला. मरुतांनीं युक्त असा तो प्रौढ व वृष्टिजनक सोमच अंतरिक्षाचा मोठा धीरा देऊन द्युलोकाला उंच आकाशांत स्थापन करता झाला. ( ६–४७–५ ). हे इन्द्रदेवा! आम्हांस सुखी ठेव! आणि आम्हांस जिवंत राहण्यासाठीं औषध देण्याची कृपा कर! आमची बुद्धि तलवारीच्या धारेप्रमाणें सुतीक्ष्ण कर! तुझी इच्छा करणारा मी जें कांहीं आतां बरेंवाईट बोलेन त्याचा स्वीकार करून मला देवांनीं युक्त असें कर! ( ६–४७–१० ).

## रत्न २१५ वें

शत्रूपासून आमचा बचाव करणाऱ्या इन्द्रदेवाला मी बोलावतों. मनोरथ पूर्ण करणाऱ्या इन्द्रदेवाला मी हांक मारतों. आमंत्रणप्रसंगीं हाक मारण्यास अति सुलभ, त्याचप्रमाणें शूर, सर्वसमर्थ, बहुजनस्तुत, अशा इन्द्रदेवास मी पाचारण करतों. तो भगवान् इन्द्र आमचें कल्याण करो! (६–४७–११ ).

इन्द्रः सुत्रामा स्ववाँ अवोभिः सुमृळीको भवतु विश्ववेदाः ।
बाधतां द्वेषो अभयं कृणोतु सुवीर्यस्य पतयः स्याम ॥

॥ ६-४७-१२ ॥

तस्य वयं सुमतौ यज्ञियस्याऽपि भद्रे सौमनसे स्याम ।
स सुत्रामा स्ववाँ इन्द्रो अस्मे आराच्चिद् द्वेषः सनुतर्युयोतु ॥

॥ ६-४७-१३ ॥

रूपं रूपं प्रतिरूपो बभूव तदस्य रूपं प्रतिचक्षणाय ।
इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते युक्ता ह्यस्य हरयः शता दश ॥

॥ ६-४७-१८ ॥

## रत्न २१६ वें

**गर्ग भारद्वाज-ऋषि, रथ-देवता, त्रिष्टुप्-छंद**

वनस्पते वीड्वङ्गो हि भूया अस्मत्सखा प्रतरणः सुवीरः ।
गोभिः सन्नद्धो असि वीळयस्वाऽऽस्थाता ते जयतु जेत्वानि ॥

॥ ६-४७-२६ ॥

## रत्न २१७ वें

**गर्ग भारद्वाज-ऋषि, रथ-देवता, जगती-छंद**

दिवस्पृथिव्याः पर्योज उद्भृतं वनस्पतिभ्यः पर्याभृतं सहः ।
अपामोज्मानं परि गोभिरावृतमिन्द्रस्य वज्रं हविषा रथं यज ॥

॥ ६-४७-२७ ॥

उत्तम प्रकारें रक्षण करणारा व धनसंपन्न असा तो इन्द्र-देव आपल्या संरक्षणशक्तीनिशी आम्हांस सर्वोत्तम सुख देणारा होवो! त्याचप्रमाणें सर्वज्ञ असा तो आमचा द्वेष करणाऱ्यांची चांगली भुसंडी वळो! आणि आम्हांस भयरहित करो! अर्थात् आम्ही त्याच्या प्रसादानें सर्वोत्कृष्ट सामर्थ्याचे धनी होऊं! ( ६–४७–१२ ). एकंदरींत तात्पर्य काय, तर आम्हीं त्या पूजनीय इन्द्रदेवाच्या सुप्रसन्न मर्जींत व त्याच्या कल्याणकारक कृपाबुद्धींत रहावें असें घडो! सर्व प्रकारें रक्षण करणारा तो भगवान् इन्द्रदेव आमच्या द्वेष्टयांना दूरच्या दूर डांबून तेथें त्यांचा फडशा पाडो! ( ६–४७–१३ ). हा इन्द्र प्रत्येक रूपाचा प्रतिनिधि होत्साता, तें तें अग्न्यादि देवतास्वरूप धारण करता झाला. इन्द्राचें तें हें देवतांचें विविध स्वरूप हा अग्नि, हा विष्णु, हा रुद्र असें पृथक् पृथक् निदर्शन करण्यासाठींच आहे. अर्थात् हा इन्द्रदेवच आपल्या मायाशक्तीनें भक्तांच्या इच्छेप्रमाणें विविध रूपें धारण करून, एकाच वेळीं त्यांच्या त्यांच्या घरीं जात असतो. आणि यासाठीं रथास जोडून ठेविलेले त्याचे हजारों घोडे सदैव सज्ज असतात. ( ६–४७–१८ ).

### रत्न २१६ वें

हे वृक्षापासून बनलेल्या रथा! चांगला बळकट हो! आम्हांस साह्य करणारा असा हो! आणि पराक्रमी वीरांनीं युक्त होऊन आमचा बचाव करणारा हो! तुझ्यावर चढून लढाई करणारा आमचा शूर वीर संग्रामांत विजय मिळवो! ( ६–४७–२६ ).

### रत्न २१७ वें

हा रथ म्हणजे द्युलोक व पृथ्वी यांच्या सारभूतापासून उत्पन्न झालेलें जें तेज आहे, तद्रूप आहे. वृक्षापासून त्यास चांगला चिवटपणा प्राप्त झालेला असून, पाण्याप्रमाणें तो मोठा वेगवान् आहे. शिवाय त्याला बैलाच्या चामडयानें सभोंवताली चांगला आवळून काढला आहे. अर्थात् हा रथ म्हणजे इन्द्राच्या वज्राचा एक भाग असून, अशा त्या रथ-देवतेला, हे अध्वर्यो! आतां तूं हविर्भाग अर्पण कर! ( ६–४७–२७ ).

## रत्न २१८ वें

गर्ग भारद्वाज-ऋषि, रथ-देवता, त्रिष्टुप्-छंद

इन्द्र॑स्य वज्रो॑ म॒रुता॒मनी॑कं मि॒त्रस्य॒ गर्भो॒ वरु॑णस्य॒ नाभिः॑ ।
सेमां नो॑ ह॒व्यदा॑तिं जुषा॒णो देव॑ रथ॒ प्रति॑ ह॒व्या गृ॑भाय ॥

॥ ६-४७-२८ ॥

## रत्न २१९ वें

गर्ग भारद्वाज-ऋषि, दुंदुभि-देवता, त्रिष्टुप्-छंद

उप॑ श्वासय पृथि॒वीमु॒त द्यां पु॑रु॒त्रा ते॑ मनु॒तां विष्ठि॑तं॒ जग॑त् ।
स दु॑न्दुभे स॒जूरिन्द्रे॑ण दे॒वैर्दू॒राद् दवी॑यो॒ अप॑ सेध॒ शत्रू॑न् ॥

॥ ६-४७-२९ ॥

आ क्र॑न्दय॒ बल॒मोजो॑ न॒ आ धा॒ निः ष्ट॑निहि दु॒रि॒ता बाध॑मानः ।
अप॑ प्रोथ दुन्दुभे दु॒च्छुना॑ इ॒त इन्द्र॑स्य मु॒ष्टिर॑सि वी॒ळय॑स्व ॥

॥ ६-४७-३० ॥

## रत्न २२० वें

गर्ग भारद्वाज-ऋषि, इन्द्र-देवता, जगती-छंद

आमूर॑ज प्र॒त्याव॑र्तये॒मा: के॑तु॒मद् दु॑न्दु॒भिर्वा॑वदीति ।
सम॑श्वप॑र्णा॒श्चर॑न्ति नो॒ नरो॒ऽस्माक॑मिन्द्र र॒थिनो॑ जयन्तु ॥

॥ ६-४७-३१ ॥

## रत्न २१८ वें

हा रथ म्हणजे इन्द्राचें जणुं कांहीं वज्रच आहे ! मरुताच्या सैन्याप्रमाणें तो शीघ्रगामी आहे. दिवसा सूर्यप्रकाशांत तो संचार करतो आणि वरुण ज्याची देवता आहे अशा रात्रीच्या वेळीं नाभीप्रमाणें स्थिर राहतो. हे रथ-देवा ! आमच्या या यागानुष्ठानाचा तूं सेवन करणारा होत्साता, आम्हीं दिलेल्या हविर्भागाचा स्वीकार कर! ( ६–४७–२८ ).

## रत्न २१९ वें

हे दुंदुभे ! पृथ्वी व द्युलोक यांना तूं आपल्या रणगंभीर आवाजानें निनादून सोड ! 'सर्व स्थावरजंगम सृष्टीला तुझी गर्जना खडखडून ओळखूं येऊं दे ! हे दुंदुभे ! इन्द्र व देव यांसह तूं आमच्या शत्रूंना दूर दूर-अत्यंत दूर-पिटाळून लाव ! ( ६–४७–२९ ). हे दुंदुभे ! आमच्या शत्रूंना घळघळीत रडावयास लाव ! आमच्यांत व आमच्या सैनिकांत बल व उत्साह उत्पन्न कर ! आमच्या संकटाचा परिहार करीत, सारखा तूं गंभीर गर्जना करीत रहा ! आणि आम्हांला छळणाऱ्या व दुःख देणाऱ्या शत्रूंना पार येथून पिटाळून लाव ! तूं इन्द्राच्या वज्रमुष्टीप्रमाणें शत्रुहंता आहेस. अतएव आमच्यांत जोम उत्पन्न कर ! ( ६–४७–३० ).

## रत्न २२० वें

हे इन्द्रा ! शत्रूच्या गायी आमच्याकडे वळीव व त्यांनीं हरण करून नेलेल्या आमच्या गायी परत आम्हांकडे आण ! हा दुंदुभि सर्वांस ऐकूं जाईल असा गंभीर आवाज करतो आहे. हें पहा, आमचे शूर घोडेस्वार शत्रूंशीं लढण्यांत आतां रंगून गेले. तर, हे इन्द्रदेवा ! त्या आमच्या रणगाजी वीरांना शत्रूंवर विजय प्राप्त होईल असें कर ! ( ६–४७–३१).

## रत्न २२१ वें

**ऋजिश्वा भारद्वाज-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

ते नो रायो द्युमतो वाजवतो दातारो भूत नृवतः पुरुक्षोः ।
दशस्यन्तो दिव्याः पार्थिवासो गोजाता अप्या मृळता च देवाः ॥
॥ ६-५०-११ ॥

## रत्न २२२ वें

**ऋजिश्वा भारद्वाज-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मा नो वृकाय वृक्ये समस्मा अघायते रीरधता यजत्राः ।
यूयं हि ष्ठा रथ्यो नस्तनूनां यूयं दक्षस्य वचसो बभूव ॥
॥ ६-५१-६ ॥

मा व एनो अन्यकृतं भुजेम मा तत्कर्म वसवो यच्चयध्वे ।
विश्वस्य हि क्षयथ विश्वेदेवाः स्वयं रिपुस्तन्वं रीरिषीष्ट ॥
॥ ६-५१-७ ॥

नम इदुग्रं नम आ विवासे नमो दाधार पृथिवीमुत द्याम् ।
नमो देवेभ्यो नम ईश एषां कृतं चिदेनो नमसा विवासे ॥
॥ ६-५१-८ ॥

## रत्न २२३ वें

**ऋजिश्वा भारद्वाज-ऋषि, विश्वेदेव-देवता, अनुष्टुप्-छंद**

अपि पन्थामगन्महि स्वस्तिगामनेहसम् ।
येन विश्वाः परि द्विषो वृणक्ति विन्दते वसु ॥ ६-५१-१६ ॥

**श्रौ. वि. प्रवासांतून आल्यावर जपावयाचा मंत्र**

## रत्न २२१ वें

हे देवहो ! तेजस्वी, बलसंपन्न, संततियुक्त व बहुजनस्तवनीय असें सुंदर धन तुम्ही आम्हांस देणारे व्हा ! आणि आमचे मनोरथ पूर्ण करणारे असे स्वर्गजात आदित्य, भूजात वसु, वाग्जात मरुत् आणि अंतरिक्षजात रुद्र, हे सर्व देवहो ! तुम्हीं आम्हांस सुखी करा ! (६–५०–११ ).

## रत्न २२२ वें

हे पूजनीय देवहो ! तुम्ही आमच्या शरीराचे, बलाचे आणि वाणीचे नेते आहांत. तर, विनंति ही कीं, तुम्ही आम्हांला हिंसा करणाऱ्या चोराच्या किंवा त्याच्या स्त्रीच्या हवाली करूं नका ! आणि त्याचप्रमाणें आमचे जे अहित चिंतणारे शत्रू आहेत, त्या सर्व दुष्टजनांच्या स्वाधीनहि पण आम्हांस देऊं नका ! ( ६–५१–७ ). हे देवहो ! दुसऱ्यांनीं केलेल्या पापाचीं फळें भोगण्याचा प्रसंग आम्हांवर न येवो ! हे वसूंनो ! जें पाप केलें असतां आम्हांस बाधक होईल तें पाप आमच्या हातून न घडो ! हे विश्वेदेवहो ! या सर्व जगताचे तुम्ही स्वामी आहां. म्हणून आमचा जो शत्रु आहे तो आपला आपण होऊनच नाश करून घेईल, असें करा ! ( ६–५१–८ ). नमस्कार हा सर्वांत श्रेष्ठ आहे. म्हणून मी नमस्कार आचरतों. हा नमस्कारच पृथ्वी व द्युलोक यांस धारण करतो. म्हणून मी देवांना हा नमस्कार करतों. या देवांना केलेला हा नमस्कार मोठा समर्थ आहे. प्रत्यक्ष केलेलें असें पाप जरी असलें तरी तें सुद्धां या नमस्काराच्या योगानें मी विलयास नेतों. ( ६–५१–१६ ).

## रत्न २२३ वें

सुखानें जातां येणाऱ्या व उपद्रवरहित अशा सरळ मार्गावर आम्ही प्राप्त झालों आहों, कीं ज्या मार्गानें गेलें असतां दुष्ट लोक टाळले जातात व धनाची प्राप्तिहि होते. (६–५१–१६).

## रत्न २२४ वें

**ऋजिश्वा भारद्वाज-ऋषि, विश्वेदेव-देवता, गायत्री-छंद**

विश्वे देवास आ गत शृणुता म इमं हवम् ।
एदं बर्हिर्नि षीदत ॥ ६-५२-७ ॥

**श्रौ. वि.** (आग्रयणेष्टि) वैश्व देव-चरु-अनुवाक्या. **स्मा. वि.** देवतर्पण; ब्रह्मयज्ञ, विश्वेदेव-आवाहन

## रत्न २२५ वें

**ऋजिश्वा भारद्वाज-ऋषि, विश्वदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

विश्वे देवाः शृणुतेमं हवं मे ये अन्तरिक्षे य उप द्यवि ष्ठ ।
अग्निजिह्वा उत वा यजत्रा आसद्यास्मिन् बर्हिषि मादयध्वम् ॥
॥ ६-५२-१३ ॥

**श्रौ. वि.** (वैश्वदेवशस्त्र) याज्या **स्मा. वि.** विश्वेदेव-जप

## रत्न २२६ वें

**ऋजिश्वा भारद्वाज-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद**

विश्वे देवा मम शृण्वन्तु यज्ञिया उभे रोदसी अपां नपाच्च मन्म ।
मा वो वचांसि परिचक्ष्याणि वोचं सुम्नेष्विद् वो अन्तमा मदेम ॥
॥ ६-५२-१४ ॥

## रत्न २२७ वें

**ऋजिश्वा भारद्वाज-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

ये के च ज्मा महिनो अहिमाया दिवो जज्ञिरे अपां सधस्थे ।
ते अस्मभ्यमिषये विश्वमायुः क्षप उस्रा वरिवस्यन्तु देवाः ॥
॥ ६-५२-१५ ॥

**श्रौ. वि.** (आग्रयणेष्टि) वैश्वदेव याज्या

## रत्न २२४ वें

हे विश्वेदेवहो ! येथें या अनुष्ठानांत या, आमची प्रार्थना ऐका आणि या कुशासनावर बसा. ( ६–५२–७ ).

## रत्न २२५ वें

अहो विश्वेदेवहो ! अंतरिक्षांत राहणारे असे जे तुम्ही आहां, तसेंच स्वर्गामध्यें राहणारे असे जे आहां, अग्नि हा ज्यांच्या मुखस्थानीं आहे आणि जे तुम्ही अत्यंत पूज्य आहां, असे ते सर्व तुम्ही माझी प्रार्थना ऐका. कृपा करून येथें या दर्भासनावर येऊन बसा आणि आमची सेवा गोड मानून घ्या ! ( ६–५२–१३ ).

## रत्न २२६ वें

पूजार्ह असे हे विश्वेदेव, तसेंच अंतरिक्ष व पृथ्वी हे उभय लोक आणि अंतरिक्षांतील अग्निदेव हे सर्व आमचें स्तोत्र श्रवण करोत ! हे देवहो ! तुम्हांस मानवत नसलेलीं स्तोत्रें आम्ही कांहीं म्हणणार नाहीं. अतएव आम्ही तुमच्या अत्यंत जवळ राहणारे असे होत्साते, तुम्हीं दिलेल्या सुखा-समाधानांतच राहून आनंद मानूं. ( ६–५२–१४ ).

## रत्न २२७ वें

महान् असे जे कोणी अहिप्रज्ञ देव या पृथ्वीमध्यें जन्मले आहेत, तसेंच जे कोणी स्वर्गापासून जन्मले आहेत आणि जे कोणी अंतरिक्षापासून झाले आहेत, असे ते सर्व देव मुलांबाळांसहित आम्हांला उदंड आयुष्य, सर्व रात्री व सर्व दिवस–अर्थात् सदा सर्वकाल–देवोत ! ( ६–५२–१५ ).

## रत्न २२८ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, पूषा-देवता, गायत्री-छंद.**

वयमु त्वा पथस्पते रथं न वाजसातये ।
धिये पूषन्नयुज्महि ॥ ६-५३-१ ॥

**श्रौ. वि. धनेच्छु प्रवाशानें करावयाचा जप**

अभि नो नर्यं वसु वीरं प्रयतदक्षिणम् ।
वामं गृहपतिं नय ॥ ५-५३-२ ॥
अदित्सन्तं चिदाघृणे पूषन् दानाय चोदय ।
पणेश्चिद् वि म्रदा मनः ॥ ६-५३-३ ॥
वि पथो वाजसातये चिनुहि वि मृधो जहि ।
साधन्तामुग्र नो धियः ॥ ६-५३-४ ॥
परि तृन्धि पणीनामारया हृदया कवे ।
अथेमस्मभ्यं रन्धय ॥ ६-५३-५ ॥
उत नो गोषणिं धियमश्वसां वाजसामुत ।
नृवत् कृणुहि वीतये ॥ ६-५३-१० ॥

## रत्न २२९ वें

**बार्हस्पत्य भारद्वाज-ऋषि, सरस्वती-देवता, जगती-छंद**

इयमदाद् रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे ।
या शश्वन्तमाचखादावसं पणिं ता ते दात्राणि तविषा सरस्वति ॥
॥ ६-६१-१ ॥

**श्रौ. वि. (पृष्ठ्य षळह) प्रउगशस्त्र** **स्मा. वि. देवी-सूक्त**

## रत्न २२८ वें

हे पूषन्! हे मार्गरक्षक देवा! युद्धांत जसा रथ जोडतात त्याप्रमाणें आम्ही तुला यज्ञयागार्थ व अन्नलाभार्थ येथें जोडीत आहों. (६-५३-१), हे पूषन् देवा! आम्हां मनुष्यांना हितकर असें धन प्राप्त व्हावें म्हणून दारिद्र्य नष्ट करणारा, व शुद्ध धन असलेला अशा उदार गृहपतीकडे तूं आम्हांस घेऊन जा! (६-५३-२). हे तेजस्वी पूषन्! दान देण्याची प्रवृत्ति नसलेल्या कवडीचुंबकालाहि तूं आम्हांस धन देण्याविषयीं प्रेरणा कर! पणीसारख्या महालोभी मनुष्याचें देखील मन तूं आम्हांविषयीं मृदु होईल असें कर! (६-५३-३). हे सामर्थ्यसंपन्न पूषन्! आम्हांस अन्न लाभेल असे मार्ग तूं शोधून काढ! तसेंच वाटमाऱ्या लुटारूंसारख्या दुष्ट लोकांना ठार कर! आणि आमचें अन्न मिळवावयाचे प्रयत्न सर्व सिद्धीस जावोत! (६-५३-४). हे ज्ञानी पूषन्! पणीसारख्या कंजूष लोकांचीं जीं कठोर हृदयें आहेत तीं शस्त्राच्या तीक्ष्ण टोंकानें भोसकून काढ! आणि मग अशा लोभ्यांना आमच्यासाठीं वश करून घे! (६-५३-५). फार काय सांगूं! हे पूषन्! हे देवा! गायी, घोडे व अन्न देणारी व आम्हां भक्तजनांवर प्रेम करणारी अशी उदार बुद्धि तूं आमच्या प्रपंचोपभोगार्थ धारण कर! (६-५३-१०).

## रत्न २२९ वें

जिनें काळ्याकभिन्न व केवळ स्वार्थपरायण अशा पणीचें निर्मूलन केलें अशी ती ही सरस्वती देवी आपल्या वध्र्यश्व नामक सद्भक्ताला बलशाली व ऋणविमोचक असा दिवोदास नांवाचा पुत्र देती झाली. हे सरस्वति! हे देवि! अशा प्रकारच्या तुझ्या देणग्या आम्हा मर्त्यांना खरोखर महत्त्वाच्या अशाच आहेत. नाहीं असें कोण म्हणेल? (६-६१-१).

इयं शुष्मेभिर्बिसखा इवारुजत् सानु गिरीणां तविषेभिरूर्मिभिः ।
पारावतघ्नीमवसे सुवृक्तिभिः सरस्वतीमा विवासेम धीतिभिः ॥
॥ ६-६१-२ ॥

सरस्वति देवनिदो नि बर्हय प्रजां विश्वस्य बृसयस्य मायिनः ।
उत क्षितिभ्योऽवनीरविन्दो विषमेभ्यो अस्रवो वाजिनीवति ॥
॥ ६-६१-४ ॥

## रत्न २३० वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, सरस्वती-देवता, गायत्री-छंद**

प्र णो देवी सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती ।
धीनामवित्र्यवतु ॥ ६-६१-४ ॥

**श्रौ. वि. (समूळ्ह दशरात्र) प्रउगशस्त्र** **स्मा. वि. देवीसूक्त**

यस्त्वा देवि सरस्वत्युपब्रूते धने हिते ।
इन्द्रं न वृत्रतूर्ये ॥ ६-६१-५ ॥

त्वं देवि सरस्वत्यवा वाजेषु वाजिनि ।
रदा पूषेव नः सनिम् ॥ ६-६१-६ ॥

उत स्या नः सरस्वती घोरा हिरण्यवर्तनिः ।
वृत्रघ्नी वष्टि सुष्टुतिम् ॥ ६-६१-७ ॥

यस्या अनन्तो अह्रुतस्त्वेषश्चरिष्णुरर्णवः ।
अमश्चरति रोरुवत् ॥ ६-६१-८ ॥

कमळाचें मूळ उपटून टाकणाऱ्याप्रमाणें ही सरस्वती नदी आपल्या सामर्थ्यांनी व प्रचंड लाटांनीं तीरावर असलेले पर्वताचे कडे धडाधड ढासळून खालीं पाडते ! अशा या पर्वतांचा सप्पा उडविणाऱ्या सरस्वतीची तिचा अनुग्रह व्हावा म्हणून आम्ही सुंदर स्तोत्रें गाऊन व ध्याननिष्ठ राहून उपासना करतों. ( ६–६१–२ ). हे सरस्वति ! देवांची निंदा करणारे असे जे नास्तिक असुर आहेत, त्यांना ठार मार आणि आक्रमक व मायावी अशा त्या त्वष्टयाच्या वृत्रासुर नामक मुलाला चीत कर ! हे अन्नसंपन्न सरस्वति ! तूं आम्हां मनुष्यांसाठीं पृथ्वी मिळविलीस आणि त्यांच्यासाठीं म्हणून मधुर उदक वहावलेंस ! ( ६–६१–३ ).

## रत्न २३० वें

अन्नसमृद्ध व स्तोतृजनांची रक्षणकर्त्री ही सरस्वती देवी अन्न देऊन आमचें रक्षण करो ! ( ६–६१–४ ). हे सरस्वति देवि ! जो भक्त धनाच्या निमित्तानें संग्रामसमर्था इन्द्राप्रमाणेंच तुझीहि स्तुति करतो, त्याचें तूं रक्षण कर ! ( ६–६१–५ ). हे सामर्थ्यसंपन्न देवि ! हे सरस्वति ! युद्धांत तूं आमचें रक्षण तर करच ! शिवाय आणखी, पूषाप्रमाणें तूं आम्हांस उपभोगण्यास योग्य असें धनहि दे ! ( ६–६१–६ ). ही सरस्वती म्हणजे शत्रूंना मोठी भयंकर आहे ! तिचा रथ सोन्याचा आहे ! शत्रूंना ती ठार मारणारी आहे ! अशी ही सरस्वती आमच्या स्तोत्राची इच्छा करो ! ( ६–६१–७ ) या सरस्वतीचें सामर्थ्य म्हणजे अनंत आहे! अजिंक्य आहे ! तिच्या प्रवाहाचा वेग अप्रतिहत असून,तो तितकाच प्रभूतजलाहि आहे! तो जात असतां मोठमोठ्यानें गर्जना करीतच जात असतो. ( ६–६१–८ ).

सा नो विश्वा अति द्विषः स्वसॄरन्या ऋतावरी ।
अतन्नहेव सूर्यः ॥ ६-६१-९ ॥
उत नः प्रिया प्रियासु सप्तस्वसा सुजुष्टा ।
सरस्वती स्तोम्या भूत् ॥ ६-६१-१० ॥
आपप्रुषी पार्थिवान्युरु रजो अन्तरिक्षम् ।
सरस्वती निदस्पातु ॥ ६-६१-११ ॥
त्रिषधस्था सप्तधातुः पञ्च जाता वर्धयन्ती ।
वाजेवाजे हव्याभूत् ॥ ६-६१-१२ ॥

## रत्न २३१ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, सरस्वती-देवता, जगती-छंद**

प्र या महिम्ना महिनासु चेकिते द्युम्नेभिरन्या अपसामपस्तमा ।
रथ इव बृहती विभ्वने कृतोपस्तुत्या चिकितुषा सरस्वती ॥
॥ ६-६१-१३ ॥

**स्मा. वि. सरस्वती-सूक्त; देवीसूक्त**

## रत्न २३२ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, सरस्वतीदेवता, त्रिष्टुप्-छंद**

सरस्वत्यभि नो नेषि वस्यो माप स्फरीः पयसा मा न आ धक् ।
जुषस्व नः सख्या वेश्या च मा त्वत् क्षेत्राण्यरणानि गन्म ॥
॥ ६-६१-१४ ॥

**श्रौ. वि. सारस्वत याज्या** **स्मा. वि. देवीसूक्त**

अशी ती ही सरस्वती आमच्या सर्व द्वेष्टयांना अति दूर पिटाळून लावो ! सतत गमन करणारा सूर्य जसा दिवसाचें तीव्र आक्रमण करीत जातो, तद्वत् उदकानें तुडुंब वाहणाऱ्या या सरस्वतीच्या बहिणी ज्या गंगादि नद्या त्या आमच्या शत्रूंना दूर हुसकावून लावोत ! (६–६१–९). आम्हांला सर्व प्रियांतील अत्यंत प्रिय, गंगाप्रभृति सात नद्यांची बहीण, आणि पुरातन ऋषींकडून सेविली गेलेली, अशी ही सरस्वती आम्हांलाहि प्रशंसनीय होवो ! ( ६–६१–१० ). विस्तीर्ण असा पार्थिव लोक आणि अंतरिक्ष लोक यांना आपल्या तेजानें भरून काढणारी अशी ही सरस्वती आमचें लोकनिंदेपासून रक्षण करो ! ( ६–६१–११ ). ही सरस्वती तीनहि लोकांत राहणारी असून, तिला गंगादि सात नद्या अवयवभूत आहेत. ती पांचहि मानवजातीचा उत्कर्ष करणारी आहे. अशा सरस्वतीचा सर्व संग्रामकाळीं धांवा करणें हें योग्य आहे. ( ६–६१–१२ ).

## रत्न २३१ वें

नद्यांमध्यें जी माहात्म्यानें मोठी व अन्नांनीं सुसमृद्ध आहे म्हणून प्रामुख्यानें ओळखली जाते, आणि जी इतर वेगवान् नद्यांमध्यें अत्यंत वेगशाली आहे आणि जी रथाप्रमाणें गुणांनीं मोठी असून प्रजापतीकडून निर्माण करण्यांत आली अशी ही सरस्वती ज्ञानी स्तोतृवृंदाकडून प्रशंसेस पात्र आहे. ( ६–६१–१३ ).

## रत्न २३२ वें

हे सरस्वति ! तूं आम्हांस प्रशस्त असें धन आणून दे ! तूं आम्हांस हीनदीन करूं नकोस ! तू आपल्या महापुरानें आम्हांस बाधा करूं नकोस ! आमचें सख्य व प्रवेश यांचा स्वीकार कर ! आणि आम्हांस तुझ्यापासून निकृष्ट शेती न मिळेल, असें घडो ! ( ६–६१–१४ ).

# रत्न २३३ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, इन्द्राविष्णू-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

सं वां कर्मणा समिषा हिनोमीन्द्राविष्णू अपसस्पारे अस्य ।
जुषेथां यज्ञं द्रविणं च धत्तमरिष्टैर्नः पथिभिः पारयन्ता ॥

॥ ६-६९-१ ॥

**श्रौ. वि. ( उक्थ्य ) तृतीय सवनांतील अच्छावाक शस्त्र.**

**स्मा. वि. ( विष्णुसूक्त )**

या विश्वासां जनितारा मतीनामिन्द्राविष्णू कलशा सोमधाना ।
प्र वां गिरः शस्यमाना अवन्तु प्र स्तोमासो गीयमानासो अर्कैः ॥

॥ ६-६९-२ ॥

इन्द्राविष्णू मदपती मदानामा सोमं यातं द्रविणो दधाना ।
सं वामञ्जन्त्वक्तुभिर्मतीनां सं स्तोमासः शस्यमानास उक्थैः ॥

॥ ६-६९-३ ॥

आ वामश्वासो अभिमातिषाह इन्द्राविष्णू सधमादो वहन्तु ।
जुषेथां विश्वा हवनामतीनामुप ब्रह्माणि शृणुतं गिरो मे ॥

॥ ६-६९-४ ॥

इन्द्रा-विष्णू तत् पनयाय्यं वां सोमस्य मद उरु चक्रमाथे ।
अकृणुतमन्तरिक्षं वरीयोऽप्रथतं जीवसे नो रजांसि ॥

॥ ६-६९-५ ॥

इन्द्राविष्णू हविषा वावृधानाऽग्राद्वाना नमसा रातहव्या ॥
घृतासुती द्रविणं धत्तमस्मे समुद्रःस्थः कलशः सोमधानः ॥

॥ ६-६९-६ ॥

## रत्न २३३ वें

हे इन्द्राविष्णू देवांनो ! तुमचें स्तोत्र गाऊन आणि तुम्हांला हविर्भाग अर्पण करून, आम्हीं तुम्हांस प्रसन्न करीत आहों, तर या उक्थाच्या शेवटीं तुम्हीं या व हविभागांचें सेवन करा ! आणि संकटरहित मार्गांनीं आम्हांस पार करून, आमच्या पदरांत धन टाकण्याची कृपा करा ! (६–६९–१ ). हे इन्द्राविष्णू म्हणजे सर्व स्तुतिस्तोत्रांचे जनकच आहेत. तसेंच ते सोमरसाचे प्रत्यक्ष कलशच आहेत. हे इन्द्राविष्णूंनो ! आमचीं हीं तुमच्या प्रीत्यर्थ म्हटलीं जाणारी स्तुतिपर शस्त्रें व तशींच अर्कस्तोत्रें तुम्हांस ऐकूं येवोत ! ( ६–६९–२ ). हे इन्द्राविष्णूंनो ! तुम्हीं उत्साहवर्धक सोमाचे स्वामी असून, आम्हांस संपत्ति देणारे आहांत, तर तुम्हीं आतां या सोमाजवळ या ! आम्हा स्तोत्यांचीं म्हटलीं जाणारीं उक्थ व अर्कस्तोत्रें तुम्हांस तेजानें सुमंडित करोत ! ( ६–६९–३ ). हे इन्द्राविष्णूनो ! तुम्हीं शत्रूंची चांगली रग जिरविणारे असून, तुमच्याबरोबरच सोमपान करणारे अश्व तुम्हांस येथें वाहून आणोत ! आम्हा स्तोतृजनांच्या सर्व स्तोत्रांचा तुम्हीं स्वीकार करा ! त्यासाठीं माझीं स्तोत्रें व शस्त्रें कृपा करून श्रवण करा! ( ६–६–४ ). हें इद्राविष्णूंनो ! हें तुमचें कृत्य खरोखर स्तुत्यच आहे. तें म्हणजें हें. तुम्ही सोमाच्या उत्साहभरांत पृथ्वीचें आक्रमण केलेंत ! अंतरिक्ष लोक अधिक विस्तृत केलांत ! आणि ही पृथ्वी देखील आम्हांस रहावयासाठीं म्हणून विशाल करून ठेवलीत ! हें तुमचें कृत्य स्तुत्य नाहीं असें कोण म्हणेल ? ( ६–६९–५ ). हे घृतान्न इंद्राविष्णूनो ! तुम्ही सोमानें प्रवर्धन पावणारे आहां. सोमपात्रांतील सोम प्राशन करणारे आणि नमस्कारपूर्वक यजमानाकडून हवि अर्पण केले गेलेले असे आहांत. तर आम्हांस आतां धनप्रदान करा ! तुम्हीं समुद्राप्रमाणें आहांत. कारण सोमानें तुडुंब भरलेला हा कलशच जणूं तुम्हीं आहांत. ( ६–६९–६ ).

इन्द्राविष्णू पिबतं मध्वो अस्य सोमस्य दस्रा जठरं पृणेथाम् ।
आ वामन्धांसि मदिराण्यग्मन्नुप ब्रह्माणि शृणुत हवं मे ॥

॥ ६-६९-७ ॥

उभा जिग्यथुर्न परा जयेथे न परा जिग्ये कतरश्चनैनोः ।
इन्द्रश्च विष्णो यदपस्पृधेथां त्रेधा सहस्रं वि तदैरयेथाम् ॥

॥ ६-६९-८ ॥

## रत्न २३४ वें

**बार्हस्पत्य भरद्वाज-ऋषि, द्यावापृथिवी-देवता, जगती-छंद**

घृतवती भुवनानामभिश्रियोर्वी पृथ्वी मधुदुघे सुपेशसा ।
द्यावापृथिवी वरुणस्य धर्मणा विष्कभिते अजरे भूरिरेतसा ॥

॥ ६-७०-१ ॥

**श्रौ. वि. ( बृहस्पतिसव ) वैश्वदेव शस्त्र.**

असश्चन्ती भूरिधारे पयस्वती घृतं दुहाते सुकृते शुचिव्रते ।
राजन्ती अस्य भुवनस्य रोदसी अस्मे रेतः सिञ्चतं यन्मनुर्हितम् ॥

॥ ६-७०-२ ॥

यो वामृजवे क्रमणाय रोदसी मर्तो ददाश धिषणे स साधति ।
प्र प्रजाभिर्जायते धर्मणस्परि युवोः सिक्ता विषुरूपाणि सव्रता ॥

॥ ६-७०-३ ॥

घृतेन द्यावापृथिवी अभीवृते घृतश्रिया घृतपृचा घृतावृधा ।
उर्वी पृथ्वी होतृवूर्ये पुरोहिते ते इद् विप्रा ईळते सुम्नमिष्टये ॥

॥ ६-७०-४ ॥

हे दर्शनीय इंद्राविष्णूंनो ! तुम्ही मधुर अशा या सोमरसाचें प्राशन करा ! आणि त्या रसानें तुमचें उदर तुडुंब भरून काढा ! हे इंद्राविष्णूंनो ! मदकर असें हें सोमरूपी अन्न तुम्हांकडे जावो! माझीं हीं स्तोत्रें आणि त्याबरोबरच माझी प्रार्थनाहि ऐकण्याची कृपा करा ! (६–६९–७). इन्द्राविष्णूंनो ! तुम्हीं शत्रूंना जिंकतां, पण कोठेंच पराजय पावत नाहींत. तुम्हांपैकीं कोणीहि पराभव पावणारा नाहीं. इंद्र व तुम्हीं ज्या वस्तूसाठीं असुराबरोबर लढाई करतां, तेव्हां लोक, वेदवाणी व आत्मा याप्रमाणें त्रिधास्थित त्या अनंत लोकांना तुम्हीं व्यापून टाकतां. ( ६–६९–८ ).

रत्न २३४ वें

हे द्यावापृथ्वींनो ! तुम्ही उदकसंपन्न आहांत. भूतजातांचा आश्रय आहांत. त्याचप्रमाणें तुम्ही विस्तीर्ण, कार्यबाहुल्यानें विशाल, मधुर उदक देणाऱ्या, सुस्वरूप, सर्वनियामक वरुणाच्या नियमानें पृथक्पणें धारण केल्या गेलेल्या, नित्य व बहुरेतस्क अशा आहांत. ( ६–७०–१ ). हे द्यावापृथ्वींनो ! तुम्ही सर्वत्र व्यापून राहणाऱ्या आहांत;तशाच बहुधारा आहांत; उदकसंपन्न आहांत; शुचिव्रत आहांत; पवित्र कार्य करणाऱ्या आहांत; भक्तांकरितां जलवर्षाव करणाऱ्या आहांत. हे द्यावापृथ्वींनो ! या भूतजातावर सत्ता चालविणाऱ्या तुम्ही मानवांना हितकर असें वीर्य आमच्यांत सिंचन करा ! ( ६–७०–२ ). हे सर्वाधार द्यावापृथ्वींनो ! जो मनुष्य तुमच्या सुखगमनार्थ हविप्रदान करतो, त्याचें मनोरथ सुपूर्त होतात. मुलांबाळांनीं त्याचें घर सुसमृद्ध होतें ! केलेल्या कर्मावर तुम्हीं सिंचन केलेल्या बीजापासून नानावर्णांचे पण समान क्रिया करणारे प्राणी उत्पन्न होतात. ( ६–७०३– ). या द्यावापृथ्वी उदकानें आवृत आहेत. तशाच त्या उदकाचें आश्रयस्थान आहेत. शिवाय त्या उदकानें पूर्ण असून, त्या उदकाचें वर्धनहि पण त्याच करतात. त्या विस्तीर्ण व विशाल आहेत. यज्ञामध्यें यजमानाकडून त्यांचाच पुरस्कार केला जातो. स्तोतृजन हे यज्ञार्थ त्या द्यावापृथ्वीजवळ सुखाची मागणी करतात. ( ६–७०–४ ).

मधु नो द्यावापृथिवी मिमिक्षतां मधुश्चुता मधुदुघे मधुव्रते ।
दधाने यज्ञं द्रविणं च देवता महि श्रवो वाजमस्मे सुवीर्यम् ॥
॥ ६-७०-५ ॥

ऊर्जं नो द्यौश्च पृथिवी च पिन्वतां पिता माता विश्वविदा सुदंससा । संरराणे रोदसी विश्वशम्भुवा सनिं वाजं रयिमस्मे समिन्वताम् ॥ ६-७०-६ ॥

## रत्न २३५ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, वर्म-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

जीमूतस्येव भवति प्रतीकं यद्वर्मी याति समदामुपस्थे ।
अनाविध्या तन्वा जय त्वं स त्वा वर्मणो महिमा पिपर्तु ॥
॥ ६-७५-१ ॥

**श्री. वि. वर्म ( कवच ) स्तुति**

## रत्न २३६ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, धनु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

धन्वना गा धन्वनाजिं जयेम धन्वना तीव्राः समदो जयेम ।
धनुः शत्रोरपकामं कृणोति धन्वना सर्वाः प्रदिशो जयेम ॥
॥ ६-७५-२ ॥

**श्री. वि. धनुष्यस्तुति**

## रत्न २३७ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, ज्या-देवता, त्रिष्टुप्-छंद**

वक्ष्यन्तीवेदा गनीगन्ति कर्णं प्रियं सखायं परिषस्वजाना ।
योषेव शिङ्क्ते वितताधि धन्वञ्ज्या इयं समने पारयन्ती ॥
॥ ६-७५-३ ॥

**श्री. वि. ज्या-स्तुति**

उदकाचा वर्षाव करणाऱ्या, उदकाचें दोहन करणाऱ्या, उदकार्थ कर्म करणाऱ्या, आणि त्याचप्रमाणें आम्हांस यज्ञ, धन, महद्यश, अन्न व सुवीर्य देणाऱ्या अशा या देवताभूत द्यावापृथ्वी आमचेसाठीं उदकाचा वर्षाव करोत ! ( ६–७०–५ ). पितृस्थानीय द्यौ व मातृस्थानीय पृथ्वी हीं आम्हांस अन्न देवोत ! विश्ववेत्त्या, सत्कर्म करणाऱ्या, एकत्र रमणाऱ्या, व सर्वांचें कल्याण करणाऱ्या द्यावापृथ्वी आम्हांला पुत्रपौत्रादि संतति, अन्न व ऐश्वर्य हीं देवोत ! ( ६–७०–६ ).

## रत्न २३५ वें

रणभूमीवर जाणारा राजा जेव्हां अंगांत कवच धारण करतो, तेव्हां तो मेघासारखें गंभीर स्वरूप धारण करतो. हे राजन् ! अनाविद्ध शरीरानें तूं शत्रूंशीं लढून त्यांवर जय मिळीव ! कवचाचें ;प्रसिद्ध सामर्थ्य तुझें संरक्षण करो ! (६–७५–१).

## रत्न २३६ वें

धनुष्याच्या सहाय्यानें आम्ही शत्रूच्या गायी जिंकूं ! धनुष्याच्या जोरावर आम्ही शत्रूचा पाडाव करूं ! धनुष्याच्या योगानें शत्रूच्या कडव्या सैन्यावर जय मिळवूं ! हें आमचें धनुष्य शत्रूंना हताश करो ! धनुष्याच्या सहाय्यानें आम्ही सर्व दिशांतील शत्रूंवर जय मिळवूं ! (६–७५–२ ).

## रत्न २३७ वें

ही जी धनुष्याची दोरी ( ज्या ) आहे, ती संग्रामसमयीं धनुष्यावर चढविली म्हणजे पार नेणारी असून, कानाशीं मधुर भाषण करीत येते. आणि स्त्री जशी पतीला प्रेमानें आलिंगतांना गोड गोड बोलूं लागते, तद्वत् ही ज्या झाली तरी बाणाला आलिंगतांना मधुर गुणगुणूं लागते. ( ६–७५–३ ).

## रत्न २३८ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, आर्त्नी-देवता, त्रिष्टुप्-छंद**

ते आचरन्ती समनेव योषा मातेव पुत्रं बिभृतामुपस्थे ।
अप शत्रून् विध्यतां संविदाने आर्त्नी इमे विष्फुरन्ती अमित्रान् ॥
॥ ६-७५-४ ॥

**श्रौ. वि. आर्त्नी-स्तुति**

## रत्न २३९ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, इषुधि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

बह्वीनां पिता बहुरस्य पुत्रश्चिश्चा कृणोति समनावगत्य ।
इषुधिः सङ्काः पृतनाश्च पृष्ठे सर्वाः निनद्धो जयति प्रसूतः ॥
॥ ६-७५-५ ॥

**श्रौ. वि. इषुधि( भाता )स्तुति**

## रत्न २४० वें

**पायु भारद्वाज-ऋषि, सारथि-देवता, जगती-छंद**

रथे तिष्ठन् नयति वाजिनः पुरो यत्रयत्र कामयते सुषारथिः ।
अभीशूनां महिमानं पनायत मनः पश्चादनु यच्छन्ति रश्मयः ॥
॥ ६-७५-६ ॥

**श्रौ. वि. सारथिस्तुति; रश्मी( लगाम )स्तुति**

## रत्न २४१ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, अश्व-देवता, त्रिष्टुप्-छंद**

तीव्रान् घोषान् कृण्वते वृषपाणयोऽश्वा रथेभिः सह वाजयन्तः ।
अवक्रामन्तः प्रपदैरमित्रान् क्षिणन्ति शत्रूँरनपव्ययन्तः ॥
॥ ६-७५-७ ॥

**श्रौ. वि. अश्वस्तुति**

## रत्न २३८ वें

तशींच हीं धनुष्याचीं दोन टोंकें. तीं झालीं तरी सारख्या विचाराच्या नवराबायकोप्रमाणें एकमेकांजवळ राहून, आई जशी मुलाला मांडीवर घेते त्याप्रमाणें तीं राजाला जवळ घेतात. हीं समान विचारानें चालणारीं दोन टोंकें या राजाच्या द्वेष्टयांना घायाळ करीत, त्याच्या शत्रूचा फडशा पाडोत ! ( ६–७५–४ ).

## रत्न २३९ वें

भाता हा अनेक बाणांचा रक्षण करणारा पिता आहे. कारण त्या भात्यांत अनेक पुत्ररूपीं बाण आहेत. हे बाण ओढून बाहेर काढीत असतां तो भाता चिश्चा असा शब्द करीत असतो. राजाच्या पाठीवर बांधलेला तो भाता युद्धांत बाणामागून बाण सारखा बाहेर शत्रूवर सोडीत असतो व गर्जना करणाऱ्या सर्व शत्रु-सेनांवर जय मिळवितो ( ६–७५–५ ).

## रत्न २४० वें

हुषार सारथी हा रथांत उभा राहून पुढें असलेल्या घोड्यांना जिकडे जिकडे नेऊं इच्छितो तिकडे तिकडे त्यांना तो वळवितो. आणि रथाला लावलेले जे लगाम सारथीच्या मनाप्रमाणें त्या अश्वाचें नियमन करतात त्या लगामाचा महिमा, हे जनहो, तुम्ही वर्णन करा ! ( ६–७५–६ ).

## रत्न २४१ वें

त्या रथाचे घोडे आपल्या पायांच्या टापांनीं धूळ उडवीत रथासह मोठ्या वेगानें दौडत जातात व जातांना मधून मधून रणगंभीर गर्जना करतात. आणि पळून न जाणाऱ्या हिंसक शत्रूंना पादाग्रांनीं तुडवून मारे घायाळ करतात. ( ६–७५–७ ).

## रत्न २४२ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, रथ-देवता, त्रिष्टुप्-छंद**

रथवाहनं हविरस्यनाम यत्रायुधं निहितमस्य वर्म ।
तत्रा रथमुप शग्मं सदेम विश्वाहा वयं सुमनस्यमाना: ।।

।। ६-७५-८ ।।

**भ्रौ. वि. रथस्तुति**

## रत्न २४३ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, रथगोप-देवता, त्रिष्टुप्-छंद**

स्वादुषंसद: पितरो वयोधा: कृच्छ्रेश्रित: शक्तीवन्तो गभीरा: ।
चित्रसेना इषुबला अमृध्रा: सतोवीरा उरवो व्रातसाहा: ।।

।। ६-७५-९ ।।

**भ्रौ. वि. रथगोपस्तुति**

## रत्न २४४ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, ब्राह्मण-पितृ-सोमादि-देवता, जगती-छंद**

ब्राह्मणास: पितर: सोम्यास: शिवे नो द्यावापृथिवी अनेहसा ।
पूषा न: पातु दुरितादृतावृधो रक्षा माकिर्नो अघशंस ईशत ।।

।। ६-७५-१० ।।

**भ्रौ. वि. ब्राह्मणपितरसोम्या द्यावापृथिवीपूषा-स्तुति**

## रत्न २४५ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, इषु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

सुपर्णं वस्ते मृगो अस्या दन्तो गोभि: संनद्धा पतति प्रसूता ।
यत्रा नर: सं च वि च द्रवन्ति तत्रास्मभ्यमिषव: शर्म यंसन् ।।

।। ६-७५-११ ।।

**भ्रौ. वि. इषु( बाण )स्तुति**

## रत्न २४२ वें

या राजाच्या रथांतून शत्रूंना जिंकून वाहून आणलेली संपत्ति हवी-प्रमाणें आम्हांस उत्कर्षक होते. त्या रथांत राजाचें आयुध व कवच हीं ठेविलीं आहेत. अशा त्या सुखकारक रथाजवळ आम्हीं सदैव सुप्रसन्न मनानें जावें. (६–७५–८).

## रत्न २४३ वें

रथाचे जे संरक्षक आहेत ते शत्रूचें अन्न नाश करणारे, आम्हांस अन्न देणारे, आपत्कालीं मदत करणारे, शक्ति नांवाचें आयुध धारण केलेले, अप्रतिहत, दर्शनीय सेना असलेले, बाण हें ज्यांचें बल आहे, अहिंस्य, सामर्थ्यसंपन्न, थोर व शत्रुसैन्यांचा पराभव करणारे असे आहेत. (६–७५–९).

## रत्न २४४ वें

हे ब्राह्मणांनो ! हे यज्ञवर्धक व सोमार्ह पितरांनो ! तुम्ही आमचें रक्षण करा ! हे निष्पाप द्यावापृथ्वींनो ! तुम्ही आम्हांस सुखकारक व्हा ! पूषा देव आमचें संकटापासून संरक्षण करो ! आणि असा कोणताहि पापी शत्रु आमच्यावर सत्ता न चालवो ! ( ६–७५–१० ).

## रत्न २४५ वें

बाणाला चांगलें पीस लावलें आहे आणि मृगाचें शिंग त्याच्या दंत-स्थानीं बसविलें आहे. तो बाण धनुष्याच्या दोरीला जोडून धरला आहे. तो ओढून सोडला म्हणजे शत्रुसैन्यांत जाऊन पडतो. जेथें लोक संघानें अगर पृथक्पणें संचारत असतात, तेथें बाण आम्हांस सुख देवोत ! ( ६–७५–११ ).

## रत्न २४६ वें

पायु भारद्वाज-ऋषि, इषु-देवता, अनुष्टुप्-छंद

ऋजीते परि वृङ्धि नोऽश्मा भवतु नस्तनूः ।
सोमो अधि ब्रवीतु नोऽदितिः शर्म यच्छतु ॥ ६-७५-१२ ॥

श्रौ. वि. इषुस्तुति

## रत्न २४७ वें

पायु भारद्वाज-ऋषि, प्रतोद-देवता, अनुष्टुप्-छंद

आ जङ्घन्ति सान्वेषां जघनाँ उप जिघ्नते ।
अश्वाजनि प्रचेतसोऽश्वान् त्समत्सु चोदय ॥ ६-७५-१३ ॥

श्रौ. वि. प्रतोद( चाबूक )स्तुति

## रत्न २४८ वें

पायु पारद्वाज-ऋषि, हस्तघ्न-देवता, त्रिष्टुप्-छंद

अहिरिव भोगैः पर्येति बाहुं ज्याया हेतिं परिबाधमानः ।
हस्तघ्नो विश्वा वयुनानि विद्वान् पुमान् पुमांसं परि पातु
विश्वतः ॥ ६-७५-१४ ॥

श्रौ. वि. हस्तघ्न स्तुति

## रत्न २४९ वें

पायु भारद्वाज-ऋषि, इषु-देवता, अनुष्टुप्-छंद

आलाक्ता या रुरुशीर्ष्ण्यथो यस्या अयोमुखम् ।
इदं पर्जन्यरेतस इष्वै देव्यै बृहन्नमः ॥ ६-७५-१५ ॥

श्रौ. वि. इषु स्तुति

अवसृष्टा परा पत शरव्ये ब्रह्मसंशिते ।
गच्छामित्रान् प्र पद्यस्व मामीषां कं चनोच्छिषः ॥
॥ ६-७५-१६ ॥

## रत्न २४६ वें

हे बाणा ! तूं आमचा सर्व बाजूंनीं उत्कर्ष कर ! आमचें शरीर दगडाप्रमाणें अभेद्य होवो ! सोम आमचा पक्ष घेऊन बोलो ! आणि अदिति आम्हांस सुख देवो ! ( ६–७५–१२ ).

## रत्न २४७ वें

हे प्रतोदा ! ज्या तुझ्या सहाय्यानें शाहणा सारथी या घोड्यांच्या मांड्यांवर व ढुंगणावर तडाखे लगावत असतो, असा तूं संग्रामांत घोड्यांना प्रोत्साहित कर ! ( ६–७५–१३ ).

## रत्न २४८ वें

धनुष्याच्या दोरीपासून बसणारा तडाखा निवारण करणारा असा हा हस्तघ्न असून, तो सापाच्या शरीराप्रमाणें हाताला ( मनगटावरचा भाग ) परिवेष्टन करून आहे. तो सर्व कांहीं जाणणारा व पौरुषानें युक्त असून, तो स्वतः धनुर्धारीचें सर्व बाजूंनीं रक्षण करो ! ( ६–७५–१४ ).

## रत्न २४९ वें

जो बाण विषानें माखला आहे, ज्याच्या शिरोभागीं तीक्ष्ण शिंग बसविलें आहे व ज्याचें कांड पर्जन्य रेत म्हणजे वृक्षाचें आहे, अशा त्या थोर बाण-देवतेला माझा नमस्कार असो ! ( ६–७५–१५ ). मंत्र म्हणून तीक्ष्ण केलेल्या व हिंसा करण्यांत कुशल असणाऱ्या बाणा ! धनुष्यांतून सोडल्याबरोबर तूं येथून निघ ! आणि शत्रूंवर जाऊन पड ! त्यांच्यापैकीं कोणासहि शिल्लक म्हणून ठेवूं नकोस ! ( ६–७५–१६ ).

## रत्न २५० वें

**पायु भारद्वाज-ऋषि, युद्धभूमिकवचप्रभृति-देवता, पंक्ति-छंद**

यत्र बाणाः संपतन्ति कुमारा विशिखा इव ।
तत्रा नो ब्रह्मणस्पतिरदितिः शर्म यच्छतु विश्वाहा शर्म यच्छतु ॥
॥ ६-७५-१७ ॥

**श्री. वि. युद्धभूमिस्तुति**

## रत्न २५१ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, वर्म-सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मर्माणि ते वर्मणा छादयामि सोमस्त्वा राजामृतेनानु वस्ताम् ।
उरोर्वरीयो वरुणस्ते कृणोतु जयन्तं त्वानु देवा मदन्तु ॥
॥ ६-७५-१८ ॥

**श्री. वि. कवच-सोम-वरुण-स्तुति**

## रत्न २५२ वें

**पायु भारद्वाज-ऋषि, देव-ब्रह्म-देवता, अनुष्टुप्-छंद**

यो नः स्वो अरणो यश्च निष्ट्यो जिघांसति ।
देवास्तं सर्वे धूर्वन्तु ब्रह्म वर्म ममान्तरम् ॥ ६-७५-१९ ॥

**श्री. वि. ब्रह्म-देव-स्तुति.**

## सहावें मंडल समाप्त

### रत्न २५० वें

शेंडी नसलेल्या कुमारांप्रमाणें आमचे बाण जेथें जाऊन पडतात, तेथें ब्रह्मणस्पति आणि अदिति आम्हांला सुख देवो! (६–७५–१७).

### रत्न २५१ वें

हे राजन्! तुझीं जेवढीं म्हणून मर्मस्थानें आहेत, तेवढीं सर्व मी कवचानें आच्छादून टाकतों. तदनंतर राजा सोम तुला अमृतानें आच्छादन करो! राजा वरुण तुला याहिपेक्षां श्रेष्ठतर सुख देवो! आणि विजय प्राप्त करून घेतलेल्या तुला सर्व देव मिळून आनंदभरित करोत! (६–७५–१८).

### रत्न २५२ वें

स्वकीय असूनहि जो आमचा घात करूं पाहतो व तसाच परकीय शत्रु आमच्या जिवावर उठूं पाहतो, अशा उभयविध शत्रूंचा सर्व देव मिळून नाश करोत! हें स्तोत्र माझें अंतरंग कवच आहे.

**सहावें मंडल समाप्त.**



# मंडल सातवें

## रत्न २५३ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, अग्नि-देवता, विराट-छंद**

अ॒ग्निं नरो॒ दीधि॑तिभिर॒रण्यो॒र्हस्त॑च्युती जनयन्त प्रश॒स्तम् ।
दू॒रे॒दृशं॑ गृ॒हप॑तिमथ॒र्युम् ॥ ७-१-१ ॥

**श्रौ. वि. ( महाव्रत ) आज्यशस्त्र**

दा नो॑ अग्ने धि॒या र॒यिं सु॒वीरं॑ स्वप॒त्यं स॑हस्य प्रश॒स्तम् ।
न यं यावा॒ तर॑ति यातु॒मावा॑न् ॥ ७-१-५ ॥

## मराठी भावार्थ

### रत्न २५३ वें

अत्यंत स्तविला गेलेला, दूरचें पाहणारा, गृहाचा पालक, सुगम व अरणीमध्यें असलेला असा जो अग्निदेव, त्या अग्निदेवाला ऋत्विजांनीं यज्ञांत हात हलवून बोटांनीं उत्पन्न केला. ( ७-१-१ ). हे शत्रूंचा पराभव करण्यांत कुशल असलेल्या अग्निदेवा! सुंदर पुत्रपौत्रादिकांनीं युक्त अशी श्रेष्ठ संपत्ति आमच्या स्तुतीनें प्रसन्न होऊन तूं आम्हांस दे! त्या संपत्तीवर हिंसक शत्रू झडप घालूं शकणार नाहींत असें कर ! (७-१-५).

मा शूनें अग्ने नि षदाम नृणां माशेषसोऽवीरता परि त्वा ।
प्रजावतीषु दुर्यासु दुर्य ॥ ७-१-११ ॥
पाहि नों अग्ने रक्षसो अजुष्टात् पाहि धूर्तेररुषो अघायोः ।
त्वा युजा पृतनायूँरभि ष्याम् ॥ ७-१-१३ ॥

## रत्न २५४ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मा नों अग्नेऽवीरते परा दा दुर्वाससेऽमतये मा नों अस्यै ।
मा नः क्षुधे मा रक्षस ऋतावो मा नो दमे मा वन आ जुहूर्थाः ॥
॥ ७-१-१९ ॥

मा नों अग्ने दुर्भृतये सचैषु देवेद्धेष्वग्निषु प्र वोचः ।
मा तें अस्मान् दुर्मतयो भृमाच्चिद् देवस्य सूनो सहसो नशन्त ॥
॥ ७-१-२२ ॥

नू मे ब्रह्माण्यग्न उच्छशाधि त्वं देव मघवद्भ्यः सूपदः ।
रातौ स्यामोभयास आ तें यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-१-२५ ॥

## रत्न २५५ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद**

अग्ने रक्षा णो अंहसः प्रति ष्म देव रीषतः ।
तपिष्ठैरजरो दह ॥ ७-१६-१३ ॥

**श्रौ. वि. (स्वस्त्ययनेष्टि) प्रथमाज्यभागानुवाक्या**

त्वं नः पाह्यंहसो दोषावस्तरघायतः ।
दिवा नक्तमदाभ्य ॥ ७-१५-१५ ॥

हे अग्ने ! पोरेंबाळें नसलेल्या म्हणजे निपुत्रिकाच्या घरांत राहण्याचा आम्हांवर प्रसंग न येवो ! तसेंच परक्यांच्या घरीं राहण्याचा प्रसंगहि आम्हांस न शिवो ! पुत्रहीन व प्रभावशून्य असे असलेले आम्ही तुझी परिचर्या करीत मुलांबाळांनीं गजबजलेल्या अशा आमच्या मालकीच्या गृहांत रहावें, असें घडो ! ( ७-१-११ ). हे अग्ने, द्वेष करणाऱ्या राक्षसांपासून तूं आमचें रक्षण कर ! तसेंच जे कवडीचुंबक, पापी व खुनशी आहेत, अशा दुष्ट लोकांपासूनहि आमचें रक्षण कर ! तुझ्या मदतीनें आमचा द्वेष करूं पाहणाऱ्या शत्रूंचा आम्ही बीमोड करून टाकूं ! ( ७-१-१३ ).

## रत्न २५४ वें

हे अग्ने ! आम्हांस निपुत्रिकांच्या स्वाधीन करूं नकोस ! अमंगळ वस्त्रें वापरणाऱ्यांच्या स्वाधीनहि करूं नकोस ! त्याचप्रमाणें दुष्ट मनुष्यांच्या आधीन करूं नकोस ! आम्हांस क्षुधेच्या तावडींत देऊं नकोस ! तसेंच राक्षसांच्या स्वाधीनहि पण करूं नकोस ! हे देवा ! घरीं काय किंवा वनीं काय कोठें झालें तरी तूं आम्हांस इजा होईल असें करूं नकोस ! (७-१-१९). हे अग्ने ! तुझे सहायभूत असे हे प्रज्वलित केलेले अग्नि आमचें सुखानें रक्षण करणारे होतील अशा तऱ्हेनें तूं त्यांना उपदेश कर. आणि हे बलपुत्र अग्निदेवा ! तेजस्वी अशा तुझी अवकृपा आम्हांवर चुकून सुद्धां होणार नाहीं, असें घडो ! ( ७-१-२२ ). हे अग्ने ! आमच्यासाठीं लवकर शुद्ध अन्न तयार कर ! हे देवा ! हविसंपन्न अशा आम्हांला अन्न दे ! आणि तुझ्या कृपाप्रसादास आम्हीं स्तोतृजन व यजमान असे दोघेहि पात्र होऊं असें घडो ! आमचे अक्षय मंगल करून हे देवहो ! तुम्हीं आमचें सदैव रक्षण करा ! ( ७-१-२५ ).

## रत्न २५५ वें

हे अग्ने ! सर्व पापांतून तूं आम्हांस पार ने ! जरारहित असा तूं आमचा द्वेष करणाऱ्यांना प्रखर तेजानें जाळून खाक कर ! (७-१५-१३). हे अहिंस्य अग्ने ! तूं रात्रीचा अंधःकार निवारण करणारा आहेस. तर सर्व पापांतून व हिंसक शत्रूंपासून तूं आमचें रक्षण कर ! ( ७-१५-१५ ).

## रत्न २५६ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, अग्नि-देवता, प्रगाथ-छंद**

त्वमग्ने गृहपतिस्त्वं होता नो अध्वरे। त्वं पोता विश्ववार प्रचेता यक्षि वेषि च वार्यम्॥ ७-१६-५॥

कृधि रत्नं यजमानाय सुक्रतो त्वं हि रत्नधा असि।
आ न ऋते शिशीहि विश्वमृत्विजं सुशंसो यश्च दक्षते॥
॥ ७-१६-६॥

## रत्न २५७ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

त्वे ह यत्पितरश्चिन्न इन्द्र विश्वा वामा जरितारो असन्वन्।
त्वे गावः सुदुघास्त्वे ह्यश्वास्त्वं वसु देवयते वनिष्ठः॥
॥ ७-१८-१॥

**श्रौ. वि. महाव्रत**

राजेव हि जनिभिः क्षेष्येवाऽव द्युभिरभि विदुष्कविः सन्।
पिशा गिरो मघवन् गोभिरश्वैस्त्वायतः शिशीहि राये अस्मान्॥
॥ ७-१८-२॥

इमा उ त्वा पस्पृधानासो अत्र मन्द्रा गिरो देवयन्तीरुप स्थुः।
अर्वाची ते पथ्या राय एतु स्याम ते सुमताविन्द्र शर्मन्॥
॥ ७-१८-३॥

धेनुं न त्वा सूयवसे दुदुक्षन्नुप ब्रह्माणि ससृजे वसिष्ठः।
त्वामिन्मे गोपतिं विश्व आहाऽऽन इन्द्रः सुमतिं गन्त्वच्छ॥
॥ ७-१८-४॥

## रत्न २५६ वें

हे विश्ववंद्य अग्ने! तूं या आमच्या यागांतला यजमान आहेस. देवांना बोलावणारा होताहि तूंच आणि पोताहि पण तूंच आहेस. सुज्ञ असा तूं या श्रेष्ठ हवींचें देवांप्रीत्यर्थ यजन कर आणि स्वतः तूंहि भक्षण कर! (७-१६-५). हे शुभकर्मन् अग्ने! यजमानाला तूं धन दे! कारण तूं धनदाता आहेस. आमच्या यज्ञांत सर्व ऋत्विजांना तेजस्वी कर! व चांगली स्तुति करणारा असा जो होता आहे, त्याचा उत्कर्ष कर! (७-१६-६).

## रत्न २५७ वें

हे इंद्रा! आमच्या वाडवडिलांनीं तुझीं स्तोत्रें गाऊनच सर्व संपत्ति तुझ्यापासुन प्राप्त करून घेतली. (म्हणून आम्हीहि धनप्राप्तीसाठीं तुझेंच स्तवन करतों.) कारण तुझ्याजवळ चांगल्या दुभत्या गायी व उमदे घोडे आहेत. आणि यज्ञोपासकांना तूं धन देणारा आहेस (७-१८-१). हे इंद्रा! राजा ज्याप्रमाणें आपल्या स्त्रियांसहित असतो तद्वत् तूं देखील आपल्या तेजस्वी किरणांसहित असतोस. हे धनवंता! तूं ज्ञानसंपन्न असल्यामुळें तुझी स्तुति करणाऱ्या आम्हांस सुवर्ण, गायी, घोडे देऊन आमचें रक्षण कर! आणि तुझे उपासक अशा आम्हाला धनप्राप्तीस योग्य कर! (७-१८-२). हे इंद्रा! ह्या यज्ञांत अहमहमिकेनें एकमेकांशीं स्पर्धा करणारीं अशीं श्रवणीय स्तोत्रें म्हटलीं जात आहेत. म्हणून तुझ्या संपत्तीचा ओघ आम्हांकडेच वळो! आणि तुझ्या सुप्रसन्न मर्जीत राहणारे आम्ही सुखांत सदैव नांदूं असें घडो! (७-१८-३). चांगल्या तृणानें समृद्ध असणाऱ्या गोठ्यांतील गायीप्रमाणें उत्तम हवींनीं संपन्न अशा यज्ञगृहांत राहणारा जो तूं, त्या तुझ्यापासून संपत्ति मिळवूं इच्छिणारा मी वसिष्ठ तुझीं स्तोत्रें गात आहें. मला सर्व लोकांनीं तूंच गोपति आहेस असें सांगितलें आहे. या आमच्या स्तुतीला अभिलक्षून इंद्रदेव आम्हांकडे येवो! (७-१८-४).

अर्णांसि चित्पप्रथाना सुदास इन्द्रो गाधान्यकृणोत्सुपारा ।
शर्धन्तं शिम्युमुचथस्य नव्यः शापं सिन्धूनामकृणोदशस्तीः ॥

॥ ७-१८-५ ॥

पुरोळा इत् तुर्वशो यक्षुरासीद् राये मत्स्यासो निशिता अपीव ।
श्रुष्टिं चक्रुर्भृगवो द्रुह्यवश्च सखा सखायमतरद् विषूचोः ॥

॥ ७-१८-६ ॥

आ पक्थासो भलानसो भनन्तालिनासो विषाणिनः शिवासः ।
आ योऽनयत् सधमा आर्यस्य गव्या तृत्सुभ्यो अजगन् युधा नॄन् ॥

॥ ७-१८-७ ॥

दुराध्यो३ अदितिं स्रेवयन्तोऽचेतसो वि जगृभ्रे परुष्णीम् ।
मह्नाविव्यक् पृथिवीं पत्यमानः पशुष्कविरशयच्चायमानः ॥

॥ ७-१८-८ ॥

ईयुरर्थं न न्यर्थं परुष्णीमाशुश्चनेदभिपित्वं जगाम ।
सुदास इन्द्रः सुतुकाँ अमित्रानरन्धयन्मानुषे वध्रिवाचः ॥

॥ ७-१८-९ ॥

ईयुर्गावो न यवसादगोपा यथाकृतमभि मित्रं चितासः ।
पृश्निगावः पृश्निनिप्रेषितासः श्रुष्टिं चक्रुर्नियुतो रन्तयश्च ॥

॥ ७-१८-१० ॥

स्तुत्य अशा इन्द्रानें सुदास राजाकरितां परुष्णीचें वाढतें पाणी उथळ करून, त्यांतून पार होऊन जाण्यास योग्य असें केलें आणि त्या उत्साही शिम्यूला नदीमध्यें जलसमाधि दिली ! (७-१८-५). पुढारी व यज्ञकुशल असा तुर्वश नांवाचा राजा होता. त्यानें मत्स्य लोकांवर स्वारी केली. त्या वेळीं भृगु व द्रुह्यु यांनीं त्याचें प्रिय केलें. इन्द्राची वेगवेगळी प्रार्थना करणाऱ्या त्या दोघांपैकीं तुर्वशाचा सखा जो इन्द्र त्यानें आपल्या सख्याला म्हणजे तुर्वशाला तारलें, (७-१८-६). पक्थ, भलानस, अलिनास, विषाणी व शिव हे इंद्राला स्तविते झाले. कारण सोम पिऊन मदयुक्त झालेला तो इंद्र आर्यांच्या गार्यींचे कळप हिंसकापासून हरण करून परत आणता झाला व स्वतः तो गोसंघ मिळविता झाला. त्या वेळीं युद्धांत त्यानें शत्रूंना ठार मारलें !(७-१८-७). दुष्ट व मूर्ख असे ते सुदासाचे शत्रू दुथडी भरून वाहणाऱ्या परुष्णीचे तीर फोडते झाले.तो सुदास राजा इन्द्राच्या प्रसादामुळें जमिनीवरच टिकून राहिला. पुढें सुदासाचा शत्रु जो चायमान कवि तो पळून जात असतां सुदासाकडून मारला जाऊन यज्ञांतील पशूप्रमाणें जमिनीवर पसरून पडला ! (७-१८-८). परुष्णी नदी पुनः पूर्ववत् वाहूं लागली. तिच्या कांठावरील सखल प्रदेशांत पाणी पसरेनासें झालें. राजा सुदासाचा घोडा पुढें इष्ट स्थळीं सुरक्षित जाऊन पोंचला. त्या सुदासराजासाठीं इन्द्रानें त्या बडबडया शत्रूंना त्यांच्या वीरपुत्रांसहित जिंकून वश करून घेतलें. (७-१८-९). गवळ्यानें न राखलेल्या गायी ज्याप्रमाणें कुरणातील गवताकडे धूम ठोकतात तद्वत् पृश्नीनें पाठविलेले व पिंगट वर्णाचे घोडे असलेले मरुद्गण पूर्वी ठरल्याप्रमाणें इन्द्राला साहाय्य करण्याकरितां म्हणून धांवून आले. खुशींत असलेले त्यांचे घोडे तेव्हां मोठ्या वेगानें दौडत सुटले होते. (७-१८-१०).

एकं च यो विंशतिं च श्रवस्या वैकर्णयोर्जनान् राजा न्यस्तः ।
दस्मो न सद्मन् नि शिशाति बर्हिः शूरः सर्गमकृणोदिन्द्र एषाम् ॥
॥ ७-१८-११ ॥

अध श्रुतं कवषं वृद्धमप्स्वनु द्रुह्युं नि वृणग्वज्रबाहुः ।
वृणाना अत्र सख्याय सख्यं त्वायन्तो ये अमदन्ननु त्वा ॥
॥ ७-१८-१२ ॥

वि सद्यो विश्वा दृंहितान्येषामिन्द्रः पुरः सहसा सप्त दर्दः ।
व्यानवस्य तृत्सवे गयं भाग्जेष्म पूरुं विदथे मृध्रवाचम् ॥
॥ ७-१८-१३ ॥

नि गव्यवोऽनवो द्रुह्यवश्च षष्टिः शता सुषुपुः षट् सहस्रा ।
षष्टिर्वीरासो अधि षड् दुवोयु विश्वेदिन्द्रस्य वीर्या कृतानि ॥
॥ ७-१८-१४ ॥

इन्द्रेणैते तृत्सवो वेविषाणा आपो न सृष्टा अधवन्त नीचीः ।
दुर्मित्रासः प्रकलविन्मिमाना जहुर्विश्वानि भोजना सुदासे ॥
॥ ७-१८-१५ ॥

अर्धं वीरस्य शृतपामनिन्द्रं परा शर्धन्तं नुनुदे अभि क्षाम् ।
इन्द्रो मन्युं मन्युम्यो मिमाय भेजे पथो वर्तनिं पत्यमानः ॥
॥ ७-१८-१६ ॥

जो सुदास राजा कीर्तीच्या इच्छेनें परुष्णीच्या दोन्ही तीरांवरील वैकर्ण नांवाच्या एकवीस लोकांना ठार मारता झाला, तो यज्ञगृहांत तरुण अध्वर्यु जसा सपासप दर्भ छाटतो, तद्वत् शत्रूंचा पार सप्पा उडविण्यास समर्थ झाला ! शूर इंद्रानें मरुतांना प्रोत्साहन दिलें, तें सुदासाला मदत करण्यासाठीं म्हणूनच. ( ७–१८–११ ). नंतर त्या वज्रबाहु इंद्रानें श्रुत, कवष. वृद्ध आणि द्रुह्यु यांना क्रमानें जलसमाधि दिली ! या प्रसंगीं, हे इंद्रा ! तुझी इच्छा धरून जे तुला स्तविते झाले, ते भक्त तुझें सख्य मिळविते झाले. ( ७–१८–१२ ). ह्या कवषादिकांचीं सर्व बळकट पुरें व त्याबरोबरच त्यांचे सात बळकट तट ह्यांचा इन्द्रानें आपल्या सामर्थ्यानें विध्वंस करून, ते पार धुळींत मिसळून टाकले ! आणि अनुपुत्राचें धन तृत्सूंना वांटून दिलें. आतां त्या बडबड्या पुरुवर आम्हीं युद्धांत खास जय मिळवूंच मिळवूं ! ( ७–१८–१३ ). गायींचा लोभ धरणारे अनूचे एकशेंसाठ व द्रुह्यूचे सहा हजार साठ वीर त्या इन्द्रानें सुदासाकरितां खालीं जमिनीवर एकजात लोळविले. हे सर्व पराक्रम त्या इंद्राचेच कां म्हणाना ! ( ७–१८–१४ ). इन्द्राशीं अजाणतेपणें झुंज खेळूं लागलेले ते दुष्टमित्र तृत्सुलोक सखल प्रदेशांत वाहणाऱ्या पाण्याप्रमाणें जीव घेऊन सैरावैरा पळत सुटले ! नंतर सुदासाच्या पराक्रमानें त्राहि भगवन् झालेल्या त्या तृत्सूंनीं आपली सर्व संपत्ति सुदासास सोडून दिली. (७–१८–१५ ). या पृथ्वीवर सुदासाची हिंसा करूं पाहणारे, इन्द्राची उपासना न करणारे व शिजविलेलें अन्न देवांना सोडून खाणारे अशा सुदासाच्या मस्त शत्रूंना त्या इंद्रानें एकजात जमिनीवर लोळविलें ! आणि क्रोधानें फणफणणाऱ्या शत्रूंचा रोष चांगलाच जिरविला ! अखेर सुदासाच्या शत्रूंनीं रणांतून पलायनाचा मार्ग स्वीकारला ! ( ७–१८–१६ ).

आध्रेण चित् तद्वेकं चकार सिंह्यं चित् पेत्वेना जघान ।
अव स्रक्तीर्वेश्यावृश्चदिन्द्रः प्रायच्छद् विश्वा भोजना सुदासे ॥
॥ ७-१८-१७ ॥

शश्वन्तो हि शत्रवो रारधुष्टे भेदस्य चिच्छर्धतो विन्द रन्धिम् ।
मर्ताँ एनः स्तुवतो यः कृणोति तिग्मं तस्मिन् नि जहि
वज्रमिन्द्र ॥ ७-१८-१८ ॥

आवदिन्द्रं यमुना तृत्सवश्च पात्र भेदं सर्वताता मुषायत् ।
अजासश्च शिग्रवो यक्षवश्च बलिं शीर्षाणि जभ्रुरश्व्यानि ॥
॥ ७-१८-१९ ॥

न त इन्द्र सुमतयो न रायः संचक्षे पूर्वा उषसो न नूत्नाः ।
देवकं चिन्मान्यमानं जघन्थाऽव त्मना बृहतः शम्बरं भेत् ॥
॥ ७-१८-२० ॥

प्र ये गृहादममदुस्त्वाया पराशरः शतयातुर्वसिष्ठः ।
न ते भोजस्य सख्यं मृषन्ताऽधा सूरिभ्यः सुदिना व्युच्छान् ॥
॥ ७-१८-२१ ॥

द्वे नप्तुर्देववतः शते गोर्द्वा रथा वधूमन्ता सुदासः ।
अर्हन्नग्ने पैजवनस्य दानं होतेव सद्म पर्यैमि रेभन् ॥
॥ ७-१८-२२ ॥

चत्वारो मा पैजवनस्य दानाः स्मद्दिष्टयः कृशनिनो निरेके ।
ऋज्रासो मा पृथिविष्ठाः सुदासस्तोकं तोकाय श्रवसे वहन्ति ॥
॥ ७-१८-२३ ॥

इंद्रानें त्या समयीं दरिद्र सुदासाकडून मोठें दानकर्म करविलें ! शेळीकडून त्यानें सिंहाला मारविलें ! व यूपाचे कंगोरे सुईकडून करविले ! सुदासाला त्यानें सर्व भोग्य संपत्ति मिळवून दिली ! ( ७-१८-१७ ). हे इंद्रा ! तुझे बहुतेक शत्रु तुला वश झाले आहेत. एवढा मोठा गर्विष्ठ तो भेदासूर ! तोसुद्धां तुझ्या स्वाधीन झाला आहे ! तुझें स्तवन करणाऱ्यांना छळणाऱ्या त्या भेदासारख्या सुदास-शत्रूवर तुझें प्रखर वज्र फेंकून त्याला चांगलें शासन कर ! (७-१८-१८). त्या युद्धांत सुदासशत्रु जो भेद त्या दुष्ट असुराला इन्द्र अखेर ठार मारता झाला ! त्या वेळीं यमुनातीरवासी लोकांनीं व तृत्सूच्या लोकांनीं त्या इन्द्राला तोषविलें. आणि अज, शिग्रु व यक्षु यांनीं युद्धांत पकडलेल्या घोड्यांचीं डोकीं बलि म्हणून अर्पण केलीं ! (७-१८-१९). हे इन्द्रा ! तुझी पुरातन कृपा व संपत्ति ही उषांप्रमाणें असंख्य आहे. तशीच तुझी नवी कृपा व संपत्ति ही झाली तरी असख्यच आहे. मन्यमानाचा मुलगा जो देवक, त्यास तूं ठार केलेंस आणि त्याचप्रमाणें शंबरासुरासहि पर्वतावरून ढकलून नीट जमिनीवर लोळवता झालास ! ( ७-१८-२० ). हे इंद्र-देवा ! राक्षसांना ठार करणारे पराशर-शक्ति-वसिष्ठप्रभृति ऋषी तुझी कृपा मिळविण्याच्या बुद्धीनें घरामध्यें तुला प्रसन्न करतात आणि पालक अशा तुझ्या मैत्रीला मुळींच विसरत नाहींत, आणि म्हणूनच त्या स्तोतृजनांना सुदिन प्राप्त होतात. ( ७-१८-२१ ). हे अग्निनारायणा ! देववाताचा नातु व पिजवनाचा पुत्र जो सुदास राजा त्याजकडून दोनशें गायी व स्त्रीसहवर्तमान दोन रथ याप्रमाणें मिळालेल्या दानास इन्द्राची स्तुति कर-णारा मी योग्यच असून, यज्ञगृहांत होत्याप्रमाणें वेदीसभोंवतीं फिरतों आहें. ( ७-१८-२२ ). पिजवनपुत्र सुदासानें दान म्हणून दिलेले सुव-र्णालंकारविभूषित, अवघड ठिकाणीं सरळ चालणारे व पृथ्वीवर नांवाज-लेले असे चार घोडे रथांत बसलेल्या पुत्रवत् पालनीय अशा मज वसि-ष्ठाला पुत्राच्या अन्नासाठीं सुखरूप वाहून नेतात. ( ७-१८-२३ ).

यस्य श्रवो रोदसी अन्तरुर्वी शीर्ष्णेशीर्ष्णे विबभाजा विभक्ता ।
सप्तेदिन्द्रं न स्रवतो गृणन्ति नि युध्यामधिमशिशादभीके ॥

॥ ७-१८-२४ ॥

इमं नरो मरुतः सश्चतानु दिवोदासं न पितरं सुदासः ।
अविष्टना पैजवनस्य केतं दूणाशं क्षत्रमजरं दुवोयु ॥

॥ ७-१८-२५ ॥

## रत्न २५८ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

यस्तिग्मशृङ्गो वृषभो न भीम एकः कृष्टीश्च्यावयति प्र विश्वाः ।
यः शश्वतो अदाशुषो गयस्य प्रयन्तासि सुष्वितराय वेदः ॥

॥ ७-१९-१ ॥

**श्री. वि. ( महाव्रत ) निष्केवल्य शस्त्र**

त्वं ह त्यदिन्द्र कुत्समावः शुश्रूषमाणस्तन्वा समर्ये ।
दासं यच्छुष्णं कुयवं न्यस्मा अरन्धय आर्जुनेयाय शिक्षन् ॥

॥ ७-१९-२ ॥

त्वं धृष्णो धृषता वीतहव्यं प्रावो विश्वाभिरूतिभिः सुदासम् ।
प्र पौरुकुत्सिं त्रसदस्युमावः क्षेत्रसाता वृत्रहत्येषु पूरुम् ॥

॥ ७-१९-३ ॥

ज्याची कीर्ति विस्तीर्ण अशा या द्यावापृथ्वींत दुमदुमून राहिली आहे, जो उदार दाता श्रेष्ठ श्रेष्ठ लोकांना धन देता झाला, त्या सुदास राजाला सप्तलोक इन्द्राप्रमाणें स्तवितात. नदीच्या तीरावर तो सुदास राजा युध्यामधी नांवाच्या शत्रूला ठार मारता झाला ! (७-१८-२४) हे मार्गदर्शक मरुत् हो ! सुदास पिता जो दिवोदास, त्यास जसें सहाय केलेंत त्याचप्रमाणें या सुदासालाहि तुम्ही सहाय करीत जा ! भक्त पिजवनपुत्र सुदासाच्या घराचेंहि रक्षण करा ! आणि त्याचें बळ अविनाशी व अक्षय्य होईल असें घडो ! (७-१८-२५).

## रत्न २५८ वें

जो इंद्र शिंगासारखा तीक्ष्ण व वृषभासारखा भयंकर आहे, जो एकाकी असूनहि सर्व शत्रूंना स्थानभ्रष्ट करतो आणि यज्ञ न करणाऱ्यांच्या घरादाराचें अपहरण करतो अशा प्रकारचा, हे इंद्रा ! जो तूं, तो तूं सोमरस काढणाऱ्या भक्तजनांस धनदाता आहेस ! (७-१९-१). हे इंद्रा ! ज्या वेळीं तूं त्या अर्जुनाचा मुलगा जो कुत्स त्याला धन देऊन, शुष्ण व कुयव या दासांना वश करून घेतलेंस, त्या वेळीं तूं स्वतः शुश्रूषा करून त्या कुत्साचें त्या युद्धांत रक्षण केलेंस. (७-१९-२). हे शत्रूवर तुटून पडणाऱ्या इन्द्रा ! तुला हविर्भाग अर्पण केलेल्या सुदास राजाचें वज्राच्या सहाय्यानें व इतर सर्व संरक्षणसाधनांनीं तूं उत्तम प्रकारें रक्षण करता झालास. तसेंच भूमीच्या निमित्तानें लढाई चालली असतां त्या लढाईत पुरुकुत्साचा मुलगा जो त्रसदस्यु त्याचें व तसेंच पुरूचेंहि तूं रक्षण केलेंस ! (७-१९-३).

त्वं नृभिर्नृमणो देववीतौ भूरीणि वृत्रा हर्यश्व हंसि ।
त्वं नि दस्युं चुमुरिं धुनिं चाऽस्वापयो दभीतये सुहन्तु ॥

॥ ७-१९-४ ॥

तव च्यौत्नानि वज्रहस्त तानि नव यत् पुरो नवतिं च सद्यः ।
निवेशने शततमाविवेषीरहंश्च वृत्रं नमुचिमुताहन् ॥

॥ ७-१९-५ ॥

स ना तात इन्द्र भोजनानि रातहव्याय दाशुषे सुदासे ।
वृष्णे ते हरी वृषणा युनज्मि व्यन्तु ब्रह्माणि पुरुशाक वाजम् ॥

॥ ७-१९-६ ॥

मा ते अस्यां सहसावन् परिष्टावघाय भूम हरिवः परादै ।
त्रायस्व नोऽवृकेभिर्वरूथैस्तव प्रियासः सूरिषु स्याम ॥

॥ ७-१९-७ ॥

श्रौ. वि. ( आयुष्कामेष्टि ) इंद्र-याज्या.

प्रियास इत् ते मघवन्नभिष्टौ नरो मदेम शरणे सखायः ।
नि तुर्वशं नि याद्वं शिशीह्यतिथिग्वाय शंस्यं करिष्यन् ॥

॥ ७-१९-८ ॥

सद्यश्चिन्नु ते मघवन्नभिष्टौ नरः शंसन्त्युक्थशास उक्था ।
ये ते हवेभिर्वि पणीँरदाशन्नस्मान् वृणीष्व युज्याय तस्मै ॥

॥ ७-१९-९ ॥

हे ऋत्विजांकडून स्तवनीय इंद्रा ! मरुतांच्या सहाय्यानें लढाईंत तूं पुष्कळ शत्रूंचा पार फडशा पाडणारा आहेस ! आणि हे हरी नांवाचे घोडे असलेल्या इंद्रा ! तूं दभीति नांवाच्या राजर्षीसाठीं चुमुरि व धुनि यांसारख्या प्रबल दस्यूंना वज्रानें मारून त्यांना जमीनदोस्त करून टाकलेंस ! ( ७–१९–४ ). हे वज्रहस्ता ! हे इंद्रदेवा ! केवढा थोर पराक्रम तो तुझा ! तूं जेव्हां शंबरासुराचीं नव्याण्णव पुरें एकजात पार फोडून टाकलींस आणि मग जेव्हां तूं त्याच्या शंभराव्या पुराचें निवासार्थ म्हणून आक्रमण केलेंस तेव्हां त्या शंबरासुराला तूं ठार केलेंस आणि नमुचीलाहि तीच वाट दाखविलीस ! ( ७–१९–५ ). हे इंद्रा ! तुला हविर्भाग अर्पण करणाऱ्या भक्त सुदासाला तूं दिलेली संपत्ति शाश्वत झाली. हे बहुकर्मन् इंद्रा ! भक्तकामकल्पद्रुम अशा तुला येथें घेऊन येण्यासाठीं हरी नांवाचे तुझे सामर्थ्यसंपन्न घोडे मी रथाला जोडतों. आमचीं स्तोत्रें बलशाली अशा तुझ्याकडे जावोत ! ( ७–१९–६ ). हे बलवंता ! हे अश्वयुक्त इंद्रा ! आमच्या स्तोत्राच्या सहाय्यानें तुझ्या शोधांत असतां हिंसकाच्या आहारीं पडण्याचा आम्हांवर प्रसंग न येवो ! हे देवा ! तूं आपल्या अबाध रक्षणांनीं आमचें रक्षण कर ! आणि तुझ्या स्तोतृजनांमध्यें आम्हीं प्रिय होऊन राहूं असें घडो ! ( ७–१९–८ ). हे धनवंता ! इंद्रदेवा ! तुझी प्राप्ति व्हावी म्हणून तुझें स्तोत्र गाणारे तुझे मित्र आम्हीं तुला प्रिय होऊन घरांतच आनंदानें कालक्रमणा करूं. अतिथिग्व दिवोदासाला तूं सुखांत ठेव आणि तुर्वश व याद्व यांना वश करून घे ! ( ७–१९–८ ). हे धनवन् इंद्रदेवा ! तुझ्या प्राप्तीसाठीं जे स्तोतृजन उक्थ नांवाचीं स्तोत्रें गातात आणि त्या स्तोत्राच्या योगानें पणीसारख्या कवडीचुंबकांना देखील दानप्रवृत्त करतात, त्या आमचा तूं तुझें तें सख्य पुढें चालविण्यास म्हणून स्वीकार कर ! (७–१९–९).

एते स्तोमा नरां नृतम तुभ्यमस्मद्र्यञ्चो ददतो मघानि ।
तेषामिन्द्र वृत्रहत्ये शिवो भूः सखा च शूरोऽविता च नृणाम् ॥
॥ ७-१९-१० ॥

नू इन्द्र शूर स्तवमान ऊती ब्रह्मजूतस्तन्वा वावृधस्व ।
उप नो वाजान् मिमीह्युप स्तीन् यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-१९-११ ॥

## रत्न २५९ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

वृषा जजान वृषणं रणाय तमु चिन्नारी नर्यं ससूव ।
प्र यः सेनानीरध नृभ्यो अस्तीनः सत्वा गवेषणः स धृष्णुः ॥
॥ ७-२०-५ ॥

**श्रौ. वि. ( महाव्रत ) निष्केवल्यशस्त्र**

स न इन्द्र त्वयताया इषे धास्त्मना च ये मघवानो जुनन्ति ।
वस्वी षु ते जरित्रे अस्तु शक्तिर्यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-२०-१० ॥

## रत्न २६० वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्र-देवता, प्रगाथ-छंद.**

न यातव इन्द्र जूजुवुर्नो न वन्दना शविष्ठ वेद्याभिः ।
स शर्धदर्यो विषुणस्य जन्तोर्मा शिश्नदेवा अपि गुर्ऋतं नः ॥
॥ ७-२१-५ ॥

हे नायका ! हे इंद्रदेवा ! तुला हविर्भाग अर्पण करणारे लोकांचे हे संघ आमच्याकडे आले आहेत. तर त्यांचें तूं संग्रामांत कल्याण करणारा हो ! त्यांचा सखा हो ! आणि देवा ! रक्षणकर्ताहि पण हो ! (७–१९–१० ). हे शूर इंद्रा ! आज आमच्याकडून स्तविला जाणारा व स्तोत्रानें प्रोत्साहित झालेला तूं शरीरानें व रक्षणानें वृद्धिंगत हो ! आणि आम्हांस खावयास अन्न व रहावयास सुरक्षित असें घरदार दे ! हे देवहो ! तुम्ही आमचें कल्याण करून आमचें सदैव रक्षण करा ! ( ७–१९–११ ).

## रत्न २५९ वें

वीर्यशाली कश्यपानें भक्तकामकल्पद्रुम अशा इंद्रास युद्धासाठीं म्हणून उत्पन्न केलें. लोकहितकारक अशा त्या इंद्रदेवाला माता अदितीनें जन्म दिला. असा तो इंद्र लोकांचा सेनापति, व जगाचा ईश्वर आहे. तसाच तो शत्रूंचा नाश करणारा, गायींचा शोध लावणारा व शत्रूंवर हल्ला करणारा असा आहे. ( ७–२०–५ ). हे इंद्रदेवा ! तुझ्या कृपेनें लाभलेल्या अन्नाचा उपभोग घेण्यासाठीं म्हणून तूं आमचें रक्षण कर ! आणि जे धनिक लोक तुला स्वतः हविर्भाग अर्पण करतात, त्यांचेंहि पण रक्षण कर ! तुझी अत्यंत प्रशस्त अशी स्तुति करण्यासाठीं म्हणून तुझा स्तुतिपाठक जो मी, त्या मला सामर्थ्य लाभो ! देवहो ! आमचें कल्याण करून सदैव आमचें रक्षण करा ! ( ७–२०–१० ).

## रत्न २६० वें

हे इंद्रदेवा ! आम्हांस राक्षस ठार मारणार नाहींत असें घडो ! आणि हे बलिष्ठा ! तसेंच ते दुष्ट आम्हांस आमच्या मुलांबाळांपासून दूर करणार नाहींत, असेंहि घडो ! तो इंद्र आमचा स्वामी असून, शत्रूंवर सत्ता चालविण्यास तो उत्सुक आहे. शिश्नक्रीडेंत मग्न असणारे शिश्नदेव आमच्या यज्ञांत न येवोत ! ( ७–२१–५ ).

## रत्न २६१ वें

**वसिष्ठपुत्र-ऋषि, वसिष्ठ-देवता, त्रिष्टुप्-छंद**

न त्वावाँ अन्यो दिव्यो पार्थिवो न जातो न जनिष्यते ।
अश्वायन्तो मघवन्निन्द्र वाजिनो गव्यन्तस्त्वा हवामहे ॥

॥ ७-३२-२३ ॥

**श्रौ. वि. ( महाव्रत ) निष्केवल्य**

मा नो अज्ञाता वृजना दुराध्यो३ माशिवासो अव क्रमुः ।
त्वया वयं प्रवतः शश्वतीरपोऽति शूर तरामसि ॥

॥ ७-३२-२७ ॥

## रत्न २६२ वें

**वसिष्ठपुत्र-ऋषि, वसिष्ठ-देवता, त्रिष्टुप्-छंद..**

उतासि मैत्रावरुणो वसिष्ठोर्वश्या ब्रह्मन् मनसोऽधि जातः ।
द्रप्सं स्कन्नं ब्रह्मणा दैव्येन विश्वे देवाः पुष्करे त्वाददन्त ॥

॥ ७-३३-११ ॥

सत्रे ह जातावीषिता नमोभिः कुम्भे रेतः सिषिचतुः समानम् ।
ततो ह मान उदियाय मध्यात् ततो जातमृषिमाहुर्वसिष्ठम् ॥

॥ ७-३३-१३ ॥

## रत्न २६३ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद,**

शं न इन्द्राग्नी भवतामवोभिः शं न इन्द्रावरुणा रातहव्या ।
शमिन्द्रासोमा सुविताय शं योः शं न इन्द्रापूषणा वाजसातौ ॥

॥ ७-३५-१ ॥

**श्रौ. वि. (महानाम्नीव्रत) जप. स्मा. वि. शांतिपाठ; वास्तु-प्रोक्षण**

## रत्न २६१ वें

हे धनवन् इन्द्रदेवा ! तुझ्या तोडीचा असा स्वर्गात काय अथवा या पृथ्वीवर काय, दुसरा कोणी जन्मत नाहीं, मागें कधीं जन्मला नाहीं ! व पुढेंहि पण जन्मणार नाहीं ! अश्व व गायी यांची इच्छा करणारे हविसंपन्न आम्ही तुला या यज्ञांत पाचारण करीत आहों. (७–३२–२३). हे इंद्रा ! चोरट्या मार्गांनीं जाणारे, हिंसा करणारे, कपटी व दुष्ट लोक आम्हांवर आक्रमण करणार नाहींत, असें घडो ! हे शूरा ! तुला आम्हीं शरण आलों असून, हा अपार भवसागर सुरळींत तरून जाऊं असें कर ! (७–३२–२७).

## रत्न २६२ वें

हे वसिष्ठा ! तूं मित्रावरुणाचा पुत्र आहेस. हे ब्रह्मन् ! उर्वशीच्या संकल्पाप्रमाणें मैत्रावरुणांनीं तिच्याकडे पाहिल्यावर त्यांचें रेत स्खलन पावलें. त्या दिव्य रेतापासून तूं उत्पन्न झाला आहेस ! याप्रमाणें उत्पन्न झालेल्या व देवविषयक वेदराशीनें युक्त असलेल्या तुला देवांनीं कमलांत धारण करून वाढविलें. ( ७–३३–११ ). सत्रामध्यें मैत्रावरुण हे दीक्षित होऊन बसले असतां, भक्तजनांच्या प्रार्थनेवरून वसतीवरीनामक कुंभामध्यें त्यांनीं आपलें वीर्य एकाच वेळीं सिंचन केलें ! त्यापासून अगस्त्य हा त्या कुंभाच्या मध्य-भागापासून उत्पन्न झाला व त्याच कुंभांतून दुसरा एक जन्मला, त्यासच वसिष्ठ असें म्हणतात ! ( ७–३३–१३ ).

## रत्न २६३ वें

आपल्या संरक्षणशक्तिनिशी इंद्राग्नी हे आम्हांस शांतिप्रद होवोत ! यज-मानदत्त हविर्भागानें संतृप्त झालेले इन्द्रावरुण आम्हांस शांतिप्रद होवोत ! इन्द्र-सोमहि आम्हांस शांति व सुखप्रद होवोत अथवा ते शांतिजनक सुख व विषयजनित आनंद देणारे होवोत ! तसेंच इंद्र व पूषा हे देवहि आम्हांस युद्धप्रसंगीं शांति देणारे होवोत ! ( ७–३५–१ ).

शं नो भगः शमु नः शंसो अस्तु शं नः पुरंन्धिः शमु सन्तु रायः। शं नः सत्यस्य सुयमस्य शंसः शं नो अर्यमा पुरुजातो अस्तु ॥ ७-३५-२ ॥

शं नो धाता शमु धर्ता नो अस्तु शं नं उरूची भवतु स्वधाभिः।
शं रोदसी बृहती शं नो अद्रिः शं नो देवानां सुहवानि सन्तु ॥
॥ ७-३५-३ ॥

शं नो अग्निर्ज्योतिरनीको अस्तु शं नो मित्रावरुणावश्विना शम्।
शं नः सुकृतां सुकृतानि सन्तु शं नं इषिरो अभि वातु वातः ॥
॥ ७-३५-४ ॥

शं नो द्यावापृथिवी पूर्वहूतौ शमन्तरिक्षं दृशये नो अस्तु।
शं न ओषधीर्वनिनो भवन्तु शं नो रजसस्पतिरस्तु जिष्णुः ॥
॥ ७-३५-५ ॥

शं न इन्द्रो वसुभिर्देवो अस्तु शमादित्येभिर्वरुणः सुशंसः।
शं नो रुद्रो रुद्रेभिर्जलाषः शं नस्त्वष्टा ग्नाभिरिह शृणोतु ॥
॥ ७-३५-६ ॥

शं नः सोमो भवतु ब्रम्ह शं नः शं नो ग्रावाणः शमु सन्तु यज्ञाः ॥
शं नः स्वरूणां मितयो भवन्तु शं नः प्रस्व१ः शम्वस्तु वेदिः ॥
॥ ७-३५-७ ॥

शं नः सूर्य उरुचक्षा उदेतु शं नश्चतस्रः प्रदिशो भवन्तु।
शं नः पर्वता ध्रुवयो भवन्तु शं नः सिन्धवः शमु सन्त्वापः ॥
॥ ७-३५-८ ॥

भगदेव आम्हांस शांति देवो ! नराशंस आम्हांस शांति देवो ! पुरन्धि आम्हांस शांति देवो ! धन आम्हांस शांति देवो ! सुयम-युक्त सत्यवचन आम्हांस शांति देवो ! अनेक जन्म घेतलेला अर्यमा देव आम्हांस शांति देवो ! ( ७–३५–२ ). धाता देव आम्हांस सुखप्रद होवो ! पापपुण्य धारण करणारा वरुण देव आम्हांस शांतिप्रद होवो ! विवर्तगमन-शील अन्नयुक्त पृथिवी आम्हांस शांतिप्रद होवो ! महान् अशा द्यावा-पृथिवी आम्हांस शांतिप्रद होवोत ! पर्वत आम्हांस शांतिप्रद होवो ! देवांचीं मंगलस्तोत्रें आम्हांस शांतिप्रद होवोत ! ( ७–३५–३ ). जोतिर्मुख अग्निदेव आम्हांस शांतिलाभ देवो ! मित्रावरुण आम्हांस शांतिलाभ देवोत ! अश्विनीदेवही आम्हांस शांतिलाभ देवोत ! पुण्यवंतांचीं पुण्यकर्में आम्हांस शांतिलाभ देवोत ! गमनशील वायुदेवहि आम्हांस शांति लाभेल अशा प्रकारें वाहो ! ( ७–३५–४). प्रथम हांकेलाच द्यावा-पृथिवी आम्हांस शांतिप्रद होवोत ! अंतरिक्ष आमच्या नेत्रांस शांतिप्रद होवो ! ओषधि व वृक्ष आम्हांस शांतिप्रद होवोत ! जयशील इन्द्रदेव आम्हांस शांतिप्रद होवो ! (७-३५-५). वसुदेवांसहित तेजस्वी इंद्र आम्हांस शांति लाभेल असें करो ! सुंदर स्तुति-संपन्न वरुण देव आदित्य देवांसमवेत आम्हांस शांति लाभेल असें करो ! दुःखहारक रुद्रदेव इतर रुद्रांसह आम्हांस शांति लाभेल असें करो ! या यज्ञसमारंभांत त्वष्टा देव देवपत्न्यांसहित आम्हांस शांति लाभेल असें करो ! (७–३५–६). सोम आम्हांस शांतिकर होवो ! देवस्तोत्र आम्हांस शांतिकर होवो! सोम कुटण्याचे ग्रावे आम्हांस शांतिकर होवोत ! यज्ञ आम्हांस शांतिप्रद होवोत ! यूपाची मापें आम्हांस शांतिप्रद होवोत ! ओषधि-म्हणजे यवादि धान्यांचीं पिकें-आम्हांस शांतिलाभ देवोत ! यज्ञशालेंतील वेदि आम्हांस शांतिलाभ देवो ! ( ७–३५–७ ). आम्हांस शांतिसुख लाभावें म्हणून तेजाचा विशाल पुंज असा सूर्यदेव वर उदय पावो ! पूर्वादि चार महा-दिशा आम्हांस शांतिसौख्याचा लाभ करून देणाऱ्या होवोत ! आम्हांस सुख लाभावें म्हणून पर्वत स्थिर होऊन राहोत ! नदीदेवता आम्हांस शांतिसुख प्राप्त करून देवोत ! आणि जलदेवता आम्हांस शांतिसुखाचा लाभ मिळवून देणाऱ्या होवोत ! ( ७–३५–८ ).

शं नो अदितिर्भवतु व्रतेभिः शं नो भवन्तु मरुतः स्वर्काः।
शं नो विष्णुः शमु पूषा नो अस्तु शं नो भवित्रं शम्वस्तु वायुः ॥
॥ ७-३५-९ ॥

शं नो देवः सविता त्रायमाणः शं नो भवन्तूषसो विभातीः ।
शं नः पर्जन्यो भवतु प्रजाभ्यः शं नः क्षेत्रस्य पतिरस्तु शंभुः ॥
॥ ७-३५-१० ॥

शं नो देवा विश्वदेवा भवन्तु शं सरस्वती सह धीभिरस्तु ।
शमभिषाचः शमु रातिषाचः शं नो दिव्याः पार्थिवाः शं नो
अप्याः ॥ ७-३५-११ ॥

शं नः सत्यस्य पतयो भवन्तु शं नो अर्वन्तः शमु सन्तु गावः ।
शं न ऋभवः सुकृतः सुहस्ताः शं नो भवन्तु पितरो हवेषु ॥
॥ ७-३५-१२ ॥

शं नो अज एकपाद् देवो अस्तु शं नोऽहिर्बुध्न्यः शं समुद्रः ।
शं नो अपां नपात् पेरुरस्तु शं नः पृश्निर्भवतु देवगोपा ॥
॥ ७-३५-१३ ॥

आदित्या रुद्रा वसवो जुषन्तेदं ब्रह्म क्रियमाणं नवीयः ।
शृण्वन्तु नो दिव्याः पार्थिवासो गोजाता उत ये यज्ञियासः ॥
॥ ७-३५-१४ ॥

ये देवानां यज्ञिया यज्ञियानां मनोर्यजत्रा अमृता ऋतज्ञाः ।
ते नो रासन्तामुरुगायमद्य यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-३५-१५ ॥

व्रतासहित अदितिदेवी आम्हांस शांतिलाभ करून देवो! शोभन स्तुति-संपन्न मरुत् देव आम्हांस शांतिलाभ करून देवोत! विश्वव्यापक विष्णुदेव आम्हांस शांतिलाभ करून देवो! पूषादेव आम्हांस शांति देणारा होवो! अंतरिक्ष आम्हांस शांतिदायक होवो! वायु आम्हांस सुखदायक होवो! (७–३५–९). जगाचा रक्षक व तेजस्वी असा सविता देव आम्हांस शांति देवो! तेजस्वी उषादेवता आम्हांस शांति देवोत! आमच्या लोकांना पर्जन्य देव शांति देवो! व सुखदाता क्षेत्रपति आम्हांस शांति देवो! (७-३५-१०). विश्वेदेव आम्हांस शांतिप्रद होवोत! स्तुतिसंपन्न सरस्वती आम्हांस शांति-प्रद होवो! यज्ञ सेवन करणारे व दान सेवन करणारे, स्वर्गात राहणारे, पृथ्वीवर असणारे व अंतरिक्षांत राहणारे असे हे सर्व आम्हांस शांतिप्रद होवोत! ( ७–३५–११ ). सत्यशील देव आम्हांस सुखप्रद होवोत! अश्वदेव आम्हांस सुखप्रद होवोत! गाई आम्हांला सुखप्रद होवोत! पुण्य-शाली व कर्मकुशल असे ऋभुदेव आम्हांस सुखप्रद होवोत! स्तवनप्रसंगीं पितर आम्हांस सुखप्रद होवोत! (७–३५–१२). अज एकपाद् देव आमचें कल्याण करो! अहिर्बुध्न्य आमचें कल्याण करो! समुद्र आमचें कल्याण करो! रोगनाशक अपांनपात् आमचें कल्याण करो! देवरक्षक पृश्नि-माता आमचें कल्याण करो! ( ७–३५–१३ ). आमचें हें नवीन स्तोत्र स्वर्गातले आदित्य, अंतरिक्षांतले रुद्र व पृथ्वीवरचे वसु देव हे गोड मानून घेवोत! शिवाय आणखी राहिलेले इतर जे स्वर्गातील, पृथ्वीवरील व आकाशांतील यज्ञार्ह देव आहेत, तेहि हें आमचें स्तोत्र श्रवण करोत! ( ७–३५–१४ ). पूजनीय देवांमध्यें जे पूजनीय आहेत, मनूलाहि जे पूजनीय व तसेच अमर व सत्यज्ञ असे जे देव आहेत, ते सर्व आम्हांस आज रोजीं विशाल किर्तीचा असा वीरपुत्र देवोत! अहो देवहो! तुम्ही आमचें कल्याण करून, सदैव आमचें रक्षण करणारे व्हा! (७–३५–१५).

## रत्न २६४ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सविता-देवता, त्रिष्टुप्-छंद**

उदु ष्य देवः सविता ययाम हिरण्ययीममतिं यामशिश्रेत् ।
नूनं भगो हव्यो मानुषेभिर्वि यो रत्ना पुरूवसुर्दधाति ॥

॥ ७-३८-१ ॥

**स्मा. वि. सूर्योपस्थान.**

## रत्न २६५ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, वाजिन-देवता, त्रिष्टुप्-छंद**

शं नो भवन्तु वाजिनो हवेषु देवताता मितद्रवः स्वर्काः ।
जम्भयन्तोऽहिं वृकं रक्षांसि सनेम्यस्मद् युयवन्नमीवाः ॥

॥ ७-३८-७ ॥

वाजेवाजेऽवत वाजिनो नो धनेषु विप्रा अमृता ऋतज्ञाः ।
अस्य मध्वः पिबत मादयध्वं तृप्ता यात पथिभिर्देवयानैः ॥

॥ ७-३८-८ ॥

## रत्न २६६ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, अग्नीन्द्रादि-देवता, जगती-छंद**

प्रातरग्निं प्रातरिन्द्रं हवामहे प्रातर्मित्रावरुणा प्रातरश्विना ।
प्रातर्भगं पूषणं ब्रह्मणस्पतिं प्रातः सोममुत रुद्रं हुवेम ॥

॥ ७-४१-१ ॥

**स्मा. वि. प्रातःस्मरण, शांतिपाठ, यजमान-अभिषेक**

## रत्न २६७ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, भग-देवता, त्रिष्टुप्-छंद**

प्रातर्जितं भगमुग्रं हुवेम वयं पुत्रमदितेर्यो विधर्ता ।
आध्रश्चिद् यं मन्यमानस्तुरश्चिद् राजा चिद् यं भगं भक्षीत्याह ॥

॥ ७-४१-२ ॥

## रत्न २६४ वें

जगत्प्रेरक असा तो सविता देव मंडलात्मक असें सुवर्णमय रूप धारण करून, तें वर आकाशांत दिसेल असें करितो. तो स्तोतृजनांकडून खचीत स्तवनार्ह असून, त्या भक्तजनांसाठीं म्हणूनच विविध प्रकारचें धन उत्पन्न करतो. ( ७-३८-१ ).

## रत्न २६५ वें

यज्ञांमध्यें स्तोत्रपाठ चालला असतां मंदगतीनें येणारे व सुंदर अन्न-संपन्न असे अश्वदेव आम्हांस सुखकारक होवोत ! आणि येथें आल्यावर हिंसक, कृपण, चोर इत्यादि दुष्ट लोक व राक्षस यांचे ते पारिपत्य करणारे होत्साते आमच्या जुनाट रोगांचें त्वरित निरसन करोत ! ( ७-३८-७ ). अहो अश्वदेवहो ! प्रतिभासंपन्न, अमर, सत्यज्ञ असे तुम्हीं धनाच्या निमित्तानें चाललेल्या युद्धप्रसंगीं आमचें रक्षण करा ! हा मधुर सोमरस प्राशन करा ! आणि तो पिऊन तृप्त झाला म्हणजे देवयान मार्गानें परत चला ! ( ७-३८-८ ).

## रत्न २६६ वें

देवाचे स्तोत्रपाठक असे आम्हीं नित्य प्रातःकाळीं अग्नि देवाला हाक मारतो. तसेंच इंद्र, इंद्रावरुण, अश्विनी, भग, पूषा, सोम व रुद्र या देवांसहि पाचारण करतो ( ७-४१-१ ).

## रत्न २६७ वें

विश्वाला धारण करणारा, जयशील व बलशाली अशा अदिती पुत्र भग-देवाला आम्हीं प्रातःकालीं हाक मारतो. त्या देवाची स्तुति करून दरिद्र असा स्तोता ' भगदेवा ! मला धन दे ! ' अशी त्याची प्रार्थना करतो आणि धनसंपन्न राजाहि ' भगदेवा ! मला धन दे ! ' म्हणून त्याची विनवणी करतो ! ( ७-४१-२ ).

भग प्रणेतर्भग सत्यराधो भगेमां धियमुदवा ददन्नः ।
भग प्र णो जनय गोभिरश्वैर्भग प्र नृभिर्नृवन्तः स्याम ॥
॥ ७-४१-३ ॥

उतेदानीं भगवन्तः स्यामोत प्रपित्व उत मध्ये अह्नाम् ।
उतोदिता मघवन्त्सूर्यस्य वयं देवानां सुमतौ स्याम ॥
॥ ७-४१-४ ॥

भग एव भगवाँ अस्तु देवास्तेन वयं भगवन्तः स्याम ।
तं त्वा भग सर्व इज्जोहवीति स नो भग पुरएता भवेह ॥
॥ ७-४१-५ ॥

समध्वरायोषसो नमन्त दधिक्रावेव शुचये पदाय ।
अर्वाचीनं वसुविदं भगं नो रथमिवाश्वा वाजिन आ वहन्तु ॥
॥ ७-४१-६ ॥

**औ. वि.** रोगनिवारणार्थ जप. **स्मा. वि.** प्रातःस्मरण; शांतिपाठ.

## रत्न २६८ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, उषा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अश्वावतीर्गोमतीर्न उषासो वीरवतीः सदमुच्छन्तु भद्राः ।
घृतं दुहाना विश्वतः प्रपीता यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-४१-७ ॥

**स्मा. वि.** प्रातःस्मरण, शांतिपाठ.

## रत्न २६९ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, रुद्र-देवता, जगती-छंद**

इमा रुद्राय स्थिरधन्वने गिरः क्षिप्रेषवे देवाय स्वधाम्ने ।
अषाळ्हाय सहमानाय वेधसे तिग्मायुधाय भरता शृणोतु नः ॥
॥ ७-४६-१ ॥

**स्मा. वि.** रुद्रसूक्त, शुद्धोदकस्नान.

हे भगदेवा ! तूं सत्यधन आहेस ! अतएव, हे देवा ! तूं आमचे मनोरथ पूर्ण करून ही आमची प्रार्थना सफल कर ! तसेंच आम्हांस गाईघोडे इत्यादि विपुल संपत्ति देऊन, आमची चांगली भरभराट कर ! आणि तुझ्या कृपाप्रसादानें आम्हीं पुत्रपौत्रादिकांनीं सुप्रजावंत होऊं असें घडो ! ( ७-४१-३ ). हे ऐश्वर्यमंडित भगदेवा ! तुझ्या अनुग्रहानें आम्हीं आज रोजीं धनसंपन्न होऊन रहावें ! आणि तसेंच प्राण्हकाळीं आणि मध्यान्हकाळींहि धनसंपन्न होऊन रहावें ! आणि हे देवा ! सूर्योदय झाला म्हणजे आम्हीं तुझ्या कृपाप्रसादानें इन्द्रादि देवांच्या सुप्रसन्न मर्जींत राहूं, असें घडो ! (७-४१-४). अहो इन्द्रप्रभृति देवहो ! भगदेव हाच भाग्यवान् असो ! त्या देवानें दिलेल्या संपत्तीनें आम्हीहि मोठे भाग्यवान् होऊं! हे भगदेवा ! सर्व लोक आपापल्या मनोरथपूरणार्थ त्रैलोक्यविख्यात अशा तुला भक्तिभावानें हांक मारतात. तर, हे भगदेवा ! तूं या यज्ञानुष्ठानांत आमचा पुढारी हो ! ( ७-४१-५ ) ज्याप्रमाणें दधिक्रावा घोडा पवित्र स्थानाकडेच जात असतो, तद्वत् या उषादेवता झाल्या तरी आमच्या यज्ञस्थानाकडेच आगमन करणाऱ्या होवोत ! वेगवान् घोडे ज्याप्रमाणें रथाला दौडत घेऊन येतात, तद्वत् या उषादेवता ऐश्वर्यसंपन्न अशा भगदेवाला आम्हांकडे शीघ्र घेऊन येवोत ! ( ७-४१-६ ).

### रत्न २६८ वें

ज्या अश्वसंपन्न, गोसंपन्न आणि वीरसंपन्न आहेत आणि तशाच ज्या मंगलमूर्ती आहेत, जलवर्षाव करणाऱ्या आहेत आणि ज्या सकल सद्गुणांनी सुसंपन्न आहेत, अशा त्या उषादेवता आम्हांस अज्ञानरूपी तमापासून सदैव दूर ठेवोत ! अहो देवहो ! आमचें कल्याण करून सदैव आमचें रक्षण करणारे असे व्हा ! ( ७-४१-७ ).

### रत्न २६९ वें

अहो स्तुतिपाठकांनो ! हें स्तोत्र तुम्ही रुद्रदेवाप्रीत्यर्थ धारण करा ! त्या देवाचें धनुष्य मोठें सुदृढ असून, तो त्यांतून बाणांचा अत्यंत जलद प्रयोग करतो. तो अन्नसंपन्न असून शत्रूंना अजिंक्य आहे. प्रतिपक्ष्याचा तो पाडाव करणारा असून, सर्व कांहीं तो जाणणारा आहे. त्या रुद्रदेवाचीं शस्त्रास्त्रें मोठीं प्रखर आहेत. असा तो रुद्रदेव आमचीं स्तुतिस्तोत्रें श्रवण करो ! ( ७-४६-

स हि क्षयेण क्षम्यस्य जन्मनः साम्राज्येन दिव्यस्य चेतति ।
अवन्नवन्तीरुप नो दुरश्चराऽनमीवो रुद्र जासु नो भव ॥
॥ ७-४६-२ ॥

या ते दिद्युदवसृष्टा दिवस्परि क्ष्मया चरति परि सा वृणक्तु नः ।
सहस्रं ते स्वपिवात भेषजा मा नस्तोकेषु तनयेषु रीरिषः ॥
॥ ७-४६-३ ॥

## रत्न २७० वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, रुद्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मा नो वधी रुद्र मा परा दा मा ते भूम प्रसितौ हीळितस्य ।
आ नो भज बर्हिषि जीवशंसे यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-४६-४ ॥

**स्मा. वि. रुद्रसूक्त.**

## रत्न २७१ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, आपो-देवता त्रिष्टुप्-छंद.**

समुद्रज्येष्ठाः सलिलस्य मध्यात् पुनाना यन्त्यनिविशमाना ।
इन्द्रो या वज्री वृषभो रराद ता आपो देवीरिह मामवन्तु ॥
॥ ७-४९-१ ॥

**स्मा. वि. पुण्याहवाचन, (विवाह) सुवर्णाभिषेक.**

या आपो दिव्या उत वा स्रवन्ति खनित्रिमा उत वा याः स्वयंजाः ।
समुद्रार्था याः शुचयः पावकास्ता आपो देवीरिह मामवन्तु ॥
॥ ७-४९-२ ॥

यासां राजा वरुणो याति मध्ये सत्यानृते अवपश्यञ्जनानाम् ।
मधुश्चुतः शुचयो याः पावकास्ता आपो देवीरिह मामवन्तु ॥
॥ ७-४९-३ ॥

तो देव पृथ्वीवर जन्मलेल्यांना संपत्ति देऊन, त्यांना सत्कार्यी प्रवृत्त करतो. तसेंच स्वर्गात जन्मलेल्या दिव्यविबुधांना ऐश्वर्य देऊन, त्यांनाहि स्वकर्तव्य बजावण्यास प्रेरणा करतो. हे रुद्रदेवा! तुझें स्तोत्र-संकीर्तन करणारे जे आम्हीं त्या आमच्या प्रजेचें रक्षण कर! आणि आमच्या घरीं उपस्थित हो! तसेंच आमच्या मुलांबाळांना रोगराई यांची बाधा होणार नाहीं असें कर! (७-४६-२). हे रुद्रदेवा! तुझें विद्युल्लतारूपी प्रखर शस्त्र आकाशांतून कडाडत जेव्हां पृथ्वीवर येऊन आदळतें, त्या वेळीं तें आम्हांवर न कोसळो म्हणजे झालें! आणि हे देवा! तुझीं जीं सहस्रावधि दिव्य औषधें आहेत, तीं आम्हांस लाभतील, असें कर! आणि आमच्या पुत्रपौत्रादिकांना इजा करूं नकोस! (७-४६-३).

## रत्न २७० वें

हे रुद्रदेवा! कृपा कर! आम्हांस ठार मारूं नकोस! त्याचप्रमाणें आमचा अव्हेरहि पण करूं नकोस! तूं जेव्हां रागावलेला असशील, त्या वेळीं आम्हीं तुझ्या तडाख्यांत सांपडणार नाहीं असें घडो! मनुष्यांना प्रशंसनीय अशा या यज्ञकर्मात आम्हांस भागीदार कर! अहो रुद्रप्रमुख देवांनो! तुम्ही आमचें कल्याण करून सदैव आमचें रक्षण करणारे असे व्हा!(७-४६-४).

## रत्न २७१ वें

मुख्यत्वेंकरून समुद्रांत राहणारें, आकाशांतून खालीं पडणारें, सर्व जगाला पावन करणारें, सतत वाहत असणारें आणि वज्रधारी व भक्त-काम-कल्पद्रुम इन्द्रानें खणून काढलेलें, असें जें दिव्य उदक, तें माझें येथें रक्षण करो! (७-४९-१). जें आकाशांत निर्माण झालें आहे, जें नदी-नदांतून वाहतें आहे, जें खोदलेल्या जागीं म्हणजे विहिरींतहि असतें, जें स्वयंभू आहे, जें समुद्राकडे वाहत जातें आणि जें तेजस्वी व पवित्र आहे, असें तें दिव्य उदक माझें रक्षण करो! (७-४९-२). ज्या उदकांचा राजा वरुण हा मनुष्यांचा खरेखोटेपणा पहात अंतरिक्षांतून गमन करीत असतो, असें तें माधुर्ययुक्त, तेजस्वी आणि पवित्र उदक आमचें रक्षण करो! (७-४९-३).

यासु राजा वरुणो यासु सोमो विश्वे देवा यासूर्जं मदन्ति ।
वैश्वानरो यास्वग्निः प्रविष्टस्ता आपो देवीरिह मामवन्तु ॥
॥ ७-४९-४ ॥

## रत्न २७२ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, नदी-देवता, अतिजगती-छंद**

याः प्रवतो निवत उद्वत उदन्वतीरनुदकाश्च याः ।
ता अस्मभ्यं पयसा पिन्वमानाः शिवा देवीरशिपदा भवन्तु सर्वा
नद्यो अशिमिदा भवन्तु ॥ ७-५०-४ ॥

**स्मा. वि. नदीप्रार्थना.**

## रत्न २७३ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, वास्तोष्पति-देवता, त्रिष्टुप्-छंद**

वास्तोष्पते प्रति जानीह्यस्मान् त्स्वावेशो अनमीवो भवा नः ।
यत् त्वेमहे प्रति तन्नो जुषस्व शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥
॥ ७-५४-१ ॥

**स्मा. वि. वास्तुहोम, शांतिपाठ, पुण्याहवाचन**

वास्तोष्पते प्रतरणो न एधि गयस्फानो गोभिरश्वेभिरिन्दो ।
अजरासस्ते सख्ये स्याम पितेव पुत्रान् प्रति नो जुषस्व ॥
॥ ७-५४-२ ॥

वास्तोष्पते शग्मया संसदा ते सक्षीमहि रण्वया गातुमत्या ।
पाहि क्षेम उत योगे वरं नो यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-५४-३ ॥

ज्या उदकांमध्यें राजा वरुण हा असतो, तसाच सोमहि असतो, ज्या उदकांत राहून सर्व देव हे अन्नानें संतृप्त होतात आणि ज्यामध्यें वैश्वानर अग्नि प्रविष्ट होऊन बसलेला आहे, असें तें दिव्य उदक माझें रक्षण करो ! ( ७-४९-४ ).

## रत्न २७२ वें

ज्या सखल प्रदेशांतून वाहणाऱ्या, ज्या खोल प्रदेशांतून वाहणाऱ्या, ज्या उंच प्रदेशावरून वाहणाऱ्या आणि तशाच ज्या जलयुक्त आहेत व ज्या जलरहित आहेत, अशा त्या सर्व दिव्य नद्या आम्हांस निरोगी करोत ! आणि आम्हांस कल्याणप्रद होवोत ! पण आम्हांस पीडा करणाऱ्या मात्र न होवोत ! ( ७-५०-४ )

## रत्न २७३ वें

हे गृहरक्षक वास्तोष्पति देवा ! तूं आमचा स्वीकार कर ! आमचा मंगल आश्रयदाता हो ! तसाच आरोग्यकारकहि हो ! आम्हीं तुला मागूं तें तें आम्हांस दे ! आमच्या पुत्रपौत्रांना व अश्वगवादिकांना सुखकर हो ! ( ७-५४-१ ). हे गृहरक्षक वास्तोष्पते ! तूं आमची या घरांत भरभराट कर ! आमची संपत्ति वृद्धिंगत कर ! हे आल्हाददायका ! आम्हीं तुझ्या सख्यत्वांत राहून, गायी, घोडे इत्यादिकांनीं संपन्न होऊन रहावें आणि जरारहित असावें ! पिता जसा पुत्राचें कल्याण करतो, तद्वत् तूंहि आमचें कल्याणच करावेंस ! (७-५४-२). हे गृहपते ! सुखकर, सुंदर व धनसंपन्न असें तुझें शेजार आम्हांस लाभेल असें कर ! हल्लीं आम्ही मिळविलेलें व पुढें मिळवावयाचें अशा उभयविध धनाचें तूं रक्षण कर ! हे वास्तोष्पति देवा ! तूं आमचें कल्याण करून, सदैव आमचा रक्षणकर्ता हो ! (७-५४-३).

## रत्न २७४ वें

**वसिष्ठ-मैत्रावरुणि ऋषि, वास्तोष्पति-देवता, गायत्री-छंद**

अमीवहा वास्तोष्पते विश्वा रूपाण्याविशन् ।

सखा सुशेव एधि नः ।। ७-५५-१ ।।

## रत्न २७५ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि--ऋषि, रुद्र-देवता, अनुष्टुप्-छंद**

त्र्यम्बकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनम् ।

उर्वारुकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ।। ७-५९-१२ ।।

**स्मा वि. मृत्युंजयजप, रुद्राक्षधारण, भस्माभिमंत्रण इ.**

## रत्न २७६ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद**

यदद्य सूर्य ब्रवोऽनागा उद्यन् मित्राय वरुणाय सत्यम् ।

वयं देवत्रादिते स्याम तव प्रियासो अर्यमन् गृणन्तः ।।

।। ७-६०-१ ।।

**स्मा. वि. सौरजप.**

## रत्न २७७ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद**

उत् सूर्यो बृहदर्चींष्यश्रेत् पुरु विश्वा जनिम मानुषाणाम् ।

समो दिवा ददृशे रोचमानः क्रत्वा कृतः सुकृतः कर्तृभिर्भूत् ।।

।। ७-६२-१ ।।

**स्मा. वि. सौरजप.**

स सूर्य प्रति पुरो न उद् गा एभिः स्तोमेभिरेतशेभिरेवैः ।

प्र नो मित्राय वरुणाय वोचोऽनागसो अर्यम्णे अग्नये च ।।

।। ७-६२-२ ।।

## रत्न २७४ वें

हे गृहपालक वास्तोष्पते ! रोगनाशक असा तूं विविध रूपांमध्यें प्रविष्ट होऊन राहिला आहेस. तर तूं आतां आमचा सखा हो ! आणि आम्हांस सुखांत ठेव ! ( ७–५५–१ ).

## रत्न २७५ वें

पुण्यगंधसंपन्न व धनधान्यसंवर्धक अशा त्रिनेत्र रुद्रदेवाचें आम्हीं पूजन करतों. काकडी पक्व झाली म्हणजे जशी ती देठापासून आपोआपच गळून पडते, तद्वत् या रुद्रदेवाच्या अनुग्रहानें आम्हीं या जन्ममृत्यूंच्या संसारबंधनांतून मुक्त व्हावें, पण मोक्षरूपी चिरजीवितापासून मात्र कदापि अलग होऊं नये ! ( ७–५९–१२ ).

## रत्न २७६ वें

हे उदय पावणाऱ्या सूर्यदेवा ! तूं जर आज आम्हांस निष्पाप असें म्हणशील तर देवांमध्यें मित्र व वरुण यांना आम्हीं खरे होऊन राहूं आणि निष्पापहि होऊं ! हे अर्यमा देवा ! हे अदिते ! देवांमध्यें तुझी स्तुति करणारे आम्हीं तुला प्रिय होऊनच असावें ! ( ७–६०–१ ).

## रत्न २७७ वें

. सर्वांना प्रेरणा करणारा हा सूर्यदेव सकल मानवमात्रासाठीं म्हणून अत्यंत व्यापक असा किरणसमूह वर धारण करतो. तो दिवसा प्रकाशत राहून सर्वांना सारखाच दर्शन देतो. तो देव विश्वजाताचा कर्ता असून प्रजापतीपासून निर्माण झाला आहे. आणि भक्तजनांच्या स्तोत्रगायनानें प्रखर बनला आहे ( ७–६२–१ ). हे सूर्यदेवा ! लोकविख्यात असा तूं आमच्या स्तोत्रानें विविधरंगी अश्वावर आरूढ होऊन आमच्या सन्मुख उदय पाव ! आणि मित्र, वरुण, अर्यमा व अग्निदेव यांस आम्हीं निष्पाप आहों असें जाहीर कर ! ( ७–६२–२ ).

वि नः सहस्रं शुरुधो रदन्त्वृतावानो वरुणो मित्रो अग्निः ।
यच्छन्तु चन्द्रा उपमं नो अर्कमा नः कामं पूपुरन्तु स्तवानाः ॥
॥ ७-६२-३ ॥

## रत्न २७८ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद**

उद्वेति सुभगो विश्वचक्षाः साधारणः सूर्यो मानुषाणाम् ।
चक्षुर्मित्रस्य वरुणस्य देवश्चर्मेव यः समविव्यक् तमांसि ॥
॥ ७-६३-१ ॥

**स्मा. वि. सौरजप.**

उद्वेति प्रसवीता जनानां महान् केतुरर्णवः सूर्यस्य ।
समानं चक्रं पर्याविवृत्सन् यदेतशो वहति धूर्षु युक्तः ॥
॥ ७-६३-२ ॥

विभ्राजमान उषसामुपस्थाद् रेभैरुदेत्यनुमद्यमानः ।
एष मे देवः सविता चच्छन्द यः समानं न प्रमिनाति धाम ॥
॥ ७-६३-३ ॥

दिवो रुक्म उरुचक्षा उदेति दूरे अर्थस्तरणिर्भ्राजमानः ।
नूनं जनाः सूर्येण प्रसूता अयन्नर्थानि कृणवन्नपांसि ॥
॥ ७-६३-४ ॥

यत्रा चक्रुरमृता गातुमस्मै श्येनो न दीयन्नन्वेति पाथः ।
प्रति वां सूर उदिते विधेम नमोभिर्मित्रावरुणोत हव्यैः ॥
॥ ७-६३-५ ॥

दुःखनिवारक व सत्यवंत असे वरुणमित्राग्निप्रभृति देव आम्हांला हजारांनीं संपत्ति अर्पण करोत! ते आल्हादकारी देव आम्हांला स्तुत्य व पूजनीय असें धन देऊन, आम्हां स्तोतृजनांचे मनोरथ पूर्ण करोत! ( ७–६२–३ ).

## रत्न २७८ वें

भाग्यशाली, जगद्रष्टा, मनुष्यमात्रांना सर्वसाधारण, व मित्रावरुण यांचा डोळा असा हा तेजस्वी सूर्यनारायण कातड्याप्रमाणें अंधकाराला सर्व बाजूंनीं वेष्टन करून वर आकाशांत उदय पावत आहे. (७–६३–१). सर्व लोकांना कार्यप्रवृत्त करणारा, अत्यंत थोर, सर्व कांहीं जाणणारा, आणि आकाशांतून जलवृष्टि करणारा असा हा सूर्यदेव एकचाकी रथांतून परिवर्तन करण्याची इच्छा धरून वर आकाशांत उदय पावत आहे. त्या रथाच्या धुरेला एतश नांवाचा पिवळ्या रंगाचा घोडा जोडला असून तो त्याला वाहून नेत आहे. ( ७–६३–२ ). हा सूर्यदेव अत्यंत कांतिमान् असून, स्तुतिपाठकांच्या स्तोत्रगायनानें हर्षभरित होत्साता, उषांमधून वर उदय पावतो. हा सवितृ-देव माझ्या इच्छा पूर्ण करणारा असून, तो सर्व जगावर सारखें प्रकाशत असलेलें आपलें तेज केव्हांहि संकुचित करीत नाहीं ( ७–६३–३ ). अंत-रिक्षाचा अलंकार, दूर जाणारा, तारण करणारा, व अत्यंत तेजस्वी असा हा सूर्यदेव वर उदय पावत आहे. खरोखर सर्व लोक त्याच्याच प्रेरणेवरून घराबाहेर पडून, आपापले उद्योगधंदे करूं लागतात ( ७–६३–४ ). सूर्याला जाण्याकरितां म्हणून देवांनीं वर आकाशांत रस्ता करून ठेविला असून, तो आकाशमार्ग धरूनच सूर्यदेव हा बाहिरी ससाण्याच्या वेगानें आपला मार्ग आक्रमीत असतो. अहो मित्रावरुणांनो! सूर्य उदय पावला म्हणजे प्रातःस्तवनांत आम्हीं स्तुतिपूर्वक हविरन्न अर्पून तुमची परिचर्या करतों. ( ७–६३–५ ).

## रत्न २७९ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सूर्य-देवता, प्रगाथ-छंद**

उदु त्यद्दर्शतं वपुर्दिव एति प्रतिह्वरे ।
यदीमाशुर्वहति देव एतशो विश्वस्मै चक्षसे अरम् ॥

॥ ७-६६-१४ ॥

**स्मा. वि. सौरजप.**

## रत्न २८० वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सूर्य-देवता, पुरउष्णिक्-छंद**

शीर्ष्णः शीर्ष्णो जगतस्तस्थुषस्पतिं समया विश्वमा रजः ।
सप्त स्वसारः सुविताय सूर्यं वहन्ति हरितो रथे ॥

॥ ७-६६-१५ ॥

## रत्न २८० (अ) वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सूर्य-देवता, गायत्री-छंद**

तच्चक्षुर्देवहितं शुक्रमुच्चरत् ।
पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतम् ॥ ॥ ७-६६-१६ ॥

**स्मा. वि. सूर्य-उदीक्षण, शांतिपाठ.**

## रत्न २८१ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्रवरुण-देवता, जगती-छंद**

न तमंहो न दुरितानि मर्त्यमिन्द्रावरुणा न तपः कुतश्चन ।
यस्य देवा गच्छथो वीथो अध्वरं न तं मर्तस्य नशते परिह्वृतिः ॥

॥ ७-८२-७ ॥

## रत्न २८२ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, वरुण-देवता, त्रिष्टुप्-छंद**

न स स्वो दक्षो वरुण ध्रुतिः सा सुरा मन्युर्विभीदको अचित्तिः ।
अस्ति ज्यायान् कनीयस उपारे स्वप्नश्चनेदनृतस्य प्रयोता ॥

॥ ७-८६-६ ॥

## रत्न २७९ वें

तें दर्शनीय सूर्य-मंडळ अंतरिक्षाजवळ उदय पावत आहे. सर्व लोकांना दर्शन घडावें म्हणून त्या सूर्यमंडळाला शीघ्रगामी असा विविध रंगाचा घोडा आकाशांतून वाहून नेत आहे. (७–६६–१४).

## रत्न २८० वें

स्थावर-जंगम सृष्टीचा स्वामी असा जो रथांत बसलेला सूर्य, त्या देवाला जगत्कल्याणासाठीं सर्व लोकांसामोरून स्वयंस्फूर्तीनें गमन करणारे असे सात हरिद्वर्ण घोडे आपल्या डोक्यांवरून वाहून आणतात. (७–६६–१५).

## रत्न २८० (अ) वें

तें विश्वप्रकाशक व देवहितकारक असें शुभ्र सूर्यमंडळ वर आकाशांत उदय पावत आहे. आम्हीं त्याचें शंभर वर्षेपर्यंत दर्शन घेत असावें व त्यासाठीं शंभर वर्षे जगून रहावें ! ( ७–६६–१६ ).

## रत्न २८१ वें

अहो इन्द्रावरुण देवहो ! ज्या भक्ताच्या यज्ञशाळेंत तुम्हीं जातां व जाऊन तेथील हविरन्नाची इच्छा करतां, त्या देवभक्ताला पाप लागत नाहीं, दुराचरण बाधत नाहीं व कसलाच त्रास अगर ताप होत नाहीं. ( ७–८२–७ ).

## रत्न २८२ वें

हे वरुणदेवा ! खरोखर सांगतों कीं, मनुष्याचें स्वभूत बल हें कांहीं त्याला पापप्रवृत्त करूं शकत नाहीं. तर त्याच्या जन्मकाळीं निर्माण झालेली ती दैवघटनाच त्याला पाप करावयास लावते आणि ती सुरा, क्रोध, फांसे व अज्ञान एतत्स्वरूपात्मक असून तीच पापाला कारण आहे. अल्प व हीन मनुष्याच्या पापप्रवृत्तीला त्याच्या अंतर्यामीं असणारा तो नियामक ईश्वरसुद्धां केव्हां केव्हां कारणीभूत होतो. शिवाय कधीं कधीं स्वप्नांतील कर्मदेखील त्या पापप्रवृत्तीला मदत करणारें होतें. ( हा माझा अपराध दैवगत असल्यामुळें तो तूं वरुणदेवा ! क्षमा कर, असा भावार्थ.) ( ७–८६–६ ).

## रत्न २८३ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, वायु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

आ नो॑ नियुद्भिः॑ शतिनी॑भिरध्वरं स॑हस्रिणी॑भिरुप॑ याहि यज्ञम् ।
वायो॑ अस्मिन् त्सव॑ने मादयस्व यूयं पा॑त स्वस्तिभिः सदा॑ नः ॥

॥ ७-९२-५ ॥

**औ. वि. वायव्य पशुहविर्भाग याज्या. स्मा. वि. अनिल-आवाहन**

## रत्न २८४ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सरस्वती-देवता, त्रिष्टुप्-छंद**

प्र क्षोद॑सा धाय॑सा सस्र एषा सर॑स्वती धरुणमाय॑सी पूः ।
प्रबाब॑धाना रथ्ये॑व याति विश्वा॑ अपो म॑हिना सिन्धुरन्याः ॥

॥ ७-९५-१ ॥

**औ. वि. प्रथमछंदोम-प्रउगशस्त्र स्मा. वि. सरस्वतीसूक्त.**

एका॑चेतत् सर॑स्वती नदीनां॑ शुचि॑र्यती गिरिभ्य आ स॑मुद्रात् ।
रायश्चेत॑न्ती भुव॑नस्य भू॑रेर्घृतं पयो॑ दुदुहे नाहु॑षाय ॥

॥ ७-९५-२ ॥

## रत्न २८५ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सरस्वान्-देवता, त्रिष्टुप्-छंद**

स वा॑वृधे नर्यो॑ योष॑णासु वृषा शिशु॑र्वृ॑षभो यज्ञिया॑सु ।
स वाजिनं॑ मघव॑द्भ्यो दधाति वि सातये॑ तन्वं॑ मामृजीत ॥

॥ ७-९५-३ ॥

**औ. वि. सारस्वत पशुवपायाग याज्या. स्मा. वि. सरस्वती-सूक्त;**

## रत्न २८३ वें

हे वायो ! शेंकडों हजारों नियुत घोड्यानिशी तूं आमच्या या हिंसा-रहित यज्ञांत ये ! आणि येऊन या प्रातःसवनांत सोमपान करून प्रमुदित हो ! हे देवहो ! तुम्ही आमचें कल्याण करा व सदैव रक्षण करणारे असे व्हा ! ( ७–९२–५ ).

## रत्न २८४ वें

ही सरस्वती नदी पोलादी शहराप्रमाणें सर्वांधार असून, मोठ्या वेगानें तिचा प्रवाह धांवत जात असतो. आणि म्हणून ती इतर सर्व नद्यांना मागें टाकीत जाते. रथांत बसलेला वीर जसा वाटेंतील झाडझुडपें तुडवून पुढें दौडत जातो, तद्वत् ही सरस्वती झाली तरी मार्गांतील अडथळे दूर करून वेगानें धांवत जाते. ( ७–९५–१ ). पर्वतापासून समुद्रापर्यंत वाह-णाऱ्या नद्यांमध्यें पवित्र अशी फक्त ही एकटी सरस्वतीच दिसत असून, तिनेंच नाहुषाची प्रार्थना ध्यानांत घेतली. आणि विपुल अन्नसंपत्तीचा वर्षाव करणारी अशी ती ही सरस्वती नाहुषाला त्या हजार वर्षे चाललेल्या सत्रांत दूध व तूप रेलचेल पुरविती झाली. (७–९५–२ ).

## रत्न २८५ वें

लोकहितकारक, बलवान्, सूक्ष्म स्वरूपांत राहणारा आणि वर्षाव करणारा असा हा अंतरिक्षस्थ सरस्वान् वायु आपल्या यज्ञार्ह स्त्रीगणांमध्यें–म्हणजे अंतरिक्षांतील जलामध्यें–वर्धन पावत आहे. अशाप्रकारचा हा सरस्वान् वायु हविसपन्न यजमानांना बलवान् पुत्र देतो आणि लाभार्थ त्यांचें शरीर परिशुद्ध करतो. ( ७–९५–३).

## रत्न २८६ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सरस्वती-देवता, त्रिष्टुप्-छंद**

उत स्या नः सरस्वती जुषाणोप श्रवत् सुभगा यज्ञे अस्मिन् ।
मितज्ञुभिर्नमस्यैरियाना राया युजा चिदुत्तरा सखिभ्यः ॥

॥ ७-९५-४ ॥

**श्रौ. वि. (दश) प्रउगशस्त्र** **स्मा. वि. सरस्वतीसूक्त.**

इमा जुह्वाना युष्मदा नमोभिः प्रति स्तोमं सरस्वति जुषस्व ।
तव शर्मन् प्रियतमे दधाना उप स्थेयाम शरणं न वृक्षम् ॥

॥ ७-९५-५ ॥

अयमु ते सरस्वति वसिष्ठो द्वारावृतस्य सुभगे व्यावः ।
वर्ध शुभ्रे स्तुवते रासि वाजान् यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥

॥ ७-९५-६ ॥

## रत्न २८७ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सरस्वती-देवता, बृहती-छंद**

बृहदु गायिषे वचोऽसुर्या नदीनाम् ।
सरस्वतीमिन्महया सुवृक्तिभिः स्तोमैर्वसिष्ठ रोदसी

॥ ७-९६-१ ॥

**श्रौ. वि. (दश) पंचमदिन प्रउगशस्त्र.** **स्मा. वि. सरस्वतीसूक्त.**

## रत्न २८८ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सरस्वती-देवता, सतोबृहती-छंद**

उभे यत्ते महिना शुभ्रे अन्धसी अधिक्षियन्ति पूरवः ।
सा नो बोध्यवित्री मरुत्सखा चोद राधो मघोनाम् ॥

॥ ७-९६-२ ॥

## रत्न २८६ वें

ती प्रसन्न झालेली व भाग्यशालिनी सरस्वती देवी या आमच्या यज्ञांत म्हटलें जाणारें स्तुतिस्तोत्र श्रवण करो ! गुडघे टेकून नमस्कारपूर्वक देव तिच्या सन्निध जातात. ती शाश्वत संपत्तीनें युक्त असून इतर नद्यांहून श्रेष्ठ आहे ! ( ७–९५–४ ). हे सरस्वति ! हें हविरन्न तुला नमस्कारपूर्वक अर्पण करून, तुजपासून आम्हीं धन मिळवूं इच्छितों. तर आमच्या स्तोत्राचा तू स्वीकार कर ! अत्यंत गोड अशा तुझ्या कृपाप्रसादाचा उपभोग घेत आम्हीं तुझा वृक्षाप्रमाणें आश्रय करून राहूं ! (७–९५–५). हे भाग्य-शालिनि सरस्वति ! हा वसिष्ठ यज्ञगृहाचीं पुढचीं व मागचीं अशीं दोन्ही बाजूचीं दारें तुझ्यासाठीं उघडीं करून ठेवीत आहे. तर हे शुभ्रवर्ण सरस्वति! तूं आम्हीं अर्पण केलेल्या हविरन्नानें सुपुष्ट हो ! आणि स्तुति करणाऱ्या मज-भक्ताला उत्तमोत्तम अन्नसामुग्री दे ! हे देवहो ! तुम्ही आमचें कल्याण करा आणि सदोदित आमचें रक्षण करणारे व्हा ! ( ७–९५–६ ).

## रत्न २८७ वें

हे वसिष्ठा ! सर्व नद्यांमध्यें अत्यंत बलसंपन्न अशा सरस्वतीप्रीत्यर्थ तूं हें महास्तोत्र पठण करीत आहेस. त्याचप्रमाणें स्वर्गांत देवतारूपानें व पृथ्वीवर वाग्रूपानें वास करणाऱ्या सरस्वतीचेंहि सुंदर स्तोत्र गाऊन पूजन कर ! ( ७–९६–१ ).

## रत्न २८८ वें

हे शुभ्रवर्ण सरस्वति ! तुझ्या महिम्यामुळेंच मनुष्यांना दिव्य व पार्थिव अग्नि यांचें ज्ञान होतें. अशा प्रकारची तूं आमचें रक्षण करून आम्हांस उपदेश कर ! मरुत्सखा अशी तूं हविसंपन्न आम्हां यजमानांना शीघ्र धन आणून दे ! ( ७–९६–२ ).

## रत्न २८९ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सरस्वती-देवता, प्रस्तारपंक्ति-छंद**

भद्रमिद् भद्रा कृणवत्सरस्वत्यकवारी चेतति वाजिनीवती ।
गृणाना जमदग्निवत् स्तुवाना वसिष्ठवत् ।। ७-९६-३ ।।

## रत्न २९० वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सरस्वान्-देवता, गायत्री-छंद**

जनीयन्तो न्वग्रवः पुत्रीयन्तः सुदानवः ।
सरस्वन्तं हवामहे ।। ७-९६-४ ।।

**श्रौ. वि. सारस्वत पशुवपा, पुरोडाश, हविपुरोनुवाक्या.**

ये ते सरस्व ऊर्मयो मधुमन्तो घृतश्चुतः ।
तेभिर्नोऽविता भव ।। ७-९६-५ ।।

पीपिवांसं सरस्वतः स्तनं यो विश्वदर्शतः ।
भक्षीमहि प्रजामिषम् ।। ७-९६-६ ।।

## रत्न २९१ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, विष्णु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

परो मात्रया तन्वा वृधान न ते महित्वमन्वश्नुवन्ति ।
उभे ते विद्म रजसी पृथिव्या विष्णो देव त्वं परमस्य वित्से ।।
।। ७-९९-१ ।।

**श्रौ. वि. वैष्णव पशुपुरोडाश याज्या. स्मा. वि. विष्णुसूक्त.**

न ते विष्णो जायमानो न जातो देव महिम्नः परमन्तमाप ।
उदस्तभ्ना नाकमृष्वं बृहन्तं दाधर्थ प्राचीं ककुभं पृथिव्याः ।।
।। ७-९९-२ ।।

इरावती धेनुमती हि भूतं सूयवसिनी मनुषे दशस्या ।
व्यस्तभ्ना रोदसी विष्णवेते दाधर्थ पृथिवीमभितो मयूखैः ।
।। ७-९९-३ ।।

## रत्न २८९ वें

ही कल्याणमूर्ति सरस्वती आमचें उदंड कल्याण करो ! तशीच सरळ मार्गानें जाणारी व विपुल अन्न असलेली ती आम्हांवर कृपादृष्टि ठेवो ! जमदग्नि ऋषीनें स्तवन केल्याप्रमाणें मज वसिष्ठाला शोभेल अशा रीतीनेंच हे देवि ! तूं मजकडून स्तविली जावीस ! ( ७–९६–३ ).

## रत्न २९० वें

स्त्रीची व पुत्रांची इच्छा करणारे, दानशील, व अग्रेसर असे आम्हीं आज रोजीं सरस्वान् देवाचें स्तवन करीत आहों. ( ७–९६–४ ). हे सरस्वन् देवा ! तुझे जे जलतरंग आहेत, ते सुरस असून जल-वर्षाव करणारे आहेत. तर त्या तरंगांनी तूं आमचें रक्षण करणारा हो ! ( ७–९६–५ ). जो सर्वांना दृश्यमान होतो त्या सरस्वान् देवाचा गर्जना करणारा मेघ आम्हांस प्राप्त होवो ! तसेंच त्या देवाच्या प्रसादानें आम्हांस प्रजा व अन्न यांचाहि लाभ घडो ! ( ७–९६–६ ).

## रत्न २९१ वें

हे मर्यादातीत वाढणाऱ्या विष्णुदेवा ! तुझा अगाध महिमा आम्हां मनुष्यांत कोणीहि जाणूं शकत नाहीं ! आम्हीं फक्त ही पृथ्वी व अंतरिक्ष हे दोनच लोक तुझे तेवढे जाणूं शकतो. त्यांपलीकडला जो उत्कृष्ट लोक आहे, तो तूंच एकटा जाणणारा आहेस. (७–९९–१). हे विष्णुदेवा ! तुझ्या महिम्याचा परम अंत हल्लीं जन्मलेला किंवा मागें जन्मून गेलेला यांपैकीं कोणीच जाणण्यास समर्थ नाहीं. तुझा तो उत्कृष्ट द्युलोक तूं मधल्यामध्येंच सावरून धरला आहेस ! इतकेंच नव्हे तर पृथ्वीचा पूर्वभागहि–अर्थात् ही समंध पृथ्वीच–तूं आपल्या प्रभावानें दृढ धरून ठेविली आहेस! (७–९९–२). अहो द्यावापृथ्वींनो ! भक्तजनांस देण्याकरितां म्हणूनच तुम्ही अन्न, गाई, व धान्य यांनीं सुसमृद्ध झालां आहांत. हे विष्णो ! तूं पृथ्वीला ऊर्ध्वमुख व स्वर्गाला अधोमुख याप्रमाणें निरनिराळ्या प्रकारें धारण करता झाला आहेस आणि सभोंवतीं पर्वत रोवून तूं ही पृथ्वी दृढ करून ठेविली आहेस ( ७–९९–३ ).

## रत्न २९२ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्राविष्णु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

उरुं यज्ञाय चक्रथुरु लोकं जनयन्ता सूर्यमुषासमग्निम् ।
दासस्य चिद् वृषशिप्रस्य माया जघ्नथुर्नरा पृतनाज्येषु ॥

॥ ७-९९-४ ॥

**श्रौ. वि. (दश) अच्छावाकशस्त्र. स्मा. वि. विष्णुसूक्त.**

इन्द्राविष्णू दृंहिताः शम्बरस्य नव पुरो नवतिं च श्नथिष्टम् ।
शतं वर्चिनः सहस्रं च साकं हथो अप्रत्यसुरस्य वीरान् ॥

॥ ७-९९-५ ॥

इयं मनीषा बृहती बृहन्तोरुक्रमा तवसा वर्धयन्ती ।
ररे वां स्तोमं विदथेषु विष्णो पिन्वतमिषो वृजनेष्विन्द्र ॥

॥ ७-९९-६ ॥

## रत्न २९३ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, विष्णु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

वषट् ते विष्णवास आ कृणोमि तन्मे जुषस्व शिपिविष्ट हव्यम् ।
वर्धन्तु त्वा सुष्टुतयो गिरो मे यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥

॥ ७-९९-७ ॥

**श्रौ. वि. अभ्युदयीष्टि याज्या.**

## रत्न २९४ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, विष्णु-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

नू मर्तो दयते सनिष्यन् यो विष्णव उरुगायाय दाशत् ।
प्र यः सत्राचा मनसा यजात एतावन्तं नर्यमाविवासात् ॥

॥ ७-१००-१ ॥

**श्रौ. वि. (उक्थ्य) तृतीयसवन अच्छावाकशस्त्र. स्मा. वि. विष्णुसूक्त**

## रत्न २९२ वें

अहो, इन्द्राविष्णुंनो! यज्ञ करणाऱ्या यजमानाकरितां म्हणून तुम्हीं स्वर्ग लोक विशाल करून ठेविलात. त्याचप्रमाणें सर्वांना प्रेरणा करणारा सूर्य, अंधकाराचा नाश करणारी उषा व असुरांनीं वेष्टित असा अग्नि यांना तुम्हींच प्रकाशित केलेंत. अहो अग्रेसर इन्द्राविष्णुंनो! त्या वृषशिप्र दासाची कपटकृत्यें तुम्हींच युद्धांत हाणून पाडलीं नाहींत काय? (७–९९–४). अहो इन्द्राविष्णुनो! चांगलीं बळकट असलेलीं त्या शंबरासुराचीं नव्याण्णव पुरें तुम्हीं झगझ्यासरशीं पार फोडून तोडून जमीनदोस्त करून टाकलींत कीं! त्याचप्रमाणें वर्चिन असुराच्या शेंकडों हजारों वीरांना तुम्हांवर त्यांनीं हात उगारण्याच्या आधींच गांठून त्यांची एकजात मुसंडी वळलीत! (७–९९–५). ही आमची थोर व मननीय स्तुति थोर, पराक्रमशाली व सामर्थ्य संपन्न अशा तुम्हांला खरोखर वर्धन करणारी आहे. हे विष्णो! आणि हे इंद्रा! या यज्ञांत तुम्हांप्रीत्यर्थ आम्हीं हें स्तोत्र अर्पण करीत आहों! तर तुम्हीं आमच्या आपत्कालीं आम्हांस भरपूर अन्न मिळेल, असें करा! (७–९९–६).

## रत्न २९३ वें

हे विष्णो! मी तुला तोंडानें वषट् म्हणून हा हविर्भाग अर्पण करीत आहे. तर हे किरणवलयांकित देवा! वषट्कारपूर्वक तुला अर्पण केलेल्या या हविरन्नाचें तूं सेवन कर! (७–९९–७).

## रत्न २९४ वें

अनेक भक्तजनांच्या स्तुतीस योग्य अशा विष्णुदेवास जो हविर्दान करतो, तो धनार्थी मनुष्य तावडतोब धन प्राप्त करून घेतो. आणि जो स्तोत्रपूर्वक त्याची महोपासना करतो आणि तसाच जो त्या महान् व जनहितकारक विष्णुदेवाची नमस्कारपूर्वक परिचर्या करतो, त्यालाहि लवकर धनप्राप्ति होते! (७–१००–१).

त्वं विष्णो सुमतिं विश्वजन्यामप्रयुतामेवयावो मतिं दाः ।
पर्चो यथा नः सुवितस्य भूरेरश्वावतः पुरुश्चन्द्रस्य रायः ॥
॥ ७-१००-२ ॥

त्रिर्देवः पृथिवीमेष एतां वि चक्रमे शतर्चसं महित्वा ।
प्र विष्णुरस्तु तवसस्तवीयान् त्वेषं ह्यस्य स्थविरस्य नाम ॥
॥ ७-१००-३ ॥

वि चक्रमे पृथिवीमेष एतां क्षेत्राय विष्णुर्मनुषे दशस्यन् ।
ध्रुवासो अस्य कीरयो जनास उरुक्षितिं सुजनिमा चकार ॥
॥ ७-१००-४ ॥

प्र तत्ते अद्य शिपिविष्ट नामाऽर्यः शंसामि वयुनानि विद्वान् ।
तं त्वा गृणामि तवसमतव्यान् क्षयन्तमस्य रजसः पराके ॥
॥ ७-१००-५ ॥

किमित्ते विष्णो परिचक्ष्यं भूत् प्र यद् ववक्षे शिपिविष्टो अस्मि ।
मा वर्पो अस्मदप गूह एतद् यदन्यरूपः समिथे बभूथ ॥
॥ ७-१००-६ ॥

वषट् ते विष्णवास आ कृणोमि तन्मे जुषस्व शिपिविष्ट हव्यम् ।
वर्धन्तु त्वा सुष्टुतयो गिरो मे यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
॥ ७-१००-७ ॥

हे मनोरथपूरका! विष्णुदेवा! लोकहितकारक व सर्व-दोषरहित अशी सद्बुद्धि तूं आम्हांस दे, कीं ज्या योगें सुलभप्राप्य, विपुल, अश्वयुक्त व आल्हादक अशा संपत्तीचा आम्हांस योग घडेल. ( ७–१००–२ ). हा विष्णुदेव शंभर किरण असलेल्या या पृथ्वीला आपल्या महिम्याच्या योगानें तीनच पावलांत समग्र आक्रमण करता झाला! पुराणांतला पुराण पुरुष असा हा विष्णुदेव आमचा स्वामी होवो! त्या पुराण पुरुषाचें रूप म्हणजे हा प्रकाशच होय.(७–१००–३). या विष्णुदेवानें असुरांकडून ही पृथ्वी अपहृत करून घेऊन, ती मनुष्यांना रहावयास म्हणून दिली. त्याचे स्तुतिपाठक असे जे भक्तजन आहेत, ते ऐहिक व पारलौकिक सुखलाभ मिळवून, तेथें स्थिर होऊन राहतात. ज्याचें भक्तिपूर्वक नामसंकीर्तन केल्यानें मानवजन्म हा सुखाला कारण होतो, तो विष्णुदेव भक्तजनांसाठीं पृथ्वीसारखें विशाल निवासस्थान मिळवून देता झाला.(७-१००-४). हे किरणमाला धारण करणाऱ्या विष्णुदेवा! तुझ्या त्या सुविख्यात नामाचें, वस्तुजात जाणणारा असा मी भक्तिभावपूर्वक संकीर्तन करीत आहें. या लोकाच्या पलीकडे राहणाऱ्या त्या महापुरुष विष्णुदेवाचें, अल्प असा मी मानव यथाशक्ति गुणगान करीत आहे. (७–१००–५). हे विष्णुदेवा! मी शिपिविष्ट आहें असे तूं सांगत असतोस, पण त्या नांवांत वर्णन करण्यासारखें असें काय आहे? शौर्यादि गुणांनीं युक्त असें जें तुझें रूप तें कृत्रिम असून, संग्रामांत तें तूं धारण करीत असतोस. पण तें गौण असून, देवा! तुझें जें खरें वैष्णव रूप आहे तें आमच्यापासून तूं लपवून ठेवूं नकोस! ( ७–१००–६ ). हे विष्णो! तोंडानें वषट्-कार म्हणून मी तुला हा हविर्भाग अर्पण करीत आहे. तर हें किरणमालिन् देवा! वषट्-कारपूर्वक अर्पण केलेल्या या हविर्भागाचें तूं सेवन कर! (७–१००–७).

# रत्न २९५ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, पर्जन्य-देवता, त्रिष्टुप्-छंद**

तिस्रो वाचः प्र वद ज्योतिरग्रा या एतद् दुह्रे मधुदोघमूधः ।
स वत्सं कृण्वन् गर्भमोषधीनां सद्यो जातो वृषभो रोरवीति ॥

॥ ७-१०१-१ ॥

**स्मा. वि. पर्जन्य-सूक्त.**

यो वर्धन ओषधीनां यो अपां यो विश्वस्य जगतो देव ईशे ।
स त्रिधातु शरणं शर्म यंसत् त्रिवर्तु ज्योतिः स्वभिष्टय१स्मे ॥

॥ ७-१०१-२ ॥

स्तरीरु त्वद् भवति सूत उ त्वद् यथावशं तन्वं चक्र एषः ।
पितुः पयः प्रति गृभ्णाति माता तेन पिता वर्धते तेन पुत्रः ॥

॥ ७-१०१-३ ॥

यस्मिन्विश्वानि भुवनानि तस्थुस्तिस्रो द्यावस्त्रेधा सस्रुरापः ।
त्रयः कोशास उपसेचनासो मध्वः श्चोतन्त्यभितो विरप्शम् ॥

॥ ७-१०१-४ ॥

इदं वचः पर्जन्याय स्वराजे हृदो अस्त्वन्तरं तज्जुजोषत् ।
मयोभुवो वृष्टयः सन्त्वस्मे सुपिप्पला ओषधीर्देवगोपाः ॥

॥ ७-१०१-५ ॥

स रेतोधा वृषभः शश्वतीनां तस्मिन्नात्मा जगतस्तस्थुषश्च ।
तन्म ऋतं पातु शतशारदाय यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥

॥ ७-१०१-६ ॥

## रत्न २५५ वें

हे ऋषे ! ज्योतिर्मय अशा ओंकारपूर्वक ऋग्यजुःसामात्मक वेदवाणीचा सुमंगल घोष कर, कीं जी वृष्टिदायक मेघाला उदकवर्षाव होईल असें करील. पर्जन्य-देव हा आपल्या बरोबर असलेल्या वैद्युताग्नीला चमकावयास लावून त्यालाच ओषधीचा गर्भ करतो. आणि आपण स्वतः तावडतोब प्रादुर्भूत होऊन, मुसळधारांनीं जलवृष्टि करूं लागतो. त्या वेळीं तो आकाशांत गडगडाट व कडकडाट करीत असतो. (७–१०१–१). जो ओषधींचा व उदकांचा संवर्धक, त्याचप्रमाणें ज्याची सत्ता सर्व जगावर चालते, असा तो पर्जन्य-देव त्रैलोक्यव्यापी असून, आम्हांला रहावयास घर व त्याबरोबरच सुखहि देवो ! तसेंच वसतादि तीनहि ऋतूंत अभिलषणीय असें तेजहि पण लाभेल असें करो ! ( ७–१०१–२ ). या पर्जन्यदेवाचें एक स्वरूप असें आहे कीं, तें वांझ गाईसारखें निर्वर्षुक आहे आणि दुसरें एक असें आहे कीं, तें धेनूसारखें जलवर्षाव करणारें आहे. पिता जो द्युलोक त्यापासून माता म्हणजे पृथ्वी ही त्या मेघोदकाचा स्वीकार करते. त्या उदकापासून उगवलेल्या हविर्द्रव्यानें तो द्युलोक वर्धन पावतो आणि त्याच उदकापासून या पृथ्वीवर जन्मलेल्या जीवजातांचेंहि संपोषण व संवर्धन होतें. ( ७–१०१–३ ). ज्यावर हें सर्व जीवजात अवलंबून आहे, ज्याचा स्वर्गादि लोक आश्रय करून आहेत व ज्यापासून उदक हें पूर्वादि तीन दिशांकडे वाहत जातें, असे ते तीन दिशांमधून वर्षाव करणारे मेघ हे त्या थोर पर्जन्यदेवासमक्ष माधुर्यपूर्ण जलवर्षाव करूं लागतात. (७–१०१–४). हें स्तोत्र त्या स्वयंदीप्त पर्जन्य देवाकरतांच केलें आहे. तें त्याच्या अंतः-करणाला जाऊन भिडो ! व तो देव त्याचें सेवन करो ! सुखदायक अशा त्या जलधारा त्या पर्जन्यदेवाच्या अनुग्रहानें आम्हांस यथाकाल लाभत जावोत ! आणि त्या पर्जन्यानें सुसंवर्धित अशा ओषधि आम्हांसाठीं फलपुष्पादिकांनी सुसमृद्ध होवोत ! ( ७–१०१–५ ). तो पर्जन्यदेव बैलाप्रमाणें ओषधींच्या बीजभूत उदकांचा उत्पादक आहे. म्हणून त्या पर्जन्यांत स्थावर-जंगमांचा आत्मा आश्रय करून असतो. असें तें पर्जन्यदत्त उदक शंभर वर्षे जगण्या-करितां म्हणून माझें संरक्षण करो ! (७–१०१–६).

## रत्न २९६ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, पर्जन्य-देवता, गायत्री-छंद**

पर्जन्याय प्र गायत दिवस्पुत्राय मीळ्हुषे ।
स नो यवसमिच्छतु ॥ ७-१०२-१ ॥

**आ. वि. (चातुर्मास्य) पर्जन्येष्टि याज्या.**

यो गर्भमोषधीनां गवां कृणोत्यर्वताम् ।
पर्जन्यः पुरुषीणाम् ॥ ७-१०२-२ ॥

**स्मा. वि. गर्भाधान.**

तस्मा इदास्ये हविर्जुहोता मधुमत्तमम् ।
इळां नः संयतं करत् ॥ ७-१०२-३ ॥

## रत्न २९७ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणिऋषि, मण्डूक-देवता, अनुष्टुप्-छंद**

संवत्सरं शशयाना ब्राह्मणा व्रतचारिणः ।
वाचं पर्जन्यजिन्वितां प्र मण्डूका अवादिषुः ॥ ७-१०३-१ ॥

## रत्न २९८ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, मण्डूक-देवता, त्रिष्टुप्-छंद**

दिव्या आपो अभि यदेनमायन् दृतिं न शुष्कं सरसी शयानम् ।
गवामह न मायुर्वत्सिनीनां मण्डूकाना वग्नुरत्रा समेति ॥
॥ ७-१०३-२ ॥

**स्मा. वि. पर्जन्यसूक्त.**

यदीमेनाँ उशतो अभ्यवर्षीत् तृष्यावतः प्रावृष्यागतायाम् ।
अख्खलीकृत्या पितरं न पुत्रो अन्यो अन्यमुप वदन्तमेति ॥
॥ ७-१०३-३ ॥

अन्यो अन्यमनु गृभ्णात्येनोरपां प्रसर्गे यदमन्दिषाताम् ।
मण्डूको यदभिवृष्टः कनिष्कन् पृश्निः संपृङ्क्ते हरितेन वाचम् ॥
॥ ७-१०३-४ ॥

## रत्न २९६ वें

अहो ऋत्विज हो ! वर्षाव करणाऱ्या द्युलोकपुत्र अशा त्या पर्जन्य-देवाची तुम्ही स्तुति करा ! तो आम्हांस व्रीहियवादि रूपानें अन्न देण्याची इच्छा करो ! (७-१०२-१). जो पर्जन्य ओषधीमध्यें, गाईमध्यें, घोड्यांमध्यें व स्त्रियांमध्यें गर्भाची उत्पत्ति करतो, ( ७-१०२-२ ). त्या पर्जन्य-देवासाठीं म्हणून अग्नीमध्यें मधुर हवीचें हवन करा ! तो देव आम्हांस अन्न तयार करून देवो ! ( ७-१०२-३).

## रत्न २९७ वें

संवत्सर सत्रात्मक व्रत आचरण करणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणें वर्षभर बिळांतच स्वस्थ पडून जणुं कांहीं तपच करीत बसलेले हे मण्डूक पर्जन्यानें प्रसन्न होत्साते, आतां मोठ्यानें बोलूं लागले आहेत. (७-१०३-१).

## रत्न २९८ वें

जेव्हां आकाशांतील उदक शुष्क पखालींप्रमाणें कोरडे ठणठणीत झालेल्या तलावांत राहणाऱ्या मंडूकांप्रत येऊन पोंचतें, तेव्हां सवत्स गायीच्या हंबरड्याप्रमाणें वृष्टिसमयीं या मंडूकांचा कलकलाट शब्द बाहेर निघतो. (७-१०३-२). तृष्णाकुल झालेल्या व म्हणून पाण्याची इच्छा करणाऱ्या या मंडूकांवर वर्षाकाल येतांच पर्जन्य जेव्हां पाण्याचा वर्षाव करूं लागतो, तेव्हां मूल जसें बापाकडे बोलत जातें, तद्वत् एक मंडूक शब्द करणाऱ्या दुसऱ्या मंडूकाकडे जातो. (७-१०३-३). पर्जन्य पडत असतां जेव्हां जलाचा वर्षाव होत असतो, तेव्हां हे मंडूक हर्षभरित होत्साते, एक दुसऱ्याला जाऊन भेटतो; व पावसांत न्हालेला, उड्या मारणारा व चित्रविचित्र रंगाचा एक मंडूक जेव्हां दुसऱ्या हिरवट रंगाच्या मंडूकाच्या आवाजाशीं आपला आवाज भिडवितो, तेव्हां त्या दोघांपैकीं एक दुसऱ्याचें जणुं कांहीं अभिनंदनच करीत असतो ! ( ७-१०३-४ ).

यदेषामन्यो अन्यस्य वाचं शाक्तस्येव वदति शिक्षमाणः ।
सर्वं तदेषां समृधेव पर्व यत् सुवाचो वदथनाध्यप्सु ॥
॥ ७-१०३-५ ॥

गोमायुरेको अजमायुरेकः पृश्निरेको हरित एक एषाम् ।
समानं नाम बिभ्रतो विरूपाः पुरुत्रा वाचं पिपिशुर्वदन्तः ॥
॥ ७-१०३-६ ॥

ब्राह्मणासो अतिरात्रे न सोमे सरो न पूर्णमभितो वदन्तः ।
संवत्सरस्य तदहः परि ष्ठ यन्मण्डूकाः प्रावृषीणं बभूव ॥
॥ ७-१०३-७ ॥

ब्राह्मणासः सोमिनो वाचमक्रत ब्रह्म कृण्वन्तः परिवत्सरीणम् ।
अध्वर्यवो घर्मिणः सिष्विदाना आविर्भवन्ति गुह्या न के चित् ॥
॥ ७-१०३-८ ॥

देवहितिं जुगुपुर्द्वादशस्य ऋतुं नरो न प्र मिनन्त्येते ।
संवत्सरे प्रावृष्यागतायां तप्ता घर्मा अश्नुवते विसर्गम् ॥
॥ ७-१०३-९ ॥

गोमायुरदादजमायुरदात् पृश्निरदाद्धरितो नो वसूनि ।
गवां मण्डूका ददतः शतानि सहस्रसावे प्र तिरन्त आयुः ॥
॥ ७-१०३-१० ॥

## रत्न २९९ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

यो मा पाकेन मनसा चरन्तमभिचष्टे अनृतेभिर्वचोभिः ।
आप इव काशिना संगृभीता असन्नस्त्वासत इन्द्र वक्ता ॥
॥ ७-१०४-८ ॥

**स्मा. वि. पाकप्रशंसा.**

हे मंडूकांनो ! पढणारा शिष्य जसा आपल्या गुरूच्या शब्दांचा अनुवाद करीत असतो, त्याप्रमाणें तुमच्यांत जेव्हां एक दुसऱ्याच्या शब्दामागून शब्द काढतो व पाण्यांत पोहत पोहत बोलूं लागतो, तेव्हां विकलांग झालेलें तुमचें शरीर सर्वांगपरिपूर्ण होतें. ( ७–१०३–५ ). एक मंडूक गाईसारखा आवाज काढतो, तर एक शेळीसारखा ओरडतो. एक चित्रविचित्र रंगाचा, तर एक हिरवट रंगाचा आहे. असे विविध प्रकारांचे हे ' मंडूक ' हें एकच नांव धारण करतात. आणि मोठा घोष करीत अनेक ठिकाणीं प्रादुर्भूत होतात. (७–१०३–६). मंडूक हो ! अतिरात्र नांवाच्या सोमयागांत ज्याप्रमाणें ब्राह्मण रात्री स्तोत्र-शस्त्रादि म्हणत असतात, तद्वत् ज्या दिवशीं पाऊस पडेल त्या दिवशीं तुम्हीं सर्व सरोवराच्या सभोंवतीं जमणारे व्हा.( ७–१०३–७). सोमयागांत स्तोत्र पठण करणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणें हे मंडूक झाले तरी महाघोष करीत आहेत. आणि प्रवर्ग्यातील ऋत्विजाप्रमाणें घामानें डबडबलेले व बिळांत दडून बसलेले कांहीं मडूक पाऊस पडला म्हणजे बाहेर पडतात. (७–१०३–८). हे पुढारी मंडूक देवांनीं घालून दिलेले संवत्सराचे नियम अगदीं कसोशीनें पाळतात व म्हणून वसंतादि त्या त्या ऋतुनियमाचें ते उल्लंघन करीत नाहींत. संवत्सर संपूर्ण होऊन पर्जन्यकाळ आला म्हणजे उन्हाळ्यांत तापानें त्रस्त झालेले हे मंडूक बिळांतून बाहेर पडतात. ( ७–१०३–९ ). गाईसारखा शब्द करणारा, अजासारखा शब्द करणारा, चित्रविचित्र वर्णाचा व हिरवट रंगाचा असे सर्व मंडूक आम्हांला संपत्ति देवोत ! वर्षाऋतु प्राप्त झाला असतां हे सर्व मंडूक आम्हांस असंख्य गाई देणारे होत्साते, आमचें आयुष्य प्रदीर्घ वाढवोत ! ( ७–१०३–१० ).

## रत्न २९९ वें

शुद्ध मनानें वागणाऱ्या मला जो दुष्ट मनुष्य खोटें बोलून नसता दोष लावतो तो लबाड मनुष्य, हे इन्द्रदेवा ! मुठींत धरलेल्या पाण्याप्रमाणें नाहींसा होवो ! ( ७–१०४–८ ).

## रत्न ३०० वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद**

सुविज्ञानं चिकितुषे जनाय सच्चासच्च वचसी पस्पृधाते ।
तयोर्यत् सत्यं यतरदृजीयस्तदित् सोमोऽवति हन्त्यासत् ॥
॥ ७-१०४-१२ ॥

न वा उ सोमो वृजिनं हिनोति न क्षत्रियं मिथुया धारयन्तम् ।
हन्ति रक्षो हन्त्यासद् वदन्तमुभाविन्द्रस्य प्रसितौ शयाते ॥
॥ ७-१०४-१३ ॥

## रत्न ३०१ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्रसोम-देवता, अनुष्टुप्-छंद**

इन्द्र जहि पुमांसं यातुधानमुत स्त्रियं मायया शाशदानाम् ।
विग्रीवासो मूरदेवा ऋदन्तु मा ते दृशन् त्सूर्यमुच्चरन्तम् ॥
॥ ७-१०४-२४ ॥

## रत्न ३०२ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, इन्द्रसोम-देवता, अनुष्टुप्-छंद**

प्रति चक्ष्व वि चक्ष्वेन्द्रश्च सोम जागृतम् ।
रक्षोभ्यो वधमस्यतमशनिं यातुमद्भ्यः ॥ ७-१०४-२५ ॥

**सातवें मंडल समाप्त**

---

## रत्न ३०० वें

हें सूज्ञांस सहज समजण्यासारखें आहे कीं, सत्य व असत्य भाषणामध्यें स्पर्धा चाललेली असते. त्यांत जें सत्य व सरळ असतें, त्याचें सोमदेव रक्षण करतो आणि जें असत्य असतें, त्याचा तो पार फडशा पाडतो. (७-१०४-१२). सोम हा पापाचरण करणाऱ्या दुष्टाला मोकळा सोडीत नाहीं. त्याचप्रमाणें खोटें बोलणाऱ्या बलाढयालाहि तो मोकळा सोडीत नाहीं. तर तो त्या दुष्टालाहि ठार करतो आणि त्या बलाढया-लाहि जमिनीवर लोळवितो. सोमहृत असे हे दोघेहि मग त्या इंद्राच्या पाशांत अडकून पडतात ! (७-१०४-१३).

## रत्न ३०१ वें

हे इन्द्रा ! पुरुषरूप धारण करणाऱ्या राक्षसाला ठार कर ! व कपट करून हिंसा करूं पाहणाऱ्या राक्षसीलाहि पण यमसदनाचा रस्ता दाखीव आणि तसेंच मारणक्रीडा करणारे मूरदेवासारखे राक्षस माना तुटून नाश पावोत ! त्यांना उगवत्या सूर्याचें दर्शन न घडो ! (७-१०४-२४).

## रत्न ३०२ वें

हे सोमदेवा ! प्रार्थना हीच कीं तूं व इन्द्र असे तुम्ही प्रत्येक राक्षसाकडे पहात असा आणि त्यांच्यावर अनेकप्रकारें देखरेख ठेवा ! तुम्ही जागृत रहा आणि आम्हांस पीडा करणाऱ्या राक्षसादिकांवर तुमचें तें प्रखर वज्रायुध फेंका ! (७-१०४-२५).

**सातवें मंडल समाप्त**

---



# मंडल आठवें

## रत्न ३०३ वें

**प्रगाथ काण्व-ऋषि, इन्द्र-देवता, प्रगाथ-छंद**

मा चिदन्यद्वि शंसत सखायो मा रिषण्यत ।

इन्द्रमित्स्तोता वृषणं सचा सुते मुहुरुक्था च शंसत ॥

॥ ८-१-१ ॥

## रत्न ३०४ वें

**मेधातिथि काण्व-ऋषि, इन्द्र-देवता, प्रतिष्ठा-छंद**

इच्छन्ति देवाः सुन्वतं न स्वप्नाय स्पृहयन्ति ।

यन्ति प्रमादमतन्द्राः ॥ ८-२-१८ ॥

**औ. वि. ( अग्नि ) प्रातरनुवाक**

## मराठी अर्थ

### रत्न ३०३ वें

अहो मित्रहो ! इंद्र देवाच्या स्तोत्राशिवाय अन्य स्तोत्र गाऊं नका. आणि गाऊन व्यर्थ शिणूं नका । सोम पिळून तयार झाला म्हणजे त्या मनोरथपूरक इंद्र देवाचेंच तुम्ही सर्व मिळून स्तवन करा ! ( ८–१–१ ).

### रत्न ३०४ वें

देव हे सोम अर्पण करणाराची इच्छा करतात. त्याच्या झोंपेची इच्छा करीत नाहींत. म्हणूनच सदैव जागरूक असणारे ते अत्यंत मदकर असा सोमरस प्राप्त करून घेतात. ( ८–२–१८ ).

## रत्न ३०५ वें

**मेध्यतिथि काण्व-ऋषि, इन्द्र-देवता, प्रगाथ-छंद.**

भूयाम ते सुमतौ वाजिनो वयं मा नः स्तरभिमातये ।
अस्माञ्चित्राभिरवतादभिष्टिभिरा नः सुम्नेषु यामय ॥ ८-३-२ ॥

## रत्न ३०६ वें

**वत्स काण्व-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद**

त्वमग्ने व्रतपा असि देव आ मर्त्येष्वा ।
त्वं यज्ञेष्वीड्यः ॥ ८-११-१ ॥

**श्रौ. वि. (अग्नि) प्रतिरनुवाक. स्मा. वि. व्रतलोपार्थ आज्यहोम.**

## रत्न ३०६ (अ)

**वत्स काण्व-ऋषि, अग्नि-देवता, वर्धमान-छंद**

त्वमसि प्रशस्यो विदथेषु सहन्त्य ।
अग्ने रथीरध्वराणाम् ॥ ८-११-२ ॥

## रत्न ३०६ (ब)

**वत्स काण्व-ऋषि, अग्नि-देवता, प्रतिष्ठा-छंद**

स त्वमस्मदप द्विषो युयोधि जातवेदः ।
अदेवीरग्ने अरातीः ॥ ८-११-३ ॥
अन्ति चित्सन्तमह यज्ञं मर्तस्य रिपोः ।
नोप वेषि जातवेदः ॥ ८-११-४ ॥
मर्ता अमर्तस्य ते भूरि नाम मनामहे ।
विप्रासो जातवेदसः ॥ ८-११-५ ॥
विप्रं विप्रासोऽवसे देवं मर्तास ऊतये ।
अग्निं गीर्भिर्हवामहे ॥ ८-११-६ ।

## रत्न ३०५ वें

हे इंद्र देवा ! हविष्मान् असे आम्ही तुझ्या सुप्रसन्न मर्जीत राहूं असें घडो ! शत्रूचा पक्ष घेऊन तूं आम्हांस चिरडूं नकोस ! तुझ्या अभीष्ट व विविध संरक्षण-शक्तीनिशी तूं आमचें रक्षण कर ! आणि आम्हांस सदैव सुखी राख ! ( ८–३–२ ).

## रत्न ३०६ वें

हे अग्ने ! तूं सत्कर्मांचें रक्षण करणारा आहेस. म्हणून यज्ञकर्मांत तूं स्तवनार्ह झाला आहेस. ( ८–११–१ ).

## रत्न ३०६ (अ) वें

हे शत्रूचा पराभव करणाऱ्या अग्ने ! तूं आमच्या यज्ञमंडपांत प्रशंसनीय आहेस, आणि यज्ञकार्यांचा नेता आहेस. ( ८–११–२ ).

## रत्न ३०६ (ब) वें

हे जातवेद अग्ने ! आमचा जे द्वेष करणारे आहेत, त्यांना तूं दूर–अति दूर–पिटाळून लाव ! तसेंच जे देवनिंदक व आमचे शत्रु आहेत, त्यांनाहि आमच्यापासून दूर ठेव ! ( ८–११–३ ). हे सर्वज्ञ अग्ने ! आमचा जो शत्रु आहे, तो तुझ्या कितीहि जवळ असला तरी त्याच्या यज्ञाचा तूं स्वीकार करूं इच्छित नाहींस ( ८–११–४ ). आम्ही मर्त्यजन अमर अशा तुझ्या श्रेष्ठ नामाचें संकीर्तन करीत आहों. कारण, हे देवा ! तूं शहाणा व सर्वज्ञ आहेस ! ( ८–११–५ ). ज्ञानी असे आम्ही ज्ञानी अशा अग्निदेवास हवीनें तृप्त करण्यास व आमचें रक्षण करण्यास स्तोत्र म्हणून येथें बोलावीत आहों. ( ८–११–६ ).

## रत्न ३०७ वें

**गोषूक्त्यश्वसूक्तिनौ काण्वायनौ-ऋषि, इन्द्र-देवता, गायत्री-छंद**

यदिन्द्राहं यथा त्वमीशीय वस्व एक इत् ।
स्तोता मे गोषखा स्यात् ॥ ८-१४-१ ॥

**श्रौ. वि. (महाव्रत) निष्केवल्यशस्त्र.**

शिक्षेयमस्मै दित्सेयं शचीपते मनीषिणे ।
यदहं गोपतिः स्याम् ॥ ८-१४-२ ॥
धेनुष्ट इन्द्र सूनृता यजमानाय सुन्वते ।
गामश्वं पिप्युषी दुहे ॥ ८-१४-३ ॥
न ते वर्तास्ति राधस इन्द्र देवो न मर्त्यः ।
यद्दित्ससि स्तुतो मघम् ॥ ८-१४-४ ॥
यज्ञ इन्द्रमवर्धयद् यद्भूमिं व्यवर्तयत् ।
चक्राण ओपशं दिवि ॥ ८-१४-५ ॥
अपां फेनेन नमुचेः शिर इन्द्रोदवर्तयः ।
विश्वा यदजयः स्पृधः ॥ ८-१४-१३ ॥
मायाभिरुत्सिसृप्सत इन्द्र द्यामारुरुक्षतः ।
अव दस्यूँरधूनुथाः ॥ ८-१४-१४ ॥
असुन्वामिन्द्र संसदं विषूचीं व्यनाशयः ।
सोमपा उत्तरो भवन् ॥ ८-१४-१५ ॥

## रत्न ३०८ वें

**इरिम्बिठि काण्वऋषि-अग्निसूर्यानिल-देवता, उष्णिक-छंद**

शमग्निरग्निभिः करच्छं नस्तपतु सूर्यः ।
शं वातो वात्वरपा अप स्त्रिधः ॥ ८-१८-९ ॥

**स्मा. वि. शनैश्वर आवाहन.**

## रत्न ३०७ वें

हे इंद्रा! जसा तूं संपत्तीचा एकटाच अधिकारी आहेस तसाच मीहि जर झालों तर माझी स्तुति करणारा भक्त खात्रीनें गाईबैलांनीं संपन्न होईलच. ( ८-१४-१ ). हे शक्तिमान् इंद्रा! मी जर तुझ्या प्रसादानें गोधन-संपन्न झालों तर माझ्याकरितां स्तुति करणाऱ्या स्तोत्याला मी धन देऊं इच्छीन. इतकेंच काय, देऊनहि टाकीन ( ८-१४-२ ). हे इंद्रा! स्तोत्याचा उत्कर्ष करणारी तुझी स्तुतिरूप धेनु भक्ताला गवाश्वादि सर्व अभिलषित संपत्ति देण्यास समर्थ आहे ( ८-१४-३ ). स्तुतीनें सुप्रसन्न झालेला तूं भक्ताला जेव्हां धन देऊं इच्छितोस, तेव्हां त्यास अडथळा करणारा असा देवांत कोणी नाहीं आणि मनुष्यांत तर नाहींच नाहीं! ( ८-१४-४ ). यज्ञ इंद्राला संवर्धन करतो. तो इन्द्र आकाशांत राहून, आपलें सामर्थ्य मेघरूपानें प्रगट करीत पृथ्वीला सुपीक करतो.(८-१४-५). हे इंद्र देवा! ज्या वेळीं तूं सर्व शत्रुसैन्याचा धुव्वा उडवून दिलास, तेव्हां त्या नमुचि राक्षसाचें मस्तक तूं पाण्याच्या फेंसानें तोडून तें सरळ आकाशांत उडवून दिलेंस! ( ८-१४-१३ ). तसेंच आपल्या कपट कृत्यांनीं सर्वत्र धुमाकूळ घालणाऱ्या आणि स्वर्गावर चढाई करूं पाहणाऱ्या दुष्ट दस्यूंना तूं खालीं लोटून दिलेंस ( ८-१४-१४ ). हे देवा! सोमपान करून बलसंपन्न होत्साता तुला सोम अर्पण न करणाऱ्या व इतस्ततः भटकणाऱ्या दुष्ट लोकांचे तांडे तूं पार नष्ट करून टाकलेस. (८-१४-१५).

## रत्न ३०८ वें

अग्नि देव आपल्या अंशभूत गार्हपत्यादि अग्निसमवेत आम्हांस सुख देवो! सूर्य आम्हांस सुखकारक रीतीनें उष्णता देणारा होवो! तो निष्पाप वायु झाला तरी आम्हांस क्षेम होईल अशा बेतानें वाहो! आणि हे सर्व अग्न्यादि देव आमच्या शत्रूंचा नाश करोत! ( ८-१८-९ ).

## रत्न ३०९ वें

**इरिम्बिठि काण्व-ऋषि, आदित्य-देवता, उष्णिक-छंद**

अपामीवामप स्रिधमप सेधत दुर्मतिम् ।
आदित्यासो युयोतना नो अंहसः ॥ ८-१८-१० ॥
युयोता शरुमस्मदाँ आदित्यास उतामतिम् ।
ऋधग्द्वेषः कृणुत विश्ववेदसः ॥ ८-१८-११ ॥
तत्सु नः शर्म यच्छताऽऽदित्या यन्मुमोचति ।
एनस्वन्तं चिदेनसः सुदानवः ॥ ८-१८-१२ ॥
यो नः कश्चिद् रिरिक्षति रक्षस्त्वेन मर्त्यः
स्वैः ष एवै रिरिषीष्ट युर्जनः ॥ ८-१८-१३ ॥
समित् तमघमश्नवद् दुःशंसं मर्त्यं रिपुम् ।
यो अस्मत्रा दुर्हणावाँ उप द्वयुः ॥ ८-१८-१४ ॥
पाकत्रा स्थन देवा हृत्सु जानीथ मर्त्यम् ।
उप द्वयुं चाद्वयुं च वसवः ॥ ८-१८-१५ ॥

## रत्न ३१० वें

**सोभरि काण्व-ऋषि, अग्नि-देवता, प्रगाथ-छंद**

भद्रो नो अग्निराहुतो भद्रा रातिः सुभग भद्रो अध्वरः ।
भद्रा उत प्रशस्तयः ॥ ८-१९-१९ ॥

**श्री. वि. (अभिप्लविक-उक्थ) तृतीयसवन, स्तोत्रिया**

यदग्ने मर्त्यस्त्वं स्यामहं मित्रमहो अमर्त्यः ।
सहसः सूनवाहुत ॥ ८-१९-२५ ॥

## रत्न ३०९ वें

हे आदित्य हो ! तुम्ही आमचे रोग दूर करा ! शत्रूंना पिटाळून लावा ! आमचें वाईट इच्छिणाऱ्यांना नष्ट करा ! आणि आम्हांस सर्व पापापासून मुक्त करा ! ( ८–१८–१० ). हे आदित्य हो ! हिंसकांना आम्हांपासून दूर करा ! आमच्यांतील दुर्बुद्धि काढून न्या ! हे सर्वज्ञ हो ! आमचे जे शत्रु आहेत, त्यांना लांब ठेवा ! ( ८–१८–११ ). हे अत्यंत उदार आदित्य हो ! जें पातक्याला देखील त्याच्या पापापासून मुक्त करूं शकतें, असें सुख तुम्ही आम्हांस द्या ! ( ८–१८–१२ ). जो कोणी राक्षसबुद्धीनें आमचा घात करूं पाहतो, तो दुष्ट मानव आपल्या स्वतःच्या कर्मानेंच नाश पावो ! तो दुर्जन दुःखांत पडून त्यांतच त्याचा अंत होवो ! (८-१८-१३) जो आमच्याविषयीं दुष्टबुद्धि धारण करतो व दुटप्पी धोरणानें वागूं पाहतो, त्या दुष्ट दुर्जनाला त्याचेंच पातक खाऊन टाको ! (८–१८–१४). अहो देव हो ! तुम्ही परिपक्वज्ञानी आहांत. म्हणून आम्हां मनुष्यांत कपटी कोण आणि निष्कपटी कोण हें तुम्ही आपल्या मनांत सहज ओळखूं शकतां. ( ८–१८–१५ ).

## रत्न ३१० वें

हविर्भाग अर्पून तृप्त केलेला अग्निदेव आम्हांस कल्याणप्रद होवो ! हे शोभनधन अग्ने ! दान आम्हांस कल्याणप्रद होवो ! यज्ञ आम्हांस कल्याणप्रद होवो ! त्याचप्रमाणें आमचीं स्तोत्रेंहि आम्हांस कल्याणप्रद होवोत ! ( ८–१९–१९ ). हे बलपुत्रा ! घृताहुति अर्पण केलेल्या आणि अनुकूल तेज असलेल्या अग्निदेवा ! मर्त्य असा मी जेव्हां उपासनाद्वारा तुझ्या स्वरूपाला प्राप्त होईन, तेव्हां मी तुझ्याप्रमाणेंच खात्रीनें अमर होईनच होईन ! ( ८–१९–२५ ).

## रत्न ३११ वें

**विश्वमना वैयश्वः-ऋषि, इन्द्र-देवता, उष्णिक-छंद**

अगोरुधाय गविषे द्युक्षाय दस्म्यं वचः ।
घृतात् स्वादीयो मधुनश्च वोचत ॥ ८-२४-२० ॥

## रत्न ३१२ वें

**मनुर्वैवस्वत-ऋषि, विश्वेदेव-देवता, पुरउष्णिक-छंद**

यथा वशन्ति देवास्तथेदसत् तदेषां नकिरा मिनत् ।
अरावा चन मर्त्यः ॥ ८-२८-४ ॥

## रत्न ३१३ वें

**मनुर्वैवस्वत-ऋषि, विश्वेदेव-देवता, गायत्री-छंद**

नहि वो अस्त्यर्भको देवासो न कुमारकः ।
विश्वे सतोमहान्त इत् ॥ ८-३०-१ ॥

## रत्न ३१४ वें

**मनुर्वैवस्वत-ऋषि, यज्ञ व यजमान-देवता, गायत्री-छंद**

यो यजाति यजात इत् सुनवच्च पचाति च ।
ब्रह्मेदिन्द्रस्य चाकनत् ॥ ८-३१-१ ॥

**श्रौ. वि. (दश) नवमदिन वैश्वदेवशस्त्र.** **स्मा. वि. यज्ञप्रशंसा.**

पुरोळाशं यो अस्मै सोमं ररत आशिरम् ।
पादित् तं शक्रो अंहसः ॥ ८-३१-२ ॥
तस्य द्युमाँ असद् रथो देवजूतः स शूशुवत् ।
विश्वा वन्वन्नमित्रिया ॥ ८-३१-३ ॥
अस्य प्रजावती गृहेऽसश्चन्ती दिवेदिवे ।
इळा धेनुमती दुहे ॥ ८-३१-४ ॥

## रत्न ३११ वें

हे ऋत्विज हो ! स्तोत्राचा नाश न करणारा, इतकेंच नव्हे, तर स्तुतिप्रिय व तेजस्वी अशा त्या इंद्रदेवाप्रीत्यर्थ घृताहूनहि रुचिकर व मधाहूनहि मधुर अशी स्तुति करा ! ( ८–२४–२० ).

## रत्न ३१२ वें

देव जशी इच्छा करतात तसेंच होतें. ती त्यांची इच्छा कोणीहि भंग करूं शकत नाहीं. देव एखाद्या मनुष्याची इच्छा करतील तर तो कट्टा कंजूष असला तरी त्यांना हविप्रदान करण्यास प्रवृत्त होतो. (८–२८–४).

## रत्न ३१३ वें

देव हो ! तुम्हांमध्यें कोणी बालकहि नाही आणि कोणी कुमारहि नाहीं. तुम्हीं सर्व सारखेच नित्य तरुण आहां. ( ८–३०–१ ).

## रत्न ३१४ वें

जो यज्ञ करतो तो हविसंपन्न होत्साता पुनः अभीष्टप्राप्त्यर्थ देवांना हविप्रदान करतो. त्याचप्रमाणें तोच पुढें सोमरसहि तयार करतो आणि पशुपुरोडाशादि हविरन्नहि शिजवितो. असा हा यजमान इंद्राच्या स्तोत्राची पुनः पुनः इच्छा करीत असतो. ( ८–३१–१ ). जो देवभक्त इंद्राप्रीत्यर्थ पुरोडाश व आशिर ( दुग्धमिश्रित सोम ) अर्पण करतो त्या देवभक्ताला तो सर्वसमर्थ इंद्र सर्व अरिष्टांपासून रक्षण करतो, ( ८–३१–२ ). त्या .देवोपासकाचा देवप्रेरित व तेजस्वी रथ यज्ञरूपानें त्याच्याकडे येतो. त्यायोगें तो शत्रूंनीं निर्माण केलेलीं सर्व संकटें विलयास नेतो, आणि आपण स्वतः पुत्र-धनादिकांनीं संवर्धन पावतो ( ८–३१–३ ). सवत्स, घर सोडून न जाणारी, भरपूर दूध देणारी अशी गाय व त्याबरोबरच सुमधुर व पुष्टिकर अन्न हीं या देव-भक्ताच्या घरीं देवांकडून नित्य पुरविलीं जातात. ( ८–३१–४ ).

## रत्न ३१४ (अ) वें

**मनुर्वैवस्तव-ऋषि, दंपती-देवता, गायत्री-छंद.**

या दम्पती समनसा सुनुत आ च धावतः ।
देवासो नित्ययाशिरा ॥ ८-३१-५ ॥

**श्रौ. वि. दंपत्याशिर्वाद.**

## रत्न ३१४ (ब) वें

**मनुर्वैवस्तव-ऋषि, दम्पत्याशिष-देवता, गायत्री-छंद**

प्रति प्राशव्याँ इतः सम्यञ्चा बर्हिराशाते ।
न ता वाजेषु वायतः ॥ ८-३१-६ ॥
न देवानामपि ह्नुतः सुमतिं न जुगुक्षतः ।
श्रवो बृहद् विवासतः ॥ ८-३१-७ ॥
पुत्रिणा ता कुमारिणा विश्वमायुर्व्यश्नुतः ।
उभा हिरण्य-पेशसा ॥ ८-३१-८ ॥

## रत्न ३१५ वें

**मनुर्वैवस्वत-ऋषि, दंपती-देवता, अनुष्टुप्-छंद**

वीतिहोत्रा कृतद्वसू दशस्यन्तामृताय कम् ।
समूधो रोमशं हतो देवेषु कृणुतो दुवः ॥ ८-३१-९ ॥

## रत्न ३१६ वें

**मनुर्वैवस्वत-ऋषि, दंपत्याशिष-देवता, पादनिचृत्-छंद**

आ शर्म पर्वतानां वृणीमहे नदीनाम् ।
आ विष्णोः सचाभुवः ॥ ८-३१-१० ॥

**श्रौ. वि. दंपती आशिर्वाद**

एतु पूषा रयिर्भगः स्वस्ति सर्वधातमः ।
उरुरध्वा स्वस्तये ॥ ८-३१-११ ॥

## रत्न ३१४ (अ) वें

हे देवहो ! जे देवकार्यांत समान विचाराचे असे जायापती सोमरस तयार करतात, व तो रस दशापवित्रांतून गाळून दूधांत मिसळतात. ( ८-३१-५ ).

## रत्न ३१४ (ब) वें

त्यांना हितकारक अन्न लाभतें, ते चांगले यज्ञ करतात, आणि म्हणून अशा दंपतीला अन्नाचा केव्हांहि तुटवडा पडत नाहीं. ( ८-३१-६ ). हीं नवरा-बायको देवांशीं ठकबाजी करीत नाहींत किंवा त्यांच्याविषयींची आपलीं पूज्यबुद्धि लपवून ठेवीत नाहींत. देवहो ! पुष्कळ हविरन्नानें तीं तुमची परिचर्या करतात. ( ८-३१-७ ). घरांत पुत्र व कुमार यांनीं युक्त होऊन आणि विविध सुवर्णालंकारांनीं मंडित होऊन तीं उभयतां सर्व आयुष्य धनपुत्रादिकांसमवेत उत्तम रीतीनें सुखांत घालवितात. ( ८--३१-८ ).

## रत्न ३१५ वें

यज्ञप्रिय, हवि अर्पण करणारे, धन देणारे हे जायापती वंशवृद्धीसाठीं म्हणून रतिविलास करतात आणि देवांची यथाकाल सेवाहि पण करतात. ( ८-३१-९ ).

## रत्न ३१६ वें

पर्वतांचें, नद्यांचें, देवांसमवेत असणाऱ्या विष्णूचें जें सुख, त्याची आम्ही इच्छा करीत आहों. ( ८-३१-१० ). धनदाता पूषा व सर्वाधार भगदेव आमच्या कल्याणाकरितां आमच्याकडे येवो ! नंतर मार्ग-रक्षक पूषादेव येथें आल्यावर हा विस्तीर्ण मार्ग आम्हांस कल्याणकारक होईल, असें घडो ! (८-३१-११).

अरमतिरनर्वणो विश्वो देवस्य मनसा ।
आदित्यानामनेह इत् ॥ ८-३१-१२ ॥
यथा नो मित्रो अर्यमा वरुणः सन्ति गोपाः ।
सुगा ऋतस्य पन्थाः ॥ ८-३१-१३ ॥

## रत्न ३१७ वें

**मनुर्वैवस्वत-ऋषि, दम्पत्याशिष-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अग्निं वः पूर्व्यं गिरा देवमीळे वसूनाम् ।
सपर्यन्तः पुरुप्रियं मित्रं क्षेत्रसाधसम् ॥ ८-३१-१४ ॥

**सौ. वि. दंपती आशिर्वाद.**

## रत्न ३१८ वें

**मनुर्वैवस्वत-ऋषि, दम्पत्याशिष-देवता, पंक्ति-छंद.**

मक्षू देववतो रथः शूरो वा पृत्सु कासु चित् ।
देवानां य इन्मनो यजमान इयक्षत्यभीदयज्वनो भुवत् ॥
॥ ८-३१-१५ ॥

**सौ. वि. दंपती आशिर्वाद.**

न यजमान रिष्यसि न सुन्वान न देवयो ।
देवानां य इन्मनो यजमान इयक्षत्यभीदयज्वनो भुवत् ॥
॥ ८-३१-१६ ॥

नकिष्टं कर्मणा नशन्न प्र योषन्न योषति ।
देवानां य इन्मनो यजमान इयक्षत्यभीदयज्वनो भुवत् ॥
॥ ८-३१-१७ ॥

असदत्र सुवीर्यमुत त्यदाश्वश्व्यम् ।
देवानां य इन्मनो यजमान इयक्षत्यभीदयज्वनो भुवत् ॥
॥ ८-३१-१८ ॥

शत्रूकडे न जाणाऱ्या पूषादेवाची सर्व स्तोतृजन मुक्तकंठानें स्तुति करतात. अदितिपुत्रांना उद्देशून दिलेलें दान खरोखर निष्पापच असतें. (८-३१-१२). मित्र, अर्यमा व वरुण हे आमचे ज्या मार्गानें रक्षक करणारे होतील असे ते यज्ञाचे मार्ग त्यांना सुगम होवोत ! (८-३१-१३).

## रत्न ३१७ वें

अहो देवहो ! तुमचा जो मुख्यांतला मुख्य अग्नि देव आहे, त्याचें आम्ही धनप्राप्त्यर्थ स्तोत्र गाऊन स्तवन करितों. तो देव पुष्कळ लोकांना अभीष्ट पुरवून संतुष्ट करणारा आणि मित्राप्रमाणें यज्ञांत सहाय्य करणारा आहे. ( ८-३१-१४ ).

## रत्न ३१८ वें

शूर वीर हा जसा शत्रुसैन्यांत धूमधडाक्यानें शिरतो, तद्वत् देवभक्ताचा रथ झाला तरी कसल्याहि कठीण मार्गांतून सहज जाऊं शकतो. जो मनःपूर्वक देवाचें भजनपूजन करूं इच्छितो, तो देव न मानणाऱ्या नास्तिकाचा पुरा बींमोड करू शकतो. ( ८-३१-१५ ). हे यज्ञकर्त्या यजमाना ! तुझा नाश होणार नाहीं ! सोम अर्पण करणाऱ्या देवोपासका ! तुझाहि नाश होणार नाहीं ! त्याप्रमाणें हे देवसेवेच्छुभक्ता ! तुझाहि पण नाश होणार नाहीं ! तर तुम्हां सर्वांचा पुत्रपौत्रादि संततींनीं उत्कर्षच होईल ! जो देवाची उपासना करतो तो देवपूजा न करणाऱ्या नास्तिकाचा अखेर पाडावच करतो. ( ८-३१-१६ ). जे लोक देवांचें मनःपूर्वक यजनपूजन करतात, त्यांचा नाश करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. तो देवभक्त आपल्या स्थानापासून केव्हांहि चळत नाहीं ! तो अयजनशील अशा नास्तिकाचा पराभव करण्यास पूर्ण समर्थ होतो ! ( ८-३१-१७ ). जो भक्त देवांची मनःपूर्वक उपासना करूं इच्छितो त्याला पराक्रमी पुत्र होतात. त्यालाच वेगवान् घोडे लाभतात आणि संपत्तिहि लाभते ! आणि तोच देवांप्रीत्यर्थ यज्ञ न करणाऱ्या पाखंडाला अखेर चिरडून टाकण्यास समर्थ होतो ! ( ८-३१-१८ ).

## रत्न ३१९ वें

**मेध्यातिथि काण्व-ऋषि, इन्द्र-देवता, गायत्री-छंद.**

इन्द्रश्चिद् घा तदब्रवीत् स्त्रिया अशास्यं मनः ।
उतो अह क्रतुं रघुम् ।। ८-३३-१७ ।।

## रत्न ३२० वें

**नाभाक काण्व-ऋषि, इन्द्राग्नी-देवता, महापंक्ति-छंद.**

यदिन्द्राग्नी जना इमे विह्वयन्ते तना गिरा ।
अस्माकेभिर्नृभिर्वयं सासह्याम पृतन्यतो वनुयाम वनुष्यतो ।
नभन्तामन्यके समे ।। ८-४०-७ ।।

**श्रौ. वि. ( महाव्रत ) निष्केवल्य शस्त्र.**

## रत्न ३२१ वें

**विरूप आंगिरस-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद.**

समिधाग्निं दुवस्यत घृतैर्बोधयतातिथिम् ।
आस्मिन् हव्या जुहोतन ।। ८-४४-१ ।।

**श्रौ. वि. ( अग्नि ). प्रातरनुवाक.**

अग्ने स्तोमं जुषस्व मे वर्धस्वानेन मन्मना ।
प्रति सूक्तानि हर्य नः ।। ८-४४-२ ।।
अग्निं दूतं पुरो दधे हव्यवाहमुप ब्रुवे ।
देवाँ आ सादयादिह ।। ८-४४-३ ।।

**स्मा. वि. अग्नि-आवाहन. अग्निपूजन.**

उत्ते बृहन्तो अर्चयः समिधानस्य दीदिवः ।
अग्ने शुक्रास ईरते ।। ८-४४-४ ।।
उप त्वा जुह्वो३ मम घृताचीर्यन्तु हर्यत ।
अग्ने हव्या जुषस्व नः ।। ८-४४-५ ।।

## रत्न ३१९ वें

इन्द्र म्हणाला–स्त्रीचें मन ताब्यांत ठेवणें हें पुरुषाला अत्यंत कठीण आहे! याचें कारण असें कीं, तिची बुद्धि अगदीं अल्प आहे! ( ८–३३–१७ ).

## रत्न ३२० वें

जे भक्त इंद्राग्नीला स्तुति करून व धन अर्पण करून पाचारण करतात, त्या भक्तांमध्यें आम्ही भक्त असे आहों कीं जे आमच्याशीं शत्रुत्वानें वागतात त्यांना आम्ही आमच्या सैन्याच्या सहायानें पार चिरडून टाकूं! आणि जे आमच्याशीं मित्रभावानें वागूं इच्छितात त्यांच्यांशीं आम्हीहि पण मित्रप्रेमानेंच वागूं! सर्व शत्रु अग्नीकडून ठार मारले जावेत! ( ८–४०–७ ).

## रत्न ३२१ वें

हे ऋत्विजहो! अतिथीप्रमाणें प्रिय असलेल्या, अग्नि-देवाचें समिधा अर्पून तुम्ही पूजन करा! तुपानें त्याला प्रज्वलित करा! आणि त्या प्रदीप्त अग्नींत आहुति द्या! (८–४४–१). हे अग्निदेवा! तूं माझें स्तोत्र अंगीकृत कर! त्या स्तोत्रानें तुं प्रज्वलित हो. आणि आमच्या सूक्तांची इच्छा कर! ( ८–४४–२ ). हवि वाहून नेणारा व देवांचा दूत असा जो अग्नि-देव, त्या अग्नि देवाला मीं अग्रभागीं स्थापन केला आहे. मी त्याचें स्तोत्र गायन करीत आहें. तर तो देवांना येथें यज्ञशालेंत आणून बसवो! (८-४४-३). हे प्रदीप्त अग्ने! तुझ्या पेटलेल्या प्रगल्भ नि प्रज्वल ज्वाला वर आकाशांत चढतात. ( ८–४४–४ ). हे सुंदर अग्ने! माझी घृताची (पळी) व स्रुच् ( पळी ) तुझ्याकडेच येती आहे. आमचीं हविर्द्रव्यें, हे देवा! तूं सेवन कर! ( ८–४४–५ ).

अग्निर्मूर्धा दिवः ककुत् पतिः पृथिव्या अयम् ।
अपां रेतांसि जिन्वति ॥ ८-४४-१६ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) प्रातरनुवाक        स्मा. वि. शांतिपाठ, मंगळग्रहजप.**

उदग्ने शुचयस्तव शुक्रा भ्राजन्त ईरते ।
तव ज्योतींष्यर्चयः ॥ ८-४४-१७ ॥

ईशिषे वार्यस्य हि दात्रस्याग्ने स्वर्पतिः ।
स्तोता स्यां तव शर्मणि ॥ ८-४४-१८ ॥

त्वामग्ने मनीषिणस्त्वां हिन्वन्ति चित्तिभिः ।
त्वां वर्धन्तु नो गिरः ॥ ८-४४-१९ ॥

अदब्धस्य स्वधावतो दूतस्य रेभतः सदा ।
अग्नेः सख्यं वृणीमहे ॥ ८-४४-२० ॥

अग्निः शुचिव्रततमः शुचिर्विप्रः शुचिः कविः ।
शुची रोचत आहुतः ॥ ८-४४-२१ ॥

पुराग्ने दुरितेभ्यः पुरा मृध्रेभ्यः कवे ।
प्र ण आयुर्वसो तिर ॥ ८-४४-३० ॥

## रत्न ३२२ वें

**प्रगाथ घोर काण्व-ऋषि, सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अपाम सोममृता अभूमागन्म ज्योतिरविदाम देवान् ।
किं नूनमस्मान् कृणवदरातिः किमु धूर्तिरमृत मर्त्यस्य ॥
॥ ८-४८-३ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) आत्माभिमर्शन.**

शं नो भव हृद आ पीत इन्दो पितेव सोम सूनवे सुशेवः ।
सखेव सख्य उरुशंस धीरः प्र ण आयुर्जीवसे सोम तारीः ॥
॥ ८-४८-४ ॥

देवांमध्यें श्रेष्ठ, द्युलोकाचें शिखर, आणि पृथ्वीचा पालक असा हा अग्निदेव सर्व स्थावरजंगम सृष्टीला संतुष्ट करतो. ( ८–४४–१६ ). हे अग्ने ! तुझ्या निर्मल, शुभ्रवर्ण, देदीप्यमान ज्वाला तुझें तेज संवर्धन करतात. (८–४४–१७). हे अग्ने ! स्वर्गाचा स्वामी असा तूं भक्ताला देण्यास योग्य अशा श्रेष्ठ संपत्तीचा मालक आहेस. म्हणून सुख-प्राप्त्यर्थ मी तुझा भक्त झालों आहें. ( ८–४४–१८ ). हे अग्ने ! विद्वान् स्तोतृजन तुझें गोड स्तोत्र गातात. यज्ञकर्मे करून तुला प्रसन्न करतात. आमचें स्तवन तुला प्रवर्धन करो ! ( ८–४४–१९ ). हे अग्ने ! अखंडित, बलवान्, देवांचा दूत, आणि देवांचा स्तोता असा जो तूं त्या तुझें आम्ही नेहमीं सख्य इच्छितों. ( ८–४४–२० ). अग्निदेव हा अत्यंत शुद्धकर्मे करणारा असून, तसाच तो पवित्र, प्रतिभावान्, निर्मल व दूरदर्शी असा आहे. त्यास आहुति दिली म्हणजे तो सुप्रकाशमान होतो. (८–४४–२१). हे भगवंता ! हे विश्व-व्यापका ! संकटें व शत्रु आम्हांवर घाला घालावयाच्या पूर्वीच तूं आमचें आयुष्य दृढ करून तें वाढीव ! ( ८–४४–३० ).

## रत्न ३२२ वें

हे अमृत सोमा ! आम्ही तुझें पान करू आणि पान करून अमर होऊं ! स्वर्गाला जाऊं आणि देवांना पाहूं ! मग आमचा शत्रु आमचें काय कर-णार आहे ? हे अमर देवा ! मजसारख्या मानव भक्ताचें दुष्ट मनुष्य काय करणार आहे ? ( ८–४८–३ ). हे सोमा ! पिता पुत्राला किंवा मित्र मित्राला जसा सुखदायक असतो त्याप्रमाणें मीं प्यालेला हा सोमरस माझ्या हृदयाला आनंदकारी होवो ! हे बहुकीर्तिमान् देवा ! तूं बुद्धिमान् आहेस ! आम्हीं दीर्घकाल जगावें यासाठीं तूं आमचें आयुष्य वृद्धिंगत कर ! ( ८–४८–४ ).

## रत्न ३२३ वें

**प्रगाथ घौर काण्व-ऋषि, सोम-देवता, जगती-छंद.**

इमे मा पीता यशस उरुष्यवो रथं न गावः समनाह पर्वसु ।
ते मा रक्षन्तु विस्रसश्चरित्रादुत मा स्रामाद्यवयन्त्विन्दवः ॥

॥ ८-४८-५ ॥

## रत्न ३२४ वें

**प्रगाथ घौर काण्व-ऋषि, सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

त्वं सोम पितृभिः संविदानोऽनु द्यावापृथिवी आ ततन्थ ।
तस्मै त इन्दो हविषा विधेम वयं स्याम पतयो रयीणाम् ॥

॥ ८-४८-१३ ॥

**श्रौ. वि. ( चातुर्मास्य ) महापितृयज्ञ याज्या.**

त्रातारो देवा अधि वोचता नो मा नो निद्रा ईशत मोत जल्पिः ।
वयं सोमस्य विश्वह प्रियासः सुवीरासो विदथमा वदेम ॥

॥ ८-४८-१४ ॥

त्वं नः सोम विश्वतो वयोधास्त्वं स्वर्विदा विशा नृचक्षाः ।
त्वं न इन्द ऊतिभिः सजोषाः पाहि पश्चातादुत वा पुरस्तात् ॥

॥ ८-४८-१५ ॥

## रत्न ३२५ वें

**भर्ग प्रगाथ-ऋषि, इन्द्र-देवता, प्रगाथ-छंद.**

अविप्रो वा यदविधद्विप्रो वेन्द्र ते वचः ।
स प्र ममन्दत् त्वाया शतक्रतो प्राचामन्यो अहंसन ॥

॥ ८-६१-९ ॥

**श्रौ. वि. ( अग्नि ) प्रवर्ग्य.**

## रत्न ३२३ वें

हा प्यालेला सोम यशस्कर व पापमोचक आहे. बैल जसे रथाला ओढण्यासाठीं म्हणून अग्रभागीं जुंपले जातात, तद्वत् मी प्यालेला हा सोम माझें शरीर उत्तेजित करो ! तो माझें चारित्र्य रक्षण करो ! आणि रोगपीडादिकांपासून बचाव करो ! ( ८–४८–५ ).

## रत्न ३२४ वें

हे सोमा ! आमच्या पितरांबरोबर जाणारा तूं आकाश व पृथ्वी यांना क्रमानें विस्तार करणारा आहेस. आम्ही तुझें हविर्भागानें पूजन करितों. तर, हे देवा ! आम्हीं विपुल संपत्तीचे मालक होऊं, असें कर ! ( ८–४८–१३ ). हे भक्तरक्षक देव हो ! आम्हांस उपदेशाच्या गोष्टी सांगा ! झोंपेचा आमच्यावर अम्मल चालणार नाहीं असें करा ! निंदक आमची निंदा करणार नाहीं, असें घडो ! नेहमी आम्ही सोमदेवाच्या सुप्रसन्न मर्जीत रहावें ! शूर वीरांनीं युक्त असावें ! आणि देवांचें संकीर्तन करणारे व्हावें ! ( ८–४८–१४ ). हे सोमदेवा ! तूं आम्हांला सर्व बाजूंनीं अन्न प्राप्त करून दे ! स्वर्ग जाणणारा व मनुष्यमात्रावर नजर ठेवणारा असा तूं आतां आमच्या उदरांत प्रवेश कर ! हे इंदो, आमच्यावर प्रसन्न होऊन, तूं आपल्या संरक्षण-शक्तीनिशी पुढून व मागून आमचें सर्व बाजूंनीं रक्षण कर ! ( ८–४८–१५ ).

## रत्न ३२५ वें

ज्ञानी असो वा अज्ञानी असो, हे इंद्र देवा ! कोणींहि तुझें स्तवन केलें तरी हे शतक्रतो ! हे अप्रतिहतक्रोधा ! हे संग्रामाभिमानी देवा ! तुझ्या नामसंकीर्तनानें त्याला आनंद हा झालाच पाहिजे. (८–६१–९ ).

यत इन्द्र भयामहे ततो नो अभयं कृधि ।
मघवञ्छग्धि तव तन्न ऊतिभिर्वि द्विषो वि मृधो जहि ॥

॥ ८-६१-१३ ॥

**स्मा. वि.** इंद्र आवाहन.

त्वं हि राधस्पते राधसो महः क्षयस्यासि विधतः ।
तं त्वा वयं मघवन्निन्द्र गिर्वणः सुतावन्तो हवामहे ॥

॥ ८-६१-१४ ॥

इन्द्रः स्पळुत वृत्रहा परस्पा नो वरेण्यः ।
स नो रक्षिषच्चरमं स मध्यमं स पश्चात् पातु नः पुरः ॥

॥ ८-६१-१५ ॥

त्वं नः पश्चादधरादुत्तरात् पुर इन्द्र नि पाहि विश्वतः ।
आरे अस्मत्कृणुहि दैव्यं भयमारे हेतीरदेवीः ॥ ८-६१-१६ ॥

## रत्न ३२६ वें

**भर्ग प्रगाथ-ऋषि, इन्द्र-देवता, शंकुमती-छंद.**

अद्याद्या श्वःश्व इन्द्र त्रास्व परे च नः ।
विश्वा च नो जरितॄन् त्सत्पते अहा दिवा नक्तं च रक्षिषः ॥

॥ ८-६१-१७ ॥

## रत्न ३२७ वें

**भर्ग प्रगाथ-ऋषि, इन्द्र-देवता, प्रगाथ-छंद.**

प्रभङ्गी शूरो मघवा तुवीमघः संमिश्लो वीर्याय कम् ।
उभा ते बाहू वृषणा शतक्रतो नि या वज्रं मिमिक्षतुः ॥

॥ ८-६१-१८ ॥

हे इंद्र-देवा! जिकडून जिकडून आम्हांस भयप्रसंग उद्भवेल तिकडून तिकडून आम्हांस भयरहित कर! हे उदार देवा! तूं आपल्या रक्षकगणांच्या सहाय्यानें आम्हांस निर्भय करण्यास समर्थ आहेस. जे आमचा द्वेष करणारे व हिंसा करणारे असे दुष्ट दुर्जन आहेत, त्यांचें तूं पार निर्दालन करून टाक! (८–६१–१३). हे धनस्वामिन्! विधिपूर्वक यजन करणाऱ्या भक्तजनांच्या संपत्तीची व घरादाराची तूं भरभराट करणारा आहेस. हे धनवंता! हे स्तुतिप्रिय इन्द्रदेवा! तुला आम्हीं गोड सोमरस तयार करून प्रेमानें हांक मारीत आहों! ( ८–६१–१४ ). हा वृत्रहंता इंद्र देव सर्वज्ञ व सर्वश्रेष्ठ असून, तो आमचें व आमच्या पुत्रादिकांचें आमच्या शत्रूंपासून रक्षण करो! त्याचप्रमाणें मागून व पुढूनहि आमचें रक्षण करो! ( ८–६१–१५ ). हे इंद्र-देवा! तूं आमचें पश्चिमेकडून, पूर्वेकडून तसेंच उत्तरेकडून आणि दक्षिणेकडून–अर्थात् सर्व बाजूंनी–रक्षण कर! तसेंच दैवी आपत्ति आमच्यापासून दूर कर! आणि राक्षसादिकांच्या घातकी शस्त्रास्त्रांपासूनहि आमचा बचाव कर! ( ८–६१–१६ ).

## रत्न ३२६ वें

हे इंद्रदेवा! आज तर आज, उद्यां तर उद्यां आणि परवां म्हणशील तर परवां तूं आमचें रक्षण कर! तुझे जे आम्हीं स्तोतृजन आहों, त्या सर्वांचेंहि, हे सज्जनपालका! तू दिवसा काय, रात्रीं काय, सदा सर्वकाळ रक्षण करावेंस ( ८–६१–१७ ).

## रत्न ३२७ वें

हा इंद्र-देव विजयशाली, मोठा शूर, ऐश्वर्यवान् आणि तसाच पराक्रम गाजविण्यास उत्तेजन देणारा आहे. हे अनंतवीर्या! वज्र धारण करणारे तुझे ते दोन्ही हात भक्तजनांचे मनोरथ तृप्त करण्यास पूर्ण समर्थ आहेत. ( ८–६१–१८ ).

## रत्न ३२८ वें

**प्रगाथ काण्व-ऋषि, देव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अस्मे रुद्रा मेहना पर्वतासो वृत्रहत्ये भरहूतौ सजोषाः ।
यः शंसते स्तुवते धायि पज्र इंद्रज्येष्ठा अस्माँ अवन्तु देवाः ॥
॥ ८-६३-१२ ॥

**स्मा. वि. शांतिपाठ; मंत्रपुष्पांजलि.**

## रत्न ३२९ वें

**पुरुहन्मा आंगिरस-ऋषि, इन्द्र-देवता, बृहती-छंद.**

अन्यव्रतममानुषमयज्वानमदेवयुम् ।
अव स्वः सखा दुधुवीत पर्वतः सुघ्नाय दस्युं पर्वतः ॥
॥ ८-७०-११ ॥

## रत्न ३३० वें

**कुसीदी काण्व-ऋषि, इन्द्र-देवता, गायत्री-छंद.**

आ तू न इन्द्र क्षुमन्तं चित्रं ग्राभं सं गृभाय ।
महाहस्ती दक्षिणेन ॥ ८-८१-१ ॥

**स्मा. वि. अक्षतारोपण. विनायक-आवाहन.**

## रत्न ३३१ वें

**तिरश्चीरांगिरस-ऋषि, इन्द्र-देवता, विराट्-छंद.**

मन्ये त्वा यज्ञियं यज्ञियानां मन्ये त्वा च्यवनमच्युतानाम् ।
मन्ये त्वा सत्वनामिन्द्र केतुं मन्ये त्वा वृषभं चर्षणीनाम् ॥
॥ ८-९६-४ ॥

## रत्न ३२८ वें

आम्हांस सुखविणारे, उदक-वर्षाव करणारे, मेघासारखे असलेले, वृत्रासुराचा वध करण्याकरितां पुकारलेल्या लढाईत एकमतानें झुंजणारे असे हे देव असून, शस्त्र व स्तोत्र म्हणणाऱ्या भक्ताकडे धांवून येणारा इंद्र व ते सर्व देव मिळून आमचें सर्व प्रकारें रक्षण करोत ! (८–६३–१२).

## रत्न ३२९ वें

हे इंद्रा ! भलताच नेमधर्म करणारा, देवभक्तांना न आवडणारा, देवपूजा न करणारा अगर देवांवर श्रद्धा न ठेवणारा असा जो कोणी पापी, पाखंडी असेल, त्याला तुझा सखा जो पर्वत ऋषि तो स्वर्गावरून खालीं लोटून देवो ! इतकेंच नव्हे,तर त्या दस्यूला मारण्यासाठीं तो मृत्यूला प्रेरणा करो ! ( ८–७०–११ ).

## रत्न ३३० वें

हें इंद्रा ! तूं महाबाहू आहेस ! आम्हांस देण्यासाठीं प्रशंसनीय, आश्चर्यकारक व संग्रहणीय असें धन तूं आपल्या उजव्या हातांत धारण कर ! ( ८–८१–१ ).

## रत्न ३३१ वें

हे इंद्रा ! यज्ञार्ह अशा सर्व देवांमध्यें तूं अत्यंत श्रेष्ठ आहेस असें मी समजतों. तसेंच जे सामर्थ्यानें अविचल मानले जातात त्यांना हलविणाराहि तूंच आहेस, असें मी मानतों. तुझें जे हवीनें पूजन करणारे आहेत त्यांना आत्मज्ञान करून देणारा आणि मनुष्यमात्रांचा मनोरथ पुरविणारा तूंच एक आहेस, असें मी समजतों. ( ८–९६–४).

## रत्न ३३२ वें

**रेभ काश्यप-ऋषि, इन्द्र-देवता, बृहती-छंद.**

न त्वा देवास आशत न मर्त्यासो अद्रिवः ।
विश्वा जातानि शवसाभिभूरसि न त्वा देवास आशत ॥

॥ ८-९७-९ ॥

## रत्न ३३३ वें

**जमदग्नि भार्गव-ऋषि, सूर्य-देवता, प्रगाथ--छंद.**

बण्महाँ असि सूर्य बळादित्य महाँ असि ।
महस्ते सतो महिमा पनस्यतेऽद्धा देव महाँ असि ॥

॥ ८-१०१-११ ॥

**स्मा. वि. सूर्योपस्थान. सौरसूक्त.**

बट् सूर्य श्रवसा महाँ असि सत्रा देव महाँ असि ।
मह्ना देवानामसुर्यः पुरोहितो विभु ज्योतिरदाभ्यम् ॥

॥ ८-१०१-१२ ॥

## रत्न ३३४ वें

**जमदग्नि-भार्गव, गो-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

माता रुद्राणां दुहिता वसूनां स्वसादित्यानाममृतस्य नाभिः ।
प्र नु वोचं चिकितुषे जनाय मा गामनागामदितिं वधिष्ट ॥

॥ ८-१०१-१५ ॥

**स्मा. वि. गो-विसर्जन.**

## रत्न ३३२ वें

हे वज्रधरा ! तुझ्यावर देव सत्ता गाजवूं शकत नाहीत ! मनुष्यांनाहि तें शक्य नाहीं. तूं मात्र आपल्या उत्कट बलानें सर्व प्राणिमात्र व्यापून राहिला आहेस. आणि म्हणून देवांची देखील तुजवर सत्ता चालूं शकत नाहीं. ( ८–९७–५ ).

## रत्न ३३३ वें

हे सूर्य देवा ! खरोखर सर्वश्रेष्ठ आहेस तूं ! हे प्रकाश देणाऱ्या आदित्या ! तू परमथोर आहेस ! श्रेष्ठ व नित्य असा तूं, त्या तुझ्या महिमेची कीर्ति स्तोतृजन न गातील तर काय करतील ? हे देवा ! खचीत खचीत तूंच तेवढा या साऱ्या त्रिभुवनांत वीर्यानें परमश्रेष्ठ आहेस ! (८–१०१–११). हे सूर्यनारायणा ! तुझी ख्याति परमथोर आहे ! सर्व देवांमध्यें महिम्यानें तूंच एक अत्यंत थोर आहेस, हें अगदी सत्य आहे ! हे देवा ! तूं असुरांचा नाशकर्ता व देवांचा हितोपदेष्टा आहेस. आणि तुझा तो जो झगझगीत प्रकाश आहे, तो सर्वव्यापी असून अप्रतिहत आहे ! ( ८–१०१–१२ ).

## रत्न ३३४ वें

गाय ही रुद्रांची माता, वसूंची कन्या आणि आदित्यांची भगिनी आहे ! आणि अमृततुल्य दुग्धाची ती निधि आहे ! अतएव मी विचारवंतांस अशी विनंति करतों कीं, बाबांनो ! अशा निष्पाप व दैन्यरहित गाईचा वध तुम्ही करूं नका ! ( ८–१०१–१५ ).

## रत्न ३३५ वें

**सोभरि काण्व-ऋषि, अग्नामारुत-देवता, अनुष्टुप्--छंद.**

आग्ने याहि मरुत्सखा रुद्रेभिः सोमपीतये ।
सोभर्या उप सुष्टुतिं मादयस्व स्वर्णरे ॥ ८-१०३-१४ ॥

## आठवें मंडल समाप्त

---

**रत्न ३३५ वें**

**हे अग्नि देवा !** तूं मरुतांचा सखा आहेस. रुद्र देवांसह तूं आमच्या **यज्ञगृहांत सोमपानार्थ** म्हणून आगमन कर ! आणि या सोभरीचें हें सर्वोत्कृष्ट **स्तोत्र ऐकून व** सोमप्राशन **करून** परम संतुष्ट हो ! ( ८-१०३-१४ ).

**आठवें मंडल समाप्त**

---



# नववें मंडल

## रत्न ३३६ वें

**मधुच्छंद वैश्वामित्र-ऋषि, पवमान सोम-देवता गायत्री-छंद.**

स्वादिष्ठया मदिष्ठया पवस्व सोम धारया ।
इन्द्राय पातवे सुतः ॥ ९-१-१ ॥

**श्रौ. वि. ( उपाकर्म ) मंडलादि ग्रहण.**

रक्षोहा विश्वचर्षणिरभि योनिमयोहतम् ।
द्रुणा सधस्थमासदत् ॥ ९-१-२ ॥
वरिवोधातमो भव मंहिष्ठो वृत्रहन्तमः ।
पर्षि राधो मघोनाम् ॥ ९-१-३ ॥

## मराठी भावार्थ

### रत्न ३३६ वें

हे सोमा ! इंद्राला प्यावयासाठीं म्हणून तूं अत्यंत मधुर व मदजनक अशा धारांनीं वाहूं लाग ! ( ९-१-१ ). राक्षसांना ठार मारणारा व सर्व विश्वावर नजर ठेवणारा असा हा सोम सुवर्णालंकारमंडित हस्तांनीं वाटला जात असतां अभिषवण फलकावरून स्वस्थानीं येऊन बसतो. ( ९-१-२ ). हे सोमा ! तूं आम्हांला उदार हस्तानें धन देणारा हो ! श्रेष्ठ दाता हो ! शत्रुहंता हो ! व आम्हांला आमच्या शत्रूंचें धन आणून दे ! ( ९-१-३ ).

अभ्यर्षं महानां देवानां वीतिमन्धसा ।
अभि वाजमुत श्रवः ॥ ९-१-४ ॥
त्वामच्छा चरामसि तदिदर्थं दिवेदिवे ।
इन्दो त्वे न आशसः ॥ ९-१-५ ॥
पुनाति ते परिस्रुतं सोमं सूर्यस्य दुहिता ।
वारेण शश्वता तना ॥ ९-१-६ ॥
तमीमण्वीः समर्य आ गृभ्णन्ति योषणो दश ।
स्वसारः पार्ये दिवि ॥ ९-१-७ ॥
तमीं हिन्वन्त्यग्रुवो धमन्ति बाकुरं दृतिम् ।
त्रिधातु वारणं मधु ॥ ९-१-८ ॥
अभीइममघ्न्या उत श्रीणन्ति धेनवः शिशुम् ।
सोममिन्द्राय पातवे ॥ ९-१-९ ॥
अस्येदिन्द्रो मदेष्वा विश्वा वृत्राणि जिघ्नते ।
शूरो मघा च मंहते ॥ ९-१-१० ॥

## रत्न ३३७ वें

**गोतम राहुगण-ऋषि, पवमान सोम-देवता, गायत्री-छंद.**

आ प्यायस्व समेतु ते विश्वतः सोम वृष्ण्यम् ।
भवा वाजस्य संगथे ॥ ९-३१-४ ॥

**स्मा. वि. पंचगव्य.**

## रत्न ३३८ वें

**अमहीयुरांगिरस-ऋषि, पवमान सोम-देवता, गायत्री-छंद.**

उच्चा ते जातमन्धसो दिवि षद्भूम्या ददे ।
उग्रं शर्म महि श्रवः ॥ ९-६१-१० ॥

हे सोमा! तूं श्रेष्ठ देवांच्या यज्ञांत हविरन्नासहित उपस्थित हो! आणि आम्हांला अन्न व बल दे! (९-१-४). हे सोमा! आम्ही तुझी उत्तम प्रकारें परिचर्या करतों. दररोज तुझी सेवा करणें हा आमचा धर्मच आहे. आणि आमच्या आशा-आकांक्षा तुझ्यामध्येंच सर्वस्वीं गुंतून राहिल्या आहेत (९-१-५). हे सोमा! तुझा पाझरणारा मधुर रस सूर्यकन्या श्रद्धा ही विस्तृत व उत्कृष्ट अशा लोकरीच्या पवित्रांतून गाळून तो शुद्ध व निर्मळ करते (९-१-६). यज्ञांतील मुख्य दिवशीं बहिणीप्रमाणें असणाऱ्या दहा स्त्रीरूप अंगुली त्या सोमाचें ग्रहण करतात (९-१-७). त्या या सोमाला धरून सोम कुटावयाच्या ठिकाणीं आणून पसरतात. मग त्याला तेथें दगडांच्यानें कुटतात; आणि तो मधुर रस द्रोणकलश, आधवनीय व उपभृत् या तीन पात्रांत जाऊन बसतो. (९-१-८). त्या शिशुसम सोमरसाला अहिंस्य अशा गाई इन्द्राला पिण्यासाठीं म्हणून आपल्या दुधानें सुसंस्कृत करतात (९-१-९). तो शूर इन्द्र या सोमाच्या मदांतच सर्व शत्रूंना ठार करतो आणि आम्हा उपासकांना त्यांचें द्रव्य लुटून आणून देतो (९-१-१०).

## रत्न ३३७ वें

हे सोमा! तूं वायु व उदक यांनीं वृद्धिंगत हो! सर्व बाजूंनीं तुला बलवर्धक वीर्य प्राप्त होवो! संग्रामांत आम्हांस अन्न मिळवून दे! (९-३१-४).

## रत्न ३३८ वें

हे सोमा! तुझ्या रसाचें जन्मस्थान फार उच्च आहे, तें स्वर्गांत आहे. तरी पृथ्वीवरील मनुष्याला उत्कृष्ट सुख व महद्यश तो प्राप्त करून देतो. (९-६१-१०).

## रत्न ३३९ वें

**शत वैखानस-ऋषि, पवमान अग्नि-देवता, गायत्री-छंद.**

अग्न आयूंषि पवस आ सुवोर्जमिषं च नः ।
आरे बाधस्व दुच्छुनाम् ।। ९-६६--१९ ।।

**श्रौ. वि. ( आधान ) पवमान-अनुवाक्या, (चौल) आज्याहुति.**
**स्मा. वि. सायं अग्नि-उपस्थान.**

अग्निर्ऋषिः पवमानः पाञ्चजन्यः पुरोहितः ।
तमीमहे महागयम् ।। ९-६६-२० ।।
अग्ने पवस्व स्वपा अस्मे वर्चः सुवीर्यम् ।
दधद्रयिं मयि पोषम् ।। ९-६६-२१ ।।

## रत्न ३४० वें

**जमदग्नि भार्गव-ऋषि, पवमान-सोम, नित्यद्विपदा गायत्री.**

पवस्व सोम मन्दयन्निन्द्राय मधुमत्तमः ।। ९-६७-१६ ।।
असृग्रन्देववीतये वाजयन्तो रथा इव ।। ९-६७-१७ ।।
ते सुतासो मदिन्तमाः शुक्रा वायुमसृक्षत ।। ९-६७-१८ ।।

## रत्न ३४१ वें

**वसिष्ठ मैत्रावरुणि-ऋषि, पवमान-सोम, गायत्री-छंद.**

ग्राव्णा तुन्नो अभिष्टुतः पवित्रं सोम गच्छसि ।
दधत्स्तोत्रे सुवीर्यम् ।। ९-६७-१९ ।।
एष तुन्नो अभिष्टुतः पवित्रमति गाहते ।
रक्षोहा वारमव्ययम् ।। ९-६७-२० ।।

## रत्न ३३९ वें

हे पवमान अग्ने ! तूं आमचें जीवित रक्षण करणारा आहेस. अतएव आम्हांस बळ व अन्न दे ! जे सत्कार्याला विघ्न करणारे असे दुष्टजन आहेत, त्यांचा दुरूनच फडशा पाड ! ( ९–६६–१९ ). पवमान अग्निदेव हा पंचजनांचा आप्त, सर्वद्रष्टा व यज्ञार्थ अग्रभागीं स्थापन केला गेलेला असून, त्या देवाजवळ आम्ही श्रेष्ठ धनाची याचना करतों. ( ९–६६–२० ). हे सुकर्मन् अग्ने ! तूं आम्हांस सुंदर वीर्यसंपन्न असें तेज व त्याचप्रमाणें पुत्रपौत्रादि संतति व उत्तम गोधन यांचा लाभ करून दे ! (९–६६–२१).

## रत्न ३४० वें

हे सोमा ! तूं अत्यंत मधुर आहेस ! इन्द्र देवाला उत्साह देण्यासाठीं म्हणून तूं इंद्राकरतां वाहूं लाग. ( ९–६७–१६ ). देवांना प्रसन्न करण्यासाठीं तुझा वीर्यशाली रस रथाप्रमाणें पुढें पुढें सरसावत आहे. ( ९–६७–१७ ). हे पिळून ठेवलेले सोमरस अत्यंत उत्साहवर्धक व पांढरे शुभ्र असे असून ते शब्द करतात. ( ९–६७–१८ ).

## रत्न ३४१ वें

हे सोमा ! तुला ग्राव्यानें ( वरवंटयानें ) चांगला कुटून व गाळून तुझें स्तोत्र गाइलें असतां तूं पवित्र होतोस. व स्तोत्याला सुंदर वीर्ययुक्त धन देतोस. ( ९–६७–१९ ). हा दगडांनीं कुटून काढलेला आणि स्तोतृजनांनीं स्तविलेला सोम लोकरीच्या पवित्रांतून पाझरून खालीं द्रोण कलशांत प्रवेश करतो. देवकार्याला विघ्न करणाऱ्या दुष्ट राक्षसादिकांचा तो संहारकर्ता आहे. ( ९–६७–२० ).

यदन्ति यच्च दूरके भयं विन्दति मामिह ।
पवमान वि तज्जहि ॥ ९-६७-२१ ॥
पवमानः सो अद्य नः पवित्रेण विचर्षणिः ।
यः पोता स पुनातु नः ॥ ९-६७-२२ ॥

## रत्न ३४२ वें

**वसिष्ठ-ऋषि, पवमान अग्नि-देवता, गायत्री-छंद.**

यत्ते पवित्रमर्चिष्यग्ने विततमन्तरा ।
ब्रह्म तेन पुनीहि नः ॥ ९-६७-२३ ॥

**स्मा. वि. मार्जन; तिलोदककरण.**

यत्ते पवित्रमर्चिवदग्ने तेन पुनीहि नः ।
ब्रह्मसवैः पुनीहि नः ॥ ९-६७-२४ ॥
उभाभ्यां देव सवितः पवित्रेण सवेन च ।
मां पुनीहि विश्वतः ॥ ९-६७-२५ ॥

**स्मा. वि. तिलोदककरण.**

त्रिभिष्ट्वं देव सवितर्वर्षिष्ठैः सोम धामभिः ।
अग्ने दक्षैः पुनीहि नः ॥ ९-६७-२६ ॥

## रत्न ३४३ वें

**वसिष्ठ-ऋषि, पवमान-देवता, अनुष्टुप्-छंद.**

पुनन्तु मां देवजनाः पुनन्तु वसवो धिया ।
विश्वे देवाः पुनीत मा जातवेदः पुनीहि मां ॥ ९-६७-२७॥

**स्मा. वि. मार्जन; पुण्याहवाचन.**

हे पवमान सोमा ! मला या लोकीं जें कोणतें भय दुरून वा जवळून भेडसावूं पहात असेल, त्याचा तूं नाश कर ! ( ९-६७-२१ ). तो विश्वद्रष्टा पवमान सोम आपल्या पापनाशक तेजानें आज आम्हांस पापरहित करून पावन करो ! ( ९-६७-२२ ).

## रत्न ३४२ वें

हे पवमान अग्निदेवा ! तुझ्या तेजामध्यें पावन करण्याचें जें सामर्थ्य आहे, त्यानें आमचें शरीर परिशुद्ध कर ! ( ९-६७-२३ ). हे पवमान अग्ने ! तुझें जें पावनकारक व सूर्यसदृश तेज आहे, त्या तेजानें आम्हांस पावन कर ! तसेंच सोमाभिषवणानेंहि आम्हांस पुनीत कर ! (९-६७-२४). हे सर्वप्रेरक सोमा ! तुझ्या पापनाशक तेजानें व सोमाभिषवणानें अशा उभयद्वारें मला सर्व बाजूंनीं निष्पाप कर ! ( ९-६७-२५ ). हे जगत्प्रेरक सोमदेवा ! हे अग्ने ! तूं अत्यंत प्रपुष्ट व सामर्थ्यसंपन्न अशा अग्नि, वायु व सूर्य या त्रयात्मक शरीरानें आम्हांला पावन कर ! ( ९-६७-२६ ).

## रत्न ३४३ वें

हे इन्द्रादि देवगण मला पुनीत करोत ! तसेंच वसु देवहि आपल्या कर्मप्रभावानें मला पुनीत करोत ! सर्व देव मला पुनीत करोत ! आणि हे सर्वज्ञ अग्नि देवा ! तूंहि मला पुनीत कर ! ( ९-६७-२७ ).

## रत्न ३४४ वें

**वसिष्ठ-ऋषि, पवमान सोम-देवता, गायत्री-छंद.**

प्र प्यायस्व प्रस्यन्दस्व सोम विश्वेभिरंशुभिः ।
देवेभ्य उत्तमं हविः ॥ ९-६७-२८ ॥

उप प्रियं पनिप्नतं युवानमाहुतीवृधम् ।
अगन्म बिभ्रतो नमः ॥ ९-६७-२९ ॥

## रत्न ३४५ वें

**वसिष्ठ-ऋषि, पवमान सोम-देवता, पुरउष्णिक्-छंद.**

अलाय्यस्य परशुर्ननाश तमा पवस्व देव सोम ।
आखुं चिदेव देव सोम ॥ ९-६७-३० ॥

## रत्न ३४६ वें

**वसिष्ठ-ऋषि, पवमानध्येता-देवता, अनुष्टुप्-छंद.**

यः पावमानीरध्येत्यृषिभिः संभृतं रसम् ।
सर्वं स पूतमश्नाति स्वदितं मातरिश्वना ॥ ९-६७-३१ ॥

पावमानीर्यो अध्येत्यृषिभिः संभृतं रसम् ।
तस्मै सरस्वती दुहे क्षीरं सर्पिर्मधूदकम् ॥ ९-६७-३२ ॥

## रत्न ३४७ वें

पावमानीः स्वस्त्ययनीः सुदुघा हि घृतश्चुतः ।
ऋषिभिः संभृतो रसो ब्राम्हणेष्वमृतं हितम् ॥
॥ ९-६७ खिल १८-१ ॥

पावमानीर्दिशन्तु न इमं लोकमथो अमुम् ।
कामान् त्समर्धयन्तु नो देवीर्देवैः समाहिताः ॥
॥ ९-६७ खिल १८-२ ॥

## रत्न ३४४ वें

हे सोमा ! तूं आमची उत्तम रीतीनें भरभराट कर ! आणि आपल्या सर्व अंशांनीं देवांप्रीत्यर्थ सर्वश्रेष्ठ असा सोमरस कलशांत पाझरेल असें कर ! ( ९–६७–२८ ). सर्वांना आनंद देणारा, मधुर शब्द करणारा, तरुण, आहुतींनीं वृद्धिंगत होणारा अशा पवमान सोमाप्रत आम्ही हविरन्न घेऊन प्राप्त झालों आहों ( ९–६७–२९ ).

## रत्न ३४५ वें

पवमान सोम हा शत्रूचा नाश करो ! आणि पापरहित अशा आम्हां भक्तांसन्निध आगमन करो ! हे सोम देवा ! सर्वांना ठार मारणारा असा जो बलाढ्य शत्रु आहे, त्याचा तूं नाश कर ! ( ९–६७–३० ).

## रत्न ३४६ वें

या पवित्र पवमान स्तोत्राचें जो अध्ययन करतो आणि ऋषींनी संग्रहीत केलेल्या सुरस मंत्राचें जो पठण करतो, तो वायूनें विशुद्ध केलेलें असें पाप-रहित अन्नच भक्षण करतो. ( ९–६७–३१ ). जो ब्राह्मण ऋषींनीं संग्रहीत केलेल्या या पावमानी सूक्तांचें अध्यायन करतो त्याला सरस्वती ही दूध, तूप व मधुर उदक यांचा लाभ करून देते. (९–६७–३२).

## रत्न ३४७ वें

पावमानी ऋचा या कल्याणकारक, मनोरथपूरक व जलवर्षावक असून त्या ऋचांमध्यें ऋषींनीं सर्व कांहीं मंत्रसार सांठवून ठेविलेलें आहे आणि त्या ऋचा पठण करणाऱ्या ब्राह्मणांत अमृत आहे (९-६७-खिल-१८-१). या पावमानी ऋचा आम्हांला हा लोक व स्वर्गलोक यांची प्राप्ति करून देवोत ! देवांनीं उत्पन्न केलेल्या या पावमानी ऋचा आमचे सर्व मनोरथ परिपूर्ण करोत ! ( ९–६७–खिल–१८–२ ).

येन देवाः पवित्रेणात्मानं पुनते सदा ।
तेन सहस्रधारेण पावमान्यः पुनन्तु माम् ॥
॥ ९-६७-खिल १८-३ ॥

प्राजापत्यं पवित्रं शतोद्यामं हिरण्मयम् ।
तेन ब्रम्हविदो वयं पूतं ब्रह्म पुनीमहे ॥
॥ ९-६७-खिल १८-४ ॥

इन्द्रः पुनीती सह मा पुनातु सोमः स्वस्त्या वरुणः समीच्या ।
यमो राजा प्रमृणाभिः पुनातु मा जातवेदा मूर्जयन्त्या पुनातु ॥
॥ ९-६७-खिल १८-५ ॥

ऋषयस्तु तपस्तेपुः सर्वे स्वर्गजिगीषवः ।
तपन्तस्तपसोग्रेण पावमानीर्ऋचोऽब्रुवन् ॥
॥ ९-६७-खिल १८-६ ॥

यन्मे गर्भे वसतः पापमुग्रं यज्जायमानस्यच किञ्चिदन्यत् ।
जातस्य च यच्चापि च वर्धतो मे तत् पावमानीभिरहं पुनामि ॥
॥ ९-६७-खिल १८-७ ॥

मातापित्रोर्यन्न कृतं वचो मे यत् स्थावरं जङ्गमंमा बभूव ।
विश्वस्य तत् प्रहृषितं वचो मे तत् पावमानीभिरहं पुनामि ॥
॥ ९-६७-खिल १८-८ ॥

गोघ्नात् तस्करत्वात् स्त्रीवधाद्यच्च किल्बिषम् ।
पापकं च चरणेभ्यस्तत् पावमानीभिरहं पुनामि ॥
॥ ९-६७-खिल १८-९ ॥

ब्रह्मवधात् सुरापानात् स्वर्णस्तेयाद् वृषलिगमनमैथुनसंगमात् ।
गरोर्दाराधिगमनाच्च तत् पावमानीभिरहं पुनामि ॥
॥ ९-६७-खिल १८-१० ॥

ज्या पवित्रानें देव हे स्वतःला नेहमीं पुनीत करीत असतात त्या हजारधारा असलेल्या पवित्रानें या पावमानी ऋचा मला पुनीत करोत ! (९-६७-खिल-१८-३). प्रजापतीनें तयार केलेलें व शंभर प्रकारें विणलेलें असें हें सुवर्ण पवित्र आहे. त्या पवित्रानें पुनीत झालेले आम्ही मंत्रवेत्ते ब्रह्म प्राप्त करून घेऊं !( ९-६७-खिल १८-४ ). इन्द्र पुनर्तीसह मला पावन करो ! तसेंच सोम व वरुण हे स्वस्तीसह मला पावन करोत ! त्याचप्रमाणें राजा यमदेवहि पितरांसमवेत मला पावन करो ! आणि जातवेद अग्नि हाहि ऊर्जयन्ती देवतेसह मला पावन करो ! (९-६७-खिल १८-५). स्वर्गाची इच्छा करणाऱ्या ऋषींनीं महान् तपाचें आचरण केलें. त्या उग्रतपानें संतप्त झालेल्या त्यांनीं अखेर पावमानी ऋचा पठण केल्या ( ९-६७-खिल १८-६ ). गर्भात असतांना जें मजकडून पाप घडलें असेल, जन्मतांना व जन्मल्यानंतरहि जें घडलें असेल, तसेंच पुढें वाढत .असतांना जें मजकडून घडलें असेल, तें सर्व पाप मी हे पावमानी मंत्र म्हणून परिशुद्ध करतों. ( ९-६७-खिल १८-७ ). आईबापांची गोष्ट न ऐकल्यामुळें किंवा स्थावरजंगमविषयक जें पाप मला लागलें असेल, किंवा दुसऱ्यांना प्रोत्साहन देणाऱ्या माझ्या भाषणापासून जें पाप लागलें असेल, तें सर्व मी हे पावमानी मंत्र म्हणून शुद्ध करतों. ( ९-६७-खिल १८-८ ). गोवध, चौर्य, आणि स्त्रीहत्या यांच्यामुळें मला जें पाप लागलें असेल आणि इतर दुराचरणामुळेंहि मला जें कांहीं लागलें असेल, तें सर्व पाप मी या पावमानी ऋचा म्हणून शुद्ध करतों. ( ९-६७-खिल १८-९ ). ब्रह्महत्या, सुरापान, सुवर्णचौर्य, शूद्र स्त्रीसंभोग, व गुरुदारागमन इत्यादि जें पातक मजकडून घडलें असेल, तें सर्व मी या पावमानी ऋचा म्हणून शुद्ध करतों. (९-६७-खिल १८-१०)

बालघ्नान्मातृपितृवधाद्भूमितस्करात् सर्ववर्णगमनमैथुनसंगमात् ।
पापेभ्यश्च प्रतिग्रहात् सद्यः प्रहरति सर्वदुष्कृतं तत् पावमानीभिरहं
पुनामि ।। ९-६७ खिल १८-११ ।।

क्रयविक्रयाद्योनिदोषाद् भक्षाद्भोज्यात् प्रतिग्रहात् ।
असंभोजनाच्चापि नृशंसं तत् पावमानीभिरहं पुनामि ।।
।। ९-६७ खिल १८-१२ ।।

दुरिष्टं दुरधीतं पापं यच्चाज्ञानतो कृतम् ।
अयाजिताश्चासंयाज्यास्तत् पावमानीभिरहं पुनामि ।।
।। ९-६७ खिल १८-१३ ।।

अमन्त्रमन्नं यत्किञ्चिद्धूयते च हुताशने ।
संवत्सरकृतं पापं तत् पावमानीभिरहं पुनामि ।।
।। ९-६७ खिल १८-१४ ।।

ऋतस्य योनयोऽमृतस्य धाम विश्वा देवेभ्यः पुण्यगन्धाः ।
ता न आपः प्र वहन्तु पापं शुद्धा गच्छामि सुकृतामु लोकं
तत्पावमानीभिरहं पुनामि ।। ९-६७ खिल १८-१५ ।।

पावमानीः स्वस्त्ययनीर्याभिर्गच्छति नान्दनम् ।
पुण्यांश्च भक्षान् भक्षायत्यमृतत्वं च गच्छति ।।
।। ९-६७ खिल १८-१६ ।।

पावमानीः पितॄन् देवान् ध्यायेद्यश्च सरस्वतीम् ।
पितॄंस्तस्योप वर्तेत क्षीरं सर्पिर्मधूदकम् ।।
।। ९-६७ खिल १८-१७ ।।

पावमानं परं ब्रह्म शुक्रं ज्योतिः सनातनम् ।
ऋषींस्तस्योप तिष्ठेत क्षीरं सर्पिर्मधूदकम् ।।
।। ९-६७ खिल १८-१८ ।।

बालहत्या, मातृहत्या, पितृहत्या, भूमिचौर्य, सर्व वर्णांच्या स्त्रियांशीं केलेलें मैथुन कर्म, पापी पतितांकडून घेतलेलें दान इत्यादि मजकडून घडलेलीं सर्व पातकें या पावमानी ऋचा म्हणून मी शुद्ध करतों. ( ९-६७-खिल १८-११ ). क्रयविक्रय, योनिदोष, भक्षण, भोजन, प्रतिग्रह, अयोग्य भोजनपान, यांपासून मला जें मला पाप लागलें असेल, तें सर्व पाप मी पावमानी मंत्र पठण करून शुद्ध करतों. ( ९-६७-खिल १८-१२ ). अशास्त्रीय यजन, विधि सोडून केलेलें अध्ययन, अज्ञानानें केलेलें दुराचरण, अयोग्य यजन व अयोग्य याजन यांमुळें मला जें पाप लागलें असेल, तें सर्व मी हे पावमानी मंत्र म्हणून परिशुद्ध करतों. (९-६७-खिल १८-१३) अमंत्रक अग्निहवन व संवत्सरविषयक दोष यांपासून मला जें पातक लागलें असेल, तें सर्व मी या पावमानी ऋचा म्हणून शुद्ध करतों. ( ९-६७-खिल १८-१४ ). सत्याचें उगमस्थान, अमृताची खाण, सर्व देवांचा सौगंध अशा प्रकारचें जें हें उदक, तें आमचें सर्व पाप वाहून नेवो ! अशा रीतीनें परिपूत झालेला मी पुण्यवंतांच्या लोकांत जाईन. कारण पावमानी ऋचा म्हणून मी सर्व पातक धुवून काढलें आहे ( ९-६७-खिल १८-१५ ). ज्याच्यामुळें मनुष्य हा आनंदित होतो, हितकर व सुखकर भोज्यपदार्थ सेवन करतो, व अमरत्व प्राप्त करून घेतो, असे हे पावमानी मंत्र मंगलकारक आहेत ! ( ९-६७-खिल १८-१६ ). पावमानी ऋचा, पितर, देव व त्यांबरोबरच सरस्वती यांचें जो ध्यान करतो, त्यांस पितरांचा मंगल सहवास घडतो आणि शिवाय दूध, तूप व मधुर उदक यांची त्यास प्राप्ति होते ! ( ९-६७-खिल १८-१७ ). या पावमानी ऋचा म्हणजे सनातन व शुभ्र तेजस्वी असें जें परब्रह्म आहे, तत्स्वरूप आहेत. यांचें जो पठण करतो त्याला ऋषींचा सहवास घडतो आणि शिवाय दूध, तूप व मधुर उदक यांची प्राप्ति होते ! ( ९-६७-खिल १८-१८ )

पावमानं परं ब्रह्म ये पठन्ति मनीषिणः ।
सप्त जन्म भवेद्विप्रो धनाढ्यो वेदपारगः ॥

॥ ९-६७ खिल १८-१९ ॥

दशोत्तराण्यृचांश्चैव पावमानीः शतानि षट् ।
एतज्जुह्वन्जपेन् मंत्रं घोरमृत्युभयं हरेत् ॥

॥ ९-६७ खिल १८-२० ॥

एतत्पुण्यं पापहरं रोगमृत्युभयापहम् ।
पठतां श्रृण्वतां चैव ददाति परमां गतिम् ॥

॥ ९-६७ खिल १८-२१ ॥

**स्मा. वि. पवमानस्तोत्र.**

## रत्न ३४८ वें

**वत्सप्रिर्भालन्दन-ऋषि, पवमान-देवता, जगती-छंद.**

सं दक्षेण मनसा जायते कविर्ऋतस्य गर्भो निहितो यमा परः ।
यूना ह सन्ता प्रथमं वि जज्ञतुर्गुहा हितं जनिम नेममुद्यतम् ॥

॥ ९-६८-५ ॥

## रत्न ३४९ वें

**हरिमन्त आंगिरस-ऋषि, पवमान-देवता, जगती-छंद.**

आ तू न इन्दो शतदात्वश्व्यं सहस्रदातु पशुमद्धिरण्यवत् ।
उप मास्व बृहती रेवतीरिषोऽधि स्तोत्रस्य पवमान नो गहि ॥

॥ ९-७२-९ ॥

हें पावमान नांवाचें सर्वोत्कृष्ट स्तोत्र जे थोर लोक पठण करतात, ते सात जन्म ब्राह्मणयोनींत जन्मून धनसंपन्न व वेदपारग होतात (९-६७-खिल १८-१९). हे सहाशें दहा मंत्र म्हणून जो होम करील व जप करील तो भयंकर मृत्यु-भयापासून मुक्त होतो. (९-६७-खिल १८-२०). हें पावमानी स्तोत्र पुण्यकर, पापहर, रोगमृत्युभयापह असून तें पठण करणारा व श्रवण करणारा दोघेहि सद्गतीस जातात ! (९-६७-खिल १८-२१).

## रत्न ३४८ वें

प्रगल्भ मनासहित उदकाच्या पोटांत राहणारा सोम हा पृथ्वीपासून उत्पन्न होतो. तोच देवांकडून आकाशांत सूर्यरूपानें स्थापला गेला आहे. तरुण असणारे ते दोघेहि—म्हणजे सोम व सूर्य—उत्पन्न होतांच ‘ हा चंद्र नि हा सूर्य ’ असे सहज ओळखिले जातात. त्यांचा अर्धाभाग गूढ राहिला व अर्धा भाग चंद्र-सूर्यरूपानें रात्रीं व दिवसा उदयास आला. (९-६८-५).

## रत्न ३४९ वें

हे पवमान सोमा ! शेकडयांनीं गवाश्वादि पशु व हजारांनीं सुवर्णयुक्त संपत्ति तूं आम्हांस तावडतोब आणून दे ! त्याचप्रमाणें, हे सोमा ! पुष्कळ धनयुक्त अन्न आम्हासाठीं म्हणून निर्माण कर ! आणि आमचीं सुंदर स्तोत्रें ऐकण्यासाठीं तूं आम्हांकडे ये ! (९-७२-९).

## रत्न ३५० वें

**वेन भार्गव-ऋषि, पवमान सोम-देवता, जगती-छंद.**

स्वादुः पवस्व दिव्याय जन्मने स्वादुरिन्द्राय सुहवीतुनाम्ने ।
स्वादुर्मित्राय वरुणाय वायवे बृहस्पतये मधुमाँ अदाभ्यः ॥

॥ ९-८५-६ ॥

**स्मा. वि. शर्करास्नान ( देवपूजा )**

## रत्न ३५१ वें

**कश्यप मारीच-ऋषि, पवमान सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

एवा पुनानो अपः स्व१र्गा अस्मभ्यं तोका तनयानि भूरि ।
शं नः क्षेत्रमुरु ज्योतींषि सोम ज्योङ्नः सूर्यं दृशये रिरीहि ॥

॥ ९-९१-६ ॥

## रत्न ३५२ वें

**कण्व घौर-ऋषि, पवमान सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

श्रिये जातः श्रिय आ निरियाय श्रियं वयो जरितृभ्यो दधाति ।
श्रियं वसाना अमृतत्वमायन्भवन्ति सत्या समिथा मितद्रौ ॥

॥ ९-९४-४ ॥

**स्मा. वि. नीराजनदीपसमर्पण ( देवपूजा ).**

## रत्न ३५३ वें

**प्रतर्दन दैवोदासि-ऋषि, पवमान सोम, त्रिष्टुप्-छंद.**

ब्रह्मा देवानां पदवीः कवीनामृषिर्विप्राणां महिषो मृगाणाम् ।
श्येनो गृध्राणां स्वधितिर्वनानां सोमः पवित्रमत्येति रेभन् ॥

॥ ९-९६-६ ॥

**श्रौ. वि. ( देवसुहवि ) सोमयाज्या.**

## रत्न ३५० वें

हे सोमा ! माधुर्यानें ओथंबलेला असा तूं देवांसाठीं झुळुं झुळूं वाहूं लाग ! गोड नांव असलेला तूं इन्द्रासाठीं वाहूं लाग ! मित्र, वरुण, वायु आणि बृहस्पति यांचेसाठीं मधुर व अखंडित असा तूं सलग धारेनें वाहूं लाग ! ( ९–८५–६ ).

## रत्न ३५१ वें

हे सोमा ! याप्रमाणें परिशुद्ध केलेला तूं अंतरिक्ष, स्वर्ग व पृथ्वी या त्रैलोक्यांतील संपत्ति आणि वंशविस्तारक पुत्रपौत्रादि संतति आम्हांस विपुल लाभेल असें कर ! आमची शेतवाडी सुखकर कर ! नक्षत्रें विस्तीर्ण कर ! आणि आम्हांला सूर्याचें दीर्घ-काल दर्शन घडेल असें कर ! (९–९१–६).

## रत्न ३५२ वें

सोम हा संपत्तीकरतां म्हणून उत्पन्न झाला. संपत्तीकरतांच तो बाहेर पडला. स्तोतृजनांना तो संपत्ति व अन्न देणारा आहे. त्याच्या अनुग्रहानें स्तोते अमर होतात. मितगतीनें चालणाऱ्या सोमाच्या साह्यानें चालणारें युद्ध हेंच खरें युद्ध असून, तेंच पूर्ण यशस्वी होतें ( ९–९४–४ ).

## रत्न ३५३ वें

देवांमध्यें ब्रह्मा, कवींमध्यें अग्रेसर, विप्रांमध्यें ऋषि, मृगांमध्यें तरुण बैल, पक्ष्यांमध्यें बहिरीससाणा, शस्त्रांमध्यें कुऱ्हाड असा हा सोम गाळण्यांतून खळखळ शब्द करीत खालीं द्रोणकलशांत उतरतो (९–९६–६).

## रत्न ३५४ वें

**कश्यप मारीच-ऋषि, पवमान-सोम, पंक्ति-छंद.**

यत्र ब्रह्मा पवमान छन्दस्यां३ वाचं वदन् ।
ग्राव्णा सोमे महीयते सोमेनानन्दं जनयन्निन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ९-११३-६ ॥

**औ. वि. अंतकाळीं म्हणावयाचा मंत्र.**

यत्र ज्योतिरजस्रं यस्मिँल्लोके स्वर्हितम् ।
तस्मिन्मां धेहि पवमानामृते लोके अक्षित इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ९-११३-७ ॥

यत्र राजा वैवस्वतो यत्रावरोधनं दिवः ।
यत्रामूर्यह्वतीरापस्तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो परि स्रव ॥
॥ ९-११३-८ ॥

यत्रानुकामं चरणं त्रिनाके त्रिदिवे दिवः ।
लोका यत्र ज्योतिष्मन्तस्तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ९-११३-९ ॥

यत्र कामा निकामाश्च यत्र ब्रध्नस्य विष्टपम् ।
स्वधा च यत्र तृप्तिश्च तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ९-११३-१० ॥

यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसते ।
कामस्य यत्राप्ताः कामास्तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ९-११३-११ ॥

## रत्न ३५४ वें

हे पवमान सोमा ! छंदोबद्ध स्तोत्र गाणारा आणि दगडांनीं ठेंचून तयार केलेल्या सोमरसानें देवांना आनंद उत्पन्न करणारा असा ब्राह्मण जेथें देवांकडून सत्कारिला जातो, अशा ठिकाणीं तूं इंद्राप्रीत्यर्थ वाहूं लाग ! ( ९-११३-६ ). हे पवमान सोमा ! जेथें अखंड प्रकाश आहे आणि जेथें सूर्य प्रतिष्ठित आहे अशा अमर व अक्षय लोकांत सोमरस काढणाऱ्या मला नेऊन ठेव ! हे सोमा ! इन्द्राप्रीत्यर्थ वाहूं लाग ! ( ९-११३-७ ). जेथें विवस्वानाचा पुत्र यमराज राज्य करतो, जेथें सूर्याला झांकणारी रात्र आहे आणि जेथें गंगादि मोठमोठ्या नद्या आहेत, अशा ठिकाणीं मला नेऊन अमर कर ! ( ९-११३-८ ). ज्या द्युलोकाच्या तृतीय स्थानीं सूर्य हा स्वेच्छेनुसार संचार करीत असतो आणि जेथील लोक तेजःपुंज असतात अशा ठिकाणीं मला अमर कर ! हे सोमा ! तूं इन्द्राप्रीत्यर्थ वाहूं लाग ! ( ९-११३-९ ). जेथें काम्य व स्तवनीय असे इद्रादि देव राहतात, जेथें सूर्याचें निवासस्थान आहे, आणि जेथें स्वधान्नानें तृप्ति होते, अशा ठिकाणीं नेऊन मला अमर कर ! हे सोमा ! तूं इन्द्राप्रीत्यर्थ वाहूं लाग ! ( ९-११३-१० ). जेथें आनंद आहे, प्रमोद आहे, उल्हास आहे, आणि हर्ष आहे आणि जेथें काम्य देवांचे सर्व मनोरथ प्राप्त होतात, अशा ठिकाणीं नेऊन मला अमर कर ! हे सोमा ! तूं इन्द्राप्रीत्यर्थ वाहूं लाग ! ( ९-११३-११ ).

## रत्न ३५५ वें

**कश्यप मारीच-ऋषि, पवमान सोम-देवता, पंक्ति-छंद.**

य इन्दोः पवमानस्यानु धामान्यक्रमीत् ॥
तमाहुः सुप्रजा इति यस्ते सोमाविधन्मन
इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ९-११४-१ ॥

**श्रौ. वि. अंतकालीं म्हणावयाचा मंत्र.**

ऋषे मन्त्रकृतां स्तोमैः कश्यपोद्वर्धयन्गिरः ।
सोमं नमस्य राजानं यो जज्ञे वीरुधां पतिरिन्द्रायेन्दो
परि स्रव ॥ ९-११४-२ ॥

सप्त दिशो नानासूर्याः सप्त होतार ऋत्विजः ।
देवा आदित्या ये सप्त तेभिः सोमाभि रक्ष न
इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ९-११४-३ ॥

यत्ते राजञ्छृतं हविस्तेन सोमाभि रक्ष नः ।
अरातीवा मा नस्तारीन्मो च नः किं चनाममदिन्द्रायेन्दो
परि स्रव ॥ ९-११४-४ ॥

# परिशिष्ट

## रत्न ३५६ वें

यत्र तत् परमं पदं विष्णोर्लोके महीयते ।
देवैः सुकृतकर्मभिस्तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो
परि स्रव ॥ ९-११४-खिल-२०-१ ॥

यत्र तत् परमाप्यं भूतनामधिपतिम् ।
भावभावी च योगीश्च तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो
परि स्रव ॥ ९-११४-खिल-२०-२ ॥

## रत्न ३५५ वें

जो आल्हादप्रद अशा सोमाच्या तेजोमय स्थानाप्रत जातो, तोच उत्तम संततीनें युक्त होतो असें म्हणतात. तसेंच, जो तुझी परिचर्या करतो त्याला लोक सत्पुरुष असें म्हणतात. हे सोमा ! तूं इन्द्राकरतां वाहूं लाग ! ( ९-११४-१ ). हे कश्यप ऋषे ! मंत्रकर्त्यांच्या स्तोत्रांनीं पुनः पुनः वृद्धिंगत होणाऱ्या सोमराजाचें तूं पूजन कर ! जो वनस्पतींचा पालक होऊन जन्मला त्याला वंदन कर ! हे सोमा ! इन्द्राकरतां वाहूं लाग !(९-११४-२). सात दिशा, ऋतू, होत्रादि सात ऋत्विज आणि सात आदित्य देव या सर्वांनीं युक्त असा तूं आमचें रक्षण करणारा हो ! हे सोमा ! इंद्राकरतां वाहूं लाग ! ( ९-११४-३ ). हे सोमराजन् ! हें तुझ्यापुढें पक्व हविरन्न वाढून ठेविलें आहे. त्याचा तूं स्वीकार करून आमचें रक्षण कर ! शत्रु आमचा नाश करणार नाहीं असें घडो ! तसेंच कोणीहि आमची कस-लीहि संपत्ति हरण करणार नाहीं, असें होऊं दे ! हे सोमा ! इंन्द्राप्रीत्यर्थ वाहूं लाग ! (९-११४-४ ).

## रत्न ३५६ वें

जें ब्रह्मपद विष्णु लोकांत आहे असें वर्णन करण्यांत येतें आणि जें पुण्यवान देवांना प्राप्त होतें, तेथें मला, हे सोमा ! अढळ कर ! हे सोमा ! तूं इन्द्रासाठीं वाहूं लाग ! ( ९-११४ खिल २०-१ ).

जेथें परम ऐक्य आहे, जेथें सर्व प्राणिमात्रांचा अधिपति राहतो आणि जेथें ज्ञानी व योगी जातात तेथें, हे इंद्रा ! तूं मला अढळ कर ! हे सोमा ! इंद्रासाठीं वाहूं लाग ! ( ९-११४ खिल २०-२ ).

यत्र लोकास्तनूत्यजः श्रद्धया तपसा जिताः ।
तेजश्च यत्र ब्रह्म च तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो
परि स्रव ।। ९-११४-खिल-२०-३ ।।

यत्र देवा महात्मानः सेन्द्राश्च समरुद्गणाः ।
ब्रह्मा च यत्र विष्णुश्च तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो
परि स्रव ।। ९-११४-खिल-२०-४ ।।

यत्र गङ्गा च यमुना च यत्र प्राची सरस्वती ।
यत्र सोमेश्वरो देवस्तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो
परि स्रव ।। ९-११४-खिल-२०-५ ।।

यत्र तद्विष्णुर्महीयते नराणामधिपतिम् ।
यत्र शङ्खचक्रगदाधरस्मरणं मुक्तिश्च तत्र माममृतं
कृधीन्द्रायेन्दो परि स्रव ।। ९-११४-खिल-२०-६ ।।

**नवबें मंडल समाप्त**

जेथें तें परम संरक्षक ब्रह्म आहे, जेथें भूतमात्रांचा अधिपति असतो आणि जेथें ज्ञानी व योगी जातात तेथें हे सोमा ! तूं मला अढळ कर ! हे सोमा ! तूं इन्द्रासाठीं वाहूं लाग ! (९-११४ खिल २०-३). जेथें देव, महात्मे, इंद्रासहित मरुद्गण, ब्रह्मा आणि विष्णु आहेत तेथें मला, हे सोमा ! तूं अमर कर ! हे सोमा ! इंद्रासाठीं वाहूं लाग ! (९-११४ खिल २०-४ ). जेथें गंगा, यमुना व पूर्ववाहिनी सरस्वती आहे आणि जेथें सोमेश्वर महादेव आहे तेथें, हे सोमा! मला तूं अमर कर! हे सोमा इंद्रासाठीं वाहूं लाग.(९-११४ खिल २०-५). •जेथें नरांचा अधिपति विष्णुदेव हा स्तविला जातो व जेथें शंखचक्रगदाधरांचें स्मरण आणि मुक्ति आहे तेथें, हे सोमा ! मला तूं अमर कर ! हे सोमा ! इंद्रासाठीं वाहूं लाग ! ( ९-११४ खिल २०-६ ).

नववें मंडल समाप्त



# मण्डल दहावें

## रत्न ३५७ वें

त्रित आप्त्य-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

अग्निं मन्ये पितरमग्निमापिमग्निं भ्रातरं सदमित् सखायम् ।
अग्नेरनीकं बृहतः सपर्यं दिवि शुक्रं यजतं सूर्यस्य ॥
॥ १०-७-३ ॥

भवा नो अग्नेऽवितोत गोपा भवा वयस्कृदुत नो वयोधाः ।
रास्वा च नः सुमहो हव्यदातिं त्रास्वोत नस्तन्वो३ अप्रयुच्छन् ॥
॥ १०-७-७ ॥

## मराठी भावार्थ

### रत्न ३५७ वें

मी अग्निदेवाला पिता समजतों. त्यालाच आप्त समजतों. त्यालाच भाऊ आणि त्यालाच सदैव मित्रहि पण समजतों. लोक ज्याप्रमाणें आकाशांतील तेजस्वी सूर्यमंडलाची उपासना करतात, तद्वत मीहि या महान् अग्निनारायणाच्या मुखस्थानीय आह्वनाची आराधना करतों (१०-८-३). हे अग्निदेवा ! तूं आमचा दृष्टभयापासून रक्षण करणारा असा हो ! तसाच पण अदृष्ट भयापासूनहि आमचें रक्षण करणारा हो ! आम्हांसाठीं अन्न उत्पन्न कर ! आणि आम्हांस तें अन्न प्राप्त करून दे ! हे पूज्य अग्ने ! तूं आपला हविप्रसाद आम्हांस मिळेल असें कर ! आणि त्याचप्रमाणें न विसंबतां आमच्या शरीराचें रक्षणपोषणहि कर ! (१०-८-७).

## रत्न ३५८ वें

**सिंधुद्वीप आंबरीष-ऋषि, आपो-देवता, गायत्री-छंद.**

आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन ।
महे रणाय चक्षसे ॥ १०-९-१ ॥

**श्रौ. वि. (अग्नि) अग्निमारुत शस्त्र. स्मा. वि. मार्जन, स्नान. शांतिपाठ**

यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः ।
उशतीरिव मातरः ॥ १०-९-२ ॥
तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ ।
आपो जनयथा च नः ॥ १०-९-३ ॥
शं नो देवीरभीष्टय आपो भवन्तु पीतये ।
शं योरभि स्रवन्तु नः ॥ १०-९-४ ॥

**स्मा. वि. मार्जन, आचमन, शनिग्रह जप.**

## रत्न ३५९ वें

**सिंधुद्वीप आंबरीष-ऋषि, आपो देवता, वर्धमाना गायत्री-छंद.**

ईशाना वार्याणां क्षयन्तीश्चर्षणीनाम् ।
अपो याचामि भेषजम् ॥ १०-९-५ ॥

**स्मा. वि. मार्जन.**

## रत्न ३६० वें

**सिंधुद्वीप आंबरीष-ऋषि, आपो-देवता, गायत्री-छंद.**

अप्सु मे सोमो अब्रवीदन्तर्विश्वानि भेषजा ।
अग्निं च विश्वशंभुवम् ॥ १०-९-६ ॥

**स्मा. वि. स्नान, आपो देवता-आवाहन.**

## रत्न ३५८ वें

हे आपो देवींनो ! तुम्ही आम्हांस क्षेमकर अशा व्हा ! तुमच्यांत भोग्य असा जो उत्तम रस आहे, त्याचा आम्हांस उपभोग घेऊं द्या ! आणि त्याच वेळेस विनति ही कीं अत्यंत सुंदर असें जें परमात्म स्वरूप आहे, त्याच्या साक्षात्कारास आम्ही पात्र होऊं असें करा ! ( १०-९-१ ). अहो अब्देवतांनो ! प्रेमळ माता ज्याप्रमाणें आपल्या तान्हुल्यास स्तनपान करवितात तद्वत् तुम्हीहि अत्यंत सुखकारक असा आपला मधुर रस आम्हांस या लोकीं पान करावयास द्या ! ( १०-९-२ ). हे आपो देवींनो ! तुमच्या त्या मधुर रसाचें सेवन करून आम्ही सदैव संतुष्ट राहूं असें घडो ! आणि तुमच्या त्या जगदाधारभूत रसानें ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व प्राणिमात्रांना तुम्ही यथेच्छ तृप्त करा ! (१०-९--३). जलदेवता आम्हांस सुख देवोत ! यज्ञकार्यार्थ व पानार्थ आम्हांस उदक सतत मिळत राहो ! आणि तें उदक आमच्या हल्लीं जडलेल्या रोगाचें शमन व पुढील अनुत्पन्न रोगाचें पृथक्करण करणारें असें होवो ! ( १०-९-४ ).

## रत्न ३५९ वें

उदकापासून वाढणाऱ्या व्रीहियवादि धान्याचे स्वामी व मनुष्यांना आधारभूत अशा त्या आपोदेवीजवळ मी रोगनाशक अशा औषधाची याचना करतों. ( १०-९-५ ).

## रत्न ३६० वें

उदकामध्यें सर्व औषधि आहेत आणि तसेंच जगाला सौख्य देणारा अग्निहि पण आहे, असें मला सोम देवानें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें उदक हें सर्व रोगनिवारक औषधींनीं परिपूर्ण आहे, हेंहि मला त्या देवानेंच सांगितलें. ( १०-९-६ ).

## रत्न ३६१ वें

**सिंधुद्वीप आंबरीष-ऋषि, आपो-देवता, प्रतिष्ठा गायत्री-छंद.**

आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे३ मम ।
ज्योक् च सूर्यं दृशे ।। १०-९-७ ।।

## रत्न ३६२ वें

**सिंधुद्वीप आंबरीष-ऋषि, आपो-देवता, अनुष्टुप्--छंद.**

इदमापः प्र वहत यत् किं च दुरितं मयि ।
यद्वाहमभिदुद्रोह यद्वा शेप उतानृतम् ।। १०-९-८ ।।

**स्मा. वि. मार्जन, स्नान, हस्तप्रक्षालन, चिताप्रोक्षण.**

आपो अद्यान्वचारिषं रसेन समगस्महि ।
पयस्वानग्न आ गहि तं मा सं सृज वर्चसा ।। १०-९-९ ।।

# परिशिष्ट

## रत्न ३६३ वें

ससुषीस्तदपसो दिवा नक्तं च ससुषीः ।
वरेण्यक्रतूरहमा देवीरवसे हुवे ।। १०-९ खिल ।।

## रत्न ३६४ वें

**यमी-ऋषिका, यम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

ओ चित् सखायं सख्या ववृत्यां तिरः पुरू चिदर्णवं जगन्वान् ।
पितुर्नपातमा दधीत वेधा अधि क्षमि प्रतरं दीध्यानः ।।
।। १०-१०-१ ।।

## रत्न ३६१ वें

हे आपोदेवींनो ! माझें शरीर निरोगी रहावें म्हणून तुम्हीं मला आरोग्यकारक असें औषध देण्याची कृपा करा ! सूर्यदेवाचें निरंतर दर्शन घेण्यास आम्ही समर्थ व्हावें, एतदर्थ आम्ही निरोगी राहूं असें करा ! ( १०–९–७ ).

## रत्न ३६२ वें

न समजतां आम्हीं जें पातक केलें असेल अगर जाणूनबुजून आम्हीं जो दुसऱ्यांचा अपराध केला असेल अगर सत्पुरुषांना निरर्थक शिव्याशाप दिले असतील, तीं सर्व पापें, हे आपोदेवींनो ! तुम्ही कृपा करून वाहून न्या ! ( १०–९–८ ). आज रोजीं अवभृत स्नानार्थ म्हणून आम्हीं या जलामध्यें प्रवेश केला आहे, अर्थात् आम्हीं या जलरसाशीं संयुक्त झालों आहों. हे अग्निनारायणा ! तूं जलामध्येंहि रहात असल्यामुळें, या कर्मानुष्ठानप्रसंगीं तूं हजर राहून हें आमचें स्नान आम्हांस तेजस्वी करील असें कर ! ( १०–९–९ ).

## रत्न ३६३ वें

इन्द्राच्या पराक्रमामुळें रात्रंदिवस आकाशांतून पाझरणारें उदक श्रेष्ठ कर्मांत तत्पर राहणारा जो मी त्या माझ्या संरक्षणाकरितां खालीं आणीत आहे. ( १०–९ खिल ).

## रत्न ३६४ वें

यमी म्हणते-‘ मी माझ्या प्रिय सख्याला निर्जन व समुद्रवलयांकित अशा द्वीपांत घेऊन आलें तर खरी. आतां त्याला येथें सर्व लज्जा सोडून एकांत सुखासाठीं प्रयत्न करूं पाहतें. सुंदर व गुणवान पुत्र निर्माण व्हावा एतदर्थ हे यमा ! पितृभूत असें तुझें वीर्य पृथ्वीस्थानीय अशा माझ्या उदरांत प्रवेश करो ’ ! ( १०–१०–१ ).

## रत्न ३६५ वें

**यम-ऋषि, यमी-देवता, त्रिष्टुप्छंद.**

न ते सखा सख्यं वष्टयेतत् सलक्ष्मा यद्विषुरूपा भवाति ।
महस्पुत्रासो असुरस्य वीरा दिवो धर्तार उर्विया परि ख्यन् ॥
॥ १०-१०-२ ॥

## रत्न ३६६ वें

**यमी-ऋषिका, यम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

उशन्ति घा ते अमृतास एतदेकस्य चित् त्यजसं मर्त्यस्य ।
नि ते मनो मनसि धाय्यस्मे जन्युः पतिस्तन्व१मा विविश्याः ॥
॥ १०-१०-३ ॥

## रत्न ३६७ वें

**यम-ऋषि, यमी-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

न यत् पुरा चकृमा कद्ध नूनमृता वदन्तो अनृतं रपेम ।
गन्धर्वो अप्स्वप्या च योषा सा नो नाभिः परमं जामि तन्नौ ॥
॥ १०-१०-४ ॥

## रत्न ३६८ वें

**यमी-ऋषिका, यम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

गर्भे नु नौ जनिता दंपती कर्देवस्त्वष्टा सविता विश्वरूपः ।
नाकिरस्य प्र मिनन्ति व्रतानि वेद नावस्य पृथिवी उत द्यौः ॥
॥ १०-१०-५ ॥

## रत्न ३६५ वें

यम म्हणतोः-' मी तुझा सखा असलों तरी भलतेंच सख्य मी तुझ्याशीं करूं इच्छित नाहीं ! कारण जी हल्लीं समान नात्याची अशी बहीण आहे ती मग तशा प्रकारच्या सख्यत्वानें विषम नात्याची–म्हणजे पत्नी-होऊन बसेल ! थोर व प्रज्ञावान अशा प्रजापतीचे जे वीर्यशाली पुत्र आहेत, ते द्यावादि लोक धारण करणारे असून, पृथ्वीवर सर्वत्र पाहारा करीत असतात.' ( १०–१०–२ ).

## रत्न ३६६ वें

यमी म्हणतेः-' म्हणून काय झालें ? अमर असणारे देव देखील दुहितृ-भगिन्यादि स्त्रीवर्गाशीं प्रेमलीला करण्याची सुरत इच्छा करीत असतातच कीं नाहीं ? म्हणून म्हणतें कीं तुझें मन माझ्या मनाशीं समरस होवो ! तर ज्याप्रमाणें पिता प्रजापति हा पतीचें नातें धारण करून स्वकन्येशीच रममाण झाला, तद्वत हे यमा ! तूंहि माझा पति होऊन माझ्या शरीरांत प्रवेश कर कीं ! करशील ना ?' ( १०–१०–३ ).

## रत्न ३६७ वें

यम म्हणतोः-' प्रजापतीनें जें मागें एकदा केलें तें होऊन गेलें. तसें आतां आम्ही करणार नाहीं. आतांपर्यंत सत्याचरण करीत येऊन आतांच आम्ही असली अनीतीची भाषा कां म्हणून वापरावी ? अंतरिक्षांतील सूर्यनारायण हा आमचा पिता, व आमचें पोषण करणारी ती त्याची उदक-रूप पत्नी म्हणजे सरण्यू ही आमची माता. अर्थात् त्यांच्यापासून आम्ही दोघेंहि उत्पन्न झालों आहों. म्हणून हें आपलें नातें श्रेष्ठ भावा-बहिणीचें आहे. हें तूं विसरतेस कशी ? यमे !' ( १०–१०–४ ).

## रत्न ३६८ वें

यमी म्हणतेः-' आपण दोघेंहि गर्भांत असतांनाच त्या प्रजापतीनें, त्वष्टया देवानें, आणि विश्वरूपात्मक सवित्यानें आम्हा भावाबहिणींस पति-पत्नी करून टाकिलें नाहीं काय ? मग आतां त्या प्रजापतीची इच्छा कोणीं कशी व कां मोडावी ? म्हणून म्हणतें कीं गर्भांत असतांनाच आपण पति-पत्नीचें नातें धारण केलें असल्यामुळें तूं आतां माझा पति होऊन संभोग कर ! ( १०–१०–५ ).

को अस्य वेद प्रथमस्यान्हः क ईं ददर्श क इह प्र वोचत् ।
बृहन्मित्रस्य वरुणस्य धाम कदु ब्रव आहनो वीच्या नॄन् ॥

॥ १०-१०-६ ॥

यमस्य मा यम्यं१ काम आगन् त्समाने योनौ सहशेय्याय ।
जायेव पत्ये तन्वं रिरिच्यां वि चिद्वृहेव रथ्येव चक्रा ॥

॥ १०-१०-७ ॥

## रत्न ३६९ वें

**यम-ऋषि, यमी-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

न तिष्ठन्ति न नि मिषन्त्येते देवानां स्पश इह ये चरन्ति ।
अन्येन मदाहनो याहि तूयं तेन वि वृह रथ्येव चक्रा ॥

॥ १०-१०-८ ॥

## रत्न ३७० वें

**यमी-ऋषिका, यम-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

रात्रीभिरस्मा अहभिर्दशस्येत् सूर्यस्य चक्षुर्मुहुरुन्मिमीयात् ।
दिवा पृथिव्या मिथुना सबन्धू यमीर्यमस्य बिभृयामजामि ॥

॥ १०-१०-९ ॥

## रत्न ३७१ वें

**यम-ऋषि, यमी-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

आ घा ता गच्छानुत्तरा युगानि यत्र जामयः कृणवन्नजामि ।
उप बर्बृहि वृषभाय बाहुमन्यमिच्छस्व सुभगे पतिं मत् ॥

॥ १०-१०-१० ॥

शिवाय आणखी, यमा! हें असेंहि पहा कीं, हा आपला आजचा पहिल्या दिवसाचा अन्योन्य संबंध कोणाला माहीत होणार आहे? या एकांत प्रदेशांत आम्हीं केलेला प्रेमविलास कोण पाहणारा आहे! आणि तो आपण पाहिला असें सांगणारा तरी येथें कोण आहे? मित्रावरुणाचें हें भुवन मोठें विशाल आहे. स्वकल्पित अधःपाताच्या व स्वर्गाच्या भ्रामक कल्पनेनें भारून गेलेल्या यमा! हें तूं काय बोलत आहेस! सख्या! काय बोलत आहेस!! ( १०–१०–६ ). एकाच प्रणय-शय्येवर एकांतांत यमाजवळ शयन करण्याची या यमीची कामेच्छा आतां अगदीं उचंबळून आली आहे! आपल्या प्रियकर पतीपुढें रतिकामेच्छु पत्नी जशी प्रेमानें आपली काया उघडी करते, तद्वत मी-ही यमी झाली तरी-आपली काया तुझ्यापुढें उघडी करूं इच्छितें. तर हे यमा! चाकाशीं रथ जसा व्यवहार करतो, तद्वत् आपणही एकमेकांस कडकडून भेटून प्रेमविलास करूं या!' ( १०–१०–७ ).

## रत्न ३६९ वें

यम म्हणतो—यमे! देवांचे दूत येथें संचार करीत असतात. ते कोठें थांबतहि नाहींत व कोठें डोळेझांक करीतहि नाहींत, ( त्यांनीं हें पाहिलें तर! ) हें बेफाम बोलून मला दुखविणारे यमे! तूं आतां येथून चट्‌दिशी चालती हो कशी! तुला तशी इच्छाच असल्यास खुशाल अन्य पुरुषाकडे जा! त्याच्याजवळ जाऊन रथ व चाक यांच्याप्रमाणें तूंहि त्याला कड-कडून आलिंगून यथेच्छ संभोग-विलास कर! (१०-१०-८ ).

## रत्न ३७० वें

यमी म्हणते— यमा! रात्र व दिवस हीं तुला सद्‌बुद्धि देवोत! सूर्याचा डोळा या यमाकडे उघडून पाहो! भावाबहिणीचें नातें असूनहि द्यावापृथ्वी नवराबायको होऊन, यमा! प्रपंच करीत नाहींत काय? समान बंधुत्वाचें नातें धारण करणारे रात्र व दिवस हें जाणून यमयमीचें बंधुत्वाचें नातें मोडून, त्यांना नवराबायको होऊन प्रपंच करण्यास सम्मति देवोत! ( १०–१०–९ ).

## रत्न ३७२ वें

यमी-ऋषिका, यम-देवता, त्रिष्टुप्-छंद.

किं भ्रातासद्यदनाथं भवाति किमु स्वसा यन्निर्ऋतिर्निगच्छात् ।
काममूता बह्वे३तद्रपामि तन्वा मे तन्वं१ सं पिपृग्धि ॥
॥ १०-१०-११ ॥

## रत्न ३७३ वें

यम-ऋषि, यमी-देवता, त्रिष्टुप्-छंद.

न वा उ ते तन्वा तन्वं१ सं पपृच्यां पापमाहुर्यः स्वसारं
निगच्छात् । अन्येन मत् प्रमुदः कल्पयस्व न ते भ्राता सुभगे
वष्ट्येतत् ॥ १०-१०-१२ ॥

## रत्न ३७४ वें

यमी-ऋषिका, यम-देवता, विराटस्थाना-छंद.

बतो बतासि यम नैव ते मनो हृदयं चाविदाम ।
अन्या किल त्वां कक्ष्येव युक्तं परि ष्वजाते लिबुजेव वृक्षम् ॥
॥ १०-१०-१३ ॥

## रत्न ३७१ वें

यम म्हणतो—हे यमे ! बहीण भावाला सोडून दुसऱ्याला पति करून घेण्याचा काळ आतां प्रचलित होऊं पाहत आहे. म्हणून म्हणतों, हे सुभगे ! तूं मला सोडून जा ! आणि दुसरा कोणी तरी योग्य तरुण पाहून त्याच्याजवळ जाऊन तूं आपली प्रेमयाचना कर ! आणि तो तुझ्याशीं रति-विलास करीत असतां तूं त्या वेळीं आपला बाहू खुशाल उशीला घे ! ( १०–१०–१० ).

## रत्न ३७२ वें

यमी म्हणते—भाऊ असूनहि बहीण जर अनाथ होईल तर, यमा ! तो भाऊ कसला ! आणि बहीण असून भाऊ जर कामविव्हल होईल, तर ती बहीण तरी कसली ! मी प्रेमानें वेडी झाल्यामुळें हें कांहीं तरीच भल-भलतें बरळूं लागली आहें. तर यमा ! आतां संभोग इच्छेनें तुझें शरीर माझ्या शरीराशीं येऊन सरळ भिडो ! ( १०–१०–११ ).

## रत्न ३७३ वें

यम म्हणतो—नाहीं ! यमे ! ती गोष्ट सहसा होणार नाहीं ! मी माझें शरीर तुझ्या शरीराशीं मुळींसुद्धां भिडवणार नाहीं ! ती गोष्टच बोलूं नकोस तूं ! जो आपल्या बहिणीशीं प्रेमप्रसंग करतो, त्याला ज्ञानी लोक पापी असें म्हणतात. समजलीस ? तर हे सुभगे ! माझा नाद तूं आतां सोडून दे ! आणि दुसरा कोणीतरी पाहून त्याच्याकडून तूं आपली काम-वासना तृप्त करून घे ! मी–तुझा भाऊ–ही गोष्ट कालत्रयींहि करूं इच्छीत नाहीं ! छे छे ! यमे ! मुळींच करणार नाहीं ! ( १०–१०–१२ ).

## रत्न ३७४ वें

यमी म्हणते—यमा ! किती दुर्बल रे तूं ! तुझें मन व हृदय इतकें दुर्बल व कठोर असेल हें मला कळलें नाहीं ! बरें, नाहीं तर नाहीं जा ! तंग ज्याप्रमाणें अश्वाला अगर लता जशी वृक्षाला वेष्टून राहते, तद्वत तुलाहि दुसरी कोणी तरी एखादी प्रेमरमणी खास वेष्टून असली पाहिजे. (१०–१०–१३).

## रत्न ३७५ वें

**यम-ऋषि, यमी-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अन्यमू षु त्वं यम्यन्य उ त्वां परि ष्वजाते लिबुंजेव वृक्षम् ।
तस्यं वा त्वं मनं इच्छा स वा तवाऽधा कृणुष्व संविदं
सुभद्राम् ॥ १०-१०-१४ ॥

## रत्न ३७६ वें

**आंङ्गिर्हविर्धान --ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद**

वृषा वृष्णे दुदुहे दोहसा दिवः पयांसि यह्वो अदितेरदाभ्यः ।
विश्वं स वेद वरुणो यथा धियास यज्ञियो यजतु यज्ञियाँ ऋतून् ॥
॥ १०-११-१ ॥

## रत्न ३७७ वें

**वैवस्वत यम-ऋषि, अंगिरपितृ-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अङ्गिरसो नः पितरो नवग्वा अथर्वाणो भृगवः सोम्यासः ।
तेषां वयं सुमतौ यज्ञियानामपि भद्रे सौमनसे स्याम ॥
॥ १०-१४-६ ॥

**स्मा. वि. श्राद्धमंत्र.**

## रत्न ३७८ वें

**वैवस्वत यम-ऋषि, पितर-देवता, त्रिष्टुप्-छंद**

प्रेहि प्रेहि पथिभिः पूर्वेभिर्यत्रा नः पूर्वे पितरः परेयुः ।
उभा राजाना स्वधया मदन्ता यमं पश्यासि वरुणं च देवम् ॥
॥ १०-१४-७ ॥

**श्रौ. वि. दीक्षित प्रेतदहन** **स्मा. वि. (अन्त्येष्टि), प्रेत-उपस्थान.**

## रत्न ३७५ वें

यम म्हणतो– यमे ! वृक्षाला लता जशी आलिंगन देते तद्वत तूंहि दुसऱ्या कोणातरी प्रियकराला जाऊन कडकडून मिठी मार ! तोहि तुला दृढ आलिंगन देवो ! तूं त्याचें मन आकर्षून घे ! आणि तो तुझें घेवो ! याप्रमाणें परस्पर प्रेमांकित होऊन तूं आपल्या सुखाचा गोड संसार यथेच्छ थाटून पार आनंदांत रहा ! ! (१०–१०–१४).

## रत्न ३७६ वें

जलवर्षाव करणारा, थोर, अजिंक्य असा हा अग्निदेव यज्ञोपासना करणाऱ्या यजमानासाठीं 'दोहन करून आकाशांतून जलवर्षाव करतो. आपल्या बुद्धीच्या योगानें आदित्य जसा सर्व जग जाणतो, तद्वत तो हा पूज्य अग्निदेवहि तें जाणतोच. यज्ञार्ह असा तो देव यजनीय अशा ऋतूंचें यजन करो ! (१०–११–१).

## रत्न ३७७ वें

ज्यांचा मार्ग अभिनव आहे व ज्यांनीं सोम संपादन केला आहे आणि जे अंगिरा, अथर्व व भृगु यांचे वंशज आहेत, अशा त्या आमच्या सोम-संपादक पितरांच्या कृपाछत्राखालीं व त्यांच्या सुप्रसन्न मर्जीत आम्ही सदैव राहूं असें घडो ! ( १०–१४–६ )

## रत्न ३७८ वें

ज्या प्राचीन मार्गांनीं आमचे पूर्वज पितर प्राचीनकालीं ज्या लोकीं गेले, त्या लोकीं, त्याच मार्गांनीं, हे माझ्या मृत पित्या ! तूंहि पण जा ! तेथें जाऊन स्वधाकारानें तृप्त झालेल्या दोघा राजांचें म्हणजे वरुण व यम या देवांचें-दर्शन घे. ( १८–१४–७ ).

सं गच्छस्व पितृभिः सं यमेनेष्टापूर्तेन परमे व्योमन् ।
हित्वायावद्यं पुनरस्तमेहि सं गच्छस्व तन्वा सुवर्चाः ॥
॥ १०-१४-८ ॥

अपेत वीत वि च सर्पतातोऽस्मा एतं पितरो लोकमक्रन् ।
अहोभिरद्भिरक्तुभिर्व्यक्तं यमो ददात्यवसानमस्मै ॥
॥ १०-१४-९ ॥

**स्मा. वि. दहनभूमि-प्रोक्षण**

## रत्न ३७९ वें

**वैवस्वत यम-ऋषि, श्वान-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अति द्रव सारमेयौ श्वानौ चतुरक्षौ शबलौ साधुना पथा ।
अथा पितॄन् त्सुविदत्राँ उपेहि यमेन ये सधमादं मदन्ति ॥
॥ १०-१४-१० ॥

**श्रौ. वि. दीक्षित-प्रेत दहन.** **स्मा. वि. प्रेतानुमंत्रण; प्रेतउपस्थान**

यौ ते श्वानौ यम रक्षितारौ चतुरक्षौ पथिरक्षी नृचक्षसौ ।
ताभ्यामेनं परि देहि राजन् त्स्वस्ति चास्मा अनमीवं च धेहि ॥
॥ १०-१४-११ ॥

उरूणसावसुतृपा उदुम्बलौ यमस्य दूतौ चरतो जनाँ अनु ।
तावस्मभ्यं दृशये सूर्याय पुनर्दातामसुमद्येह भद्रम् ॥
॥ १०-१४-१२ ॥

## रत्न ३८० वें

**यम-ऋषि, यम-देवता, अनुष्टप्-छंद**

यमाय सोमं सुनुत यमाय जुहुता हविः ।
यमं ह यज्ञो गच्छत्यग्निदूतो अरंकृतः ॥ १०-१४-१३ ॥

**स्मा. वि. यम-आवाहन. यमाप्रीत्यर्थं आज्यहोम**

तदनंतर, हे पित्या! स्वर्गाच्या श्रेष्ठ स्थानांत राहणाऱ्या आपल्या पितरांजवळ जाऊन त्यांची भेट घे! तसेंच येथें केलेल्या इष्टापूर्त कर्माचें स्वर्गात मिळणारें जें फल, त्या कर्मफलाशी तूं संगत हो. आणि तुझें पाप नाहींसें करून घेतल्यावर वाटल्यास पुनः तूं येथें या घरी ये. आणि तेजस्वी असें सुंदर शरीर धारण कर! (१०–१४–८). हे पिशाच हो! आतां येथून चालते व्हा कसे! चला! येथून पार निघून जा! पितरांनीं स्मशानांतील हें दहनस्थान या मृत माणसासाठी म्हणून आपल्या ताब्यांत घेतलें आहे. दिवस, रात्र व जल यांनीं शुद्ध केलेलें असें हें दहनस्थान यमदेव या मृताला देता झाला. (१०–१४–९).

## रत्न ३७९ वें

चार डोळे असलेले व पिंगट रंगाचे असे जे सरमेचे पुत्र–दोन श्वान आहेत, त्यांना टाळून, हे अग्ने! सरळ मार्गानें तूं पुढें जा! आणि यमासह जे एकाच ठिकाणीं स्वधान्नानें प्रमुदित होतात, अशा त्या ज्ञानी पितरांजवळ जा! (१०–१४–१०) हे यमराजा! तुझ्या गृहाचें रक्षण करणारे, चार डोळे असलेले, पितृयाण मार्गाचें रक्षण करणारे, आणि मनुष्यमात्रांवर पाळत ठेवणारे असे जे तुझे दोन श्वान (कुत्रे) आहेत, ते या प्रेताच्या रक्षणार्थ त्याच्या बरोबर दे! आणि त्याला क्षेम व आरोग्य हीं अर्पण कर! (१०-१४-११) लांबट नाकाचे, प्राण्याचे जीव हरण करण्यांत आनंद मानणारे, व विशाल सामर्थ्याचे असे जे यमाचे दूतकर्म करणारे दोन श्वान आहेत, ते या मनुष्य लोकांत नजर ठेवून फिरत असतात. आम्ही सूर्य दर्शन घ्यावें म्हणून ते दूत आज येथें या कर्मानुष्ठानांत हजर राहून उत्तम प्राण पुनः आम्हांस अर्पण करोत! (१०–१४–१२).

## रत्न ३८० वें

अहो ऋत्विज हो! यमाकरतां तुम्ही सोमरस पिळून तयार करून ठेवा. त्याचप्रमाणें त्याला आहुतिहि पण अर्पण करा! अग्नि हा ज्याचा दूत आहे, असा हा आमचा सुशोभित यज्ञ त्या यमाकडेच जाणारा आहे (१०–१४–१३).

यमाय घृतवद्धविर्जुहोत प्र च तिष्ठत ।
स नो देवेष्वा यमद्दीर्घमायुः जीवसे ॥ १०-१४-१४ ॥

## रत्न ३८१ वें

**यम-ऋषि, यम-देवता, बृहती-छंद**

यमाय मधुमत्तमं राज्ञे हव्यं जुहोतन ।
इदं नम ऋषिभ्यः पूर्वजेभ्यः पूर्वेभ्यः पथिकृद्भ्यः ॥१०-१४-१५॥

**स्मा. वि. (अन्त्येष्टि) मृत्तिका क्षेपण**

## रत्न ३८२ वें

**यम-ऋषि, यम-देवता, अनुष्टुप्-छंद**

त्रिकद्रुकेभिः पतति षळुर्वीरेकमिद्बृहत् ।
त्रिष्टुब्गायत्री छन्दांसि सर्वा ता यम आहिता ॥ १०-१४-१६ ॥

**स्मा. वि. पितृयज्ञ.**

## रत्न ३८३ वें

**शंख यामायन-ऋषि, पितर-देवता, त्रिष्टुप्-छंद**

उदीरतामवर उत्परास उन्मध्यमाः पितरः सोम्यासः ।
असुं य ईयुरवृका ऋतज्ञास्ते नोऽवन्तु पितरो हवेषु ॥
॥ १०-१५-१ ॥

**श्रौ. वि. (महापितृयज्ञ) अनुवाक्या.** **स्मा. वि. पितृतर्पण; चरुहोम**

इदं पितृभ्यो नमो अस्त्वद्य ये पूर्वासो य उपरास ईयुः ।
ये पार्थिवे रजस्या निषत्ता ये वा नूनं सुवृजनासु विक्षु ॥
॥ १०-१५-२ ॥

हे ऋत्विज हो ! यमाप्रीत्यर्थ तुम्ही घृतयुक्त पुरोडाशादि हविर्द्रव्यें अर्पण करा ! तसेंच त्याचें स्तोत्रहि पण गायन करा ! दिव्यविबुधामधील तो यमराज आम्ही दीर्घकाल जगावें म्हणून आम्हांस दीर्घायुष्य अर्पण करो ! ( १०-१४-१४ ) !

## रत्न ३८१ वें

अहो ऋत्विज हो ! यमराजाप्रीत्यर्थ अत्यंत मधुर असें हविरन्न तयार करून, त्याचें अग्नींत हवन करा ! सनातन यज्ञमार्ग दाखविणारे असे जे सृष्टीच्या प्रारंभीं उत्पन्न झालेले आमचे पूर्वज ऋषी आहेत, त्यांना हा आमचा नमस्कार असो ! (१०-१४-१५).

## रत्न ३८२ वें

एकच असें हें महाकृत्य त्रिकद्रुक यज्ञाच्या योगानें सहा भूमींप्रत जातें. त्रिष्टुप्, गायत्री, इत्यादि जे छंद आहेत, ते सर्व यमाच्या ठिकाणींच स्तोत्ररूपानें स्थापिले जातात (१०-१४-१६) .

## रत्न ३८३ वें

पितरांत जे निकृष्ट पितर आहेत ते उत्तम हवि प्राप्त करून घेवोत ! जे उत्तम पितर आहेत, ते उत्तम हवि प्राप्त करून घेवोत ! आणि जे मध्यम पितर आहेत तेहि उत्तम हवि प्राप्त करून घेवोत! आणि ते हे सर्व पितर आमच्याविषयीं अनुग्रहबुद्धि धारण करोत! आमचें कर्मानुष्ठान जाणणारे असे जे अहिंसक पितर आमच्या प्राणांचें रक्षण करण्याकरतां आले आहेत, ते आमच्या हाकेसरशी आमचें रक्षण करोत ! ( १०-१५-१ ). जे या यजमानाच्या पूर्वी जन्मलेले असून सांप्रत पितृलोकांत जाऊन राहिलेले आहेत व जे यजमानाच्यानंतर जन्मून सांप्रत मृत झाले आहेत, जे पृथ्वीवर या कर्मानुष्ठानांतील हवि-ग्रहण करण्यासाठीं म्हणून येऊन बसले आहेत आणि जे बंधुरूप पितर आपल्या संपन्न अशा या प्रजारूप यजमानाजवळ येऊन बसले आहेत, अशा या सर्व पितरांना आम्ही आज रोजीं हें मिष्टान्नार्पणपूर्वक नमस्कार करीत आहों (१०-१५-२).

आहं पितॄन्त्सुविदत्राँ अवित्सि नपातं च विक्रमणं च विष्णोः ।
बर्हिषदो ये स्वधया सुतस्य भजन्त पित्वस्त इहागमिष्ठाः ॥
॥ १०-१५-३ ॥

बर्हिषदः पितरः ऊत्य१र्वागिमा वो हव्या चकृमा जुषध्वम् ।
त आ गतावसा शंतमेनाऽथा नः शं योररपो दधात ॥
॥ १०-१५-४ ॥

उपहूताः पितरः सोम्यासो बर्हिष्येषु निधिषु प्रियेषु ।
त आ गमन्तु त इह श्रुवन्त्वधि ब्रुवन्तु तेऽवन्त्वस्मान् ॥
॥ १०-१५-५ ॥

**औ. सू. (महापितृयज्ञ) याज्या. स्मा. वि. श्राद्धमंत्र.**

आच्या जानु दक्षिणतो निषद्येमं यज्ञमभि गृणीत विश्वे ।
मा हिंसिष्ट पितरः केन चिन्नो यद्व आगः पुरुषता कराम ॥
॥ १०-१५-६ ॥

आसीनासो अरुणीनामुपस्थे रयिं धत्त दाशुषे मर्त्याय ।
पुत्रेभ्यः पितरस्तस्य वस्वः प्र यच्छत त इहोर्जं दधात ॥
॥ १०-१५-७ ॥

ये नः पूर्वे पितरः सोम्यासोऽनूहिरे सोमपीथं वसिष्ठाः ।
तेभिर्यमः संरराणो हवींष्युशन्नुशद्भिः प्रतिकाममत्तु ॥ १०-१५-८ ॥

ये तातृषुर्देवत्रा जेहमाना होत्राविदः स्तोमतष्टासो अर्कैः ।
आग्ने याहि सुविदत्रेभिरर्वाङ् सत्यैः कव्यैः पितृभिर्घर्मसद्भिः ॥
॥ १०-१५-९ ॥

माझी पितृभक्ति उत्तम ओळखणाऱ्या पितरांना मी चांगलें जाणतों. तसेंच विश्वव्यापी विष्णुदेवाचे देवयान व पितृयान हे दोन मार्गहि मी जाणतों. दर्भासनावर बसून सोमरस व स्वधान्न यांचें सेवन करणारे पितर या आमच्या पितृयज्ञांत आज उपस्थित झाले आहेत (१०-१५-३). अहो दर्भासनावर बसणारे पितरहो! तुम्हीं आमचें रक्षण करावें! आम्हीं हें मधुर स्वधान्न खास तुमच्यासाठींच तयार केलें आहे, तें मिष्टान्न तुम्ही सेवन करा! आणि सेवन करून संतुष्ट व संतृप्त झाला म्हणजे आम्हांस शुभाशीर्वाद देण्यासाठीं आमच्याजवळ या! आणि आम्हांस सुख द्या व दुःख नाहींसें करा! (१०-१५-४)! दर्भावर मांडून ठेवलेल्या स्वधान्नाचा स्वीकार करण्याकरतां म्हणून निमंत्रिलेले आमचे सोमसंपादक पितर हे या आमच्या यज्ञगृहांत आगमन करोत! ते आमचें स्तुतिस्तोत्र ऐकोत! ऐकून सुप्रसन्न होत्साते आमची वाहवा करोत! आणि आमचें रक्षणहि करोत (१०-१५-५)! अहो पितर हो! तुम्हीं आपली डावी मांडी खाली करून व दक्षिणेकडे बसून या आमच्या पितृयज्ञाची प्रशंसा करा! आमच्याकडून कळत अगर नकळत मनुष्यस्वभावास अनुसरून आमच्या हातून तुमचा कांहीं अपराध घडला असला तर त्याबद्दल आम्हांस शासन करूं नका! (१०-१५-६)! अहो तेजस्वी देवाच्या सन्निध बसलेल्या पितरांनो! तुम्हांला स्वधान्न अर्पण करणाऱ्या या यजमानाला अपार ऐश्वर्याचा धनी करा! हे पितर हो! या यजमानाच्या पुत्राला सर्वोत्तम धन द्या! आणि त्या बरोबरच या यज्ञांत मधुर रसाची रेलचेल होईल असें करा! (१०-१५-७) आमच्या ज्या सोमसंपादक पूर्वज पितरांनीं देवांस सोमरस अर्पण केला, त्या तेजस्वी पितरांबरोबर स्नेहभावानें वागणारा हविरन्नेच्छु यमराजहि येथें या यज्ञांत येऊन, या आमच्या हविरन्नाचें यथेच्छ सेवन करो! (१०-१५-८). क्रमानें देवत्व प्राप्त करून घेतलेले, यज्ञानुष्ठान जाणणारे, स्तोत्रांनींयुक्त कर्म करणारे अशा त्या ज्ञानी, सत्यव्रत, बुद्धिमान व कव्यान्नप्रिय पितरांस बरोबर घेऊन, हे अग्निदेवा! तूं आमच्या समोर ये! (१०-१५-९).

ये सत्यासो हविरदो हविष्पा इन्द्रेण देवैः सरथं दधानाः ।
आग्ने याहि सहस्रं देववन्दैः परैः पूर्वैः पितृभिर्घर्मसाद्भिः ॥

॥ १०-१५-१० ॥

## रत्न ३८४ वें

**शंख यामायन-ऋषि, पितर-देवता, जगती-छंद**

अग्निष्वात्ताः पितर एह गच्छत सदः सदः सदत सुप्रणीतयः ।
अत्ता हवींषि प्रयतानि बर्हिष्यथा रयिं सर्ववीरं दधातन ॥

॥ १०-१५-११ ॥

**श्रौ. वि. (महापितृयज्ञ) प्रथम अनुवाक्या** **स्मा. वि. श्राद्धमंत्र.**

## रत्न ३८५ वें

**शंख यामायन-ऋषि, पितर-देवता, त्रिष्टुप्-छंद**

त्वमग्न ईळितो जातवेदोऽवाड्ढव्यानि सुरभीणि कृत्वी ।
प्रादाः पितृभ्यः स्वधया ते अक्षन्नद्धि त्वं देव प्रयता हवींषि ॥

॥ १०-१५-१२ ॥

**श्रौ. वि. (महापितृयज्ञ) स्विष्टकृत् याज्या,** **स्मा. वि. श्राद्धमंत्र.**

ये चेह पितरो ये च नेह याँश्च विद्म याँ उ च न प्रविद्म ।
त्वं वेत्थ यति ते जातवेदः स्वधाभिर्यज्ञं सुकृतं जुषस्व ॥

॥ १०-१५-१३ ॥

**श्रौ. वि. द्वितीय अनुवाक्या**

ये अग्निदग्धा ये अनग्निदग्धा मध्ये दिवः स्वधया मादयन्ते ।
तेभिः स्वराळसुनीतिमेतां यथावशं तन्वं कल्पयस्व ॥

॥ १०-१५-१४ ॥

**श्रौ. वि. (चातुर्मास्य-महापितृ यज्ञ) याज्या.**

हविरन्न भक्षण करणारे व पानीय रसाचें पान करणारे, असे जे आमचे सत्यनिष्ठ पितर आहेत, त्यांना इंद्र व दिव्यविबुध यांसह एकाच रथांत बसवून घेऊन, हे अग्ने ! तूं आमच्याकडे ये ! श्रेष्ठ अशा प्राचीन पितरांनीं हजारों स्तोत्रें गाऊन तुझें स्तवन केलें आहे ( १०–१५–१० ).

## रत्न ३८४ वें

अहो सन्मार्ग-दर्शक अग्निष्वात्त पितरहो! आमच्या या पितृयज्ञांत तुम्ही उपस्थित व्हा ! तुमच्याकरतां मांडून ठेविलेल्या या आसनावर बसा ! आणि या दर्भावर वाढून ठेविलेलें मिष्टान्न यथेच्छ सेवन करा ! भोजन करून तृप्त झाला म्हणजे सर्वश्रेष्ठ अशी संपत्ति आम्हांस प्रदान करा ! (१०-१५-११).

## रत्न ३८५ वें

हे विश्वजात जाणणाऱ्या अग्निदेवा! स्तविला गेलेला असा तूं हें आम्ही पितरांसाठीं म्हणून तयार केलेलें हविरन्न सुगंधित करून त्यांच्याकडे वाहून नेऊन तें त्यांना अचूक पोंचविता झालास. तर आतां आमचे पितर तें स्वधान्न सेवन करोत आणि तूंहि, देवा ! शुद्ध हविरन्न भक्षण कर ! ( १०–१५–१२ ). जे पितर येथें आमचेजवळ आहेत व जे आमचे जवळ नाहींत, ज्यांना आम्ही ओळखतों व ज्यांना आम्ही ओळखीत नाहीं, अशा त्या आमच्या शुचिर्भूत पितरांना, हे जातवेदा ! तूं मात्र चांगला ओळखतोस. स्वधेनें युक्त असलेल्या या यज्ञाचा तूं आनंदानें स्वीकार कर ! ( १०–१५–१३ ) ! जे अग्निदग्ध आहेत व जे अग्निदग्ध नाहींत असे जे आमचे पितर स्वर्गामध्यें आपल्या सुकृत फलाचा उपभोग घेत आहेत, त्यांना, हे अग्ने ! त्यांच्या इच्छेप्रमाणें शरीर प्राप्त होईल असें कर ! ( १०–१५–१४ )

# रत्न ३८६ वें

**दमन यामायन-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मैनमग्ने वि दहो माभि शोचो मास्य त्वचं चिक्षिपो मा शरीरम् ।
यदा शृतं कृणवो जातवेदोऽथेमेनं प्र हिणुतात्पितृभ्यः ॥
॥ १०-१६-१ ॥

**औ. वि.** प्रेत-उपस्थान; **स्मा. वि.** प्रेत संस्कार. प्रेत उपस्थान.

शृतं यदा करसि जातवेदोऽथेमेनं परि दत्तात्पितृभ्यः ।
यदा गच्छात्यसुनीतिमेतामथा देवानां वशनीर्भवाति ॥
॥ १०-१६-२ ॥

सूर्यं चक्षुर्गच्छतु वातमात्मा द्यां च गच्छ पृथिवीं च धर्मणा ।
अपो वा गच्छ यदि तत्र ते हितमोषधीषु प्रति तिष्ठा शरीरैः ॥
॥ १०-१६-३-

अजो भागस्तपसा तं तपस्व तं ते शोचिस्तपतु तं ते अर्चिः ।
यास्ते शिवास्तन्वो जातवेदस्ताभिर्वहैनं सुकृतामु लोकम् ॥
॥ १०-१६-४ ॥

अव सृज पुनरग्ने पितृभ्यो यस्त आहुतश्चरति स्वधाभिः ।
आयुर्वसान उप वेतु शेषः सं गच्छतां तन्वा जातवेदः ॥
॥ १०-१६-५ ॥

यत्ते कृष्णः शकुन आतुतोद पिपीलः सर्प उत वा श्वापदः ।
अग्निष्टद्विश्वादगदं कृणोतु सोमश्च यो ब्राह्मणाँ आविवेश ॥
॥ १०-१६-६ ॥

## रत्न ३८६ वें

हे अग्निदेवा ! आम्ही तुझी अशी प्रार्थना करतों कीं, तूं या आमच्या मृताला जाळूं नकोस ! संतापहि पण करूं नकोस ! त्याचें कातडें व शरीर इकडे तिकडे असें अस्ताव्यस्त पडेल असें करूं नकोस ! यास पूर्ण जाळून झाल्यावर, त्यास आपल्या पितरांकडे निघून जाण्याची प्रेरणा कर ! (१०–१६–१) हे जातवेदा ! ज्या वेळीं तूं या प्रेताचें शरीर जाळून पूर्ण खाक करून टाकशील, त्या वेळीं तूं त्याला कृपा करून पितरांच्या स्वाधीन कर ! जेव्हां हें प्रेत अग्निकरवीं प्राण प्रेरणाप्रत प्राप्त होतें, तेव्हां तें देवाच्या स्वाधीन होतें ( १०–१६–२ ). हे मृत पुरुषा ! तुझ्या नेत्रांतील तेज सूर्याप्रत जावो ! तुझा प्राण वायुप्रत जावो ! तूं आपल्या कर्मानुसार पृथ्वी-वर अगर स्वर्गावर जा ! किंवा तसें तुला बरें वाटत असलें तर अंतरिक्ष लोकांत संचार कर, अगर सूक्ष्म शरीर धारण करून ओषधीमध्यें देखील जाऊन रहा ( १०–१६–३ ) ! हे अग्निदेवा ! या मृताचा जन्मरहित असा जो भाग आहे, त्याला तूं आपल्या तेजानें प्रदीप्त कर ! तुझी शुचि व अर्चि नांवाची जी ज्वाला आहे, ती त्याला सुसंस्कृत करो ! हे सर्वज्ञ देवा ! तुझ्या सुखकारी ज्वालांच्या योगानें तूं या मृतात्म्याला पुण्यलोकीं नेऊन पोंचव ( १०–१६–४ )! हे अग्निदेवा ! हा मृत पुरुष तुला स्वधा-कारानें अर्पण करण्यांत आला आहे. त्याला तेथून त्याच्या पितराकडे जाण्याची प्रेरणा कर ! हा पुनः जीव धारण करून नवीन शरीर प्राप्त करून घेवो ! हे जातवेदा ! तुझ्या प्रसादानें त्याला पुनः सुंदर शरीर प्राप्त होवो ( १०–१६–५ ) ! हे मृत पुरुषा ! तुझें शरीर कावळ्यानें टोंचलें असेल अगर मुंगी, साप, किंवा श्वापद यांनीं तोडलें फाडलें असेल तर हा सर्वभक्षक अग्निदेव तें सर्व भरून काढून तें पुनः निर्व्यंग करो ! तसेंच ब्राह्मणांत प्रविष्ट झालेला सोमहि तें तुझें व्यंग भरून काढो (१०-१६-६) !

अग्नेर्वर्म परि गोभिर्व्ययस्व सं प्रोर्णुष्व पीवसा मेदसा च ।
नेत्त्वा धृष्णुर्हरसा जर्हृषाणो दधृग्विधक्ष्यन्पर्यङ्खयाते ॥

॥ १०-१६-७ ॥

इममग्ने चमसं मा वि जिह्वरः प्रियो देवानामुत सोम्यानाम् ।
एष यश्चमसो देवपानस्तस्मिन्देवा अमृता मादयन्ते ॥

॥ १०-१६-८ ॥

**श्रौ. वि. चमस-अनुमंत्रण.**

क्रव्यादमग्निं प्र हिणोमि दूरं यमराज्ञो गच्छतु रिप्रवाहः ।
इहैवायमितरो जातवेदा देवेभ्यो हव्यं वहतु प्रजानन् ॥

॥ १०-१६-९ ॥

**स्मा. वि. (अन्त्येष्टि) प्रत चिताप्रज्वलन**

यो अग्निः क्रव्यात्प्रविवेश वो गृहमिमं पश्यन्नितरं जातवेदसम् ।
तं हरामि पितृयज्ञाय देवं स घर्ममिन्वात्परमे सधस्थे ॥

॥ १०-१६-१० ॥

## रत्न ३८७ वें

**दमन यामायन-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद**

यो अग्निः क्रव्यवाहनः पितॄन्यक्षदृतावृधः ।
प्रेदु हव्यानि वोचति देवेभ्यश्च पितृभ्य आ ॥ १०-१६-११ ॥

**श्रौ. वि. (महापितृयज्ञ) स्विष्टकृत् याज्या; स्मा. वि. पितृमेध.**

उशन्तस्त्वा नि धीमह्युशन्तः समिधीमहि ।
उशन्नुशत आ वह पितॄन्हविषे अत्तवे ॥ १०-१६-१२ ॥

**श्रौ. वि. (महापितृयज्ञ) सामिधेनी; स्मा. वि. पितरावाहन; ब्रह्मयज्ञ.**

हे प्रेता ! अग्नीचें जें हें ज्वालारूप कवच आहे, तें बैलाच्या कातड्यानें आच्छादन कर. स्थूल मांसानें अग्नीला आहुति देऊन त्याला चोहोंबाजूंनीं झांकून टाक. म्हणजे तो प्रदीप्त झालेला, प्रसन्न झालेला, प्रौढ व धगधगीत पेटलेला अग्निनारायण तुला अस्ताव्यस्त करणार नाहीं ( १०-१६-७ ). हे अग्निदेवा ! या चमसपात्राला तूं हलवूं नकोस. कारण देव व पितर यांचें पिण्याचें तें प्रिय साधन आहे. त्याला पाहून देव व पितर हे आनंद-भरित होतात ( १०-१६-८ ). या प्रेतभक्षक अग्नीला मी आतां दूर पाठवून देतों. या मृताला भस्मसात करणारा हा जो क्रव्याद अग्नि आहे, तो आतां येथून यमराजाकडे प्रयाण करो ! या क्रव्याद अग्नीहून निराळा पण सर्वज्ञ असा जो दुसरा जातवेद अग्नि आहे, तो आपला अधिकार जाणून या घरांतून आतां देवांसाठीं हविरन्न घेऊन जावो (१०-१६-९) ! हा जो प्रेत-भक्षक क्रव्याद अग्नि हल्लीं घरांत शिरला आहे त्याला आतां बाहेर काढून तेथें पितरांकरतां म्हणून दुसरा हव्यवाह अग्नि मी स्थापन करतों. असें झालें म्हणजे तो जातवेद अग्नि उत्तम लोकांत आमचा यज्ञ पोंचवितां होईल ( १०-१६-१० ).

## रत्न ३८७ वें

हा जो कव्यवाहन अग्नि कीं जो देवांना व पितरांना हवि नेऊन पोंचवितो, तोच अग्नि-देव पितरांना त्यांचा हविर्भाग स्पष्ट निवेदन करो ! (१०-१६-११). हे अग्नि देवा ! तुझ्या अनुग्रहाची इच्छा करणारे आम्ही तुझी येथें स्थापना करीत आहों आणि तसेंच तुला प्रदीप्तहि करीत आहो. भक्तवत्सल असा तूं आमच्या हविरन्नाची इच्छा करणाऱ्या पितरांना या आमच्या पितृयज्ञांत अन्न भक्षण करण्याकरतां म्हणून बोलावून आण ! ( १०-१६-१२ ).

यं त्वमग्ने समदहस्तमु निर्वापया पुनः ।
कियाम्ब्वत्र रोहतु पाकदूर्वा व्यल्कशा ॥ १०-१६-१३ ॥
शीतिके शीतिकावति ल्हादिके ल्हादिकावति ।
मण्डूक्या३ सु सं गम इमं स्व१ग्निं हर्षय ॥ १०-१६-१४ ॥

**श्रौ. वि. अस्थिसंचयन; प्रेतदहनस्थान प्रोक्षण. स्मा. वि. अस्थिसंचयन.**

## रत्न ३८८ वें

**देवश्रवा यामायन-ऋषि, सरस्वती-देवता, त्रिष्टुप्-छंद**

सरस्वतीं देवयन्तो हवन्ते सरस्वतीमध्वरे तायमाने ।
सरस्वतीं सुकृतो अह्वयन्त सरस्वती दाशुषे वार्यं दात् ॥
॥ १०-१७-७ ॥

**श्रौ. वि. (दश) प्रउगशस्त्र.**

सरस्वति या सरथं ययाथ स्वधाभिर्देवि पितृभिर्मदन्ती ।
आसद्यास्मिन्बर्हिषि मादयस्वाऽनमीवा इष आ धेह्यस्मे ॥
॥ १०-१७-८ ॥

सरस्वतीं यां पितरो हवन्ते दक्षिणा यज्ञमभिनक्षमाणाः ।
सहस्रार्घमिळो अत्र भागं रायस्पोषं यजमानेषु धेहि ॥
॥ १०-१७-९ ॥

## रत्न ३८९ वें

**देवश्रवा यामायन-ऋषि, आपो-देवता, त्रिष्टुप्-छंद**

आपो अस्मान्मातरः शुन्धयन्तु घृतेन नो घृतप्वः पुनन्तु ।
विश्वं हि रिप्रं प्रवहन्ति देवीरुदिदाभ्यः शुचिरा पूत एमि ॥
॥ १०-१७-१० ॥

**श्रौ. वि. अवभृतस्नान वरामार्जन. स्मा. वि. यजमान अभिषेक.**

हे अग्नि देवा! प्रेत दहनकालीं तूं जो भूभाग जाळला असशील तो पुन: शांत कर! तेथें पाणी असलेल्या पुष्करणी उठून शिवाय शतांकुरांनीं पसरणाऱ्या दूर्वांचीं बेटें उगवोत! (१०-१६-१३). हे शीतलता उत्पन्न करणारे शीतिकेवाल्हि! हे आल्हाददायक पृथ्वी! तूं बेटकुळ्यांनीं युक्त हो आणि या अग्निदेवाला अत्यंत हर्षभरित कर! (१०-१६-१४).

## रत्न ३८८ वें

हे सरस्वति देवि! देवांशीं सख्य करूं पाहणारे भक्तजन या विस्तारलेल्या यज्ञगृहांत सरस्वतीला पाचारण करतात. पुण्यवान लोकहि तिला हाक मारतातच. कारण ती सरस्वती दात्यांना सुंदर वरदान करणारी अशी आहे. (१०-१७-७). हे सरस्वति देवि! स्वधान्नानें संतुष्ट होणारी तूं पितरांसह रथांत बसून इकडे ये! आणि या दर्भासनावर बसून संतृप्त हो! आणि तृप्त झालीस म्हणजे आम्हांस आरोग्यदायक व बलवर्धक असें अन्न देण्याची कृपा कर! (१०-१७-८). हे सरस्वति! यज्ञांत दक्षिणेकडून येणारे पितर तुला बोलावीत आहेत. तर या यज्ञांत हजारों लोकांना उपयोगी पडेल असें अन्न व विपुल धन आम्हां यजमानांना तूं बहाल कर! (१०-१७-९).

## रत्न ३८९ वें

मातेप्रमाणें पालन करणाऱ्या आपोदेवता आम्हांस पुनीत करोत! पावनकारक अब्देवता आम्हांस प्रवाहजलानें पावन करोत! तेजस्वी असें हें उदक आमचें सर्व पातक वाहून नेणारें असें होवो! स्नान व आचमन यांही करून बाह्यांतर शुचिर्भूत झालेला हा मी आतां उदकांतून निघून बाहेर येतों. (१०-१७-१०).

द्रप्सश्चस्कन्द प्रथमाँ अनु द्यूनिमं च योनिमनु यश्च पूर्वः ।
समानं योनिमनु संचरन्तं द्रप्सं जुहोम्यनु सप्त होत्राः ॥

॥ १०-१७-११ ॥

**श्रौ. वि. विप्रुड्ढोम**

यस्ते द्रप्सः स्कन्दति यस्ते अंशुर्बाहुच्युतो धिषणाया उपस्थात् ।
अध्वर्योर्वा परि वा यः पवित्रात्तं ते जुहोमि मनसा वषट्कृतम् ॥

॥ १०-१७-१२ ॥

यस्ते द्रप्सः स्कन्नो यस्ते अंशुरवश्च यः परः स्रुचा ।
अयं देवो बृहस्पतिः सं तं सिञ्चतु राधसे ॥

॥ १०-१७-१३ ॥

पयस्वतीरोषधयः पयस्वन्मामकं वचः ।
अपां पयस्वदित्पयस्तेन मा सह शुन्धत ॥

॥ १०-१७-१४ ॥

## रत्न ३९० वें

**संकसुक-ऋषि, मृत्यु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

परं मृत्यो अनु परेहि पन्थां यस्ते स्व इतरो देवयानात् ।
चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मा नः प्रजां रीरिषो मोत वीरान् ॥

॥ १०-१८-१ ॥

**स्मा. वि. मृत्यु आवाहन; (अन्त्येष्टि) प्रेतस्थान-निर्गमन.**

मृत्योः पदं योपयन्तो यदैत द्राघीय आयुः प्रतरं दधानाः ।
आप्यायमानाः प्रजया धनेन शुद्धाः पूता भवत यज्ञियासः ॥

॥ १०-१८-२ ॥

सोमाचा रस हा पृथ्वी व स्वर्ग या उभय लोकांना अनुलक्षून पाझरता झाला. द्यावा-पृथ्वीमध्यें सारखाच संचार करणारा हा सोमरस त्याचा विप्रुद्‌होम करणारे आम्ही सात ऋत्विज यथाक्रम अग्नींत होम करतों. ( १०-१७-११ ). हे सोमा ! जो तुझा रस खालीं सांडला आहे, जो रस सोम कुटण्याच्या ग्राव्यापासून उडून बाजूस पडला आहे, किंवा गाळणींतून गाळतांना बाहेर इकडे तिकडे सांडला आहे किंवा अध्वर्यूपासून गळून पडला आहे तो सर्व रस मी भक्तिभावपूर्वक वषट्‌कार मंत्रानें अग्नीमध्यें हवन करतों. ( १०-१७-१२ ). हे सोमा ! जो तुझा रस बाहेर सांडला आहे आणि जो स्रुवेच्या आंत अगर बाहेर चिकटून राहिला आहे, तो सर्व सोमरस बृहस्पति देव आम्हांस धनप्राप्ति व्हावी म्हणून सिंचन करो ! (१०-१७-१३). हे उदकांनों ! ओषधी वृष्टीच्या योगानेंच रसभरित होतात. आणि तसें म्हणाल तर माझें प्रार्थनावचनहि रसभरित आहे. किंबहुना उदकामध्यें सारभूत असें जें आहे तें सर्व रसपूर्णच होय. अतएव, त्या उदकसारानें तुम्ही मला पावन करा ! (१०-१७-१४).

## रत्न ३९० वें

हे मृत्युदेवा ! आम्हांपासून पराङ्मुख होऊन देवयानाहून निराळा असा जो पितृयाण नांवाचा मार्ग आहे, त्या मार्गानें तूं परत जा ! तूं शाहणा असून प्रार्थना ऐकणारा असा आहेस. म्हणून मी अशी प्रार्थना करतों कीं आमच्या पुत्रपौत्रादि संततीला व आमच्या वीर पुरुषांना तूं मारूं नकोस ( १०-१८-१ ) ! हे मृताचे आप्तजनहो ! मृत्यूचा पितृयाण मार्ग सोडून दुसऱ्या देवयान मार्गानें जाऊन उदंड आयुष्य धारण करणारे व्हा ! हे यज्ञोपासक जनहो ! प्रजा व धन यांनीं वर्धन पावणारे असे तुम्ही आतां शुद्ध व पवित्र व्हा ( १०-१८-२ ) !

इमे जीवा वि मृतैराववृत्रन्नभूद्भद्रा देवहूतिर्नो अद्य ।
प्राञ्चो अगाम नृतये हसाय द्राघीय आयुः प्रतरं दधानाः ॥
॥ १०-१८-३ ॥

इमं जीवेभ्यः परिधिं दधामि मैषां नु गादपरो अर्थमेतम् ।
शतं जीवन्तु शरदः पुरूचीरन्तर्मृत्युं दधतां पर्वतेन ॥
॥ १०-१८-४ ॥

## रत्न ३९१ वें

**संकसुक यामायन-ऋषि, धाता-देवता, त्रिष्टुप्-छंद**

यथाहान्यनुपूर्वं भवन्ति यथ ऋतव ऋतुभिर्यन्ति साधु ।
यथा न पूर्वमपरो जहात्येवा धातरायूंषि कल्पयैषाम् ॥
॥ १०-१८-५ ॥

**स्मा. वि. पितृमेध**

## रत्न ३९२ वें

**संकसुक यामायन-ऋषि, त्वष्टा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

आ रोहतायुर्जरसं वृणाना अनुपूर्वं यतमाना यति ष्ठ ।
इह त्वष्टा सुजनिमा सजोषा दीर्घमायुः करति जीवसे वः ॥
॥ १०-१८-६ ॥

## रत्न ३९३ वें

**संकसुक यामायन-ऋषि, पितृमेध-देवता, त्रिष्टुप्-छंद**

इमा नारीरविधवाः सुपत्नीराञ्जनेन सर्पिषा सं विशन्तु ।
अनश्रवोऽनमीवाः सुरत्ना आ रोहन्तु जनयो योनिमग्रे ॥
॥ १०-१८-७ ॥

**श्रौ. वि. स्मशानांतून सुवासिनींचा गृहप्रवेश**

हे जिवंत असलेले जन मृतापासून आतां वेगळे होवोत! आम्ही केलेला हा पितृमेधाख्य यज्ञ आम्हांस मंगलप्रद होवो! दीर्घायुष्य धारण करणारे आम्ही आतां येथून हास्यविनोद व नृत्यक्रीडा इत्यादि करण्या-करितां पूर्वाभिमुख होऊन परत घराकडे फिरूं (१०-१८-३). या जिवंत लोकांसाठीं म्हणून मी गांव व श्मशान या दोहोंमध्यें हा दगड रोवून दोहोंच्या मर्यादा निश्चित करतों. उद्देश हा कीं या जिवंत माणसांमध्यें कोणीहि माणूस वेदोक्त आयुष्यापूर्वी पितृलोकाकडे जाण्याच्या उद्देशानें ही मर्यादा ओलांडून न जावो! हे सर्व लोक शंभर वर्षें जिवंत राहोत व त्यासाठीं ते मृत्यूला या दगडाखालीं झांकून टाकोत! (१०-१८-४)

## रत्न ३९१ वें

ज्याप्रमाणें दिवसामागून दिवस क्रमानें उगवतात नि क्रमानें मावळ-तात, ज्याप्रमाणें अगोदर जन्मलेल्या पितराला मागून जन्मलेला पुत्र मरणानें टाकून देत नाहीं, तद्वत व तशा प्रकारचें आयुष्य, हे ब्रह्मदेवा! तूं आम्हांस दे! (१०-१८-५).

## रत्न ३९२ वें

हे मृताचे पुत्रादिकहो! वृद्धापकालाचा अनुभव घेऊं इच्छिणारे तुम्ही दीर्घायुष्य प्राप्त करून घ्या! व पूर्वजांप्रमाणें प्रयत्न करीत रहा! कुलीन त्वष्टा देव तुमच्याजवळ राहून तुम्हांला जगण्यासाठीं दीर्घायुष्य देवो! (१०-१८-६)

## रत्न ३९३ वें

घृतामिश्रित काजळ घातलेल्या, व पतीला शोभणाऱ्या अशा सुवासिनी स्त्रिया आतां आपल्या घरीं जावोत! तसेंच अश्रूरहित व दुःखरहित अशा अलंकारमंडित भार्या सर्वांच्या आधीं आपल्या असनावर चढून बसोत! (१०-१८-७).

उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं गतासुमेतमुप शेष एहि ।
हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभि सं बभूथ ॥
॥ १०-१८-८ ॥

**स्मा. वि. प्रेतापासून मृताच्या पत्नीस दीरानें उठविणें**

धनुर्हस्तादाददानो मृतस्याऽस्मे क्षत्राय वर्चसे बलाय ।
अत्रैव त्वमिह वयं सुवीरा विश्वाः स्पृधो अभिमातीर्जयेम ॥
॥ १०-१८-९ ॥

## रत्न ३९४ वें

**संकसुक यामायन-ऋषि, पितृमेध-देवता, जगती-छंद**

उत्ते स्तभ्नामि पृथिवीं त्वत्परीमं लोगं निदधन्मो अहं रिषम् ।
एतां स्थूणां पितरो धारयन्तु तेऽत्रा यमः सादना ते मिनोतु ॥
॥ १०-१८-१३ ॥

**स्मा. वि. अस्थि पुरणें.**

## रत्न ३९५ वें

**विमद ऐंद्र-ऋषि, सोम-देवता, अस्तारपंक्ति-छंद**

भद्रं नो अपि वातय मनो दक्षमुत क्रतुम् ।
अधा ते सख्ये अन्धसो वि वो मदे रणन्गावो न यवसे विवक्षसे ॥
॥ १०-२५-१ ॥

**स्मा. वि. शांति जप, प्रदक्षिणा.**

हे स्त्रिये! तूं या आपल्या मृतपतीच्या शेजारीं निजलेली आहेस. तर आतां तूं ह्या जिवंत माणसांचा समुदाय पाहून त्या प्रेतापासून ऊठ आणि इकडे ये. तुझा दीर तुझें पाणिग्रहण करूं इच्छितो. तर त्याचें भार्यात्व पत्करण्याकडे दृष्टि ठेवून सती जाण्याची इच्छा तूं आता करूं नकोस (१०-१८-८). आमची सत्ता चालावी, आमचें वर्चस्व गाजावें व आम्हीं सामर्थ्यसंपन्न व्हावें, एतदर्थ या आमच्या मृताच्या हातांतील धनुष्य काढून घेऊन मी जवळ ठेवितों. हे मृता! तूं आतां येथेंच राहा. तुझ्याप्रमाणें आम्हींहि वीर पुत्रादिकांनीं युक्त होत्साते आमच्याशीं स्पर्धा करणाऱ्या शत्रूंचा या तुझ्या धनुष्याच्या साहाय्यानें पक्का बीमोड करूं (१०-१८-९).

## रत्न ३९४ वें

हे अस्थिकुंभा! हे मृता! तुझ्यावर माती लोटून मी आतां तुला बुजवून टाकतों आणि त्यावर मातीचीं चौबाजूंनीं ढेंकळें रचून ठेवितों. या उप्पर तुला मी आतां कसल्याच प्रकारचा त्रास म्हणून देणार नाहीं. या ढेंकळांचें पितर जतन करोत. आणि येथेंच यमराज तुला निवासस्थान बांधून देवो! (१०-१८-१३).

## रत्न ३९५ वें

हे सोम देवा! तूं हें आमचें मन सुविचारसंपन्न, प्रगल्भ व कर्तव्यदक्ष होईल असें कर! गाई जशा कुरणांतील तृण सेवनांत रममाण होतात तद्वत आम्हीहि उल्हसित वृत्तींत असणाऱ्या तुझ्या मैत्रींत रमून जाऊं असें घडो! सोमा! खरोखर तूं उदार मनाचा थोर देव आहेस! (१०-२५-१).

## रत्न ३९६ वें

**कवष ऐलूष-ऋषि, अक्ष-देवता, त्रिष्टुप्-छंद**

प्रावेपा मा बृहतो मादयन्ति प्रवातेजा इरिणे वर्वृताना: ।
सोमस्येव मौजवतस्य भक्षो विभीदको जागृविर्मह्यमच्छान् ॥

॥ १०-३४-१ ॥

## रत्न ३९७ वें

**कवष ऐलूष-ऋषि, अक्षनिन्दा-देवता, त्रिष्टप् छंद**

न मा मिमेथ न जिहीळ एषा शिवा सखिभ्य उत मह्यमासीत् ।
अक्षस्याहमेकपरस्य हेतोरनुव्रतामप जायामरोधम् ॥

॥ १०-३४-२ ॥

द्वेष्टि श्वश्रूरप जाया रुणद्धि न नाथितो विन्दते मर्डितारम् ।
अश्वस्येव जरतो वस्न्यस्य नाहं विन्दामि कितवस्य भोगम् ॥

॥ १०-३४-३ ॥

अन्ये जायां परि मृशन्त्यस्य यस्यागृधद्वेदने वाज्य१क्षः ।
पिता माता भ्रातर एनमाहुर्न जानीमो नयता बद्धमेतम् ॥

॥ १०-३४-४ ॥

यदादीध्ये न दविषाण्येभिः परायद्भ्योऽव हीये सखिभ्यः ।
न्युप्ताश्च बभ्रवो वाचमक्रतँ एमीदेषां निष्कृतं जारिणीव ॥

॥ १०-३४-५ ॥

सभामेति कितवः पृच्छमानो जेष्यामीति तन्वा३ शूशुजानः ।
अक्षासो अस्य वि तिरन्ति कामं प्रतिदीव्ने दधत आ कृतानि ॥

॥ १०-३४-६ ॥

### रत्न ३९६ वें

मोठाले, उतार जमिनीवर वाढलेले, खालीं टाकले असतां फुरफुरत जाणारे व कंपनशील असे हे फासे मात्र मला आल्हाद देणारे आहेत. क्षणोक्षणीं जयापजयामुळें हर्षशोकास कारण होणारा हा बिभ्याचा फांसा मूजवत पर्वतावर वाढलेल्या सोमरसपानाप्रमाणें मला अत्यंत हर्षभरित करीत आहे. (१०-३४-१).

### रत्न ३९७ वें

माझी भार्या माझ्यावर कधींहि रागावली नाहीं की भांडली नाहीं. उलट माझ्या मित्रांशीं विनयादरानें वागून त्यांना संतोषवीत असे. आणि माझ्याशीहि पण सद्भावनेनेंच वागे. असें असतां मी जुगाराच्या नादी लागून त्या अनकूल भार्येला टाकून दिली ! कारण फांशांशिवाय मला कांहींच प्रिय वाटेनासें झालें ! (१०-३४-२) सासू माझा द्वेष करते आणि बायकोकडे पाहावें तर ती मला दूर लोटून देते ! कारण उघडच आहे कीं जुगाऱ्याच्या शब्दाला मान देऊन कोण त्याला सुखविणार आहे ? मूल्यवान पण म्हातारा झालेल्या घोड्याप्रमाणें माझ्यासारखा जुगारी कोठें गेला तरी त्याला सुख असें लाभणें नाहींच ! (१०-३४-३). ज्याचें धन लुबाडून घेण्याची या बलवान फांशांना मोठी आकांक्षा लागलेली असते, त्या जुगाऱ्याच्या स्त्रीचा हात दुसरे जुगारी लोक बेधडक धरून, तिचा विनयभंग करतात. त्याचे बाप, आई, भाऊ इत्यादि सर्व जण उघड म्हणत असतात कीं, आम्ही कांहीं त्याला ओळखीत नाहीं ! जा, त्याला खुशाल दोरीनें बांधून ओढून घेऊन जा ! (१०-३४-४) मग्येच मी मनांत निश्चय करतों कीं इतःपर फांशांनीं मी द्यूत खेळणार नाहीं. माझे मित्र मला बोलवायला आले तर मी दूर पळून जाईन. पण काय ? असें असलें तरी पटावर टाकलेल्या पिंगट फांशांचा खुळखुळ आवाज कानीं पडल्याबरोबर व्यभिचाराला चटावलेली स्त्री जाराच्या संकेतस्थळीं जशी धांव मारते, तद्वत मीहि जुगाऱ्यांच्या अड्ड्याकडे धूम ठोकतोंच, (१०-३४-५). फांसे खेळण्यांत मोठा जहांबाज असा मी कोणाला जिंकूं अशा आरोळ्या ठोकीतच जुगाऱ्यांच्या अड्ड्यांत धडक मारतों. काय मौज पहा ! प्रतिस्पर्ध्यांशीं पैज मारून डाव टाकणाऱ्याचे फांसे हरलेल्या जुगाऱ्याची द्यूतेच्छा सारखी भडकवीतच असतात ! (१०-३४-६).

## रत्न ३९८ वें

**कवष ऐलूष-ऋषि, अक्ष-देवता, जगती-छंद.**

अक्षास इदङ्कुशिनो नितोदिनो निकृत्वानस्तपनास्तापयिष्णवः ।
कुमारदेष्णा जयतः पुनर्हणो मध्वा सम्पृक्ताः कितवस्य बर्हणा ॥
॥ १०-३४-७ ॥

## रत्न ३९९ वें

**कवष ऐलूष-ऋषि, अक्षनिंदा-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

त्रिपञ्चाशः क्रीळति व्रात एषां देव इव सविता सत्यधर्मा ।
उग्रस्य चिन्मन्यवे ना नमन्ते राजा चिदेभ्यो नम इत्कृणोति ॥
॥ १०-३४-८ ॥

नीचा वर्तन्त उपरि स्फुरन्त्यहस्तासो हस्तवन्तं सहन्ते ।
दिव्या अङ्गारा इरिणे न्युप्ताः शीताः सन्तो हृदयं निर्दहन्ति ॥
॥ १०-३४-९ ॥

जाया तप्यते कितवस्य हीना माता पुत्रस्य चरतः क्व स्वित् ।
ऋणावा बिभ्यद्धनमिच्छमानोऽन्येषामस्तमुप नक्तमेति ॥
॥ १०-३४-१० ॥

## रत्न ३९८ वें

अहो, हे फांसे म्हणजे अंगांत रुतून बसणारे जसे कांहीं अणकुचीदार कांटेच ! ते शरीराला बोचणारे, त्याला चटका देणारे, दाह उत्पन्न करणारे असे मोठे द्वाड व दुष्ट आहेत ! विजयी जुगाऱ्याला ते पुत्राचा आनंद देतात खरे ! प्रथम लाभाचें आमिष दाखवून माणसाला जुगार खेळण्यास प्रवृत्त करतात. पण अखेर बेटे त्याचा सर्वस्वी घात करावयास चुकत नाहींत ! ( १०--३४--७ ).

## रत्न ३९९ वें

सत्यधर्मा जो सविता तो जगांत जसा विहार करतो तद्वत या त्रेपन्न अक्षांचा ( फांशांचा ) संघ सतत विहार करीत असतो. मनुष्य कितीहि रागीट असो, त्याच्या रागाला ते मुळींच दाद देत नाहींत. अहो, राज्याचा मालक असा जो राजा तो झाला तरी बिचारा या अक्षांना द्यूतांत नमस्कारच करतो कीं ! ( १०–३४–८ ) फांसे घडघडत खालीं जमिनीवर पडतात. पण हरलेल्या जुगाऱ्याच्या अंगावर जसे कांहीं फुरफुरतच असतात ! म्हटलें तर त्यांना स्वतःना हात नाहींत. पण मौज ही कीं धडधडीत हात असलेल्या जुगाऱ्याला ते अगदीं अचूक चीत करतात ! तुम्हीं हें सत्य समजा कीं, फांसे हे दिव्यलोकीचे धगधगीत निखारे आहेत ! ते इंधनरहित भूमीवर फेकले आणि हाताला गार लागत असले तरी ते काळजाला तीक्ष्ण चटके देणारे असे आहेत ! ( १०–३४–९ ) कोठें तरी भटकत फिरणाऱ्या त्या जुगाऱ्याची सुशील पत्नी बिचारी पतिविरहामुळें सारखी झुरत असते. त्याची आई झाली तरी आपल्या पुत्राला इकडे तिकडे भटकत असलेला पाहून पुत्रशोकानें तळमळत असते. कर्जबाजारी झालेला तो जुगारी निराशेनें भयभीत होत्साता चोरी करून धन मिळविण्याच्या इच्छेनें रात्रीं दुसऱ्याच्या घरीं चोरी करण्यास जातो ! (१०–३४–१०).

स्त्रियं दृष्ट्वाय कितवं ततापाऽन्येषां जायां सुकृतं च योनिम् ।
पूर्वाह्णे अश्वान् युयुजे हि बभ्रून् त्सो अग्नेरन्ते वृषलः पपाद ॥
॥ १०-३४-११ ॥

यो वः सेनानीर्महतो गणस्य राजा व्रातस्य प्रथमो बभूव ।
तस्मै कृणोमि न धना रुणध्मि दशाहं प्राचीस्तदृतं वदामि ॥
॥ १०-३४-१२ ॥

अक्षैर्मा दीव्यः कृषिमित् कृषस्व वित्ते रमस्व बहु मन्यमानः ।
तत्र गावः कितव तत्र जाया तन्मे वि चष्टे सवितायमर्यः ॥
॥ १०-३४-१३ ॥

## रत्न ४०० वें

**कवष ऐलूष, अक्षनिंदा-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

मित्रं कृणुध्वं खलु मृळता नो मा नो घोरेण चरताभि धृष्णु ।
नि वो नु मन्युर्विशतामरातिरन्यो बभ्रूणां प्रसितौ न्वस्तु ॥
॥ १०-३४-१४ ॥

## रत्न ४०१ वें

**लुश धानाक-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

सविता पश्चातात्सविता पुरस्तात्सवितोत्तरात्तात्सविताधरात्तात् ।
सविता नः सुवतु सर्वतातिं सविता नो रासतां दीर्घमायुः ॥
॥ १०-३६-१४ ॥

**स्मा. वि. सौरजप, पुण्याहवाचन. आशिर्वाद.**

दुसऱ्यांच्या स्त्रिया सुखांत व त्यांचीं घरें सुव्यवस्थित पाहून जुगारी हा आपल्या घरची दैन्यावस्था व बायकोची हीनावस्था आठवून मनांत तळमळत व तडफडत असतो ! पण सकाळ उजाडतांच पुनः तो फांशांशीं लगट करतो आणि रात्रीं त्यांच्या शेजारीच जाऊन निजतो. ( १०-३४-११ ), अहो फांशांनो ! तुमच्या संघाचा जो कोणी नायक असेल, तुमच्या गणाचा जो कोणी राजा असेल, त्याला मी आतां हात जोडून नमस्कार करतों. मी आतां जुगाराप्रीत्यर्थ पैसा घालविणार नाहीं. हें पहा, खोटें वाटल्यास मी आपल्या हातांचीं दहाहि बोटें उघडीं करून दाखवितों. अहो! खोटें नाहीं, मी हें सत्य, सत्यच सांगत आहें.(१०-३४-१२) अरे जुगाऱ्या ! फांशांनीं जुगार खेळूं नकोस ! बाबा ! खेळूं नकोस ! शेतीच कर ! म्हणजे तुला त्यापासून संपत्तीचा उपभोग घ्यावयास सांपडेल. त्या कृषिकर्मांत गायी आहेत ! स्त्रीहि आहे ! हें रहस्य मला सर्वज्ञानी अशा सवितादेवानें अनेक प्रकारें समजावून सांगितलें आहे,(१०-३४-१३).

## रत्न ४०० वें

अहो फांशांनों ! आतां मेहरबानी करा ! तुम्ही माझे मित्र व्हा ! मला सुखानंदांत ठेवा! माझ्याशीं उपमर्दकारक रीतीनें आणि खुनशीपणानें आतां वागूं नका ! तुमचा राग माझ्या शत्रूवर जाऊन आदळो ! आमचा शत्रु पिंगटवर्णाच्या तुमच्या जाळ्यांत अचूक येऊन पडो! (१०-३४-१४).

## रत्न ४०१ वें

जो पश्चिमेकडे आहे, पूर्वेकडे आहे, उत्तरेकडे आहे आणि दक्षिणेकडेहि आहे--अर्थात् जो सर्व बाजूंनीं आहे- असा तो सविता देव आमच्यासाठीं सर्व अभिलषित वस्तु निर्माण करो ! आणि आम्हांस दीर्घायुष्य देवो ! ( १०-३६-१४ ).

## रत्न ४०२ वें

**अभितप सौर्य-ऋषि, सूर्य-देवता, जगती-छंद.**

नमो॑ मि॒त्रस्य॒ वरु॑णस्य॒ चक्ष॑से म॒हो दे॒वाय॒ तदृ॒तं स॑पर्यत ।
दू॒रे॒दृशे॑ दे॒वजा॑ताय के॒तवे॑ दि॒वस्पु॒त्राय॒ सूर्या॑य शंसत ॥

॥ १०-३७-१ ॥

**श्रौ. वि. (आश्विनशस्त्र) सौर्यकांड.** **स्मा. वि. सूर्योपस्थान.**

सा मा॑ स॒त्योक्तिः॒ परि॑ पातु वि॒श्वतो॒ द्यावा॑ च॒ यत्र॑ त॒तन॒न्नहा॑नि च ।
विश्व॑म॒न्यन्नि वि॑शते॒ यदेज॑ति वि॒श्वाहापो॑ वि॒श्वाहोदे॑ति॒ सूर्यः॑ ॥

॥ १०-३७-२ ॥

न ते॒ अदे॑वः प्र॒दिवो॒ नि वा॑सते॒ यदे॑त॒शेभिः पत॒रै र॑थ॒र्यसि॑ ।
प्रा॒चीन॑म॒न्यद॒नु॑ वर्तते॒ रज॒ उद॒न्येन॒ ज्योति॑षा यासि सूर्य ॥

॥ १०-३७-३ ॥

येन॑ सूर्य॒ ज्योति॑षा॒ बाध॑से॒ तमो॒ जग॑च्च॒ विश्व॑मुदि॒यर्षि॑ भा॒नुना॑ ।
तेना॒स्मद्विश्वा॒मनि॑रा॒मना॑हुति॒मपामी॑वा॒मप॑ दु॒ष्वप्न्यं॑ सुव ॥

॥ १०-३७-४ ॥

**श्रौ. वि. सूर्य उपस्थान.**

विश्व॑स्य॒ हि प्रेषि॑तो॒ रक्ष॑सि व्र॒तमहे॑ळयन्नु॒च्चर॑सि स्व॒धा अनु॑ ।
यद॒द्य त्वा॑ सूर्योप॒ब्रवा॑म॒है तं नो॑ दे॒वा अनु॑ मंसीरत॒ क्रतु॑म् ॥

॥ १०-३७-५ ॥

तं नो॒ द्यावा॑पृथि॒वी तन्न॒ आप॒ इन्द्रः॑ शृण्वन्तु म॒रुतो॒ हवं॒ वचः॑ ।
मा शूने॑ भूम॒ सूर्य॑स्य सं॒दृशि॑ भ॒द्रं जीव॑न्तो जर॒णाम॑शीमहि ॥

॥ १०-३७-६ ॥

## रत्न ४०२ वें

अहो ऋत्विज हो ! मित्र व वरुण यांच्या नेत्रस्थानीं असलेला, महान्, तेजस्वी, दूर असला तरी पाहणारा, देवांसाठीं जन्मलेला, प्रकाशरूपी ध्वज असलेला, स्वर्लोकाचें रक्षण करणारा असा जो हा सूर्यनारायण त्याला नमस्कार करा ! त्या सूर्यनारायणाची अनुष्ठानपूर्वक उपासना करा ! आणि त्याचें मंगल स्तुतिस्तोत्र गा ! ( १०-३७-१ ), जिच्यामुळें द्यावापृथ्वी व अहोरात्र हीं निर्माण झालीं, जिच्यामध्यें सर्व भूतजात विश्रांत पावते, व चलनवलनादि क्रिया करते, जिच्यामुळें उदक हें सदासर्वकाल वाहत राहतें व सूर्य उदयास्त करीत फिरत असतो अशी ती सत्योक्ति माझें चोहोंकडून रक्षण करो ! ( १०-३७-२ ), हे सूर्य देवा! ज्या वेळीं तूं रथाला वेगवान असे घोडे जोडूं इच्छितोस आणि ज्या वेळीं तुझें प्राचीन असें चंद्राख्यरूपीं दुसरें तेज बरोबर घेऊन तूं उदय पावतोस तेव्हां कोणीहि पुरातन राक्षस तुझ्या सन्निध राहूं शकत नाहीं ( १०-३७-३). हे सूर्य देवा ! ज्या तेजानें तूं अंधकाराचें निवारण करतोस आणि ज्या तेजानें तूं सर्व जगाला जागृत करतोस त्या तेजानें आमची उपासमार, आमची अधार्मिकता, व रोगराई इत्यादिकांचा नायनाट कर ! आणि त्याच वेळीं रात्रीं पडलेल्या दुःस्वप्नापासून उत्पन्न होणारीं अरिष्टें हींहि पण विलयास ने ( १०-३७-४ ), हे सूर्यदेवा ! सद्भावप्रेरित होऊन केलेली सर्व यज्ञोपासकांची जी देवोपासना आहे, तिचें तूं न रागावतां राक्षसादिकांपासून रक्षण करतोस. आणि प्रातर्होम आटपला म्हणजे पुनः वर आकाशांत प्रयाण करतोस. हे देवा ! ज्या ज्या वेळीं आम्हीं तुझी प्रार्थना करूं, त्या त्या वेळीं त्या आमच्या अनुष्ठानाला इन्द्रादि देव अनुमोदन देवोत ! ( १०-३७-५ ), द्यावापृथ्वी, आपोदेवी, इंद्र आणि मरुत प्रभृति देव हा आमचा धांवा व ही आमची स्तुति ऐकोत ! सूर्य देवाचें दर्शन घडल्यावर दुःखाचा प्रसंग आमच्यावर न येवो ! आम्ही दीर्घकाल प्राणधारण करणारे होत्साते, कल्याण व अमरत्व प्राप्त करून घेऊं असें घडो ! ( १०-३७-६ ).

विश्वाहा त्वा सुमनसः सुचक्षसः प्रजावन्तो अनमीवा अनागसः ।
उद्यन्तं त्वा मित्रमहो दिवेदिवे ज्योग्जीवाः प्रति पश्येम सूर्य ॥

॥ १०-३७-७ ॥

महि ज्योतिर्बिभ्रतं त्वा विचक्षण भास्वन्तं चक्षुषे चक्षुषे मयः ।
आरोहन्तं बृहतः पाजसस्परि वयं जीवाः प्रति पश्येम सूर्य ॥

॥ १०-३७-८ ॥

यस्य ते विश्वा भुवनानि केतुना प्र चेरते नि च विशन्ते अक्तुभिः ।
अनागास्त्वेन हरिकेश सूर्याऽह्नाह्ना नो वस्यसावस्यसोदिहि ॥

॥ १०-३७-९ ॥

## रत्न ४०३ वें

**अभितप सौर्य-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

शं नो भव चक्षसा शं नो अह्ना शं भानुना शं हिमा शं घृणेन ।
यथा शमध्वञ्छमसद्दुरोणे तत्सूर्य द्रविणं धेहि चित्रम् ॥

॥ १०-३७-१० ॥

## रत्न ४०४ वें

**अभितप सौर्य-ऋषि, सूर्य-देवता, जगती-छंद.**

अस्माकं देवा उभयाय जन्मने शर्म यच्छत द्विपदे चतुष्पदे ।
अदत्पिबदूर्जयमानमाशितं तदस्मे शं योररपो दधातन ॥

॥ १०-३७-११ ॥

यद्वो देवाश्चकृम जिह्वया गुरु मनसो वा प्रयुती देवहेळनम् ।
अरावा यो नो अभि दुच्छुनायते तस्मिन्तदेनो वसवो नि धेतन ॥

॥ १०-३७-१२ ॥

हे सूर्य नारायणा ! आम्ही सुप्रसन्न, सुदर्शन, सुप्रजावान, रोगरहित, पापरहित होत्साते तुझें सदैव पूजन करीत असावें. आणि हे मित्रपूजका ! प्रतिदिवशीं उदय पावणारा जो तूं त्या तुझें, चिरकाल जगूं पाहणारे आम्ही सु-मंगल दर्शन घेत रहावें असें घडो ! ( १०-३७-७ ). हे ज्ञानमूर्ते ! हे सूर्य देवा ! तूं महत्तेज धारण करणारा आहेस ! अत्यंत दीप्तमान आहेस ! सर्वांच्या दृष्टीला सुखकर असा आहेस ! अत्यंत बलवान असा जो अंतरिक्ष लोक, त्या अंतरिक्ष लोकावरहि चढून जाणारा जो तूं त्या तुझें आम्हीं दीर्घकाल जिवंत राहून, नित्य मंगल दर्शन घेत असावें असें घडो ! ( १०-३७-८ ) हे सुवर्णकेश सूर्य देवा ! तूं उदय पावलास म्हणजे त्या तुझ्या झगझगीत तेजानें सर्व जग खडबडून जागें होऊन हालचाल-धांवपळ करूं लागतें ! आणि तूं अस्त पावलास म्हणजे तें धडपडणारें जग पुन: रात्रीं अंधकारांत स्वस्थ विराम पावतें. तर हे देवा! तूं आम्हांस निष्पाप करीत व क्षेमकर होत नित्य उदय पावत जा ! (१०-३७-९ )

## रत्न ४०३ वें

हे सूर्य देवा! तूं आपल्या मंगलमय तेजानें आम्हांस सुखकर हो ! प्रकाशानें सुखकर हो ! किरणानें सुखकर हो ! हिमानें सुखकर हो ! उष्णतेनें सुखकर हो! फार काय, ज्या ज्या योगानें प्रवासांत व घरांत आम्हांस उत्तम सुख लाभेल, असें उत्कृष्ट बलारोग्यधन आम्हांस अर्पण कर ! (१०-३७-१०).

## रत्न ४०४ वें

अहो देवहो! तुम्ही आमच्या लोकांना व पशूंना दोघांसहि सुखप्रदान करा! तसेंच आम्ही जें जें खाऊं, जें जें पिऊं, जें जें बल प्राप्त करून घेऊं, तें सर्व आम्हांस आरोग्यकारक व विषयजनित सुख देणारें होईल असें करा ! व त्याबरोबरच आम्हांस निष्पाप करावयासहि पण चुकूं नका ! ( १०-३७-११ ) ! अहो दिव्य विबुधहो ! आम्हीं वाचेनें, मनानें व शरीरानें तुम्हांस राग येईल असला कसला जरी अपराध केला असला, तरी तो सर्व अपराध आम्हांला सोडून आमच्याशीं दुष्टपणानें वागणाऱ्या आमच्या शत्रूंच्या बोकांडीं जाऊन बसेल, असें करा ! ( १०-३७-१२).

## रत्न ४०५ वें

**सौचिक अग्नि-ऋषि, देव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

प्रयाजान्मे अनुयाजाँश्च केवलानूर्जस्वन्तं हविषो दत्त भागम् ।
घृतं चापां पुरुषं चौषधीनामग्नेश्च दीर्घमायुरस्तु देवाः ॥

॥ १०-५१-८ ॥

**स्मा. वि. देवे.**

## रत्न ४०६ वें

**देव-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद.**

तन्तुं तन्वन्रजसो भानुमन्विहि ज्योतिष्मतः पथो रक्ष धिया
कृतान् । अनुल्बणं वयत जोगुवामपो मनुर्भव जनया दैव्यं
जनम् ॥ १०-५३-६ ॥

**श्रौ. वि. दर्भास्तरण** **स्मा. वि. सायं अग्नि-उपस्थान**

## रत्न ४०७ वें

**देव-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप् छंद.**

अश्मन्वती रीयते सं रभध्वमुत्तिष्ठत प्र तरता सखायः ।
अत्रा जहाम ये असन्नशेवाः शिवान्वयमुत्तरेमाभि वाजान् ॥

॥ १०-५३-८ ॥

**स्मा. वि. (विवाह) यानारोहण.**

## रत्न ४०८ वें

**बृहदुक्थ वामदेव्य-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

एभिर्ददे वृष्ण्या पौंस्यानि येभिरौक्षद्वृत्रहत्याय वज्री ।
ये कर्मणः क्रियमाणस्य मह्न ऋतेकर्ममुदजायन्त देवाः ॥

॥ १०-५५-७ ॥

**स्मा. वि. देवे**

## रत्न ४०५ वें

अहो देवहो! प्रयाज नांवाचा हविर्भाग व अनुयाज नांवाचा हविर्भाग आणि तसेंच स्विष्टकृत् नांवाचा सारभूत हविर्भाग मला–अग्नीला–अर्पण करा! उदकाचें सारभूत असें जें घृत व ओषधीपासून उत्पन्न झालेला पुरुषरूपी हविर्भाग मला अर्पण करा! आणि मला अग्नीला दीर्घायुष्य असूं द्या! (१०–५१–८).

## रत्न ४०६ वें

हे अग्नि देवा! यज्ञकर्माचा विस्तार करणारा असा जो तूं, तो रजोलोक प्रकाशित करणाऱ्या सूर्य मंडलामध्यें प्रवेश कर आणि यज्ञकर्मानें तयार केलेल्या तेजस्वी अशा स्वर्गाकडे जाणाऱ्या देवयान मार्गाचें रक्षण कर! आम्हां स्तोतृजनांचें यज्ञानुष्ठान अग्निदेव प्रसादपूर्ण करो! हे अग्ने! आतां तूं स्तुत्य हो आणि दिव्यविबुधांना येथें प्रकट कर! (१०–५३–६).

## रत्न ४०७ वें

अहो मित्रहो! ही पहा पाषाणमय नदी वाहते आहे. तिला तरून जाण्याचा प्रयत्न करा! उठा! आणि सुरक्षितपणें ती ओलांडून पैलतीरास जा! कारण या प्रदेशांत राक्षस, भूत, पिशाच इत्यादि उपद्रव देणारे दुष्ट प्राणी राहत असतात. त्यांना आम्ही येथेंच टाकून देऊं आणि सुखकर असें मिष्टान्न मिळविण्याकरतां लवकर ही नदी ओलांडून पार जाऊं! (१०–५३–८).

## रत्न ४०८ वें

मरुद्गणाच्या साहाय्यानें इन्द्रदेव हा वृत्राला मारण्यासाठीं जोरानें जलवर्षाव करतो आणि मरुत्देव हे त्या इन्द्रास पाऊस पाडण्याच्या कामांत साहाय्य करण्यासाठीं म्हणून सामोरे येतात. त्या मरुतांच्या साहाय्यानें इन्द्र हा वृष्टिरूपी पराक्रमाचीं कृत्यें करतो. (१०–५५–७).

## रत्न ४०९ वें

**बंधु गौपायन विश्वेदेव-देवता, गायत्री-छंद.**

मनो न्वा हुवामहे नाराशंसेन सोमेन ।
पितॄणां च मन्मभिः ॥ १०-५७-३ ॥

आ तं एतु मनः पुनः क्रत्वे दक्षाय जीवसे ।
ज्योक् च सूर्यं दृशे ॥ १०-५७-४ ॥

**श्रौ. वि. (महापितृयज्ञ) (१) ऋत्विग्जय. (२) पिंडपितृयज्ञ-उपस्थान.**

पुनर्नः पितरो मनो ददातु दैव्यो जनः ।
जीवं व्रातं सचेमहि ॥ १०-५७-५ ॥

वयं सोम व्रते तव मनस्तनूषु बिभ्रतः ।
प्रजावन्तः सचेमहि ॥ १०-५७-६ ॥

## रत्न ४१० वें

**बंधु गोपायन-ऋषि, सोम-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मो षु णः सोम मृत्यवे परा दाः पश्येम नु सूर्यमुच्चरन्तम् ।
द्युभिर्हितो जरिमा सू नो अस्तु परातरं सु निर्ऋतिर्जिहीताम् ॥
॥ १०-५९-४ ॥

## रत्न ४११ वें

**बंधु गोपायन-ऋषि, असुनीति-देवता, त्रिष्टुप्-छंद**

असुनीते मनो अस्मासु धारय जीवातवे सु प्र तिरा न आयुः ।
ररन्धि नः सूर्यस्य संदृशि घृतेन त्वं तन्वं वर्धयस्व ॥
॥ १०-५९-५ ॥

**श्रौ. वि. असुनीति स्तवन.** **स्मा. वि. देवता प्राणप्रतिष्ठा.**

### रत्न ४०९ वें

हे सुबंधो ! मायावी लोकांनीं हिरावून नेलेलें तें तुझें मन आम्हीं नराशंसचमसांतील सोमरसाच्या योगानें व अंगिरस पितरांच्या मननीय स्तोत्रादिकांनीं तावडतोब इकडे येण्याकरतां बोलावतों ! (१०-५७-३). तें तुझें भटकत असलेलें मन कर्म करण्यासाठीं, बलासाठीं, जीवनासाठीं व सूर्यनारायणाचें चिरकाल दर्शन घेण्यासाठीं म्हणून पुनः इकडे येवो ! ( १०-५७-४ ). आमचे अंगिरस पितर पुनः तुला प्राण व इंद्रियसमुदाय प्राप्त करून देवोत ! त्याच प्रमाणें देवजनहि देवोत! आम्ही ते दोन्ही प्राप्त करून घेऊं ! ( १०-५७-५ ). हे सोमदेवा ! आम्ही तुझ्या कर्मानुष्ठानांत व तुझ्या मूर्तीवर मन गुंतविणारे आहोंत. अतएव आम्हीं पुत्रपौत्रादिकांनी युक्त होऊं ! ( १०-५७-६ )

### रत्न ४१० वें

हे सोमदेवा ! तूं आम्हांला मृत्यूच्या स्वाधीन करूं नकोस ! असें झालें म्हणजे आम्ही उदय पावणाऱ्या सूर्य देवाचें दर्शन घेत बहुकाल जिवंत राहूं ! अनेक दिवसांनीं येणारें वार्धक्य हें आम्हांस सुखाचें होवो ! प्राणापहार करणारी निर्ऋति ( हडळ ) ही आम्हांपासून दूर-अत्यंत दूर निघून जावो ! ( १०-५९-४ )

### रत्न ४११ वें

हे प्राणदायिनी ! हे असुनीत देवि ! आमच्या अंतःकरणांत मन स्थिर राहील असें कर ! आम्हीं दीर्घकाल जगावें म्हणून आम्हांस उदंड आयुष्य दे! आणि आम्हांस सूर्य दर्शन चिरकाल घडेल असें कर ! तसेंच तूं आपलें शरीर या आमच्या घृताहुतींनीं संवर्धन कर. ( १०-५९-५ ) !

असुनीते पुनरस्मासु चक्षुः पुनः प्राणमिह नो धेहि भोगम् ।
ज्योक् पश्येम सूर्यमुच्चरन्तमनुमते मृळया नः स्वस्ति ॥
॥ १०-५९-६ ॥

## रत्न ४१२ वें

**बंधु गोपायन-ऋषि, पृथिवी-सोम-प्रभृति-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

पुनर्नो असुं पृथिवी ददातु पुनर्द्यौर्देवी पुनरन्तरिक्षम् ।
पुनर्नः सोमस्तन्वं ददातु पुनः पूषा पथ्यां३ या स्वस्तिः ॥
॥ १०-५९-७ ॥

## रत्न ४१३ वें

**बंधु गोपायन-ऋषि, हस्त-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अयं मे हस्तो भगवानयं मे भगवत्तरः ।
अयं मे विश्वभेषजोऽयं शिवाभिमर्शनः ॥ १०-६०-१२ ॥

## रत्न ४१४ वें

**नाभानेदिष्ठ मानव-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

इदमित्था रौद्रं गूर्तवचा ब्रह्म क्रत्वा शच्यामन्तराजौ ।
क्राणा यदस्य पितरा मंहनेष्ठाः पर्षत् पक्थे अहन्ना सप्त होतॄन् ॥
॥ १०-६१-१ ॥

**श्रौ. वि. वैश्वदेवशस्त्र.** **स्मा. वि. उपनयनकालीन पठणीयसूक्त.**

स इद्दानाय दभ्याय वन्वञ्च्यवानः सूदैरमिमीत वेदिम् ।
तूर्वयाणो गूर्तवचस्तमः क्षोदो न रेत इतऊति सिञ्चत् ॥
॥ १०-६१-२ ॥

हे असुनीत देवि! तूं आम्हांस पुनः डोळे दे! पुनः प्राण दे! आम्हांला येथें पुष्कळ सुखोपभोग घडेल असें कर! आम्हीं दीर्घकाल उगवत्या सूर्य देवाचें दर्शन घेत जाऊं, असें घडो! हे अनुमते! आमचें कल्याण होईल, अशा रीतीनें आम्हांस सुखानंदांत ठेव! ( १०-५९-६ ).

### रत्न ४१२ वें

पृथ्वी पुनः आम्हांस प्राण अर्पण करो! स्वर्ग प्राण अर्पण करो! अंतरिक्ष प्राण अर्पण करो! सोम आम्हांस पुनः शरीर देवो! पूषा पुनः आम्हांस अन्न देवो! व स्वस्तिदेवता वाचा अर्पण करो! ( हे वरील १०-५९-५ ते १०-५९-७ असे तीन मंत्र मरणोन्मुख सुबंधूला उद्देशून म्हटल्याचें सायण भाष्यावरून दिसून येते. ) ( १०-५९-७ ).

### रत्न ४१३ वें

हा माझा हात भाग्यवान आहे. हा माझा दुसरा हात त्याहूनहि अधिक भाग्यवान आहे. हा माझा पहिला हात सर्वौषधि गुणसंपन्न आहे आणि हा दुसरा हात स्पर्श झाला असतां मंगलप्रद आहे. ( १०-६०-१२ ).

### रत्न ४१४ वें

मोठ्या बुद्धिवैभवानें तयार केलेलें व रुद्र देवाला प्रिय असें हें प्रार्थना-सूक्त नाभानेदिष्ठ हा अंगिरसाच्या समूहांत त्यांच्या सत्रामध्यें म्हणत आहे. कीं जें सूक्त आपल्या मिळकतीचे विभाग करणारे त्याचे पितर व विभाग घेणारे त्याचे भाऊ गोधनलाभाच्या उद्देशानें तयार करते झाले. नाभानेदिष्ठ हा अंगिरसाच्या सप्तहोतृक यज्ञाच्या सहाव्या दिवशीं तें सूक्त म्हणून त्यांचा यज्ञ परिपूर्ण करता झाला ( १०-६१-१ ). धन देण्यासाठीं व शत्रूंना ठार मारण्यासाठीं स्तोतृजनांना मदत करणारा व प्रखर शस्त्रांनीं राक्षसादिकांना ठार मारणारा तो रुद्र देव वेदीवर चढता झाला. शीघ्रगमनशील व अत्यंत मधुर भाषणी असा तो महादेव उदकाप्रमाणें रेताचा वर्षाव करता झाला ( अर्थात् त्यानें अश्वीना उत्पन्न केलें ) ( १०-६१-२ ).

मनो न येषु हवनेषु तिग्मं विपः शच्या वनुथो द्रवन्ता ।
आ यः शर्याभिस्तुविनृम्णो अस्याऽश्रीणीतादिशं गभस्तौ ॥
॥ १०-६१-३ ॥

कृष्णा यद्गोष्वरुणीषु सीदद्दिवो नपाताश्विना हुवे वाम् ।
वीतं मे यज्ञमा गतं मे अन्नं ववन्वांसा नेषमस्मृतध्रू ॥
॥ १०-६१-४ ॥

प्रथिष्ट यस्य वीरकर्ममिष्णदनुष्ठितं नु नर्यो अपौहत् ।
पुनस्तदा वृहति यत् कनाया दुहितुरा अनुभृतमनर्वा ॥
॥ १०-६१-५ ॥

मध्या यत् कर्त्वमभवदभीके कामं कृण्वाने पितरि युवत्याम् ।
मनानग्रेतो जहतुर्वियन्ता सानौ निषिक्तं सुकृतस्य योनौ ॥
॥ १०-६१-६ ॥

पिता यत् स्वां दुहितरमधिष्कन् क्ष्मया रेतः संजग्मानो नि
षिञ्चत् । स्वाध्योऽजनयन् ब्रह्म देवा वास्तोष्पतिं व्रतपां निरतक्षन् ॥
॥ १०-६१-७ ॥

स ईं वृषा न फेनमस्यदाजौ स्मदा परैदप दभ्रचेताः ।
सरत् पदा न दक्षिणा परावृङ् न ता नु मे पृशन्यो जगृभ्रे ॥
॥ १०-६१-८ ॥

अहो अश्विनो ! स्तोत्यानें हांक मारल्यावेळीं यज्ञशालेंत हजर राहण्याच्या बुद्धीनें तुम्ही मनोगतीनें धांवत जाऊन तेथें उपस्थित होता. हा माझा अध्वर्यु हविर्द्रव्यानें संपन्न असून तो या माझ्या यज्ञकर्मांत हातांत हवि धरून बोटांनी शिजवीत आहे ( १०–६१–३ ). रात्र जेव्हां अरुणकांतीच्या गाईमध्यें जाऊन बसते न बसते, तोंच म्हणजे उषःकालसमयीं, प्रकाशमय स्वर्गाला खालीं न पाडूं देणारे अश्वीहो! मी तुम्हांस हांक मारीत आहें. तर माझ्या हविरन्नाची इच्छा धरा ! आणि त्यासाठी या माझ्या यज्ञांत आगमन करा ! घोडा जसा गवताकडे धांवत जातो, तद्वत तुम्हीं या हविरन्नासाठी धांवून या ! तुम्हीं मजविषयी मनांत कसलाहि द्रोहभाव आणूं नका ! ( १०–६१–४ ). प्रजापतीचें जें कामनायुक्त रेत कीं ज्यापासून वीरपुरुषच उत्पन्न होतात, तें रेत त्यानें पुत्राच्या इच्छेनें सिंचन केलें. त्यापासून लोकहितकर्ता असा रुद्र उत्पन्न झाला. पुरुषरूपानें उत्पन्न झालेला तो प्रजापति यानें आपली सुंदर कन्या जी उषा तिच्या ठायीं पुनः त्या रेताचें विसर्जन केलें. आणि तें सर्व बाजूंनीं उद्गम पावलें. ( १०–६१–५ ). प्रजापति हा आपल्या दुहितेशीं आकाशांत यथेच्छ रममाण झाला असतां त्या मैथुनप्रसंगीं कांही रेत खालीं पडलें. अर्थात् आपल्या प्रिय दुहितेशीं संलग्न झालेल्या त्या प्रजापतीनें तें रेत उच्च अशा पवित्र यज्ञस्थानांत विसर्जन केलें (त्यापासून वास्तोष्पतिरुद्र उत्पन्न झाला ) ( १०–६१–६ ). ज्या वेळी पिता म्हणजे प्रजापति हा आपल्या दुहितेच्या ठिकाणीं रेत सिंचन करता झाला, त्या वेळीं त्यानें पृथ्वीशीं संगत होऊन हरिणाचें रूप धारण करून वीर्य सिंचन केलें. तेव्हांच कर्मकुशल देवांनीं ब्रह्म उत्पन्न केलें. अर्थात् यज्ञकर्म-रक्षक असा वास्तोष्पति ( यज्ञगृहाचा स्वामी ) निर्माण केला. ( १०–६१–७ ). ( दक्षिणा म्हणून दिलेल्या गाई अडविण्यासाठीं आलेल्या वास्तोष्पतीला पाहून नाभानेदिष्ठ म्हणतो ) वृत्रास मारण्यासाठीं त्यावर फेंस फेंकणाऱ्या इन्द्राप्रमाणें करूं पाहणाऱ्या वास्तोष्पतीला या गाई तुझाच भाग आहे असें सांगितल्यावर तो माझ्यापासून निघून गेला. जो क्षुद्र बुद्धि असतो तो दक्षिणारूपानें दिलेल्या गाई सोडून पाऊलहि सरकत नाहीं; पण हा दांडगा रुद्र माझ्या गाई घेत नाहीं. ( १०–६१–८ ).

मक्षू न वह्निः प्रजाया उपब्दिरग्निं न नग्न उप सीददूधः ।
सनितेध्मं सनितोत वाजं स धर्ता जज्ञे सहसा यवीयुत् ॥

॥ १०-६१-९ ॥

मक्षू कनायाः सख्यं नवग्वा ऋतं वदन्त ऋतयुक्तिमग्मन् ।
द्विबर्हसो य उप गोपमागुरदक्षिणासो अच्युता दुदुक्षन् ॥

॥ १०-६१-१० ॥

मक्षू कनायाः सख्यं नवीयो राधो न रेत ऋतमित् तुरण्यन् ।
शुचि यत् ते रेक्ण आयजन्त सबर्दुघायाः पय उस्रियायाः ॥

॥ १०-६१-११ ॥

पश्वा यत् पश्चा वियुता बुधन्तेति ब्रवीति वक्तरी रराणः ।
वसोर्वसुत्वा कारवोऽनेहा विश्वं विवेष्टि द्रविणमुप क्षु ॥

॥ १०-६१-१२ ॥

तदिन्न्वस्य परिषद्वानो अग्मन् पुरू सदन्तो नार्षदं बिभित्सन् ।
वि शुष्णस्य संग्रथितमनर्वा विदत् पुरुप्रजातस्य गुहा यत् ॥

॥ १०-६१-१३ ॥

भर्गो ह नामोत यस्य देवाः स्वर्ण ये त्रिषधस्थे निषेदुः ।
अग्निर्ह नामोत जातवेदाः श्रुधी नो होतर्ऋतस्य होताध्रुक् ॥

॥ १०-६१-१४ ॥

उत त्या मे रौद्रावर्चिमन्ता नासत्याविन्द्र गूर्तये यजध्यै ।
मनुष्वद्वृक्तबर्हिषे रराणा मन्दू हितप्रयसा विक्षु यज्यू ॥

॥ १०-६१-१५ ॥

रुद्ररक्षित यज्ञशालेंत अग्नीप्रमाणें ताप देणारे व ऋत्विजादि प्रजेला पीडा करणारे राक्षस दिवसा तर येत नाहींतच, रात्रींहि पण ते वस्त्रहीन दुष्टजन त्या प्रज्वलित अग्निनारायणाजवळ येण्यास धजत नाहींत. याप्रमाणें रुद्रदेवाकडून राखिल्या जाणाऱ्या त्या यज्ञांत तेजस्वी अग्नि उत्पन्न होतो, व देवांचें हविरन्नहि उत्पन्न होतें. तो जो यज्ञरक्षक अग्नि आहे, तो आपल्या पराक्रमानें राक्षसप्रभृतींशीं लढणारा असा योद्धा होऊनच जन्मला आहे ( १०–६१–१० ). तात्काल पृथ्वीमातेशीं सख्य जोडून नवीन धनाप्रमाणें असणाऱ्या उदकाला त्या यज्ञोपासकांनीं आकाशांतून खालीं वर्षाव करण्यास प्रेरणा केली. हे इंद्रा ! जेव्हां तुला गाईचें अमृतसदृश दुग्धरूपधन अर्पण करून तुझें पूजन केलें तेव्हां तूं जलवर्षाव करता झालास (१०–६१–११) . ज्या वेळीं स्तोतृजन आपले गोठे गाईरहित पाहतात तेव्हां ते असें म्हणतात कीं स्तोतृजनांत रममाण होणारा व अत्यंत धनवान असा निष्पाप इन्द्रदेव पणींनीं चोरून नेलेलें सर्व गोरूप धन पुनः भक्तांना देण्यासाठीं ताबडतोब वेढून टाकतो ( १०–६१–१२ ). तेथें त्या इन्द्रदेवाचे परिचारक चटकन् धांवून जाते झाले. किल्ल्यांत राहणारे ते असुर नृषदाच्या पुत्राला ठार मारू पहात होते. पण इन्द्रानें त्या मायावी शुष्णासुराचें गुप्तस्थानांतील तें दुर्ज्ञेय मर्म अखेर ओळखून काढलेंच ! ( १०–६१–१३ ) त्या तेजाचें नांव भर्ग असें आहे. दर्भासनावर बसलेले जे देव आहेत ते स्वर्गातल्याप्रमाणें त्या आसनावर उपविष्ट होतात आणि त्या तेजाला अग्नि असेंहि म्हणतात, व जातवेद असेंहि म्हणतात. हे यज्ञसंपादक अग्निदेवा ! तूं देवांना यज्ञामध्यें बोलावणारा आहेस, तसाच द्रोहरहितहि आहेस; तर, हे देवा! तूं आमची प्रार्थना ऐक ! ( १०–६१–१४ ) आणि हे इन्द्रदेवा ! ते तेजस्वी रुद्रपुत्र म्हणजे अश्वीदेव माझ्या स्तुतीला व सत्काराला योग्य असेच आहेत. मनूच्या यज्ञांतल्याप्रमाणें कुशासन पसरलें असतां त्यांना मोठा आनंद होतो. ते हर्षभरित होतात. ते आम्हां ऋत्विजांना धन देणारे आहेत आणि तसेच पूज्यहि आहेत ( १०–६१–१५ ).

अयं स्तुतो राजा वन्दि वेधा अपश्च विप्रस्तरति स्वसेतुः ।
स कक्षीवन्तं रेजयत् सो अग्निं नेमिं न चक्रमर्वतो रघुद्रु ॥
॥ १०-६१-१६ ॥

स द्विबन्धुर्वैतरणो यष्टा सबर्धुं धेनुमस्वं दुहध्यै ।
सं यन्मित्रावरुणा वृञ्ज उक्थैर्ज्येष्ठेभिरर्यमणं वरूथैः ॥
॥ १०-६१-१७ ॥

तद्बन्धुः सूरिर्दिवि ते धियंधा नाभानेदिष्ठो रपति प्र वेनन् ।
सा नो नाभिः परमास्य वा घाऽहं तत् पश्चा कतिथश्चिदास ॥
॥ १०-६१-१८ ॥

इयं मे नाभिरिह मे सधस्थमिमे मे देवा अयमस्मि सर्वः ।
द्विजा अह प्रथमजा ऋतस्येदं धेनुरदुहज्जायमाना ॥
॥ १०-६१-१९ ॥

अधासु मन्द्रो अरतिर्विभावाऽव स्यति द्विवर्तनिर्वनेषाट् ।
ऊर्ध्वा यच्छ्रेणिर्न शिशुर्दन् मक्षू स्थिरं शेवृधं सूत माता ॥
॥ १०-६१-२० ॥

अधा गाव उपमातिं कनाया अनु श्वान्तस्य कस्य चित् परेयुः ।
श्रुधि त्वं सुद्रविणो नस्त्वं याळाश्वघ्नस्य वावृधे सूनृताभिः ॥
॥ १०-६१-२१ ॥

हा विश्वविधाता राजा सोम सर्वांकडून स्तविला गेला, तसाच आजहि आम्हांकडून स्तविला जात आहे. तो विप्राप्रमाणें शुद्ध आहे व त्याचे किरण जगाचे बंधक आहेत. असा तो सोम म्हणजे चंद्र नित्य आकाश तरून जातो. त्यानें सोमार्थ गेलेल्या कक्षीवानाचें हृदय पार हलवून सोडलें. घोडे जसे चाकाच्या धांवाला जोरानें फिरवितात तद्वत त्यानें अग्नीला देखील हलवून टाकलें. ( १०-६१-१६ ). तो अग्नि म्हणजे उभय लोकांचा बंधु आहे आणि विश्वाचा तारक आहे. जेव्हां तो शयू मित्रावरुणाची व अर्यमाची प्रशस्त व सुंदर स्तोत्रांनीं स्तुति करता झाला तेव्हां त्यांच्या आज्ञेवरून त्या देवयाजक अग्नीनें न प्रसवणाऱ्या गाईला त्या शयूसाठीं अमृतासारखें मधुर दूध देणारी बनविली ! ( १०-६१-१७ ). एका आईचा, स्तुतिपाठक, असा हा नाभानेदिष्ठ स्वर्गांत राहणाऱ्या तुझाच अपत्यभूत आहे. तो कर्मकुशल असून मनांत हजार गाईंची इच्छा धरून तुझें स्तोत्र गात आहे. तो द्युलोक आमचें उत्कृष्ट असें बंधनस्थान असून त्या आदित्याचें तो अधिष्ठान आहे. मी त्या आदित्याच्या कांहीं पिढ्या मागून झालों आहें. ( १०-६१--१८ ). ही वाणी माझें बंधन आहे. या मडलांतच माझें स्थान आहे. हे प्रकाशणारे किरण माझेच आहेत. हा मीच सर्व कांहीं झालों आहें. ब्राह्मण हे त्या सत्यस्वरूपी ब्रह्माच्या आधींच जन्मले आहेत. पृथ्वी देवता उत्पन्न झाल्यावर तिनें हें सर्व उत्पन्न केलें ( १०-६१-१९ ) . चारहि दिशांना हर्षभरित करणारा, गमनशील, तेजस्वी, दोनहि लोकांत जाणारा, काष्ठभक्षक असा अग्निदेव यागार्थ येथें उपस्थित झाला आहे. तो ऊर्ध्वमुखी असून प्रशंसनीय सेनेप्रमाणें शत्रूंचें हां हां म्हणतां दमन करतो. अशा त्या निश्चल व सुखवर्धक अग्नि-नारायणाला यज्ञामध्यें अरणिमाता जन्म देते ( १०-६१-२० ) . सांप्रत कोणा एका दमलेल्याचीं-म्हणजे या नाभानेदिष्ठाचीं सुंदर स्तुतिस्तोत्रें उपमानभूत इन्द्र देवाकडे जात आहेत. हे धनसंपन्न अग्निदेवा ! तूं तीं आमचीं प्रार्थनास्तोत्रें ऐक आणि आमच्या इन्द्राचें यजन कर ! अश्वमेधयाजी जो मनु त्याचा मी हा नाभानेदिष्ठ पुत्र असून, त्या माझ्या स्तोत्रानें तूं वर्धन पावतोस ( १०-६१-२१ ).

अध त्वमिन्द्र विद्ध्य१स्मान् महो राये नृपते वज्रबाहुः ।
रक्षा च नो मघोनः पाहि सूरीननेहसस्ते हरिवो अभिष्टौ ॥
॥ १०-६१-२२ ॥

अध यद्राजाना गविष्टौ सरत् सरण्युः कारवे जरण्युः ।
विप्रः प्रेष्ठः स ह्येषां बभूव परा च वक्षदुत पर्षदेनान् ॥
॥ १०-६१-२३ ॥

अधा न्वस्य जेन्यस्य पुष्टौ वृथा रेभन्त ईमहे तदू नु ।
सरण्युरस्य सूनुरश्वो विप्रश्चासि श्रवसश्च सातौ ॥
॥ १०-६१-२४ ॥

युवोर्यदि सख्यायास्मे शर्धाय स्तोमं जुजुषे नमस्वान् ।
विश्वत्र यस्मिन्ना गिरः समीचीः पूर्वीव गातुर्दाशत् सूनृतायै ॥
॥ १०-६१-२५ ॥

स गृणानो अद्भिर्देववानिति सुबन्धुर्नमसा सूक्तैः ।
वर्धदुक्थैर्वचोभिरा हि नूनं व्यध्वैति पयस उस्रियायाः ॥
॥ १०-६१-२६ ॥

## रत्न ४१५ वें

**नाभमेदिष्ठ मानव-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद.**

त ऊ षु णो महो यजत्रा भूत देवास ऊतये सजोषाः ।
ये वाजाँ अनयता वियन्तो ये स्था निचेतारो अमूराः ॥
॥ १०-६१-२७ ॥

हे इंद्र देवा ! तूं वज्रधर आहेस. आतां आम्हीं श्रेष्ठ धनास पात्र आहों असें तूं जाण. हविष्मान व स्तुतिकर्ते जे आम्ही त्या आमचें रक्षण कर ! हे अश्वयुक्त इंद्रा ! तुझ्या कृपाछत्राखालीं आम्ही निष्पाप होऊन राहूं असें घडो ! (१०-६१-२२) हे तेजस्वी मित्रावरुण हो ! आतां ज्या अर्थी गाईची इच्छा करणारा व स्तुतिप्रिय सरण्यु हा यज्ञ करणाऱ्या अंगिरसाकडे जात आहे त्या अर्थी हा स्तुतिकुशल नाभानेदिष्ठ त्या अंगिरसांना अत्यंत आवडता होवो ! त्यांचें कर्तव्य तोच तडीस नेवो ! आणि या अंगिरसांना पार करो ! ( १०-६१-२३ ). तात्काल जयशील अशा या वरुणापाशीं सहज स्तुति करणारे आम्ही त्याच्या पुष्ट्यर्थ गोधनाची याचना करीत आहों. अश्व हा वरुणाचा पुत्र होय. हे वरुणदेवा ! तूं विप्राप्रमाणें पूज्य आहेस. आम्हांस तूं अन्न देण्यास प्रवृत्त होतोस. ( १०-६१-२४ ). अहो मित्रावरुणांनो ! तुमच्याशीं सख्य जोडावें व आम्हांस सामर्थ्य लाभावें म्हणून हा अन्नवान् अध्वर्यु तुमची स्तुति करीत आहे कीं जें सख्य लाभलें असतां अंगिरसांची सर्व लोकांत प्रशंसा होईल. गाणाऱ्याला पूर्वदिशा ज्याप्रमाणें सुख देते, त्याप्रमाणें सत्य व मधुर स्तोत्रगायकांना सुख देवो ! (१०-६१-२५). तो वरुण जलदेवतांनीं युक्त व सुबंधु आहे. तो नमस्कार मंत्रांनीं व सूक्तवचनांनीं स्तविला म्हणजे वर्धन पावतो. उक्थमंत्रांनीं व स्तुतिवचनांनीं तो प्रसन्न होवो ! आणि शीघ्र आमच्याकडे निघून येवो ! त्याच्या यजनार्थ गाईंचीं स्तनाग्रें पाझरूं लागलीं आहेत. ( १०-६१-२६ ) हे पूज्य देव हो ! तुम्हीं आमच्या रक्षणासाठीं एकत्र जमा ! आणि तुम्ही अंगिरसांनो ! मला अन्न प्राप्त करून द्या ! तुम्हीं आतां स्मृतिमान झाला आहांत. तर आतां तुम्ही गाईंचा निर्णय करणारे व्हा ! ( १०-६१-२७ ).

## रत्न ४१५ वें

देवांप्रीत्यर्थ हविरन्न व ब्राह्मणांप्रीत्यर्थ दक्षिणा यांनीं सुसमृद्ध असलेले मोठाले यज्ञ करून तुम्ही अंगिरसांनी इंद्राचें सख्य व देवांचें अमरत्व हीं प्राप्त करून घेतलीत. अहो आंगिरसहो ! त्या तुमचें कल्याण असो ! हे सुबुद्ध अंगिरसहो ! हा मनूचा पुत्र नाभानेदिष्ठ या तुमच्या सत्रांत प्राप्त झाला आहे; तर त्या मला तुम्ही तुमच्या यज्ञात स्थान द्या ! ( १०-६२-१ ).

## रत्न ४१५ (अ) वें

**नाभानेदिष्ट मानव-ऋषि, विश्वेदेवता, जगती-छंद.**

ये यज्ञेन दक्षिणया समक्ता इन्द्रस्य सख्यममृतत्वमानश ।
तेभ्यो भद्रमङ्गिरसो वो अस्तु प्रति गृभ्णीत मानवं सुमेधसः ॥
॥ १०-६२-१ ॥

**स्मा. वि. उपनयनकालीन पठणीय मंत्र**

य उदाजन् पितरो गोमयं वस्वृतेनाभिन्दन् परिवत्सरे वलम् ।
दीर्घायुत्वमङ्गिरसो वो अस्तु प्रति गृभ्णीत मानवं सुमेधसः ॥
॥ १०-६२-२ ॥

य ऋतेन सूर्यमारोहयन् दिव्यप्रथयन् पृथिवीं मातरं वि ।
सुप्रजास्त्वमङ्गिरसो वो अस्तु प्रति गृभ्णीत मानवं सुमेधसः ॥
॥ १०-६२-३ ॥

अयं नाभा वदति वल्गु वो गृहे देवपुत्रा ऋषयस्तच्छृणोतन ।
सुब्रह्मण्यमङ्गिरसो वो अस्तु प्रति गृभ्णीत मानवं सुमेधसः ॥
॥ १०-६२-४ ॥

## रत्न ४१६ वें

**नाभानेदिष्ठ मानव-ऋषि, विश्वेदेव-देवता, अनुष्टुप्-छंद**

विरूपास इदृषयस्त इद्गम्भीरवेपसः ।
ते अङ्गिरसः सूनवस्ते अग्नेः परि जज्ञिरे ॥ १०-६२-५ ॥

## रत्न ४१७ वें

**नाभानेदिष्ठ मानव-ऋषि, विश्वेदेव-देवता, बृहती-छंद**

ये अग्नेः परि जज्ञिरे विरूपासो दिवस्परि ।
नवग्वो नु दशग्वो अङ्गिरस्तमः सचा देवेषु मंहते ॥
॥ १०-६२-६ ॥

अहो अंगिरसहो ! आपण मला पितरासारखे आहां. तुमचें गोधन त्या चोरट्या पणींनीं चोरून पर्वतांमध्यें लपवून ठेविलें होतें. तुमची यज्ञसमाप्ति झाल्यावर तें हरवलेलें गोधन तुम्हीं परत शोधून बाहेर काढलेंत. त्या वेळीं जें रणकंदन माजलें त्यांत त्या पणींचा जो अग्रणी, त्या बलासुराला ठार मारलेंत. अशा तुम्हांना उदड आयुष्य लाभो ! तर मला तुम्हीं आपल्या सत्रांत घ्या ! ( १०-६२-२ ). त्याचप्रमाणें तुम्हीं आपल्या यज्ञाच्या प्रभावानें द्युलोकांत सूर्यनारायणाची स्थापना केलीत; आणि प्राणिमात्रांची जननी जी ही पृथ्वी, तिचा लौकिक तुम्ही सर्वत्र पसरविलांत. असे जे तुम्हीं ते सुप्रजावंत व्हा ! तर आतां मला तुमच्या यज्ञांत भाग घेऊं द्या ! ( १०-६२-३ ). अहो अग्निपुत्रहो ! हा नाभानेदिष्ठ तुमच्या यज्ञगृहांत येऊन कल्याणवचन बोलत आहे. तें तुम्ही आदरपूर्वक ऐका ! तुम्हांला सुमंगल असें ब्रह्मतेज लाभो ! अहो सुप्रज्ञ आंगिरसहो ! सांप्रत येथें तुमच्याजवळ नाभानेदिष्ठ हा उपस्थित झाला आहे तर त्याचा तुम्हीं स्वीकार करा. ( १०-६२-४ ).

## रत्न ४१६ वें

हे जे नाना रूपाचे व नाना वर्णांचे अंगिरस महर्षि आहेत, ते मोठे कर्मकुशल आहेत. खरोखर ते पुत्र या नांवाला शोभतात. ते अग्नीपासून निर्माण झाले असल्यामुळें ते अग्नीचेच पुत्र होत. ( १०-६२-५ ).

## रत्न ४१७ वें

स्वतेजानें चमकणाऱ्या या विविधरूपी अंगिरसांमध्यें नवग्व किंबहुना दशग्व हा श्रेष्ठ आहे. तो देवांसह असणारी अग्निदेव मला धन देता झाला ( १०–६२–६ ).

## रत्न ४१८ वें

नाभानेदिष्ठ मानव-ऋषि, विश्वेदेव-देवता, सतोबृहती-छंद

इन्द्रेण युजा निः सृजन्त वाघतो व्रजं गोमन्तमश्विनम् ।
सहस्रं मे ददतो अष्टकर्ण्य१ः श्रवो देवेष्वक्रत ॥

॥ १०·६२-७ ॥

## रत्न ४१९ वें

नाभानेदिष्ठ मानव-ऋषि, सावर्णिदान-देवता, अनुष्टुप्-छंद

प्र नूनं जायतामयं मनुस्तोक्मेव रोहतु ।
यः सहस्रं शताश्वं सद्यो दानाय मंहते ॥ १०-६२-८ ॥
न तमश्नोति कश्चन दिव इव सान्वारभम् ।
सावर्ण्यस्य दक्षिणा वि सिन्धुरिव पप्रथे ॥ १०-६२-९ ॥

## रत्न ४२० वें

नाभानेदिष्ठ मानव-ऋषि, सावर्णिदान-देवता, गायत्री-छंद

उत दासा परिविषे स्मद्दिष्टी गोपरीणसा ।
यदुस्तुर्वश्च मामहे ॥ ॥ १०-६२-१० ॥

## रत्न ४२१ वें

नाभानेदिष्ठ मानव-ऋषि, सावर्णिदान-देवता, त्रिष्टुप्-छंद

सहस्रदा ग्रामणीर्मा रिषन्मनुः सूर्येणास्य यतमानैतु दक्षिणा ।
सावर्णेर्देवाः प्र तिरन्त्वायुर्यस्मिन्नश्रान्ता असनाम वाजम् ॥

॥ १०-६२-११ ॥

### रत्न ४१८ वें

यज्ञकर्म उत्तम रीतीनें पार पाडणारे हे अंगिरस ऋषी इंद्राच्या साहाय्यानें पणींनीं चोरून नेऊन पर्वतांत लपवून ठेविलेले गायी-घोड्यांचे कळप शोधून बाहेर काढते झाले. त्यांनीं मला हजारांनीं धनदान दिलें व परिपुष्ट अशा विपुल गायीहि दिल्या. आणि म्हणून त्यांची कीर्ति देवलोकांतहि जाऊन पसरली. ( १०-६२-७ ).

### रत्न ४१९ वें

पाण्याचा स्पर्श झालेल्या बीजाप्रमाणें कर्म सफल झालेला हा सावर्णि मनु धनपुत्रादिकांनीं लवकर सुसवर्धन पावो ! तो शंभर घोडे व हजार गायी दान देण्यास या ऋषीला प्रेरणा करतो ! ( १०-६२-८ ). त्या सावर्णि मनूला दातृत्वशक्तीनें मागें हटविणारा असा कोणीहि नाहीं. सूर्य जसा तेजानें अप्रतिहत आहे, तद्वत् हा सावर्णि मनु देखील दानकर्मात अजिंक्य आहे. त्या मनूची ही गवादि दक्षिणा महानदीच्या प्रवाहाप्रमाणें पृथ्वीवर पसरत जाते. ( १० ६२-९ ).

### रत्न ४२० वें

आणि सुख देणारें, गोधनसंपन्न व दासाप्रमाणें असणारे यदु व तुर्वश राजर्षि या सावर्णि मनूच्या भोजनाप्रीत्यर्थ पशू पाठवीत असतात. ( १०-६२-१० ).

### रत्न ४२१ वें

गोसहस्राचा दाता व जनपदाचा नेता असा जो सावर्णि मनु तो कोणाकडूनहि वधिला जाणार नाहीं. यानें दिलेली दक्षिणा सूर्याबरोबर जाऊन तिन्ही लोकांत प्रसिद्धि पावो ! या सवर्णपुत्राचें आयुष्य इन्द्रादि देव वृद्धिंगत करोत ! कर्मानुष्ठानांत सदैव दक्ष राहणार आम्ही त्या मनूच्या कृपाछत्राखालीं राहून गोरूप अन्नाची प्राप्ति करून घेऊं ! ( १०-६२-११ ).

## रत्न ४२२ वें

**गयप्लात-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद**

येभ्यो माता मधुमत्पिन्वते पयः पीयूषं द्यौरदितिरद्रिबर्हाः ।
उक्थशुष्मान्वृषभरान्त्स्वप्नसस्ताँ आदित्याँ अनु मदा स्वस्तये ॥

॥ १०-६३-३ ॥

**श्रौ. वि. (अग्नि) धाय्या.** **स्मा. वि. मनुष्यगंध निवारण, घंटानाद**

भरेष्विन्द्रं सुहवं हवामहेऽहोमुचं सुकृतं दैव्यं जनम् ।
अग्निं मित्रं वरुणं सातये भगं द्यावापृथिवी मरुतः स्वस्तये ॥

॥ १०-६३-९ ॥

सुत्रामाणं पृथिवीं द्यामनेहसं सुशर्माणमदितिं सुप्रणीतिम् ।
दैवीं नावं स्वरित्रामनागसमस्रवन्तीमा रुहेमा स्वस्तये ॥

॥ १०-६३-१० ॥

**श्रौ. वि. (प्रायणीयेष्टि) अनुवाक्या. नावारोहण.**

**स्मा. वि. शय्यारोहण. नौकारोहण**

स्वस्ति नः पथ्यासु धन्वसु स्वस्त्य१प्सु वृजने स्वर्वति ।
स्वस्ति नः पुत्रकृथेषु योनिषु स्वस्ति राये मरुतो दधातन ॥

॥ १०-६३-१५ ॥

**श्रौ. वि. (प्रायणीयेष्टि) पथ्यास्वस्ति अनुवाक्या**

## रत्न ४२२ (अ) वें

**बृहस्पतिरांगिरस-ऋषि, ज्ञान-देवता, त्रिष्टुप्-छंद**

सक्तुमिव तितउना पुनन्तो यत्र धीरा मनसा वाचमक्रत ।
अत्रा सखायः सख्यानि जानते भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि ॥

॥ १०-७१-२ ॥

## रत्न ४२२ वें

ज्याच्या प्रीत्यर्थ माता पृथ्वी ही मधुर उदक देते आणि अदीन, मेघा-वेष्टित असा द्युलोक अमृताचा वर्षाव करतो, अशा सर्वसमर्थ, वृष्टिकारक व सच्चरित्र अशा अदिति पुत्रांचें आपल्या कल्याणार्थ, हे ऋषे! स्तवन करून आनंद मान! ( १०-६३-३ ). हांकेसरशी सहज धांवून येणारा व सर्व दुरितांपासून मुक्त करणारा अशा भगवान इन्द्रदेवास आम्ही युद्ध-प्रसंगीं आवाहन करतों. त्याचप्रमाणें पुण्यवान अशा अग्नि, मित्र, वरुण प्रभृति देवतासंघासहि आमच्या संरक्षणार्थ आम्ही हांक मारतों. आणि आमचें कल्याण व्हावें एतदर्थ भग, द्यावा, पृथ्वी व मरुत् यांचाहि धांवा करतों. ( १०-६३-९). उत्तम रक्षण करणारी, अत्यंत विशाल, दोषरहित, सुखकारक, अदीन, आनंदकारक, व्यंगरहित, छिद्ररहित अशी ही यज्ञरूपी दिव्य नाव आम्हीं देवत्व प्राप्त करून घेणेंसाठीं म्हणून आरोहण करतों. ( १०-६३-१० ). अहो मरुत् देवहो! जलयुक्त प्रदेशांत, निर्जल प्रदेशांत, समुद्रादि जलाशयांत, सर्व समरायुधांनीं युक्त अशा शत्रुसैन्यांत, तुम्ही आमचें रक्षण करा! तसेंच प्रजोत्पादक अशा आमच्या पुरुषेन्द्रियाचें व स्त्रियांच्या गर्भेन्द्रियाचें क्षेम करा! आणि आमच्या गवादि पशूंचेंहि कल्याण करा! ( १०-६३-१५ ).

## रत्न ४२२ (अ) वें

सुपानें सातु ज्याप्रमाणें पाखडून स्वच्छ करण्यांत येतात, तद्वत् व्याकरण दृष्टीनें शुद्ध व स्पष्ट बोलणारे असे विद्वान् पंडित जेव्हां विचारपूर्वक भाषण करतात तेव्हां त्यांच्याच तोडीचे जे विद्वान् असतात ते त्या भाषणाचा अर्थ नीट ओळखतात. म्हणून अशा विद्वानांच्या वाणींत कल्याणकारक लक्ष्मी वास करून असते. ( १०-७-१२ ).

## रत्न ४२३ वें

**सिंधुक्षित्-ऋषि, नदी-देवता, जगती-छंद**

प्र सु व आपो महिमानमुत्तमं कारुर्वोचाति सदने विवस्वतः ।
प्र सप्तसप्त त्रेधा हि चक्रमुः प्र सृत्वरीणामति सिन्धुरोजसा ॥
॥ १०-७५-१ ॥

**औ. वि. नदीस्तुति.**

इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोमं सचता परुष्ण्या ।
असिक्न्या मरुद्वृधे वितस्तयाऽऽर्जीकीये शृणुह्या सुषोमया ॥
॥ १०-७५-५ ॥

**स्मा. वि. नदीस्नान, तीर्थालोडन. (कलशांत) जलपूरण**

स्वश्वा सिन्धुः सुरथा सुवासा हिरण्ययी सुकृता वाजिनीवती ।
ऊर्णावती युवतिः सीलमावत्युताधि वस्ते सुभगा मधुवृधम् ॥
॥ १०-७५-८ ॥

सुखं रथं युयुजे सिन्धुरश्विनं तेन वाजं सनिषदस्मिन्नाजौ ।
महान्ह्यस्य महिमा पनस्यतेऽदब्धस्य स्वयशसो विरप्शिनः ॥
॥ १०-७५-९ ॥

## रत्न ४२४ वें

**विश्वकर्मा-भौवन-ऋषि, विश्वकर्मा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात् ।
सं बाहुभ्यां धमति सं पतत्रैर्द्यावाभूमी जनयन्देव एकः ॥
॥ १०-८१-३ ॥

**स्मा. वि. सूर्यप्रदक्षिणा, नेत्रन्यास, मंत्रपुष्पांजलि समर्पणं**

## रत्न ४२३ वें

हे अपोदेवींनो ! मी जो स्तुतिपाठक तो तुमच्या उत्तम महात्म्याची स्तुति, देवांची परिचर्या करूं इच्छिणाऱ्या या यजमानाच्या घरीं बसून गायन करीत आहें. त्या ज्या नद्या आहेत, त्या पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग अशा तीनहि लोकांतून सात सात अशा प्रमाणांत वाहत असतात. आणि त्या वाहणाऱ्या नद्यांत सिंधु ही सामर्थ्यानें सर्वांस हटवून मागें टाकणारी आहे. ( १०-७५-१ ). हे गंगे ! यमुने ! सरस्वति ! शतुद्रि ! परुष्णि ! तुम्ही सर्वांनीं हें माझें स्तोत्र ऐका ! तसेंच असिक्नीसहित असणारे मरुद्वृधे ! आणि वितस्तता व सुषोमा यांसहित वाहणारे आर्जीकीये ! तुम्हीहि पण माझें स्तोत्र श्रवण करा ! ( १०-७५-५ ). सिंधु नदी ही सुंदर घोड्यांनीं संपन्न, सुंदर रथानें युक्त, सुंदर वस्त्रांनीं सुमंडित, सुंदर सुवर्णालंकारांनीं विभूषित आणि तशीच पुण्यशील व अन्नसंपन्न अशी आहे. ती शील नामक तृणानें अलंकृत आहे. अशी ही सिंधु नदी भाग्यसंपन्न असून तिच्या कांठीं मधुवर्धक अशा झाडांची गर्दी झालेली आहे. ( १०-७५-८ ). त्या सिंधूनें आपला सुखकर असा रथ अश्व जोडून सज्ज केला आहे. त्या रथांत बसून येऊन आम्हांस ती अन्नप्रदान करो ! तिच्या अखंड, यशस्वी व प्रचंड घोष करीत धांवणाऱ्या त्या श्रेष्ठ रथाचें महात्म्य संग्रामांत गाइलें जातें. ( १०-७५-९ ).

## रत्न ४२४ वें

त्या विश्वकर्म्या देवाला सर्व बाजूंनीं डोळे आहेत ! सर्व दिशांकडे मुखें आहेत ! चहूंकडे बाहू आहेत ! आणि सर्वत्र पायहि आहेत ! तो बाहूंच्या योगानें स्वर्गास व पायाच्या योगानें पृथ्वीस प्रेरणा करतो. याप्रमाणें स्वर्ग व पृथ्वी यांना चैतन्य देणारा स्वयंप्रकाश असा परमेश्वर तो एकच आहे ! ( १०-८१-३ )

## रत्न ४२५ वें

**मन्यु तापस-ऋषि, मन्यु-देवता, जगती-छंद**

यस्ते मन्योऽविधद्वज्र सायक सह ओजः पुष्यति विश्वमानुषक् ।
साह्याम दासमार्यं त्वया युजा सहस्कृतेन सहसा सहस्वता ॥
॥ १०-८३.१ ॥

**श्रौ. वि.** (आधानयज्ञ) निविद्वान, **स्मा. वि.** सेनानिरीक्षण (संग्रामकालीन)

## रत्न ४२६ वें

**मन्यु तापस-ऋषि, मन्यु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

मन्युरिन्द्रो मन्युरेवास देवो मन्युर्होता वरुणो जातवेदाः ।
मन्युं विश ईळते मानुषीर्याः पाहि नो मन्यो तपसा सजोषाः
॥ १०-८३-२ ॥

अभीहि मन्यो तवसस्तवीयान्तपसा युजा वि जहि शत्रून् ।
अमित्रहा वृत्रहा दस्युहा च विश्वा वसून्या भरा त्वं नः ॥
॥ १०-८३-३ ॥

त्वं हि मन्यो अभिभूत्योजाः स्वयंभूर्भामो अभिमातिषाहः ।
विश्वचर्षणिः सहुरिः सहावानस्मास्वोजः पृतनासु धेहि ॥
॥ १०-८३-४ ॥

अभागः सन्नप परेतो अस्मि तव क्रत्वा तविषस्य प्रचेतः ।
तं त्वा मन्यो अक्रतुर्जिहीळाहं स्वा तनूर्बलदेयाय मेहि ॥
॥ १०-८३-५ ॥

## रत्न ४२५ वें

हे मन्यो ! जो तुझी उपासना करतो, तो भक्त. हे वज्ररूपा ! हे बाणरूपा ! आपल्यांत बल, तेज व पराक्रम यांची अभिवृद्धि करतो. म्हणून आम्ही—जे तुझे भक्त—तुझ्या साहायानें, तुझ्या वीरावेशानें आणि तुझ्या सामर्थ्यानें दास व आर्य अशा दोघांहि शत्रूंचा चक्काचूर करून टाकूं ! ( १०-८३-१ ).

## रत्न ४२६ वें

मन्यु हा इंद्र आहे. मन्यु हा देव आहे. मन्यु हा सोमनिष्पादक अग्नि आहे आणि तसाच जातप्रज्ञ वरुणहि आहे! जे मनुष्य होऊन जन्मले आहेत, ते सर्व जन या मन्यूचीच स्तुति करतात. तर हे मन्यो ! आमच्या पितरांवर प्रेम करणारा असा तूं तीव्र वीरवृत्ति धारण करून आमचें रक्षण कर ( १०-८३-२ )! हे मन्यो ! बलवानांतला तूं बलवान आहेस ! तर तूं या आमच्या यज्ञमंडपांत ये ! आणि आमच्या पितरांच्या सहायानें आमच्या शत्रूंना ठार कर! आमचे जे अमित्र आहेत त्यांचा तूं कर्दनकाळ आहेस ! वृत्रासुराचा तूं मर्दन करणारा आहेस ! आणि दस्यूंची खोड जिरवणारा आहेस ! म्हणून प्रार्थना ही की, तूं या सर्व लोकांची संपत्ति लुटून आमच्याकडे घेऊन ये ( १०-८३-३ )! हे मन्यो ! शत्रूचा नक्षा उतरविण्यास तूं समर्थ आहेस ! तूं स्वयंभू क्रोधमूर्ति आहेस ! शत्रूंचा फडशा पाडणारा आहेस ! सर्व द्रष्टा आहेस ! सहनशील आहेस ! अतएव, तूं आमच्या सैनिकांत लढाईत वीरावेश उत्पन्न कर ! ( १०-८३-४ ). हे ज्ञानी मन्यो ! यज्ञसमारंभांत तुझें पूजन न केल्यामुळें मी रणांत पराभव पावून देशोधडीस लागलों आहें. तुझी उपासना न केल्यामुळें, हे मन्यु देवा! मीं तुला क्रोध उत्पन्न केला आहे. तर आतां कृपा करून माझ्या क्षीणबल शरीरांत वीरश्री चमकण्याकरतां तूं आतां माझ्याजवळ येऊन रहा ! ( १०-८३-५ )

अयं ते अस्म्युप मेह्यर्वाङ् प्रतीचीनः सहुरे विश्वधायः ।
मन्यो वज्रिन्नभि मामावंवृत्स्व हनाव दस्यूँरुत बोंध्यापेः ॥

॥ १०-८३-६ ॥

अभि प्रेहि दक्षिणतो भवा मेऽधा वृत्राणि जङ्घनाव भूरि ।
जुहोमि ते धरुणं मध्वो अग्रमुभा उपांशु प्रथमा पिबाव ॥

॥ १०-८३-७ ॥

## रत्न ४२७ वें

**मन्यु तापस-ऋषि, मन्यु-देवता, त्रिष्टुप्-छंद**

त्वया मन्यो सरथमारुजन्तो हर्षमाणासो धृषिता मरुत्वः ।
तिग्मेषव आयुधा संशिशाना अभि प्र यन्तु नरो अग्निरूपाः ॥

॥ १०-८४-१ ॥

**श्रौ. वि. (एकाह) मरुत्वतीय शस्त्र निविद्धान**

**स्मा. वि. (संग्राम) सेनानिरीक्षण.**

अग्निरिव मन्यो त्विषितः सहस्व सेनानीर्नः सहुरे हूत एधि ।
हत्वाय शत्रून्वि भजस्व वेद ओजो मिमानो वि मृधो नुदस्व ॥

॥ १०-८४-२ ॥

सहस्व मन्यो अभिमातिमस्मे रुजन्मृणन्प्रमृणन्प्रेहि शत्रून् ।
उग्रं ते पाजो नन्वा रुरुध्रे वशी वशं नयस एकज त्वम् ॥

॥ १०-८४-३ ॥

हे सहनशीला ! हा मी आतां तुझा झालों आहें. तर तूं आतां मजकडे वळ ! हे दुष्टमर्दना ! हे विश्वंभरा ! हे मन्यु देवा ! हे वज्रधरा ! माझ्याकडे तोंड कर ! आपण दोघे मिळून शत्रूला तलवारीचें चांगलें पाणी पाजूं ! आणि मग तूं आम्हांस चार बुद्धीच्या गोष्टी सांग ( १०-८३-६ ). हे मन्यो ! असा पुढें ये ना ! माझ्या उजवीकडे उभा रहा ! आपण दोघे मिळून शत्रूंचा-ते असंख्य असले तरी-पार त्या सर्वांचा चांगला धुव्वा उडवून देऊं ! मी तुला मधुर व उत्कृष्ट असा सोमरस अर्पण करतों. तूं आणि मी तो रस अगोदर प्राशन करूं या (१०-८३-७).

## रत्न ४२७ वें

हे मन्यो ! तुझ्या सहायानें आमचे वीर एकसारख्या रथांत बसून मोठया हर्षानें व त्वेषानें रणसंग्राम गाजविणारे आहेत. त्यांचे बाण प्रखर असून आयुधें नीट पाजळून अत्यंत तीक्ष्ण केलेली आहेत. अग्नीप्रमाणें प्रखर असलेले हे आमचे रणगाजी वीर शत्रूवर चाल करून मोठया आवेशानें त्यांची फळी फोडून पुढें सरसावोत ! आणि त्यांच्यावर तुटून पडून, त्यांची दाणादाण करोत ! (१०-८४-१). हे मन्यो ! अग्नीप्रमाणें तूं लालबुंद होऊन, शत्रूंचा पार धुव्वा उडवून दे ! हे शत्रूमर्दना ! आम्ही युद्धांत तुझा कळकळीनें धांवा करीत आहों. तर तूं येथें येऊन आमच्या सेनागणाचा नायक हो आणि शत्रूचा फडशा पाडून त्यांची संपत्ति आम्हांला विभागून दे ! तसेंच आमच्यांत सामर्थ्य खुलवून घातकी शत्रूंचा नायनाट कर ! (१०-८४-२). हे मन्यो ! आमच्यावर चाल करून येणाऱ्या दुष्ट शत्रूंचा चेंदामेंदा कर ! त्यांचे हाल हाल कर ! त्यांना ठार मार आणि पुढें सर ! तुझ्या उग्र व तीक्ष्ण तेजोबलापुढें कोणाचा तरी टिकाव लागला आहे, असें कधीं झालें आहे काय ? तूं एकाकी असलास तरी सर्वांना आपल्या कह्यांत ठेवण्यास सर्वथैव समर्थ आहेस ! (१०-८४-३).

## रत्न ४२८ वें

**मन्यु तापस-ऋषि, मन्यु-देवता, जगती-छंद**

एको बहूनामसि मन्यवीळितो विशंविशं युधये सं शिशाधि ।
अकृत्तरुक्त्वया युजा वयं द्युमन्तं घोषं विजयाय कृण्महे ॥

॥ १०-८४-४ ॥

**औ. वि. (एकाह) मारुत्वतीयशास्त्र, स्मा. वि. मन्यु सूक्त, सेनानिरीक्षण.**

विजेषकृदिन्द्र इवानवब्रवो३ऽस्माकं मन्यो अधिपा भवेह ।
प्रियं ते नाम सहुरे गृणीमसि विद्मा तमुत्सं यत आबभूथ ॥

॥ १०-८४-५ ॥

आभूत्या सहजा वज्र सायक सहो बिभर्ष्यभिभूत उत्तरम् ।
क्रत्वा नो मन्यो सह मेद्येधि महाधनस्य पुरुहूत संसृजि ॥

॥ १०-८४-६ ॥

संसृष्टं धनमुभयं समाकृतमस्मभ्यं दत्तां वरुणश्च मन्युः ।
भियं दधाना हृदयेषु शत्रवः पराजितासो अप नि लयन्ताम् ॥

॥ १०-८४-७ ॥

## रत्न ४२९ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सोम-देवता, अनुष्टुप्-छंद**

सत्येनोत्तभिता भूमिः सूर्येणोत्तभिता द्यौः ।
ऋतेनादित्यास्तिष्ठन्ति दिवि सोमो अधि श्रितः ॥

॥ १०-८५-१ ॥

**स्मा. वि. (विवाह) वधूपठण मंत्र**

## रत्न ४२८ वें

हे मन्यो ! तूं एकटाच अनेक शत्रूना भूमीवर लोळविण्यास पूर्ण समर्थ आहेस ! आमच्या प्रत्येक घरांतील वीराला रणसंग्राम गाजविण्यासाठीं उत्तम प्रोत्साहन देऊन, त्यांना जय्यत तयार कर! हे अक्षयकांति मन्यो! तुझें सहाय मिळालें म्हणजे आम्ही विजयश्री मिळविण्याकरतां प्रचंड रणघोष करूं ! ( १०-८४-४ ).

हे मन्यु देवा ! इन्द्राप्रमाणें तूं विजयदाता आहेस ! तसाच पण अनिंद्य आहेस ! तर हे देवा ! तूंच आमचा या रणयज्ञांत रक्षणकर्ता हो ! हे शत्रु-दमना! तुझ्या गोड नांवाचेंच आम्ही स्तुतिस्तोत्र गातों आणि जेथून तूं प्रकट होत असतोस तो झराहि पण आम्ही जाणतों. (१०-८४-५).

हे वज्ररूपा ! सर्ववश सामर्थ्यासह तूं प्रकट होत असतोस. हे रिपुरंतका ! तूं सर्वोत्कृष्ट सामर्थ्य धारण करणारा आहेस ! हे विश्वविजया ! हे बहुजनस्तुत मन्यो ! तूं आपल्या कर्तृत्वानें पुष्कळ संपत्ति लूट म्हणून मिळवून देणाऱ्या या उग्र संग्रामांत आमच्याजवळ मित्रभावानें येऊन राहण्याची कृपा कर ! ( १०-८४-६ ).

एकत्र मिसळलेलें व एकत्र केलेलें दिव्य व ऐहिक असें हें जें उभयविध धन आहे, तें वरुण व मन्यु देव मला अर्पण करते झाले आणि आमच्या शत्रूंच्या छातींत धडकी भरून ते पराभूत होत्साते विलयास गेले ! ( १०-८४-७ ).

## रत्न ४२९ वें

पृथ्वीला सत्याचा म्हणजे ब्रह्माचा आधार आहे. आकाशाला सूर्याचा आणि आदित्यांना यज्ञाचा आधार असून, सोम हा स्वर्गाच्या आश्रयानें राहतो. ( १०-८५-१ ).

सोमेनादित्या बलिनः सोमेन पृथिवी मही ।
अथो नक्षत्राणामेषामुपस्थे सोम आहितः ।। १०-८५-२ ।।
सोमं मन्यते पपिवान्यत्संपिंषन्त्योषधिम् ।
सोमं यं ब्रह्माणो विदुर्न तस्याश्नाति कश्चन ।।
।। १०-८५-३ ।।
आच्छद्विधानैर्गुपितो बार्हतैः सोम रक्षितः ।
ग्राव्णामिच्छृण्वन्तिष्ठसि न ते अश्नाति पार्थिवः ।।
।। १०-८५-४ ।।
यत्त्वा देव प्रपिबन्ति तत आ प्यायसे पुनः ।
वायुः सोमस्य रक्षिता समानां मास आकृतिः ।।
।। १०-८५-५ ।।

## रत्न ४३० वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सूर्याविवाह-देवता, अनुष्टुप्-छंद**

रैभ्यासीदनुदेयी नाराशंसी न्योचनी ।
सूर्याया भद्रमिद्वासो गाथयैति परिष्कृतम् ।। १०-८५-६ ।।

**श्रौ. वि. सूर्याविवाह**

चित्तिरा उपबर्हणं चक्षुरा अभ्यञ्जनम् ।
द्यौर्भूमिः कोश आसीद्यदयात्सूर्या पतिम् ।। १०-८५-७ ।।
स्तोमा आसन्प्रतिधयः कुरीरं छन्द ओपशः ।
सूर्याया अश्विना वराऽग्निरासीत्पुरोगवः ।। १०-८५-८ ।।
सोमो वधूयुरभवदश्विनास्तामुभा वरा ।
सूर्यां यत्पत्ये शंसन्तीं मनसा सविताददात् ।।
।। १०-८५-९ ।।

या सोमामुळेंच देव बलवान झाले, सोमामुळेंच पृथ्वीला महत्त्व लाभलें. म्हणून नक्षत्रांमध्यें या सोमाला ( चंद्राला ) अग्रस्थान प्राप्त झालें आहे. ( १०-८५-२ ). वल्लीरूप ओषधीचा रस काढून पिणारे आपण सोम प्यालों असें समजत असतात. पण ब्राह्मण (ज्ञाते) ज्याला सोम समजतात, तो मात्र मानवांना प्यावयास मिळत नाहीं ! (१०-८५-३ ). हे सोमा ! आच्छादक साधनें असलेल्यांनीं तुला झांकून ठेविलें आहे व स्वानभ्राजादि सप्त सोमपालांनीं तुझें रक्षण केलें आहे. अशा प्रकारचा तूं ग्राव्यांचा म्हणजे दगडांचा आवाज मात्र ऐकत असतोस. पण पृथ्वीवरला मनुष्य तुला भक्षण करूं शकत नाहीं. (१०-८५-४ ). फक्त देवच तेवढे तुझा उपभोग घेत असतात. तरी पण चमत्कार हा कीं तूं पुनः पुनः वाढतच असतोस. वायु हा सोमाचा रक्षक असून, वर्षांचे वसंतादि जे ऋतु आहेत, ते या सोमामुळेंच उत्पन्न होतात. (१०-८५-५ )

## रत्न ४३० वें

रैभी ( नांवाचे मंत्र ) व नाराशंसी ( नांवाचे मंत्र ) ह्या वधूबरोबर जाणाऱ्या तिच्या दासी झाल्या. नवरी मुलगी जी ही सूर्या तिचें वस्त्र सुंदर असून, तें गाथेनें अलकृत केलेलें होतें ( १०-८५-६ ). जेव्हां सूर्या ( सूर्य कन्या ) ही पतिगृहीं जावयास निघाली, त्या वेळचा काय सांगावा तो थाट ! चित्ति ( विचार ) हा त्या वेळी तिचा तक्या असून, डोळ्याला सुंदर काजळ होतें ! आकाश व पृथ्वी हें तिचें अलंकार-भांडार होतें ( १०-८५-७ ) ! वेदसूक्तें हे तिच्या रथाचे कठडे असून, कुरीर छंद हा त्या रथाचा शिरोभाग होता. अश्विनी कुमार हे तिचें पाणिग्रहण करण्यासाठीं आलेले नवरदेव असून, अग्नि हा त्यांच्यांत सर्वांत पुढें चालला होता ( १०-८५-८ ). सूर्य देवाने जेव्हां आपल्या उपवर कन्येला म्हणजे सूर्येला पति करून देणेचें मनांत आणलें, तेव्हां सोम हा तिला मागणी घालता झाला, आणि अश्विनी कुमारांनीहि पण तीच इच्छा दर्शविली ( १०-८५-९ ).

मनो अस्या अन आसीद् द्यौरासीदुत च्छदिः ।
शुक्रावनड्वाहावास्तां यदयात्सूर्या गृहम् ॥ १०-८५-१० ॥

ऋक्सामाभ्यामभिहितौ गावौ ते सामनावितः ।
श्रोत्रं ते चक्रे आस्तां दिवि पन्थाश्चराचरः ॥
॥ १०-८५-११ ॥

शुची ते चक्रे यात्या व्यानो अक्ष आहतः ।
अनो मनस्मयं सूर्याऽऽरोहत्प्रयती पतिम् ॥
॥ १०-८५-१२ ॥

सूर्याया वहतुः प्रागात्सविता यमवासृजत् ।
अघासु हन्यन्ते गावोऽर्जुन्योः पर्युह्यते ॥
॥ १०-८५-१३ ॥

## रत्न ४३१ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सूर्याविवाह-देवता, त्रिष्टुप्-छंद**

यदश्विना पृच्छमानावयातं त्रिचक्रेण वहतुं सूर्यायाः ।
विश्वे देवा अनु तद्वामजानन्पुत्रः पितराववृणीत पूषा ॥
॥ १०-८५-१४ ॥

## रत्न ४३२ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सूर्याविवाह-देवता, अनुष्टुप्-छंद**

यदयातं शुभस्पती वरेयं सूर्यामुप ।
क्वैकं चक्रं वामासीत्क्व देष्ट्राय तस्थथुः ॥ १०-८५-१५ ॥

ही सूर्या जेव्हां पतिगृहीं जावयास निघाली तेव्हां मन हा तिचा रथ होता आणि आकाश हें त्या रथाचें छत्र होतें. सूर्य व चंद्र असे हे दोन उमदे तेजस्वी बैल त्या रथाला जोडलेले होते (१०-८५-१०)! हे सूर्ये! ऋग्वेद व सामवेद-रूपी दोऱ्यांनीं बांधलेले ते सूर्यचंद्ररूपी बैल सारखे जोडीनें चालत होते. तुझे कर्ण हींच तुझ्या रथाचीं चाकें असून, आकाशांत तुझा रस्ता सुगम व सरळ असा होता. (१०-८५-११). रथांत बसून निघालेल्या त्या सूर्येचे कान तिच्या रथाचीं चाकें झालीं असून, वायु हा त्या रथाचा आंस (अक्ष) झाला होता. अशा मनोमय रथांत सूर्या ही आपल्या पतिगृहीं जावयास म्हणून चढून बसली (१०-८५-१२). काय सांगावा त्या वेळचा तो वरातीचा थाट! त्या सविता देवानें सूर्येला सासरीं पाठवितांना जो तिला गवादिकांचा नजराणा दिला होता, तो आधींच तिकडे गेला होता! मघा नक्षत्रावर गाईंना काठीनें मारून कन्येच्या सासरीं पाठवतात, पण कन्येला मात्र फल्गुनी नक्षत्रावर सासरीं पोंचती करतात (१०-८५-१३).

## रत्न ४३१ वें

अहो अश्विनी कुमार हो! तीन चाकी रथांत बसून जेव्हां तुम्ही सूर्येला विवाहांत मागणी घालण्यासाठीं आला होतां, तेव्हां सगळ्या देवांनीं तुम्हांला संमति दिली होती. आणि तुमचा पुत्र-जो पूषा-तो झाला तरी आपली पसंती दर्शवूनच होता. नाहीं काय? (१०-८५-१४).

## रत्न ४३२ वें

अहो अश्विनी देव हो! सूर्येला वरण्यासाठीं जेव्हां तुम्ही सवित्याच्या घरीं आला, त्या वेळीं तुमच्या रथाचें हें चाक कोठें होतें? आणि सूर्येला मागणी घालावयाच्या वेळीं तुम्ही कोठें राहत होता? (१०-८५-१५)

द्वे ते चक्रे सूर्ये ब्रह्माण ऋतुथा विदुः ।
अथैकं चक्रं यद्गुहा तदद्धातय इद्विदुः ॥ १०-८५-१६ ॥

## रत्न ४३३ वें

सूर्यासावित्री-ऋषिका, देव-देवता, अनुष्टुप्-छंद

सूर्यायै देवेभ्यो मित्राय वरुणाय च ।
ये भूतस्य प्रचेतस इदं तेभ्योऽकरं नमः ॥ १०-८५-१७ ॥

## रत्न ४३४ वें

सूर्या सावित्री-ऋषिका, सोमार्क-देवता, जगती-छंद

पूर्वापरं चरतो माययैतौ शिशू क्रीळन्तौ परि यातो अध्वरम् ।
विश्वान्यन्यो भुवनाभिचष्ट ऋतूँरन्यो विदधज्जायते पुनः ॥
॥ १०-८५-१८ ॥

स्मा. वि (विवाह) वधूनें करावयाचा आज्य होम

## रत्न ४३५ वें

सूर्या सावित्री-ऋषिका, चन्द्रमा-देवता, त्रिष्टुप्-छंद

नवोनवो भवति जायमानोऽह्नां केतुरुषसामेत्यग्रम् ।
भागं देवेभ्यो वि दधात्यायन्प्र चन्द्रमास्तिरते दीर्घमायुः ॥
॥ १०-८५-१९ ॥

श्रौ. वि. (चंद्रमासेष्टि) याज्या. स्मा. वि. पुण्याहवाचन, वधूवर आशीर्वाद

## रत्न ४३६ वें

सूर्या सावित्री-ऋषिका, आशी-देवता, त्रिष्टुप्-छंद

सुकिंशुकं शल्मलिं विश्वरूपं हिरण्यवर्णं सुवृतं सुचक्रम् ।
आ रोह सूर्ये अमृतस्य लोकं स्योनं पत्ये वहतुं कृणुष्व ॥
॥ १०-८५-२० ॥

श्रौ. वि. आशीर्वाद

हे सूर्ये ! तुझ्या रथाचीं जीं दोन चाकें आहेत, तीं ब्राह्मण हे ऋतूंवरून ओळखतात. परंतु तिसरें जें संवत्सरात्मक चाक आहे, तें मात्र फक्त ज्ञानीच ओळखूं शकतात ( १०-८५-१६ ).

## रत्न ४३३ वें

सूर्यपत्नीला, देवांना, मित्राला, वरुणाला आणि सूज्ञ अशा सकल भूतजाताला हा माझा—या सूर्येचा—नमस्कार असो ! (१०-८५-१७)

## रत्न ४३४ वें

पूर्व व पश्चिम या दिशांमध्यें स्वतःच्या मायाशक्तीनें शिशूप्रमाणें क्रीडा करणारे हे सूर्यचंद्र भक्तांच्या यज्ञशालेकडे येत असतात. त्यांपैकीं सूर्य हा विश्वाची पाहणी करीत असतो व दुसरा म्हणजे चंद्र हा ऋतु निर्माण करीत पुनः पुनः वृद्धिक्षय पावत असतो. ( १०-८५-१८ )

## रत्न ४३५ वें

चंद्र हा प्रतिदिवस एकेक कलेनें वाढत जात असल्यामुळें तो दररोज नवा नवा असा होतो. दिवसाचा गमक असा जो सूर्य तो उषेच्यापुढें येतो; आणि येऊन देवांना दररोज त्यांचा त्यांचा हविर्भाग त्यांना विभागून देतो, आणि चंद्र दीर्घायुष्य वाढवितो. (१०-८५-१९).

## रत्न ४३६ वें

हे सूर्ये ! हा नानारूपांनीं युक्त व सुवर्ण अलंकारांनीं विभूषित असा जो तुझा सुंदर रथ आहे, तो शाल्मली वृक्षाचा बनविलेला असून, तो रेशमी वस्त्रानें आच्छादून उत्तम सुशोभित केलेला आहे. त्याचीं चाकें सुन्दर असून तो रथ सहज चालत जातो. त्यावर तूं आतां चढून बैस आणि सुखकारक असा जो अमृत-लोक त्याप्रत पतीसाठीं जाऊन सुखरूप पोंच ! (१०-८५-२०).

उदीर्ष्वातः पतिवती ह्येईषा विश्वावसुं नमसा गीर्भिरीळे ।
अन्यामिच्छ पितृषदं व्यक्तां स ते भागो जनुषा तस्य विद्धि ॥
॥ १०-८५-२१ ॥

## रत्न ४३७ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, आशी-देवता, अनुष्टुप्-छंद**

उदीर्ष्वातो विश्वावसो नमसेळामहे त्वा ।
अन्यामिच्छ प्रफर्व्यं१ सं जायां पत्या सृज ॥
॥ १०-८५-२२ ॥

## रत्न ४३८ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, आशी-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अनृक्षरा ऋजवः सन्तु पन्था येभिः सखायो यन्ति नो वरेयम् ।
समर्यमा सं भगो नो निनीयात्सं जास्पत्यं सुयममस्तु देवाः ॥
॥ १०-८५-२३ ॥

प्र त्वा मुञ्चामि वरुणस्य पाशाद्येन त्वाबध्नात्सविता सुशेवः ।
ऋतस्य योनौ सुकृतस्य लोकेऽरिष्टां त्वा सह पत्या दधामि ॥
॥ १०-८५-२४ ॥

**श्रौ. वि. पत्नीयोक्त्र विमोचन**

## रत्न ४३९ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, आशी-देवता, अनुष्टुप्-छंद**

प्रेतो मुञ्चामि नामुतः सुबद्धाममुतस्करम् ।
यथेयमिन्द्र मीढ्वः सुपुत्रा सुभगासति ॥ १०-८५-२५ ॥

**स्मा. वि. विवाहमंत्र**

हे विश्वावसो! इकडे बघ! ही सूर्या आतां पतिवती झाली आहे. म्हणून तूं आतां तिच्याजवळून ऊठ! तुला हात जोडून मी हें सांगत आहें. बापाच्या घरीं अविवाहित असलेली दुसरी एखादी कुमारी पाहून तूं तिची इच्छा कर. कारण ती तुझा भाग आहे असें समज. (१०-८५-२१).

## रत्न ४३७ वें

हे विश्वावसो! आतां तूं येथून उठशील तर बरें होईल! तुला हात जोडून मी विनंति करतें कीं जी कोणी दुसरी कुमारी तुझी इच्छा करीत असेल, तिजकडे तूं खुशाल जा! दुसऱ्याची पत्नी झालेली मी त्या माझा आतां माझ्या पतीशीं संयोग घडूं दे! (१०-८५-२२)

## रत्न ४३८ वें

अहो देवहो! ज्या मार्गांनीं वराकडची वऱ्हाडी मंडळी कन्येच्या पित्याकडे आली, ते मार्ग निष्कंटक व सरळ असोत! अर्यमा आणि भग हे आम्हांला सुखरूपपणें आमच्या इष्ट स्थळीं पोंचते करोत! हे देवहो! हें नवराबायकोचें नवदांपत्य चांगलें ऐक्यानें राहून मोठ्या सुखानंदांत नांदो! (१०-८५-२३) हे वधू! तुझा वैभवसंपन्न पिता जो सवितादेव त्यानें तुला ज्या पाशानें येथें बांधून ठेविलें होतें, त्या वरुण देवाच्या पाशांतून मी तुला आतां मुक्त करतों. सृष्टिनियम पाळून गृहस्थ धर्माचें आचरण करण्यासाठीं मी तुला सुरक्षित अशी या यजनस्थानीं तुझ्या या पतीशीं गांठ घालून देतों (१०-८५-२४).

## रत्न ४३९ वें

मी तुला आतां तुझ्या पितृकुलांतून मुक्त करून, या पतीच्या कुलांत दृढबद्ध करून ठेवितों. हे वीर्यसेचक इन्द्र देवा! ही वधू सुपुत्रवती व भाग्यशालिनी होईल असें कर! (१०-८५-२५)

## रत्न ४४० वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, आशी-देवता, त्रिष्टुप्-छंद**

पूषा त्वेतो नयतु हस्तगृह्याऽश्विना त्वा प्र वहतां रथेन ।
गृहान्गच्छ गृहपत्नी यथासो वशिनी त्वं विदथमा वदासि ॥

॥ १०-८५-२६ ॥

**श्रौ. वि. यानारोहण** **स्मा. वि. (विवाह) रथारोहण**

## रत्न ४४१ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, आशी-देवता, जगती-छंद**

इह प्रियं प्रजया ते समृध्यतामस्मिन्गृहे गार्हपत्याय जागृहि ।
एना पत्या तन्वं१ सं सृजस्वाऽधा जिव्री विदथमा वदाथः ॥

॥ १०-८५-२७ ॥

**श्रौ. वि. गृहप्रवेश** **स्मा. वि. (विवाह) वधूवरगृहप्रवेश.**

## रत्न ४४२ वें

**सूर्यासावित्री-ऋषि, आशी-देवता, अनुष्टुप्-छंद**

नीललोहितं भवति कृत्यासक्तिर्व्यज्यते ।
एधन्ते अस्या ज्ञातयः पतिर्बन्धेषु बध्यते ॥ १०.८५-२८ ॥

**स्मा. वि. (विवाह) वधूवर-वस्त्र ग्रंथिबंधन, (कंकण-बंधन)**

## रत्न ४४३ वें

**सूर्यासावित्री-ऋषिका, वधूवास संस्पर्शनिंदा-देवता, अनुष्टुप्-छंद**

परा देहि शामुल्यं ब्रह्मभ्यो वि भजा वसु ।
कृत्यैषा पद्वती भूत्वया जाया विशते पतिम् ॥

॥ १०-८५-२९ ॥

## रत्न ४४० वें

हे वधू! पूषा देव तुला हात धरून घेऊन जावो! अश्विनी कुमार तुला रथांत बसवून घेऊन स्वस्थानीं प्रयाण करोत! तूं आपल्या पतीच्या घरीं जा आणि तेथें गृहस्वामिनी हो! सर्वांना आपल्या मुठींत ठेवूं इच्छिणारी तूं सासरच्या घरांतील मंडळीशीं प्रेमादरयुक्त असें गोड भाषण बोलत जा! (१०-८५-२६).

## रत्न ४४१ वें

हे वधू! हें नवीन घर तूं पतीशीं प्रामाणिक व प्रेमळ राहून, आपल्या संततीनें सुसमृद्ध कर! त्या घरांत सदैव गृहकार्यांत जागरूक राहून, तूं गृहिणी धर्माचें उत्तम पालन कर! या पतीच्या देहाशींच तूं आपला दैहिक संबंध ठेव! अहो दंपतींनो! तुम्ही पुष्कळ दिवस जगून रहा आणि घरांतील मंडळीशीं प्रिय व गोड भाषण बोलत जा! (१०-८५-२७).

## रत्न ४४२ वें

अभिचार देवता ही तांबडी व निळी अशा रूपाची आहे. अशा प्रकारची ही कृत्या वधूच्या मलिन वस्त्रांतून दडून बसलेली असते. तिला मी आतां बाहेर घालवून देतों. ती निघून गेली म्हणजे या वधूचा संसार वाढीस लागेल आणि पति तिच्या संसारकृत्यांत दृढ बंधनानें बांधला जाईल. (१०-८५-२८).

## रत्न ४४३ वें

हें शरीरमलानें मलिन झालेलें वस्त्र तूं आतां टाकून दे! आणि ब्राह्मणांस वस्त्रधनादि दान कर! नाहीं तर ही मळकट वस्त्रांत दडून बसलेली कृत्या पादयुक्त होऊन बायको रूपाने नवऱ्याच्या शरिरांत शिरून बसेल! (१०-८५-२९).

अश्रीरा तनूर्भवति रुशती पापयामुया ।
पतिर्यद्वध्वो३ वाससा स्वमङ्गमभिधित्सते ॥

॥ १०-८५-३० ॥

## रत्न ४४४ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, क्षयरोग नाशिनी देवता, अनुष्टुप्-छंद**

ये वध्वश्चन्द्रं वहतुं यक्ष्मा यन्ति जनादनु ।
पुनस्तान्यज्ञिया देवा नयन्तु यत आगताः ॥

॥ १०-८५-३१ ॥

## रत्न ४४५ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सूर्यासावित्री-देवता, अनुष्टुप्-छंद**

मा विंदन्परिपन्थिनो य आसीदन्ति दम्पती ।
सुगेभिर्दुर्गमतीतामप द्रान्त्वरातयः ॥ १०-८५-३२ ॥

**श्रौ. वि. (विवाह वधूप्रयाण) याज्या**

सुमङ्गलीरियं वधूरिमां समेत पश्यत ।
सौभाग्यमस्यै दत्वायाऽथास्तं वि परेतन ॥ १०-८५-३३ ॥

**स्मा. वि. (विवाह) अश्मारोहण, वधूला आशीर्वाद**

## रत्न ४४६ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सूर्या सावित्री-देवता, उरोबृहती-छंद.**

तृष्टमेतत्कटुकमेतदपाष्ठवद्विषवन्नैतदत्तवे ।
सूर्यां यो ब्रह्मा विद्यात्स इद्वाधूयमर्हति ॥ १०-८५-३४ ॥

**स्मा. वि. (विवाह) वधूचा पुराण वस्त्रत्याग.**

पति जर वधूच्या मलिन वस्त्रानें आपलें अंग झांकूं पाहील तर ह्या दुष्ट कृत्येच्या स्पर्शानें त्याचें तेजस्वी शरीर निस्तेज बनेल ! ( १०-८५-३० ).

## रत्न ४४४ वें

क्षयरोगादि सारखे जे आनुवंशिक रोग वधूबरोबर माहेरून पतिगृहीं येत असतात, त्या सर्वांना यज्ञांतील देव ते जेथून आले असतील तेथें परत नेऊन पोंचवोत ! ( १०-८५-३१ ).

## रत्न ४४५ वें

वाटमारे असे जे दुष्ट बेरड आहेत, त्यांचा उपद्रव या दंपतीना प्रवासांत न होवो! हीं दोघें अवघड प्रदेशांतून सुरक्षित सुटून सरळ मार्गानें सुखरूप आपल्या घरीं जाऊन पोंचोत ! ( १०-८५-३२ ) ही वधू मोठी शुभलक्षणी आहे ! तिला हे सभ्यजन हो ! तुम्ही येऊन पहा ! आणि पाहून परत जातांना शुभाशीर्वाद द्या ! आणि मग आल्या मार्गानें आपापल्या घरीं परत जा ! ( १०-८५-३३ ).

## रत्न ४४६ वें

हें वधूचें वस्त्र खरबरीत आहे. तें मळकट आहे. तें जीर्ण व पचपचीत झालें आहे. म्हणून तें विषाप्रमाणें आतां टाकाऊ झालें आहे. तें आतां वापरण्यास योग्य नाहीं. जो ब्राह्मण या सूर्येला उत्तम जाणतो, तोच या वधू-वस्त्राला योग्य आहे ( १०-८५-३४ ).

## रत्न ४४७ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सूर्या सावित्री-देवता, अनुष्टुप्-छंद**

आशसनं विशसनमथो अधिविकर्तनम् ।
सूर्यायाः पश्य रूपाणि तानि ब्रह्मा तु शुन्धति ॥

॥ १०-८५-३५ ॥

**स्मा. वि. (विवाह) वधूनें करावयाचें नूतन वस्त्रधारण.**

## रत्न ४४८ वें

**सूर्या सावित्री-ऋषिका, सूर्यासावित्री-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः ।
भगो अर्यमा सविता पुरन्धिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥

॥ १०-८५-३६ ॥

**औ. वि. पाणिग्रहण.** **स्मा. वि. (विवाह) पाणिग्रहण.**

तां पूषञ्छिवतमामेरयस्व यस्यां बीजं मनुष्या३ वपन्ति ।
या न ऊरू उशती विश्रयाते यस्यामुशन्तः प्रहराम शेपम् ॥

॥ १०-८५-३७ ॥

## रत्न ४४९ वें

**सूर्या सावित्री ऋषिका, सूर्यासावित्री-देवता, अनुष्टुप्-छंद.**

तुभ्यमग्रे पर्यवहन्त्सूर्यां वहतुना सह ।
पुनः पतिभ्यो जायां दा अग्ने प्रजया सह ॥ १०-८५-३८ ॥

**स्मा. वि. (विवाह) अग्नि-परिक्रमण.**

पुनः पत्नीमग्निरदादायुषा सह वर्चसा ।
दीर्घायुरस्या यः पतिर्जीवाति शरदः शतम् ॥

॥ १०-८५-३९ ॥

## रत्न ४४७ वें

आशसन, विशसन व अधिविकर्तन अशीं तीन वस्त्रें या सूर्येच्या अंगावर असून, त्या वस्त्राच्या रूपांकडे पहा. तीं वस्त्रें अमंगल असल्यामुळें, त्या सूर्येला जाणणारा ब्राह्मणच तिला त्या वस्त्रांपासून दूर करूं शकतो. ( १०-८५-३५ ).

## रत्न ४४८ वें

हे वधू ! आम्हा उभयतांच्या कल्याणासाठी मी तुझें पाणिग्रहण करतों. मी – हा जो तुझा पति— त्याच्या जवळ तूं वृद्ध होईतोंपर्यंत रहा ! भग, अर्यमा, सविता, पुरन्धि या देवांनीं मी गृहस्थधर्माचें यथासांग आचरण करावें, म्हणून तुला माझ्या स्वाधीन केली आहे ( १०-८-३६ ). हे पूषन् ! जिच्या ठिकाणीं मनुष्य बीजारोपण करितो, जी कामोत्सुक होऊन माझ्या मांड्यांची इच्छा करते, आणि कामोत्सुक असणारा मी जिचे ठिकाणी लिंगाघात करूं इच्छितों अशा या सुंदर स्त्रीचें मन माझ्या ठिकाणीं तल्लीन होवो ! ( १०-८५-३७ ).

## रत्न ४४९ वें

हे अग्निदेवा ! ही सूर्या प्रथम तुलाच दिली होती. तर आतां तूं ही वधू–मी जो इचा पति–त्या पतीच्या स्वाधीन करून, तिजपासून त्याला उत्तम संतति प्राप्त होईल असें कर ! ( १०–८५–३८ ). उदंड आयुष्य व सुंदर तेज यांसह ही वधू अग्निदेवानें पुनः पतीच्या स्वाधीन केली आहे हा तिचा पति दीर्घायु होऊन शंभर वर्षें जगो ! ( १०–८५–३९ ).

सोमः प्रथमो विविदे गन्धर्वो विविद उत्तरः ।
तृतीयो अग्निष्टे पतिस्तुरीयस्ते मनुष्यजाः ॥

॥ १०-८५-४० ॥

**स्मा. वि. (विवाह) वधू-निरीक्षण.**

सोमो ददद्गन्धर्वाय गन्धर्वो ददद्ग्नये ।
रयिं च पुत्राँश्चादादग्निर्मह्यमथो इमाम् ॥ १०-८५-४१ ॥
इहैव स्तं मा वि यौष्टं विश्वमायुर्व्यश्नुतम् ।
क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिर्मोदमानौ स्वे गृहे ॥ १०-८५-४२ ॥

## रत्न ४५० वें

**सूर्यासावित्री-ऋषिका, सूर्यासावित्री-देवता, जगती-छंद.**

आ नः प्रजां जनयतु प्रजापतिराजरसाय समनक्त्वर्यमा ।
अदुर्मङ्गलीः पतिलोकमा विश शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥

॥ १०-८५-४३ ॥

**श्रौ. वि. गृहप्रवेश.** **स्मा. वि. (विवाह) वधूवराभिषेक.**
**गृहप्रवेशनीय होम.**

## रत्न ४५१ वें

**सूर्यासावित्री-ऋषिका, सूर्यासावित्री--देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अघोरचक्षुरपतिघ्न्येधि शिवा पशुभ्यः सुमनाः सुवर्चाः ।
वीरसूर्देवकामा स्योना शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥

॥ १०-८५-४४ ॥

**स्मा. वि. (विवाह) अग्निप्रदक्षिणा; गृहप्रवेशनीय होम, वधूनिरीक्षण.**

हे वधू! प्रथम तूं सोमाला प्राप्त झालीस. नंतर गंधर्वानें तुझा स्वीकार केला. त्यानंतर अग्नि हा तुझा तिसरा पति झाला आणि हा जो मी मनुष्य, तो तुझा आतां चौथा पति झालों आहें ( १०–८५–४० ). सोमानें तिला गंधर्वाच्या स्वाधीन केली. गंधर्वानें पुढें ती अग्नीस दिली आणि त्या अग्नीनें संपत्ति व संतति यांसह तिला आतां माझ्या स्वाधीन केली आहे! (१०-८५-४१). अहो ! नूतन जायापतींनो ! तुम्ही दोघेहि येथेंच या गृहांत संसार करा ! तुमची यानंतर ताटातूट केव्हांहि न होवो ! संपूर्ण मानवी आयुष्याचा तुम्ही पूर्ण उपभोग घ्या ! पुत्रपौत्रादिकांशीं क्रीडा करीत आनंदित होत्साते तुम्ही आपल्या घरीं सुखासमाधानानें कालक्रमणा करा ! ( १०-८५-४२ ).

## रत्न ४५० वें

प्रजापति देव आम्हांस प्रजा देवो ! अर्यमादेव आम्हांस म्हातारपण देवो ! हे वधू ! शुभकारक अशी तूं या तुझ्या पतिसन्निधच रहा ! आणि आमच्या कुटुंबांतील माणसांना व पशूंना सुखविणारी अशी हो ! ( १०-८५-४३ ).

## रत्न ४५१ वें

हे वधू ! तुझी दृष्टि रागानें ताठरलेली नसावी ! पतीला दुःख देणारी अशी तूं न व्हावीस ! पशूंना तूं हितकर व्हावीस ! तुझे विचार नेहमीं शुभच असावेत ! तूं तेजस्वी होऊन रहा ! वीरपुत्रास जन्म देणारी हो ! देवकार्यांत मन दक्ष असूं दे ! तूं गुणानें सुंदर आहेस ! अतएव आमच्या आप्तेष्टांना व पशूंना सदैव सुखांत ठेवणारी अशी हो ! ( १०-८५-४४ ).

## रत्न ४५२ वें

**सूर्यासावित्री-ऋषिका, सूर्यासावित्री-देवता, अनुष्टुप्-छंद.**

इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ।

दशास्यां पुत्राना धेहि पतिमेकादशं कृधि ॥१०-८५-४५॥

**स्मा. वि. (विवाह) वधूवराभिषेक; अग्निप्रदक्षिणा; गृहप्रवेशनीय होम.**

सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वां भव ।

ननान्दरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी अधि देवृषु ॥

॥ १०-८५-४६ ॥

**स्मा. वि. (विवाह) वधूवराभिषेक.**

समंजन्तु विश्वे देवाः समापो हृदयानि नौ ।

सं मातरिश्वा सं धाता समु देष्ट्री दधातु नौ ॥१०-८५-४७॥

**औ. वि. (विवाह) वधूवर-हृदयस्पर्शन. स्मा. वि. (विवाह) दधिप्राशन.**

## रत्न ४५३ वें

अविधवा भव वर्षाणि शतं साग्रं तु सुव्रता ।

तेजस्वी च यशस्वी च धर्मपत्नी पतिव्रता ॥ खिल २३-१ ॥

**स्मा. वि. (विवाह) वधूस आशीर्वाद.**

जनयद्वहु पुत्राणि मा च दुःखं लभेत् क्वचित् ।

भर्ता ते सोमपा नित्यं भवेद्धर्मपरायणः ॥ खिल २३-२ ॥

अष्टपुत्रा भव त्वं च सुभगा च पतिव्रता ।

भर्तुश्चैव पितुर्भ्रातु हृदयानंदनी सदा ॥ खिल २३-३ ॥

इन्द्रस्य तु यथेन्द्राणी श्रीधरस्य यथा श्रिया ।

शंकरस्य यथा गौरी तद्वद्भर्तुरपि भर्तरि ॥ खिल २३-४ ॥

## रत्न ४५२ वें

हे इंद्र देवा ! तूं वीर्य सिंचन करणारा आहेस ! तर ही वधू सुपुत्रवती व भाग्यशालिनी होईल अशी कर ! हिला सुंदर दहा पुत्र होवोत ! आणि पति हा अकरावा असो ! ( १०–८५–४५ ) हे वधू ! तूं आपल्या सद्वर्तनानें व सादर मधुर भाषणानें सासूसासऱ्यावर आपली छाप पाड ! आणि दीर व नणंदा यांना वश करून घेऊन, या घरांत सुगृहिणी होऊन सुखानें नांद ! ( १०–८५–४६ ) सर्व देव आम्हा पतिपत्नीचीं मनें एक विचारानें युक्त होतील असें करोत ! आपोदेवी, वायु व धाता या देवता आमची अंतःकरणें एकमेकांशीं समरस होतील असें करोत ! देवी सरस्वती ही आमच्या मनांत परस्पराविषयीं प्रेमादर नांदेल असें करो ! ( १०–८५–४७ ).

## रत्न ४५३ वें

हे वधू ! तूं उदंड सौभाग्यवती होऊन राहा ! शंभर वर्षें तूं जगून अस ! शेवटपर्यंत नेमनिष्ठ होऊन राहा ! संसारांत तेजस्वी व यशस्वी हो ! एकंदरींत तूं धर्मपत्नी व पतिव्रता होऊन रहा ! ( १०–८५–खिल २३–१ ). तुला अनेक पुत्रपौत्र होऊं देत ! तुला केव्हांहि दुःखाचा स्पर्श न होवो ! तुझा पति सदोदित देवयजन कार्यात दक्ष राहून प्रसंगोचित धर्मकार्यें निभावून नेवो ! ( १०–८५–खिल २३–२ ). तुला चांगले आठ वीर पुत्र होवोत ! तूं भाग्यशालिनी अशी पतिव्रता होऊन राहा ! त्याचप्रमाणें तुझा पति, बाप व भाऊ यांस आपल्या सद्वर्तनानें व सुभाषणानें सदैव आनंदित राख ! ( १०–८५–खिल २३–३ ). इंद्राची जशी इन्द्राणी, विष्णूची जशी लक्ष्मी आणि शंकराची जशी पार्वती, तशी तूं आपल्या पतीला प्रिय होऊन राहा ! ( १०·८५-खिल २३-४ ).

अत्रेर्यथानुसूया स्याद् वसिष्ठस्याप्यरुन्धती ।
कौशिकस्य यथा सती तथा त्वमपि भर्तरि ॥ खिल २३-५ ॥
ध्रुवैधि पोष्या मयि मह्यं त्वादाद्बृहस्पतिः ।
मया पत्या प्रजावती सं जीव शरदः शतम् ॥ खिल २३-६॥

स्मा. वि. (विवाह) वरील १ ते ६ मंत्र वधूस आशीर्वाद.

## रत्न ४५४ वें

पायुभारद्वाज-ऋषि, रक्षोहा अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

त्वं नो अग्ने अधरादुदक्तात्त्वं पश्चादुत रक्षा पुरस्तात् ।
प्रति ते ते अजरासस्तपिष्ठा अघशंसं शोशुचतो दहन्तु ॥
॥ १०-८७-२० ॥

श्रौ. वि. रक्षोघ्न मंत्र. स्मा. वि. अग्नि-उपस्थान.

पश्चात्पुरस्तादधरादुदक्तात्कविः काव्येन परि पाहि राजन् ।
सखे सखायमजरो जरिम्णेऽग्ने मर्ताँ अमर्त्यस्त्वं नः ॥
॥ १०-८७-२१ ॥

## रत्न ४५५ वें

मूर्धन्वान् अंगिरस-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद.

द्वे स्रुती अशृणवं पितॄणामहं देवानामुत मर्त्यानाम् ।
ताभ्यामिदं विश्वमेजत्समेति यदन्तरा पितरं मातरं च ॥
॥ १०-८८-१५ ॥

## रत्न ४५६ वें

रेणु वैश्वामित्र-ऋषि, इंद्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.

इन्द्रो दिव इन्द्र ईशे पृथिव्या इन्द्रो अपामिन्द्र इत्पर्वतानाम् ।
इन्द्रो वृधामिन्द्र इन्मेधिराणामिन्द्रः क्षेमे योगे हव्य इन्द्रः ॥
॥ १०-८९-१० ॥

अत्रीची जशी अनसूया, वसिष्ठाची जशी अरुन्धती, कौशिकाची जशी सती, तशी तूं नवऱ्याला प्रिय होऊन राहा ! (१०-८५-खिल २३-५). तूं माझ्याजवळ स्थिर होऊन रहा ! मी तुझें उत्तम प्रकारें पालनपोषण करीन ! देवगुरु बृहस्पतीनें तुला मला दिली आहे. पति व पुत्र यांनीं युक्त होत्साती आनंदानें संसार करीत तूं माझ्याजवळ शंभर वर्षे कालक्रमणा कर! ( १०-८५-खिल २३-६ ).

### रत्न ४५४ वें

हे अग्निनारायणा ! तूं दक्षिण, उत्तर, पूर्व व पश्चिम या चारहि दिशांमध्यें राहून आमचें रक्षण कर ! तुझे जे तेजस्वी, प्रखर व अजर असे धगधगीत ज्वालासमूह आहेत, ते दुष्ट व पापी चांडाळांना जाळून पार भस्म करून टाकोत ! ( १०-८७-२० ). हे तेजःपुंज अग्निदेवा ! तूं सर्व-द्रष्टा आहेस ! अतएव आपल्या दिव्य दृष्टीनें पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण या चारहि दिशांमध्यें राहून तूं आमचें सर्वतोपरी रक्षण कर ! हे मित्रभूत अग्निदेवा ! तूं जराधर्मियांत अजर व मरणधर्मियांत अमर असा देव आहेस ! तर या तुझ्या मित्राला दीर्घायुष्य लाभेल असें कर ! (१०-८७-२१).

### रत्न ४५५ वें

देव, पितर व मनुष्य यांचे जाण्यायेण्याचे देवयान व पितृयान असे दोन मार्ग आहेत, असें मीं ऐकलें आहे. हे जें जीवजात आहे, तें सर्व या द्यावापृथ्वीमध्यें अंतर्भूत झालें आहे. तें जातांना या दोन मार्गावरूनच जात असतें ( १०–८८–१५ ).

### रत्न ४५६ वें

स्वर्ग, पृथ्वी, उदक, पर्वत, वृद्ध आणि ज्ञानी या सर्वांचा ईश्वर इन्द्र हाच आहे. म्हणून आपल्या कल्याणासाठीं, तसेंच मिळविलेलें ऐश्वर्य रक्षणार्थ व नवीन ऐश्वर्य संपादनार्थ आम्हीं इन्द्रदेवालाच भजलें पाहिजे ( १०–८९–१० ).

शुनं हुवेम मघवानमिन्द्रमस्मिन्भरे नृतमं वाजसातौ ।
शृण्वन्तमुग्रमूतये समत्सु घ्नन्तं वृत्राणि संजितं धनानाम् ॥
॥ १०-८९-१८ ॥

## रत्न ४५७ वें

**नारायण-ऋषि, पुरुष-देवता, अनुष्टुप्-छंद.**

सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।
स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ॥
॥ १०-९०-१ ॥

**स्मा. वि. (षोडशोपचार देवपूजा) देव आवाहन, श्राद्ध पादार्घ.**

पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ।
उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ॥ १०-९०-२ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) आसन समर्पण.**

एतावानस्य महिमाऽतो ज्यायाँश्च पूरुषः ।
पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ॥
॥ १०-९०-३ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) पाद्यसमर्पण.**

त्रिपादूर्ध्व उदैत्पुरुषः पादोऽस्येहाभवत्पुनः ।
ततो विष्वङ् व्यक्रामत्साशनानशने अभि ॥ १०-९०-४ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) अर्घ्यसमर्पण.**

तस्माद्विराळजायत विराजो अधि पूरुषः ।
स जातो अत्यरिच्यत पश्चाद्भूमिमथो पुरः ॥ १०-९०-५ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) आचमनीय समर्पण.**

या संग्रामांत थोर, धनवान्, भक्तांची हांक ऐकणारा, उग्र, शत्रूंना लोळविणारा, आणि त्यांची संपत्ति लुटून आणणारा असा जो पुरुषोत्तम इन्द्रदेव, त्या इन्द्र देवालाच अन्नप्राप्तीसाठीं व संरक्षणासाठीं आम्ही भक्तिभावपूर्वक हांक मारतों ( १०–८९–१८ ).

## रत्न ४५७ वें

ज्यास अनंत मस्तकें, अनंत नेत्र, व अनंत पाय आहेत, असा तो परमश्रेष्ठ पुरुष या ब्रह्मांडाला सर्व बाजूंनीं व्यापून, शिवाय आणखी दहा अंगुलें वर उरला ! ( १०–९-०१ ) ही जी विद्यमान जीवसृष्टि आहे, मागें जी होऊन गेली व पुढें जी होणार आहे, ती सर्व हा विराट पुरुषच होय. सर्व देवांचा स्वामी हा पुरुषच आहे. तसेंच अन्नावर वाढणारा जितका म्हणून भूतग्राम आहे, त्या सर्वांचा स्वामीहि हा पुराणप्रसिद्ध पुरुषच होय ! ( १०-९०-२ ) हें जें वर्तमान–भूत–भविष्यकालीन जीवजात आहे, तें सर्व या पुरुषाचाच महिमा होय ! या जगज्जालाहून हा परमात्मा किती तरी पटीनें मोठा आहे ! हें सर्व प्राणिजात त्याचा फक्त पादच–म्हणजे फक्त चौथा भागच-असून, बाकीचे तीन पाद त्याचे तेजःपुंज अशा सूर्यमंडळांत स्थित आहेत. ( १०–९०–३ ). हा जो सूर्यमंडळस्थ ब्रह्मस्वरूपी त्रिपाद पुरुष, तो जन्म-मृत्यु-रूपी संसाराच्या पलीकडे राहता झाला. त्याचा एक अंश पुनः या भुवन-कोशांत प्रविष्ट झाला. आणि प्रविष्ट होऊन सचेतन व अचेतन अशा सृष्टीला विविध रूपानें त्यानें व्यापून सोडलें (१०-९०-४). त्या आदिपुरुषापासूनच हें ब्रह्मांड उत्पन्न झालें. तदनंतर त्या ब्रह्मांडांत तद्देहाभिमानी ब्रह्मदेव हा जीवरूपानें प्रविष्ट झाला. अर्थात् त्या ब्रह्मदेवानेंच देव–मनुष्य--पक्षी इत्यादि विविध जीवरूप धारण केले. त्यानंतर त्यानें प्रथम ही पृथ्वी आणि मग हीं नाना जिवांचीं विविध शरीरें निर्माण केलीं ( १०-९०-५ ). जेव्हां देवांनीं

यत्पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत ।
वसन्तो अस्यासीदाज्यं ग्रीष्म इध्मः शरद्धविः ॥१०-९०-६॥

**स्मा. वि. (देवपूजा) मलापकर्षस्नान-समर्पण.**

तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन्पुरुषं जातमग्रतः ।
तेन देवा अयजन्त साध्या ऋषयश्च ये ॥ १०-९०-७ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) वस्त्रसमर्पण.**

तस्माद्यज्ञात्सर्वहुतः संभृतं पृषदाज्यम् ।
पशून्ताँश्चक्रे वायव्यानारण्यान्ग्राम्याश्च ये ॥ १०-९०-८ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) यज्ञोपवीत-समर्पण.**

तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे ।
छन्दांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥ १०-९०-९ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) गंध-समर्पण.**

तस्मादश्वा अजायन्त ये के चोभयादतः ।
गावो ह जज्ञिरे तस्मात्तस्माज्जाता अजावयः ॥१०-९०-१०॥

**स्मा वि. (देवपूजा) पुष्पसमर्पण.**

यत्पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन् ।
मुखं किमस्य कौ बाहू का ऊरू पादा उच्येते ॥
॥ १०-९०-११ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) धूप-समर्पण.**

ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः ।
ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥१०-९०-१२॥

**स्मा. वि. (देवपूजा) दीप-समर्पण.**

चन्द्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत ।
मुखादिन्द्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत ॥ १०-९०-१३ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) नैवेद्य-समर्पण.**

पुरुषाला हवि कल्पून, त्या पुरुषहवीनें मानस यज्ञ केला, तेव्हां वसंत ऋतु हा त्या यज्ञांत आज्य झाला. ग्रीष्म हा समिधा व शरद् हा हवि बनला ( १०-९०-६ ). प्रथम उत्पन्न झालेल्या त्या पुरुषाला यज्ञसाधनभूत पशु कल्पून त्यास प्रोक्षणादिकानें संस्कृत करून घेऊन त्या पुरुषरूप पशूनें प्रजापति प्रभृति साध्य देवांनीं व तदनुकूल ऋषींनीं मिळून तो मानस यज्ञ परिपूर्ण केला ( १०-९०-७ ). सर्वहुत अशा त्या यज्ञापासून दधिमिश्रित घृत संपादित झालें आणि त्याचप्रमाणें वायु ज्यांची पालकदेवता आहे असे ग्राम्य व वन्य पशुहि निर्माण झाले (१०-९०-८). सर्व प्रकारचें हविर्द्रव्य हवन केलेल्या त्या आदियज्ञापासून ऋग्वेद झाला. सामवेद झाला. छन्द व यजुर्वेदहि त्यापासूनच झाले (१०-९०-९). त्या यज्ञापासूनच अश्व व खालीं आणि वर दांत असलेले गर्दभादि प्राणी निर्माण झाले. फार काय, त्या पुरुषयज्ञापासून गायी, शेळ्या, मेंढ्या इत्यादि प्राणिवर्ग निर्माण झाला. ( १०-९०-१० ). त्या यज्ञामध्यें प्रजापतिप्रभृति देवांनीं त्या विराट पुरुषाला संकल्पमात्रें करून उत्पन्न केला, तेव्हां त्यांनीं त्याची किती प्रकारांनीं कल्पना केली? त्या पुरुषाचें मुख कोणतें होतें? बाहू कोण, मांड्या कोण व पाय कोण झाले? (१०–९०–११) त्या विराट पुरुषाचें ब्राह्मण हें मुख झालें. म्हणजे मुखापासून त्यांची उत्पत्ति झाली. क्षत्रिय हे बाहू झाले. वैश्य हे मांड्या आणि शूद्र हे त्याचे पाय झाले. ( अर्थात् त्या त्या अवयवापासून ते ते वर्ण निर्माण झाले ) ( १०–९०–१२ ). त्या विराट पुरुषाच्या मनापासून चंद्र झाला. डोळ्यापासून सूर्य झाला. मुखापासून इंद्र व अग्नि झाले आणि प्राणापासून वायु झाला ( १०–९०–१३ ).

नाभ्या आसीदन्तरिक्षं शीर्ष्णो द्यौः समवर्तत ।
पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्तथा लोकाँ अकल्पयन् ॥
॥ १०-९०-१४ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) नमस्कार-समर्पण.**

सप्तास्यासन्परिधयस्त्रिः सप्त समिधः कृताः ।
देवा यद्यज्ञं तन्वाना अबध्नन्पुरुषं पशुम् ॥ १०-९०-१५ ॥

**स्मा. वि. प्रदक्षिणा-समर्पण.**

## रत्न ४५८ वें

**नारायण-ऋषि, पुरुष-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।
ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ॥
॥ १०-९०-१६ ॥

**स्मा. वि. (देवपूजा) पुष्पांजलि समर्पण; दक्षिणा समर्पण.**

## रत्न ४५९ वें

**अरुण वैतहव्य-ऋषि, अग्नि-देवता, जगती-छंद.**

तवाग्ने होत्रं तव पोत्रमृत्वियं तव नेष्ट्रं त्वमग्निदृतायतः ।
तव प्रशास्त्रं त्वमध्वरीयसि ब्रह्मा चासि गृहपतिश्च नो दमे ॥
॥ १०-९१-१० ॥

यस्तुभ्यमग्ने अमृताय मर्त्यः समिधा दाशदुत वा हविष्कृति ।
तस्य होता भवसि यासि दूत्य१मुप ब्रूषे यजस्यध्वरीयसि ॥
॥ १०-९१-११ ॥

नाभीपासून अंतरिक्ष झालें. मस्तकापासून स्वर्ग झाला. पायांपासून पृथ्वी झाली. कानांपासून दिशा झाल्या. अशा रीतीनें त्या विराट पुरुषापासून सर्व लोक निर्माण झाले. (१०–९०–१४). जेव्हां देवांनीं तो यज्ञ केला व विराट पुरुषाला पशु कल्पून यूपाशीं आणून बांधला, तेव्हां त्या यज्ञांत छंद हे सात परिधि व बारा महिने, पांच ऋतु, पृथिव्यादि तीन लोक व आदित्य असे मिळून एकवीस समिधा होत्या! ( १०–९०–१५ ).

## रत्न ४५८ वें

याप्रमाणें प्रजापति प्रभृति देवांनीं त्या मानस यज्ञकर्मानुष्ठानानें यज्ञरूपी परमात्म्याचें पूजन केलें. आणि त्या पूजनामुळें तीं जगदाधार कर्में मुख्य झालीं. ज्या ठिकाणीं पुरातन साध्य देव राहतात तो स्वर्ग यज्ञेश्वराची याप्रमाणें उपासना करणाऱ्या महात्म्यास प्राप्त होतो! ( १०–९०–१६ ).

## रत्न ४५९ वें

हे अग्नि देवा! यज्ञांतील होतृकर्म हें तुझेंच आहे. ऋतूमध्यें करावयाचें पोतृकर्म आणि तसेंच पण नेष्टृकर्महि तुझेंच आहे. यज्ञोपासक अशा आम्हां यजमानांचा अग्निहि तूंच. प्रशस्ताहि तूंच. अध्वर्युहि तूंच. ब्रह्माहि तूंच. फार काय, आणि यजमानहि पण तूंच आहेस! ( १०–९१–१० ). हे अग्नि देवा! अमर अशा तुला जो कोणी मर्त्य मानव समिधा अर्पण करील व आहुति देईल, त्यांचा तूं देवांना हांक मारणारा होता होतोस आणि त्यांना यज्ञगृहांत घेऊन येण्याचें दूतकर्महि तूंच करतोस. तसेंच ब्रह्मा होऊन देवांना त्यांचा हविर्भाग तूंच कथन करतोस आणि यजमान होऊन हविर्भाग अर्पणहि तूंच करतोस! ( १०-९१-११ ).

## रत्न ४६० वें

**उर्वशी-ऋषिका, पुरूरवा-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

पुरूरवो मा मृथा मा प्र पप्तो मा त्वा वृकासो अशिवास उ क्षन् ।
न वै स्त्रैणानि सख्यानि सन्ति सालावृकाणां हृदयान्येता ॥
॥ १०-९५-१५ ॥

यद्विरूपाचरं मर्त्येष्ववसं रात्रीः शरदश्चतस्रः ।
घृतस्य स्तोकं सकृदह्न आश्नां तादेवेदं तातृपाणा चरामि ॥
॥ १०-९५-१६ ॥

## रत्न ४६१ वें

**उर्वशी-ऋषि, पुरूरवा-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

इति त्वा देवा इम आहुरैळ यथेमेतद्भवसि मृत्युबन्धुः ।
प्रजा ते देवान्हविषा यजाति स्वर्ग उ त्वमपि मादयासे ॥
॥ १०-९५-१८ ॥

## रत्न ४६२ वें

**भिषक् आथर्वण-ऋषि, ओषधि-देवता, अनुष्टुप्-छंद.**

या ओषधीः पूर्वा जाता देवेभ्यस्त्रियुगं पुरा ।
मनै नु बभ्रूणामहं शतं धामानि सप्त च ॥ १०-९७-१ ॥

**श्रौ. वि. दीक्षिताला ताप आला असतां मार्जन सूक्त,**

शतं वो अम्ब धामानि सहस्रमुत वो रुहः ।
अधा शतक्रत्वो यूयमिमं मे अगदं कृत ॥ १०-९७-२ ॥
अश्वत्थे वो निषदनं पर्णे वो वसतिष्कृता ।
गोभाज इत्किलासथ यत्सनवथ पूरुषम्॥ १०-९७-५ ॥
याः फलिनीर्या अफला अपुष्पा याश्च पुष्पिणीः ।
बृहस्पतिप्रसूतास्ता नो मुञ्चन्त्वंहसः ॥ १०-९७-१५ ॥

**स्मा. वि. ओटी भरणें; फलार्पण; पुण्याहवाचन.**

## रत्न ४६० वें

हे पुरूरव्या ! पुनः सांगतें या उर्वशीसाठीं तूं प्राणत्याग करूं नकोस ! कोठेंहि निधून जाऊं नकोस ! क्रूर व अमंगळ लांडगे तुला फाडून न खावोत ! हें पहा, आम्हा स्त्रियांचें सख्य हें सख्यच नव्हे ! त्यांचीं हृदयें म्हणजे लांडग्यांचीं असतात ! (१०–९५–१५ ). राजा ! आतां माझें शेवटचें सांगणें ऐक. या चार वर्षेपर्यंत मी उर्वशी आपलें देवत्व विसरून, मानवरूप धारण करून, विविध प्रकारें नटून थटून, तुझ्याजवळ राहून तुझ्याबरोबर अनेक सुखविलास केले. आतां माझी तुझ्या सहवासांत राहून पूर्ण तृप्ति झाली आहे. म्हणून मी आतां तुला सोडून दूर दूर-म्हणजे-स्वर्गात-निघून जात आहें. (१०–९५–१६).

## रत्न ४६१ वें

राजा, तुला आतां माझ्याजवळ येण्याला एकच उपाय आहे.देव असें म्हणतात कीं हल्लीं तूं मृत्युवश आहेस. करतां देवांकरता यजन कर म्हणजे स्वर्गांत येऊन तेथें आमच्याशीं सुखविलास करण्यास तुला मिळेल. (१०-९५-१८).

## रत्न ४६२ वें

ज्या पुरातन ओषधि देवांपासून वसंतादि तीन युगांमध्यें उत्पन्न झाल्या, अशा त्या पिंगट वर्णाच्या ओषधींचीं स्थानें एकशें सात आहेत असें मी समजतों. ( १०–९७–१ ). हे मातृभूत ओषधींनो ! तुमचे जन्म शेंकडो आहेत. आणि अंकुर हजारो म्हणजे असंख्य आहेत. हे ओषधींनो ! तुमचें सामर्थ्य अगणित आहे ! तर तुम्ही माझें जीवन निरोगी होईल असें करा ! ( १०–९७–२ ). हे ओषधी देवतांनो ! तुमचें वसतिस्थान अश्वत्थ वृक्षावर आहे. पळसावरहि तुम्ही राहतां. तुम्ही गायीचें व आम्हा मनुष्यांचें पोषण करणाऱ्या आहांत. ( १०–९७–५ ). ज्या ओषधि फल धरणाऱ्या आहेत व ज्या फल धरणाऱ्या नाहींत, तसेंच ज्या फुलणाऱ्या आहेत व ज्या फुलणाऱ्या नाहींत, त्या सर्व ओषधि आम्हांस बृहस्पतीच्या अनुज्ञेवरून पापापासून मुक्त करोत ! (१०–९७–१५).

मुञ्चन्तु मा शपथ्या३दथो वरुण्यादुत ।
अथो यमस्य पड्बीशात्सर्वस्माद्देवकिल्बिषात् ॥
॥ १०-९७-१६ ॥

**स्मा. वि. मार्जन.**

मा वो रिषत्खनिता यस्मै चाहं खनामि वः ।
द्विपच्चतुष्पदस्माकं सर्वमस्त्वनातुरम् ॥ १०-९७-२० ॥
त्वमुत्तमास्योषधे तव वृक्षा उपस्तयः ।
उपस्तिरस्तु सो३स्माकं यो अस्माँ अभिदासति ॥
॥ १०-९७-२३ ॥

## रत्न ४६३ वें

**आर्ष्टिषेणो देवापि-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अग्ने बाधस्व वि मृधो वि दुर्गहाऽपामीवामप रक्षांसि सेध।
अस्मात् समुद्राद्बृहतो दिवो नोऽपां भूमानमुप नः सृजेह ॥
॥ १०-९८-१२ ॥

## रत्न ४६४ वें

**बुधसौम्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

उद्बुध्यध्वं समनसः सखायः समग्निमिन्ध्वं बहवः सनीळाः ।
दधिक्रामग्निमुषसं च देवीमिन्द्रावतोऽवसे नि ह्वये वः ॥
॥ १०-१०१-१ ॥

## रत्न ४६५ वें

**बुधसौम्य-ऋषि, विश्वेदेव-देवता, गायत्री-छंद.**

सीरा युञ्जन्ति कवयो युगा वि तन्वते पृथक् ।
धीरा देवेषु सुम्नया ॥ १०-१०१-४ ॥

**स्मा. वि. बैल नांगरास जुंपणें.**

त्या ओषधि मला शपथजन्य पापापासून मुक्त करोत ! वरुणाच्या पाशापासून सोडवोत ! यमाच्या पादबंधनांतून सुटका करोत ! आणि त्याचप्रमाणें देवांसंबंधीं आमच्या हातून जे कांहीं अपराध घडले असतील, त्या सर्व अपराधांपासून आमची मुक्तता करोत ! ( १०-९७-१६ ). हे ओषधींनो ! जो मी आज तुम्हांस खणून काढीत आहें, त्या आमचा तुम्ही घात करूं नका! आणि ज्याचेसाठीं मी तुम्हांस खणून काढीत आहें, त्याचाहि पण नाश न होवो ! त्याचप्रमाणें आमचे पुत्र व पशु हे सर्व निरोगी राहोत ! (१०-९७-२०). हे सोम ओषधे ! सर्व ओषधींत तूं श्रेष्ठ आहेस! सर्व उंच वृक्ष तुझ्या खालीच आहेत! अतएव जो आम्हांला इजा करून दुःख देऊं पाहतो, तो वृक्षाप्रमाणें जमीन धरून पडो ! (१०-९७-२३).

रत्न ४६३ वें

हे अग्ने ! शत्रूंचीं दुर्गम पुरें पार जमीनदोस्त कर ! रोगराई सर्व नाहींशी कर आणि राक्षसादिकांना दूर पिटाळून दे ! विशाल अशा समुद्रांतून व अंतरिक्षांतून आमच्या भूप्रदेशावर पर्जन्याची सारखी मुसळधार सोड ! ( १०-९८-१२ ) !

रत्न ४६४ वें

समान विचाराच्या मित्रांनो ! आतां उठा ! जागृत व्हा ! तुम्ही पुष्कळ असला तरी सर्व एकाच ठिकाणीं राहतां. तर आतां अग्निनारायणाला प्रदीप्त करा ! दधिक्रा, अग्नि व उषा या देवतांना आणि तसेंच इंद्रासह असणाऱ्या तुम्हांस मी आमच्या रक्षणार्थ म्हणून हांक मारतों (१०-१०१-१).

रत्न ४६५ वें

देवादिकांच्या ठायीं सद्भाव ठेवणारे असे ज्ञानी ऋत्विज सुखाच्या इच्छेनें नांगर जुंपतात अणि जमीन नांगरून चांगली भुसभुशीत करतात(१०-१०१-४).

रत्न ४६६ वें

इन्द्र देव हा मोठा चलाख व आक्रमणशील असून बैलाप्रमाणें भयंकर आहे ! तसाच तो शत्रूचा सप्पा उडविणारा आहे ! तो गंभीर गर्जना करून शत्रूच्या छातीत धडकी उत्पन्न करतो ! तो दुष्ट प्राण्यांना रडविणारा असून, आपल्या डोळ्याची पापणी न हलविणारा आहे. तोच एकटा महापराक्रमी असून, शत्रूंच्या शेंकडो सैन्यावर हां हां म्हणतां विजय मिळवितो ( १०-१०३-१ ).

## रत्न ४६६ वें

**अप्रतिरथ ऐन्द्र-ऋषि, इंद्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

आशुः शिशानो वृषभो न भीमो घनाघनः क्षोभणश्चर्षणीनाम् ।
संक्रन्दनोऽनिमिष एकवीरः शतं सेना अजयत्साकमिन्द्रः ॥

॥ १०-१०३-१ ॥

**श्री. वि. युद्धार्थ निघालेल्या राजाचें संदर्शन.**

संक्रन्दनेनानिमिषेण जिष्णुना युत्कारेण दुश्च्यवनेन धृष्णुना ।
तदिन्द्रेण जयत तत्सहध्वं युधो नर इषुहस्तेन वृष्णा ॥

॥ १०-१०३-२ ॥

स इषुहस्तैः स निषङ्गिभिर्वशी संस्रष्टा स युध इन्द्रो गणेन ।
संसृष्टजित्सोमपा बाहुशर्ध्युग्रधन्वा प्रतिहिताभिरस्ता ॥

॥ १०-१०३-३ ॥

## रत्न ४६७ वें

**अप्रतिरथ ऐन्द्र-ऋषि, बृहस्पति-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

बृहस्पते परि दीया रथेन रक्षोहामित्राँ अपबाधमानः ।
प्रभञ्जन्त्सेनाः प्रमृणो युधा जयन्नस्माकमेध्यविता रथानाम् ॥

॥ १०-१०३-४ ॥

## रत्न ४६८ वें

**अप्रतिरथ ऐन्द्र-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

बलविज्ञायः स्थविरः प्रवीरः सहस्वान्वाजी सहमान उग्रः ।
अभिवीरो अभिसत्वा सहोजा जैत्रमिन्द्र रथमा तिष्ठ गोवित् ॥

॥ १०-१०३-५ ॥

## रत्न ४६६ वें

तो मोठमोठ्यानें गर्जना करणारा, शत्रूवर अनिमिष नेत्रानें सारखा पाळत ठेवणारा, विजयशाली, लढाऊ बाण्याचा, संग्रामांत न कचरणारा व अत्यंत धाडसी, असा आहे. त्याची मदत घेऊन हे वीर हो ! तुम्ही शत्रूंशीं लढून विजय संपादन करा ! वीरहो ! धनुर्धारी आणि महापराक्रमी अशा इन्द्रदेवाच्या सहायानें तुम्ही शत्रूचा पराभव करा ! ( १०-१०३-२ ). तो इन्द्र धनुर्धारी वीरांच्या संगतींतच असतो आणि खड्ग धारण करणाऱ्यांच्या समूहांत राहून सर्व कांहीं तो वश करून घेतो ! संग्राम गाजविण्यासाठीं शत्रु-सैन्यांत तो नेटानें धडक मारून, त्यांच्यांत जाऊन मिसळतो आणि जे एकमतानें त्याच्यावर एक जात चालून येतील, त्यांना चांगला जमिनीवर लोळवून धूळ चारतो ! तो देव सोमपान करणारा असून वीरबाहू व प्रचंड धनुर्धारी असा आहे. बाणानें अचूक तो शत्रूवर नेम मारतो, ( १०-१०३-३ )

## रत्न ४६७ वें

हे बृहस्पते ! रथांत बसून तूंहि आमचेकडे ये ! तूं राक्षसांचा कर्दन काळ आहेस व आमच्या शत्रूंचा हंता आहेस ! लढाईला जेव्हां तोंड लागतें, तेव्हां तू शत्रुसैन्यांत शिरून त्यांचा धुव्वा उडवून पार त्यांचा चेंदामेंदा करून टाकतोस. म्हणून, हे देवा ! विनंति कीं रथांतून लढणाऱ्या आमच्या वीरांचा तूं पाठराखा हो ! (१०।१०३-४).

## रत्न ४६८ वें

हे इन्द्र देवा ! तूं मोठा बलवान आहेस, अशी तुझी फार ख्याती आहे. तसाच तूं पुराणपुरुषहि आहेस. देवा ! किती गाऊं तुझे गुण ! तूं महा-योद्धा आहेस ! अत्यंत साहसी आहेस ! मोठा बलवान आहेस ! शत्रुमर्दन आहेस ! उग्र आहेस ! पराक्रमी आहेस ! सत्त्वाढ्य आहेस ! बलोत्पन्न आहेस ! गोसंपन्न आहेस ! वीर पुरुष आहेस ! तर आतां, हे देवा ! तूं आमच्या विजयशाली रथांत येऊन बैस ! ( १०-१०३-५ ).

गोत्रभिदं गोविदं वज्रबाहुं जयन्तमज्म प्रमृणन्तमोजसा ।
इमं सजाता अनु वीरयध्वमिन्द्रं सखायो अनु सं रभध्वम् ॥
॥ १०-१०३-६ ॥

अभि गोत्राणि सहसा गाहमानोऽदयो वीरः शतमन्युरिन्द्रः ।
दुश्च्यवनः पृतनाषाळयुध्यो३ऽस्माकं सेना अवतु प्र युत्सु ॥
॥ १०-१०३-७ ॥

इन्द्र आसां नेता बृहस्पतिर्दक्षिणा यज्ञः पुर एतु सोमः ।
देवसेनानामभिभञ्जतीनां जयन्तीनां मरुतो यन्त्वग्रम् ॥
॥ १०-१०३-८ ॥

इन्द्रस्य वृष्णो वरुणस्य राज्ञ आदित्यानां मरुतां शर्ध उग्रम् ।
महामनसां भुवनच्यवानां घोषो देवानां जयतामुदस्थात् ॥
॥ १०-१०३-९ ॥

उद्धर्षय मघवन्नायुधान्युत्सत्वनां मामकानां मनांसि ।
उद्वृत्रहन्वाजिनां वाजिनान्युद्रथानां जयतां यन्तु घोषाः ॥
॥ १०-१०३-१० ॥

अस्माकमिन्द्रः समृतेषु ध्वजेष्वस्माकं या इषवस्ता जयन्तु ।
अस्माकं वीरा उत्तरे भवन्त्वस्माँ उ देवा अवता हवेषु ॥
॥ १०-१०३-११ ॥

## रत्न ४६९ वें

**अप्रतिरथ ऐन्द्र-ऋषि, अप्वादेवी-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अमीषां चित्तं प्रतिलोभयन्ती गृहाणाङ्गान्यप्वे परेहि ।
अभि प्रेहि निर्दह हृत्सु शोकैरन्धेनामित्रास्तमसा सचन्ताम् ॥
॥ १०-१०३-१२ ॥

देवा ! तूं पर्वताचा चक्काचूर करणारा आहेस ! गोसंपन्न आहेस ! वज्र-बाहु आहेस ! विजयशाली आहेस ! पराक्रम गाजवून शत्रूंचा धुव्वा उडविणारा आहेस ! एकजात लढणारे आमचे शूरवीर हो ! तुम्ही या इन्द्रदेवाचें अनुकरण करून संग्रामांत मोठी रणधुमाळी माजवा ! आणि आपल्या शौर्याची व वीर्याची शिकस्त-अगदी शिकस्त-करून सोडा ! अहो मित्रहो ! परस्पर मित्रभावानें वागणारे तुम्ही या इन्द्रदेवाला प्रसन्न करून घ्या ! (१०-१०३-६ ). घनदाट मेघ पटलांत जो धूमधडाक्यानें प्रवेश करतो, जो अत्यंत कठोर, महापराक्रमी, अत्यंत रागीट, दुर्जय, शत्रु सैन्याचा चक्काचूर करणारा व अजिंक्य असा हा इन्द्रदेव लढाईमध्यें आमच्या शूर सेनेचें रक्षण करो ! (१०-१०३-७). हा इन्द्रच आमच्या सेनेचा नायक असो ! बृहस्पति, दक्षिणा, यज्ञ व सोम हे त्याच्या अग्रभागीं येवोत ! शत्रुसेनेचें मर्दन करणाऱ्या देवसेनेच्या आघाडीस मरुद्गण चालोत ! ( १०-१०३-८ ). बलशाली इन्द्र देवाचें, राजा वरुणाचें, आदित्याचें व मरुतांचें उग्रबल आमच्या बाजूचें असो ! उदार अंतःकरणाचे व पराक्रमानें त्रैलोक्य हलवून सोडणारे असे जे देव, त्यांचा गंभीर जयघोष दश-दिशा व्यापून वर आकाशांत सुद्धां शिरता झाला ! ( १०-१०३-९ ) हे इन्द्रदेवा ! आमचीं तीक्ष्ण शस्त्रें उत्कृष्ट होतील असें कर ! आणि शूर सैनिकांचीं मनें वीरोत्साहानें उचंबळून जातील असें घडो ! हे वृत्रमर्दना ! इन्द्रदेवा ! आमच्या घोडेस्वारांची रणोत्सुक मनें उत्साहभरित होवोत ! आणि विजयशाली रथाचे जयघोष दशदिशांत निनादून जातील असें घडो ! (१०-१०३-१०). शत्रूची फळी फोडून, त्यांच्यांत मिसळून एक झालेल्या आमच्या सैनिकांचे विजयध्वज इन्द्र रक्षण करो ! आमचे बाण विजयी होवोत ! आमचे योद्धे श्रेष्ठ ठरोत ! हे दिव्य-विबुध हो ! युद्धांत तुम्ही आमचें रक्षण करा ! (१०-१०३-११).

### रत्न ४६९ वें

हे अप्वे ! आमच्या शत्रूंचीं मनें भीतीनें भांबावून जातील असें कर ! आणि त्यांचीं शरीरें मलिनवीर्य करून टाक ! आ ! शत्रूंच्या सैन्यांत घुसून त्यांचीं हृदयें शोकाग्नीनें पार होरपळून काढ ! आणि ते गाढ अंधकारांत जाऊन गडप होतील असें कर ! ( १०-१०३-१२ ).

## रत्न ४७० वें

**अप्रतिरथ ऐन्द्र-ऋषि, इन्द्र-देवता, अनुष्टुप्-छंद.**

प्रेता जयता नर इन्द्रो वः शर्म यच्छतु ।
उग्रा वः सन्तु बाहवोऽनाधृष्या यथासथ ॥

॥ १०-१०३-१३ ॥

## रत्न ४७१ वें

**दिव्य आंगिरस-ऋषि, दक्षिणा-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

आविरभून्महि माघोनमेषां विश्वं जीवं तमसो निरमोचि ।
महि ज्योतिः पितृभिर्दत्तमागादुरुः पन्था दक्षिणाया अदर्शि ॥

॥ १०-१०७-१ ॥

**श्रौ. वि. यजमान स्तुति (२) दक्षिणास्तुति.**

उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण ।
हिरण्यदा अमृतत्वं भजन्ते वासोदाः सोम प्र तिरन्त आयुः ॥

॥ १०-१०७-२ ॥

**स्मा. वि. पुण्याह वाचन.**

दैवी पूर्तिर्दक्षिणा देवयज्या न कवारिभ्यो नहि ते पृणन्ति ।
अथा नरः प्रयतदक्षिणासोऽवद्यभिया बहवः पृणन्ति ॥

॥ १०-१०७-३ ॥

शतधारं वायुमर्कं स्वर्विदं नृचक्षसस्ते अभि चक्षते हविः ।
ये पृणन्ति प्र च यच्छन्ति संगमे ते दक्षिणां दुहते सप्तमातरम् ॥

॥ १०-१०७-४ ॥

## रत्न ४७० वें

अहो आमचे शूर सैनिक हो ! चला ! शत्रूंवर धडाक्यानें चालून जा आणि विजयश्री संपादन करा ! इन्द्र तुम्हांस सुख देवो ! तुमचे भुजदंड रणांगणांत दणदणीत पराक्रम गाजवोत ! म्हणजे तुमच्यावर शत्रूची पकड बसणार नाहीं ! (१०–१०३–१३).

## रत्न ४७१ वें

सूर्यारूपीं इन्द्र देवाचें हें महातेज आतां प्रकट झालें आहे ! अहाहा ! अखिल प्राणिमात्र आतां अंधकारांतून मुक्त झाले ! पितरांनीं दिलेला सूर्यरूपी श्रेष्ठ प्रकाशगोल उदय पावता झाला ! यागांगभूत दक्षिणेचा विशाल रस्ता आतां सर्वांना दिसूं लागला ! (१०–१०७–१). देवयजनांत दक्षिणा देणारे यजमान उच्चस्थानीं असलेल्या स्वर्गाप्रत जातात, जे यजमान घोडे दक्षिणा म्हणून देतात, ते सूर्यमंडळांत जाऊन राहतात, जे सुवर्ण दक्षिणा म्हणून देतात, ते अमरत्व पावतात. हे सोमा ! जे वस्त्र दक्षिणा म्हणून देतात, ते दीर्घायुष्य प्राप्त करून घेतात ! (१०–१०७–२). देवयागाची अंगभूत जी दक्षिणा ती जे अयाजक आहेत त्यांच्यासाठीं नाहीं. कारण ते लोक देवांप्रीत्यर्थ हवि व स्तुति करून त्यांना प्रसन्न करीत नाहींत. दक्षिणा देणाऱ्या यजमानांत पुष्कळ असे असतात कीं, पापाच्या भीतीमुळें ते देवांना प्रसन्न करीत असतात. (१०–१०७–३) अनेक धारांनीं वाहणारा तो वायु, तसाच स्वर्गप्रापक सूर्य व लोकांना पाहणारे इन्द्रादि देव यांना अर्पण करण्याकरतां म्हणून ते (यजमान ) हवीकडे पाहत असतात. यज्ञांत स्तोत्र गाऊन व हवि अर्पण करून देवांना प्रसन्न करणारे असे ते यज्ञोपासक यज्ञानुष्ठान यथासांग पार पाडणाऱ्या ऋत्विजांसाठीं म्हणून ती यज्ञदक्षिणा देतात. (१०–१०७–४).

दक्षिणावान् प्रथमो हूत एति दक्षिणावान् ग्रामणीरग्रमेति ।
तमेव मन्ये नृपतिं जनानां यः प्रथमो दक्षिणामाविवाय ॥
॥ १०-१०७-५ ॥

न भोजा ममुर्न न्यर्थमीयुर्न रिष्यन्ति न व्यथन्ते ह भोजाः ।
इदं यद्विश्वं भुवनं स्वश्चैतत्सर्वं दक्षिणैभ्यो ददाति ॥
॥ १०-१०७-८ ॥

भोजमश्वाः सुष्ठुवाहो वहन्ति सुवृद्रथो वर्तते दक्षिणायाः ।
भोजं देवासोऽवता भरेषु भोजः शत्रून्त्समनीकेषु जेता ॥
॥ १०-१०७-११ ॥

## रत्न ४७२ वें

पणय : ऋषि, सरमा-देवता, त्रिष्टुप्-छंद.

किमिच्छन्ती सरमा प्रेदमानड् दूरे ह्यध्वा जगुरिः पराचैः ।
कास्मेहितिः का परितक्म्यासीत् कथं रसाया अतरः पयांसि ॥
॥ १०-१०८-१ ॥

## रत्न ४७३ वें

सरमा-ऋषि, पणयो-देवता, त्रिष्टुप्-छंद.

इन्द्रस्य दूतीरिषिता चरामि मह इच्छन्ती पणयो निधीन्वः ।
अतिष्कदो भियसा तन्न आवत्तथा रसाया अतरं पयांसि ॥
॥ १०-१०८-२ ॥

## रत्न ४७४ वें

पणयः-ऋषि, सरमा-देवता, त्रिष्टुप्-छंद.

कीदृङ्ङिन्द्रः सरमे का दृशीका यस्येदं दूतीरसरः पराकात् ।
आ च गच्छान्मित्रमेना दधामाऽथा गवां गोपतिर्नो भवाति ॥
॥ १०-१०८-३ ॥

दक्षिणा देणारा यजमान हाच यज्ञांत प्रथम बोलाबला जातो. तोच गांवांत अग्रेसरत्वाचा मान पटकावून श्रेष्ठत्व पावतो. जो प्रथम दक्षिणा देतो, त्यालाच मी लोकांचा पालनकर्ता समजतों. (१०-१०७-५). जे दक्षिणा देणारे आहेत ते नाश पावत नाहींत, किंवा हीन स्थितीसहि पोंचत नाहींत ! त्यांना दुःख शिवत नाहीं व कष्ट होत नाहींत ! अशा या उदार महात्म्यांना सर्व जग आणि स्वर्ग आपण होऊन ही सर्व दक्षिणा परत देतात. (१०-१०७-८),जे सढळ हातानें दक्षिणा देणारे आहेत,त्यांना घोडे सुखानें वाहून नेतात.दक्षिणा देणाऱ्यांचा रथ सहज व सुसूत्र चालणारा असतो.हे दिव्यविबुध हो ! तुम्ही अशा दातृत्वशील यजमानाचें लढाईत रक्षण करा ! म्हणजे तो संग्रामांत शत्रूवर खात्रीनें जय मिळवीलच मिळवील ! (१०-१०७-११).

रत्न ४७२ वें

( पणी म्हणतात ) सरमे ! कोणती इच्छा धरून तूं येथें प्राप्त झालीस ? किती दूरचा रस्ता हा ! आणि तसाच केवढा कठीण ! येथें आमच्यापाशीं येणेचा तुझा हेतु तरी काय ? रात्र तुझी कशी गेली ? तुडुंब वाहणाऱ्या या रसानदीचें शतयोजनांचें अफाट पात्र तरून तूं आलीस तरी कशी ? ( १०-१०८-१ ).

रत्न ४७३ वें

( सरमा म्हणते )-मी इन्द्राची दूती आहे. त्याच्या आज्ञेवरूनच मी येथें आलें आहें. तुम्ही बृहस्पतीच्या गायी चोरून आणून त्या येथें पर्वतामध्यें छपवून ठेविलेल्या आहेत. त्यांचा तपास करण्यासाठीं म्हणून मी आलें आहें. त्या इन्द्राच्या भीतीमुळेंच रसानदीचें पात्र माझें रक्षण करतें झालें. म्हणून ती नदी ओलांडून मी येथें आलें. ( १०-१०८-२ ).

रत्न ४७४ वें

(पणी म्हणतात) सरमे! तो तुझा स्वामी इन्द्र आहे तरी कसा ग ? त्याचा पराक्रम तरी काय? त्याची दृष्टि-म्हणजे विचार-शक्ति-कशी आहे ? कीं ज्याची दूती म्हणविणारी तूं ही अफाट वाहणारी रसानदी ओलांडून येण्याचें धारिष्ट केलेंस. हें सर्व आम्हांस सांग ना. बरें, तुझा इंद्र येणार असेल तर खुशाल येऊं दे. आम्ही त्याच्याशीं जमल्यास मैत्री करूं. आणि येथें आमच्याजवळ असलेल्या धेनूंचा आमच्याप्रमाणें त्यालाहि मालक करूं.(१०-१०८-३).

## रत्न ४७५ वें

**सरमा-ऋषि, पणयो-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

नाहं तं वेद दभ्यं दभत्स यस्येदं दूतीरसरं पराकात् ।
न तं गूहन्ति स्रवतो गभीरा हता इन्द्रेण पणयः शयध्वे ॥
॥ १०-१०८-४ ॥

## रत्न ४७६ वें

**पणयः-ऋषि, सरमा-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

इमा गावः सरमे या ऐच्छः परि दिवो अन्तान् सुभगे पतन्ती ।
कस्त एना अव सृजादयुध्व्युतास्माकमायुधा सन्ति तिग्मा ॥
॥ १०-१०८-५ ॥

## रत्न ४७७ वें

**सरमा-ऋषि, पणयो-देवता, त्रिष्टुप्-छंद**

असेन्या वः पणयो वचांस्यनिषव्यास्तन्वः सन्तु पापीः ।
अधृष्टो व एतवा अस्तु पन्था बृहस्पतिर्व उभया न मृळात् ॥
॥ १०-१०८-६ ॥

## रत्न ४७८ वें

**पणयः-ऋषि, सरमा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अयं निधिः सरमे अद्रिबुध्नो गोभिरश्वेभिर्वसुभिन्यृष्टः ।
रक्षन्ति तं पणयो ये सुगोपा रेकु पदमलकमा जगन्थ ॥
॥ १०-१०८-७ ॥

## रत्न ४७५ वें

(सरमा म्हणते)-ऐका, पणीहो! माझा इंद्र कसा आहे, तें सांगतें. ऐका! त्या इंद्राला ठार मारणारा असा त्रैलोक्यांत कोणी तरी आहे कीं काय हें मला अद्याप समजलें नाहीं! उलट इतकें मात्र खात्रीनें सांगतें कीं, त्याला जे विरोध करतात, त्यांना ठार मारल्याबांचून तो राहत नाहीं! अर्थात् तो सर्वांचा विध्वंसक आहे, हें खचीत समजा! नद्या किती कां खोल असेनात, त्याला त्या गडप करूं शकत नाहींत! तर उलट त्यालाच प्रकट करतात. अशा प्रकारचा तो इंद्र आहे.पणींनो! खास समजा कीं, त्याच्याकडून तुम्ही ठार मारले जाऊन जमिनीवर प्रेत होऊन पडाल! ( १०–१०८–४ ).

## रत्न ४७६ वें

( पणी म्हणतात)-हे सुभगे! सरमे! गायींचा शोध करीत तूं आकाशाच्या त्या टोंकापासून या टोंकापर्यंत सारखी भटकत आहेस. पण त्या गायी तुला कशा मिळणार? त्या येथें पर्वतांत आहेत. तर त्या लढाईशिवाय आपसुखें कोण बरें सोडून देईल? शिवाय आमचीं शस्त्रास्त्रें पुसशील तर तीं परजून चांगलीं प्रखर करून ठेविलीं आहेत! ( १०–१०८–५ ).

## रत्न ४७७ वें

(सरमा म्हणते)-पणीहो! ही तुमची वटवट शूर शिपाईबाण्याला शोभण्यासारखी नाहीं! शिवाय तुमचीं शरीरें बाण मारण्याच्या देखील लायकीचीं नाहींत! कारण तीं पापी आहेत! आणि तो तुमचा मार्गहि पण तितकाच नालायख आहे! तुमच्या त्या उभयविध शरीरांला बृहस्पति सुख न देवो! ( १०–१०८–६ ).

## रत्न ४७८ वें

पणी म्हणतात—बरें, पण सरमे! हें तुला कोठें ठाऊक आहे कीं हा जो आमचा खजिना आहे, तो गायी घोडे व धन यांनीं खच्चून भरलेला असून तो पर्वतांच्या पोटांत चांगला बंदिस्त करून सुरक्षित राखून ठेवण्यांत आला आहे. शिवाय शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज असे शूरपणी त्याचें अहोरात्र डोळ्यांत तेल घालून पहारा करीत आहेत. मग तू जी गायींच्या मोठ्या आशेनें येथें आलीस, तें सर्व व्यर्थच नव्हें का? ( १०–१०८–७).

## रत्न ४७९ वें

**सरमा-ऋषि, पणयो-देवता, त्रिष्टुप्-छंद**

एह गमन्नृषयः सोमशिता अयास्यो अङ्गिरसो नवग्वाः ।
त एतमूर्वं वि भजन्त गोनामथैतद्वचः पणयो वमन्नित् ॥
॥ १०-१०८-८ ॥

## रत्न ४८० वें

**पणयः-ऋषि, सरमा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

एवा च त्वं सरम आजगन्थ प्रबाधिता सहसा दैव्येन ।
स्वसारं त्वा कृणवै मा पुनर्गा अप ते गवां सुभगे भजाम ॥
॥ १०-१०८-९ ॥

## रत्न ४८१ वें

**सरमा-ऋषि, पणयो-देवता, त्रिष्टुप्-छंद**

नाहं वेद भ्रातृत्वं नो स्वसृत्वमिन्द्रो विदुराङ्गिरसश्च घोराः ।
गोकामा मे अच्छदयन्यदायमपात इत पणयो वरीयः ॥
॥ १०-१०८-१० ॥

दूरमित पणयो वरीय उद्गावो यन्तु मिनतीर्ऋतेन ।
बृहस्पतिर्या अविन्दन्निगूळ्हाः सोमो ग्रावाण ऋषयश्च विप्राः ॥
॥ १०-१०८-११ ॥

## रत्न ४७९ वें

सरमा म्हणते–पणींनो ! पुनः सांगतें ऐका ! सोम पिऊन तरतरीत झालेले नवग्व व दशग्व अंगिरस व त्यांचा प्रमुख आयास्य ऋषि हे येथें येतील, आणि येऊन तुम्हांला चांगलें चेंचून काढून तो गायींचा कळप हस्तगत करून आपापसांत विभागून घेतील. नंतर मी येथें व्यर्थ आलें असें जें तुम्ही आतांच म्हणाला, तें वमनाप्रमाणें तुम्ही टाकून द्याल. (१०–१०८–८).

## रत्न ४८० वें

पणी म्हणतात–बरें, सरमे ! तें सगळें असूं दे. गायींचा शोध करून येण्याविषयीं देवांनीं तुजवर सक्ति केली आहे असें दिसतें. म्हणून तर तूं येथपर्यंत वणवण करीत आलीस. बरें, आतां आलीस ती आलीस. आम्ही तुला आमची बहीण समजतों. आतां पुनः तिकडे इंद्राकडे जाऊंच नकोस ! आम्ही त्या तुझ्या इंद्राच्या गायी पर्वतांमध्यें लपवून ठेविल्या आहेत; त्या आपसांत वांटून घेऊ म्हणजे झालें. (१०–१०८–९).

## रत्न ४८१ वें

सरमा म्हणते--पणीहो ! खरं सांगूं तुम्हांना, मी तुमचा भाऊपणाहि जाणत नाहीं व बहीणपणाहि ओळखत नाहीं! हें सर्व तो इंद्र जाणतो आणि ते भयंकर अंगिरस जाणतात. हें पक्कें ध्यानांत ठेवा कीं, मी इंद्राकडे गेलें म्हणजे तुम्ही चोरून आणलेल्या गायी पुनः परत नेण्यासाठीं ते माझे इन्द्रादि देव तुमच्या या स्थानावर हमखास चढाई करून येतील. म्हणून तुम्हांस बऱ्या बोलानें सांगतें कीं, तुम्ही आतां गायींचा नाद सोडून आपला जीव बचावण्यासाठीं येथून दुसरीकडे मुकाट्यानें पळून जा !! निघून जा कसे !! (१०–१०८–१०). पुनः सांगतें कीं तुम्ही येथून दूर-अति दूर-पळून जा ! तुम्ही बंधनांत ठेविलेल्या गायी स्तोत्राच्या योगानें इन्द्राचें साह्य मिळवून बृहस्पतिप्रभृति ऋषि पर्वतांतून बाहेर काढतील. आणि याप्रमाणें तुम्ही लपवून ठेविलेल्या गाई बृहस्पति पुनः परत मिळवील. आणि त्या बरोबरच सोम, ग्रावे आणि मेधावी अंगिरस ऋषींहि त्या प्राप्त करून घेतील. (१०–१०८–११).

## रत्न ४८२ वें

**जुहु ब्रह्मजाया-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

ब्रह्मचारी चरति वेविषद्विषः स देवानां भवत्येकमङ्गम् ।
तेन जायामन्वविन्दद्बृहस्पतिः सोमेन नीतां जुह्वं न देवाः ॥
॥ १०-१०९-५ ॥

**स्मा. वि. देवे.**

## रत्न ४८३ वें

**जमदग्नि भार्गव-ऋषि, सरस्वतीळा भारती-देवता त्रिष्टुप्-छंद**

आ नो यज्ञं भारती तूयमेत्विळा मनुष्वदिह चेतयन्ती ।
तिस्रो देवीर्बर्हिरेदं स्योनं सरस्वती स्वपसः सदन्तु ॥
॥ १०-११०-८ ॥

## रत्न ४८४ वें

**जमदग्नि भार्गव-ऋषि, स्वाहा-देवता, त्रिष्टुपूछंद**

सद्यो जातो व्यमिमीत यज्ञमग्निर्देवानामभवत्पुरोगाः ।
अस्य होतुः प्रदिश्यृतस्य वाचि स्वाहाकृतं हविरदन्तु देवाः ॥
॥ १०-११०-११ ॥

## रत्न ४८५ वें

**वैरूप नभःप्रभेदन-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद**

इदं ते पात्रं सनवित्तमिन्द्र पिबा सोममेना शतक्रतो ।
पूर्ण आहावो मदिरस्य मध्वो यं विश्व इदभिहर्यन्ति देवाः ॥
॥ १०-११२-६ ॥

**स्मा. वि. देवे**

नि षु सीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कवीनाम् ।
न ऋते त्वत्क्रियते किं चनारे महामर्कं मघवञ्चित्रमर्च ॥
॥ १०-११२-९ ॥

## रत्न ४८२ वें

अहो देवहो ! जो ब्रह्मचारी आहे तो सर्व यज्ञकर्मात मोठा तत्पर असतो. स्तोत्र गाऊन व हवि अर्पण करून देवांना प्रसन्न करणारा होत्साता तो जणु काय देवांचा एक घटकच होऊन बसतो. म्हणून देवांना ज्याप्रमाणें 'जुहू' ( यज्ञपळी ) मिळाली, त्याप्रमाणें बृहस्पतीनें सोमानें नेलेली पत्नी परत मिळविली ( १०-१०९-५ ).

## रत्न ४८३ वें

मनुष्याप्रमाणें स्वकर्तव्य जाणणारी इळा, भारती व सरस्वती या आमच्या यज्ञांत आगमन करोत ! त्या तिघीहि पुण्यवान असून या सुखकारक दर्भासनावर बसोत ! ( १०-११०-८ )

## रत्न ४८४ वें

जन्मल्याबरोबर अग्नि देव हा यज्ञ निर्माण करता झाला आणि म्हणून तोच देवांचा पुढारीहि पण बनला. यज्ञाच्या अग्रस्थानीं असलेल्या अग्नीच्या मुखामध्यें स्वाहा म्हणून अर्पण केलेलें हविरन्न देव भक्षण करोत ! ( १०-११०-११ ).

## रत्न ४८५ वें

हे इन्द्र देवा ! हें तुझें चमसपात्र आम्हांस फार दिवसांनी मिळालें आहे. तर, देवा ! त्यांतून तूं आतां सोमपान कर ! तें पात्र मदकारक अशा सोमरसानें आम्ही तुजप्रीत्यर्थ भरून ठेविलें आहे. आणि सर्व देवहि त्याचीच इच्छा धारण करतात. ( १०-११२-६ ). हे गणपते ! तूं या आमच्या स्तोतृजनांत सुखानें येऊन बैस ! कारण तुला विद्वानांतला अत्यंत थोर विद्वान् म्हणून समजतात. तुला वगळून कोणतेंहि कृत्य-मग तें दूर असो वा जवळ असो-केलें जात नाहीं. हे इन्द्र देवा ! महान् व पूजनीय अशा या आमच्या स्तोमाची नाना रूपानें पूर्णता कर ! ( १०-११२-९ ).

## रत्न ४८६ वें

**घर्म-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्छंद**

घर्मा समन्ता त्रिवृतं व्यापतुस्तयोर्जुष्टिं मातरिश्वा जगाम ।
दिवस्पयो दिधिषाणा अवेषन्विदुर्देवाः सहसामानमर्कम् ॥
॥ १०.११४-१ ॥

तिस्रो देष्ट्राय निर्ऋतीरुपासते दीर्घश्रुतो वि हि जानन्ति वह्नयः ।
तासां नि चिक्युः कवयो निदानं परेषु गुह्येषु व्रतेषु ॥
॥ १०-११४-२ ॥

चतुष्कपर्दा युवतिः सुपेशा घृतप्रतीका वयुनानि वस्ते ।
तस्यां सुपर्णा वृषणा नि षेदतुर्यत्र देवा दधिरे भागधेयम् ॥
॥ १०-११४-३ ॥

## रत्न ४८७ वें

**घर्मऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद**

एकः सुपर्णः स समुद्रमा विवेश स इदं विश्वं भुवनं वि चष्टे ।
तं पाकेन मनसापश्यमन्तितस्तं माता रेळ्हि स उ रेळ्हि
मातरम् ॥ १०-११४-४ ॥

## रत्न ४८८ वें

**घर्म-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद**

सुपर्णं विप्राः कवयो वचोभिरेकं सन्तं बहुधा कल्पयन्ति ।
छन्दांसि च दधतो अध्वरेषु ग्रहान्त्सोमस्य मिमते द्वादश ॥
॥ १०-११४-५ ॥

## रत्न ४८६ वें

दिगंतापर्यंत प्रकाशणारे अग्नि व आदित्य या देवांनी आपल्या झगझगीत तेजानें हें सर्व त्रिभुवन जसें कांहीं कोंदून सोडलें आहे ! अंतरिक्षातील वायु हा त्या दोघांच्या प्रेमांतला आहे. तेजस्वी व पूजनीय अशा सूर्यापासून देवांनीं आपलें तेज प्रथम प्राप्त करून घेतलें आणि मग त्यांनी पृथ्वीवर पाऊस पाडला. (१०–११४–१). पृथ्वी, आकाश व द्युलोक या तीनहि लोकांत अधिष्ठित झालेल्या अग्निप्रभृति देवांची लोक अन्नदानार्थ म्हणून उपासना करतात. विशालकीर्ति व दूरदर्शी असे हे देव ती उपासना जाणतात. जे ज्ञानी आहेत, तेच या विश्वाचें आदिकारण जाणूं शकतात. आणि त्यांनाच उत्कृष्ट व गूढ अशा यमनियमात्मक व्रतांचें पूर्ण ज्ञान असतें. (१०–११४–२). जिला चार कोपरे आहेत, जी स्त्रीरूप आहे, जी सुंदर अलंकारांनीं विभूषित आहे, जी घृतमुखी आहे, अशा प्रकारची ही वेदि, तिच्या ठायीं सर्व यज्ञयागादिकांचें कर्मज्ञान केंद्रीभूत झालें आहे. आणि म्हणून येथेंच देवांना हवि अर्पण करणारे यजमान व त्यांचे पुरोहित येऊन बसतात आणि येथेंच देव येऊन आपापला हविर्भाग ग्रहण करतात. (१०-११४-३).

## रत्न ४८७ वें

एक पक्षी अंतरिक्षांत शिरून, तेथूनच तो सर्व विश्वाचें निरीक्षण करीत असतो. अशा प्रकारच्या देवाला मी परिपक्व मनानें माझ्याजवळ असलेला असा पाहत आहे. तेथें माता त्याला चाटीत असते आणि तोहि तिला चाटीत असतो. (१०-११४-४).

## रत्न ४८८ वें

वस्तुतः तो पक्षी एकच आहे. असें असलें तरी ज्ञानी लोक आपल्या प्रतिभेनें त्याला अनेक प्रकारचा कल्पून, त्याचें स्तुतिस्तोत्र गात असतात. आणि अध्वर यागांत म्हणण्यासाठीं म्हणून त्यांनी गायत्र्यादि सात छंदाची धारणा केली असून, देवांना सोमरस अर्पण करण्यासाठीं म्हणून बारा ग्रहपात्रें निर्माण करून ठेविलीं आहेत. (१०–११४–५).

षट्त्रिंशाँश्च चतुरः कल्पयन्तश्छन्दांसि च दधत आद्वादशम् ।
यज्ञं विमाय कवयो मनीष ऋक्सामाभ्यां प्र रथं वर्तयन्ति ॥
॥ १०-११४-६ ॥

चतुर्दशान्ये महिमानो अस्य तं धीरा वाचा प्र णयन्ति सप्त ।
आप्नानं तीर्थं क इह प्र वोचद्येन पथा प्रपिबन्ते सुतस्य ॥
॥ १०-११४-७ ॥

सहस्रधा पञ्चदशान्युक्था यावद् द्यावापृथिवी तावदित्तत् ।
सहस्रधा महिमानः सहस्रं यावद्ब्रह्म विष्ठितं तावती वाक् ॥
॥ १०-११४-८ ॥

कश्छन्दसां योगमा वेद धीरः को धिष्ण्यां प्रति वाचं पपाद ।
कमृत्विजामष्टमं शूरमाहुर्हरी इन्द्रस्य नि चिकाय कः स्वित् ॥
॥ १०-११४-९ ॥

भूम्या अन्तं पर्येके चरन्ति रथस्य धूर्षु युक्तासो अस्थुः ।
श्रमस्य दायं वि भजन्त्येभ्यो यदा यमो भवति हर्म्ये हितः ॥
॥ १०-११४-१० ॥

## रत्न ४८९ वें

**भिक्षु आंगिरस-ऋषि, धनान्नदान-स्तुति-देवता, जगती-छंद**

न वा उ देवाः क्षुधमिद्वधं ददुरुताशितमुप गच्छन्ति मृत्यवः ।
उतो रयिः पृणतो नोप दस्यत्युतापृणन्मर्डितारं न विन्दते ॥
॥ १०-११७-१ ॥

**औ. वि. धनदान व अन्नदान स्तुति**

छत्तीस आणि चार म्हणजे चाळीस ग्रहपात्रें सोमरसानें
रून ठेवणारे आणि स्तुतिस्तोत्रात्मक बारा छंदे धारण करणारे
से हे कविजन आपल्या बुद्धीच्या योगानें यज्ञ निर्माण करून, ऋक् व साम
ा दोन चाकांच्या योगानें तो यज्ञरूपी रथ चालविते झाले. (१०-११४-६).
ा यज्ञाच्या आणखी चौदा विभूति आहेत. तो यज्ञ-रथ सप्तर्षि हे शस्त्रादि
तोत्ररूपानें स्तुति करून चालवीत असतात. ज्या यज्ञरूपी मार्गानें देव यथेच्छ
ोमपान करते झाले, त्या व्यापक व पापनाशक तीर्थाचें यथार्थ वर्णन येथें
ोण बरें करूं शकेल ? ( १०-११४ ७ ) ब्रह्मादिस्तंबपर्यंत जे सहस्रावधि
ह आहेत, त्या देहांमध्यें फक्त चक्षुश्रोत्रादि पंधरा अंगेंच मुख्य आहेत.
ावापृथ्वीचें जेवढें परिमाण असतें, तेवढ्याच परिमाणाचा आत्माहि असतो.
हस्रावधि ठिकाणीं सहस्रावधि व्यवहार – विषय असतात. ब्रह्म हें विविध-
ाणिदेहरूपानें जेवढ्या परिमाणाचें असतें, तेवढ्याच परिमाणाची वाणीहि
ण असते. ( १०-११४-८ ). छंदाचा विनियोग जाणणारा असा शहाणा
ोण आहे ? ऋत्विजांची धिष्ण्यादि सप्त स्थानें व तदर्ह वाणी यांचें
तिपादन कोण करतो ? सात ऋत्विजांचें स्वतत्र असें आठवें स्थान कशाला
्हणतात ? इन्द्राचे ऋक्-सामरूपी हरी नांवाचे घोडे यथार्थ जाणणारा असा
ोण आहे ? ( १०-११४-९ ) हे घोडे पृथ्वीच्या अंतापर्यंत जाऊन
ंचतात. तेव्हां ते रथाच्या धुरेला जोडलेले असतात. सूर्य जेव्हां रथांत
ाऊन बसतो, तेव्हां देव या घोड्यांना श्रमहारक असे घासादि खाद्य
ावयास देतात. ( १०-११४-१० ).

## रत्न ४८९ वें

देवांनीं मनुष्यमात्रांना वस्तुत: क्षुधा दिली नसून, प्रत्यक्ष वधच दिला
ाहे, असेंच कां म्हणाना ! कारण दुसऱ्यास न देतां जो आपण एकटाच
न्नाचा उपभोग घेतो, त्याला देखील मृत्यु हा अखेर गांठतोच की नाहीं !
ुधिताला जो अन्नदान करतो, तोच खरा दाता होय ! जो क्षुधिताला
न्न देऊन त्यास संतुष्ट करतो, त्याची लक्ष्मी घरांतून केव्हांहि पाय बाहेर
ाढीत नाहीं. पण जो दुसऱ्याला दानधर्म करीत नाहीं, त्याला मात्र
खविणारा असा जगांत कोणीच भेटत नाहीं ! ( १०-११७-१ ).

य आध्राय चकमानाय पित्वोऽन्नवान्त्सन्नफितायोपजग्मुषे ।
स्थिरं मनः कृणुते सेवते पुरोतो चित्स मर्डितारं न विन्दते ॥

॥ १०-११७-२ ॥

## रत्न ४९० वें

### भिक्षु आंगिरस-ऋषि, धनान्नदान-देवता, त्रिष्टुप्-छंद

स इद्भोजो यो गृहवे ददात्यन्नकामाय चरते कृशाय ।
अरमस्मै भवति यामहूता उतापरीषु कृणुते सखायम् ॥

॥ १०-११७-३ ॥

### हमा. वि. धनान्नदान प्रशंसा

न स सखा यो न ददाति सख्ये सचाभुवे सचमानाय पित्वः ।
अपास्मात्प्रेयान्न तदोको अस्ति पृणन्तमन्यमरणं चिदिच्छेत् ॥

॥ १०-११७-४ ॥

पृणीयादिन्नाधमानाय तव्यान्द्राघीयांसमनु पश्येत पन्थाम् ।
ओ हि वर्तन्ते रथ्येव चक्राऽन्यमन्यमुप तिष्ठन्त रायः ॥

॥ १०-११७-५ ॥

मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य ।
नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी ॥

॥ १०-११७-६ ।

जो स्वतः धनधान्यादिकांनीं संपन्न असूनहि दुर्बल, दरिद्री क्षुधाग्रस्त अशा घराप्रत आलेल्या याचकास मन क्षुद्र करून अन्नदान करीत नाहीं व आपण एकटाच त्यावर यथेच्छ ताव मारतो, त्याला जगांत सुखविणारा असा कोणीच लाभत नाहीं ! ( १०-११७-२ )

## रत्न ४९० वें

अन्नाची इच्छा धरून घरीं आलेल्या व भिक्षार्थ भिरभिर भटकणाऱ्या अशा कृश मनुष्याला जो अन्नदान करतो, तोच खरा दाता होय ! अशा दात्यालाच देवयजनाचें इष्ट फल मिळतें आणि शत्रु देखील त्याची औदार्य-वृत्ति पाहून त्याचे मित्र होतात ! ( १०-११७-३ ) सदोदित आपल्या सहवासांत असून आपली अहर्निश सेवाचाकरी करणाऱ्या मित्राला जो भोजनास बोलावीत नाहीं, तो त्याचा खरा मित्रच नव्हे ! अशा कृपणाचें मित्रत्व सोडून तो केव्हांतरी दुसरीकडे निघून जाणारच. असें झालें म्हणजे तो सोडून गेलेला मित्र मग जर दुसऱ्या उदार पुरुषाच्या आश्रयाची इच्छा करील, तर मग त्या कृपणाचें घर हें घरच नव्हे ! (१०-११७-४) जो संपन्न आहे अशा भाग्यवंतानें द्रव्याची याचना करीत घरीं आलेल्या धनार्थीला यथाशक्ति धनदान करून त्यास संतुष्ट करावें. असें झाल्यास तो दाता पुण्यमार्ग पाहील ! चालत्या रथाची चाकें जशीं वरखालीं फिरत असतात, तद्वत् ही लक्ष्मी झाली तरी एकाला सोडून दुसऱ्याकडे, त्याला सोडून तिसऱ्याकडे अशी सारखी फिरत असते. (१०-११७-५) जो कृपण स्वभावाचा खाष्ट पुरुष आहे, त्याला अन्नसंपत्ति मिळणें, हें खरोखर व्यर्थ-अगदीं व्यर्थ-आहे. मी हा ऋषि अगदीं सत्य सत्य सांगतों कीं, तें त्याचें अन्न ह्मणजे केवळ मृत्युच होय ! जो देवादिकांना व इष्टमित्रांना अन्न देऊन संतोषवीत नाहीं, असा एकटाच खाणारा तो कंजूष मनुष्य केवळ पापीच होय !(१०-११७-६)

कृषन्नित्फाल आशितं कृणोति यन्नध्वानमप वृङ्क्ते चरित्रैः ।
वदन्ब्रह्मावदतो वनीयान्पृणन्नापिरपृणन्तमभि ष्यात् ॥
॥ १०-११७-७ ॥

एकपाद्भूयो द्विपदो वि चक्रमे द्विपात्त्रिपादमभ्येति पश्चात् ।
चतुष्पादेति द्विपदामभिस्वरे संपश्यन्पङ्क्तीरुपतिष्ठमानः ॥
॥ १०-११७-८ ॥

समौ चिद्धस्तौ न समं विविष्टः संमातरा चिन्न समं दुहाते ।
यमयोश्चिन्न समा वीर्याणि ज्ञाती चित् सन्तौ न समं पृणीतः ॥
॥ १०-११७-९ ॥

## रत्न ४९१ वें

**हिरण्यगर्भ प्राजापत्य-ऋषि, क (प्रजापति)-देवता, त्रिष्टुप्-छंद**

हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ।
स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥
॥ १०-१२१-१ ॥

**श्रौ. वि. (वरुणप्रघास) याज्या.    स्मा. वि. सायं औपासन; प्रजापति-उपस्थान, पुण्याहवाचन, दक्षिणा-अर्पण.**

य आत्मदा बलदा यस्य विश्व उपासते प्रशिषं यस्य देवाः ।
यस्य छायामृतं यस्य मृत्युः कस्मै देवाय हविषा विधेम ॥
॥ १०-१२१-२ ॥

पड्डा, नांगर हा स्वतः जमिनींत शिरून मालकाला धान्य मिळवून देतो. त्याचप्रमाणें जो परोपकारी असतो तो स्वतः श्रम घेऊन अडलेल्यास मार्गदर्शन करतो. त्याचप्रमाणें बालपणापासून श्रम करून विद्या शिकून दुसऱ्यास ज्ञान सांगणारा ब्राह्मण तें न सांगणाऱ्यापेक्षां अधिक प्रिय होतो आणि तसेंच अन्नदान करून याचकाला संतुष्ट करणारा असा जो परोपकारी आहे तोच खरा आप्त असून, तोच दानधर्म न करणाऱ्या कवडी-चुंबकाचा खात्रीनें पराभव करतो. (१०-११७-७) ज्याच्याजवळ एक भाग संपत्ति ह्मणजे थोडी पुंजी आहे तो उद्यां दुप्पट पुंजी असणाऱ्याला जाऊन मिळतो, व तोच पुढें कालांतरानें तिप्पट पुंजीवाल्यासहि जाऊन गांठतो. याच्या उलट ज्याच्याजवळ चौपट द्रव्य आहे तो सुस्थिति भोगत असतां कालचक्र फिरून एकपाद धनवन्तांच्या पंक्तीत येऊन बसतो ! (ह्मणून मीच काय तो श्रीमंत असा कोणीं गर्व वाहूं नये.) (१०-११७-८) आपले दोन्ही हात सारखेच असले, तरी ते सारखेंच कार्य करूं शकत नाहीत. वत्स असलेल्या दोन धेनू झाल्या तरी सारख्याच प्रमाणांत दूध देत नाहीत. एकाच आईपासून झालेली जुळी भावंडें सारखाच पराक्रम गाजवीत नाहीत. त्याचप्रमाणें एकाच कुलांत जन्मलेले सगळे सारखेच दानशूर नसतात. (म्हणून आपल्याजवळ जें काय असेल, त्यांतून कांही तरी याचकास यथाशक्ति देत जावें) (१०-११७-९).

रत्न ४९१ वें

या ब्रह्मांडांत गर्भरूपानें राहिलेला प्रजापति देव हा हे सर्व प्राणिजात उत्पन्न व्हावयाच्या पूर्वी स्वतःच प्रथम देहधारी झाला. याप्रमाणे उत्पन्न होतांच, तो एकमेवाद्वितीय असल्यामुळें अर्थात्च या सकल जीवसृष्टीचा तोच ईश्वर बनला. अंतरिक्ष, स्वर्ग व पृथ्वी या तीनहि लोकांचें धारण तोच एक देव करतो, अशा त्या प्रजापति देवाला उद्देशून आम्ही हविर्भाग अर्पण करतों. (१०-१२१-१). जो उपासकांना सायुज्य देतो, सामर्थ्य देतो, ज्याची आज्ञा सर्व जग शिरसा प्रमाण मानतें, आणि देवदेखील ज्याचा शब्द तोलून धरतात, त्याचप्रमाणें ज्याची ज्ञानपूर्वक उपासना मुक्तीला व अज्ञानपूर्वक उपासना जन्ममृत्यूला कारण होते, अशा त्या प्रजापतिदेवाला उद्देशूनच आम्ही हविर्भाग अर्पण करतों. (१०-१२१-२).

यः प्राणतो निमिषतो महित्वैक इद्राजा जगतो बभूव।
य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम॥

॥ १०-१२१-३ ॥

यस्येमे हिमवन्तो महित्वा यस्य समुद्रं रसया सहाहुः।
यस्येमाः प्रदिशो यस्य बाहू कस्मै देवाय हविषा विधेम॥

॥ १०-१२१-४ ॥

येन द्यौरुग्रा पृथिवी च दृळ्हा येन स्वः स्तभितं येन नाकः।
यो अन्तरिक्षे रजसो विमानः कस्मै देवाय हविषा विधेम॥

॥ १०-१२१-५ ॥

यं क्रन्दसी अवसा तस्तभाने अभ्यैक्षेतां मनसा रेजमाने।
यत्राधि सूर उदितो विभाति कस्मै देवाय हविषा विधेम॥

॥ १०-१२१-६ ॥

आपो ह यद्बृहतीर्विश्वमायन्गर्भं दधाना जनयन्तीरग्निम्।
ततो देवानां समवर्ततासुरेकः कस्मै देवाय हविषा विधेम॥

॥ १०-१२१-७ ॥

यश्चिदापो महिना पर्यपश्यद्दक्षं दधाना जनयन्तीर्यज्ञम्।
यो देवेष्वधि देव एक आसीत्कस्मै देवाय हविषा विधेम॥

॥ १०-१२१-८ ॥

मा नो हिंसीज्जनिता यः पृथिव्या यो वा दिवं सत्यधर्मा जजान।
यश्चापश्चन्द्रा बृहतीर्जजान कस्मै देवाय हविषा विधेम॥

॥ १०-१२१-९ ॥

श्वासोच्छ्वास करणाऱ्या व डोळे उघडझांक करणाऱ्या अशा सकल जीवजाताचा जो एकटाच अधिपति झाला आणि जो त्या द्विपाद व चतुष्पाद प्राणिमात्रांवर आपली सत्ता चालवितो,अशा त्या सुखस्वरूप प्रजापति देवाला उद्देशून आम्ही हविर्भाग अर्पण करतों ( १०–१२१–३ ) . ज्याच्या सामर्थ्यामुळें हिमालय प्रभृति पर्वत आणि नद्यांसहित समुद्र निर्माण झाले असें म्हणतात आणि तसेंच ज्याच्या महिम्यानें दिशा व उपदिशा बाहू म्हणून गणल्या जातात, अशा त्या प्रजापति देवाला सोडून आम्हीं दुसऱ्या कुणाची उपसना करावी ? (१०–१२१–४) ज्याच्यामुळें द्युलोक उग्र झाला, पृथ्वी स्थिर झाली, स्वर्ग स्तंभित झाला व आदित्य लोक सावरून धरला गेला आणि जो आकाशांत मेघ निर्माण करतो, अशा त्या प्रजापतीला सोडून आम्हीं दुसऱ्या कोणत्या देवाची उपासना करावी ? ( १०–१२१–५ ) तेजस्वी असें अंतरिक्ष व स्थिर अशी पृथ्वी हीं ज्याचें मनःपूर्वक दर्शन घेतात, व उदय पावणारा सूर्य हा ज्याच्या प्रभावानें आकाशांत प्रकाशतो, अशा त्या प्रजापति देवाला उद्देशूनच आम्ही हविर्भाग अर्पण करतों. ( १०–१२१–६ ) . अग्निप्रभृति सर्व भूतजातांस उत्पन्न करणारें आणि तदर्थ गर्भरूपी प्रजापतीला धारण करणारें असें उदक ज्याच्या महिम्यानें सर्व विश्वाला व्यापून राहिलें व ज्याच्यापासून देवांमध्येंहि प्राणशक्ति निर्माण झाली, अशा त्या सुखस्वरूप परमेश्वराला उद्देशूनच आम्ही पुरोडाशादि हविरन्न अर्पण करतों. ( १०–१२१–७ ) . यज्ञोपलक्षित सर्व विकारजातांला उत्पन्न करणारें, व तदर्थ वर्धिष्णु अशा प्रजापतीला धारण करणारें असें उदक ज्यानें आपल्या महिम्यानें पूर्णतः जाणलें व जो देवांचाहि ईश्वर बनला, अशा त्या सुखधाम परमेश्वराला सोडून आम्हीं कोणत्या देवाला हविर्भाग द्यावा ? ( १०–१२१–८ ) ज्यानें पृथ्वी उत्पन्न केली, स्वर्ग उत्पन्न केला, जो सत्यधर्माचा परिपालक आहे, असा तो हा प्रजापति देव आमची हिंसा न करो ! त्यानेंच या मोठ्या व आल्हाददायिनी नद्या निर्माण केल्या. अशा त्या प्रजापतीला सोडून आम्ही दुसऱ्या कोणत्या देवाची बरें उपासना करावी ! ( १०–१२१–९ ).

प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परि ता बभूव ।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणाम् ॥

॥ १०-१२१-१० ॥

**स्मा. वि. भोजन-संकल्प, आपोशन, व्याहृति मंत्र.**

## रत्न ४९२ वें

**वाच् आंभृणी-ऋषि, आत्मा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अहं रुद्रेभिर्वसुभिश्चराम्यहमादित्यैरुत विश्वदेवैः ।
अहं मित्रावरुणोभा बिभर्म्यहमिन्द्राग्नी अहमश्विनोभा ॥

॥ १०-१२५-१ ॥

**स्मा. वि. देवीसूक्त**

## रत्न ४९३ वें

**वाच् आंभृणी-ऋषि, आत्मा-देवता, जगती-छंद**

अहं सोममाहनसं बिभर्म्यहं त्वष्टारमुत पूषणं भगम् ।
अहं दधामि द्रविणं हविष्मते सुप्राव्येऽ यजमानाय सुन्वते ॥

॥ १०-१२५-२ ॥

## रत्न ४९४ वें

**वाच् आंभृणी-ऋषि, आत्मा-देवता, त्रिष्टुप्-छंद**

अहं राष्ट्री संगमनी वसूनां चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।
तां मा देवा व्यदधुः पुरुत्रा भूरिस्थात्रां भूर्यावेशयन्तीम् ॥

॥ १०-१२५-३ ॥

मया सो अन्नमत्ति यो विपश्यति यः प्राणिति य ईं शृणोत्युक्तम् ।
अमन्तवो मां त उप क्षियन्ति श्रुधि श्रुत श्रद्धिवं ते वदामि ॥

॥ १०-१२५-४ ॥

हे प्रजापति देवा ! या सर्व भूतजाताला व्यापून टाकण्यास तुझ्याशिवाय दुसरा कोणताहि देव समर्थ झाला नाहीं. हे देवा ! ज्या इच्छेनें आम्ही तुला हविर्भाग अर्पण करूं इच्छितों, ती आमची इच्छा तुझ्या कृपेनें सफल होवो ! आणि आम्ही संपत्तीचे मालक होऊं, असें घडो ! (१०–१२१–१०)

## रत्न ४९२ वें

ही जी मी वायुरूपी आदिशक्ति ती रुद्र व वसु यांजबरोबर फिरत असतें. तशीच आदित्य व विश्वेदेव यांच्याबरोबरहि मी हिंडत असतें. मित्र व वरुण या दोघांना धारण करणारी मीच होय ! तसेंच इन्द्र, अग्नि व अश्विदेव यांनाहि पण मीच धारण करतें ( १०–१२५–१ ) !

## रत्न ४९३ वें

शत्रूचा नाश करणाऱ्या सोमाला धारण करणारी मीच आहें ! त्वष्टा, पूषा, व भग यांनाहि धारण करणारी ती मीच ! त्याचप्रमाणें हविर्युक्त असणाऱ्या व देवांना हविर्भाग अर्पण करणाऱ्या यजमानाला ऐश्वर्य देणारी पण मीच आहें ! ( १०–१२५–२ )

## रत्न ४९४ वें

मी सर्व जगाची स्वामिनी आहें ! उपासकाला सर्व प्रकारची संपत्ति मिळवून देणारी, परतत्त्वाचें साक्षात् ज्ञान करून घेतलेली, व यज्ञार्ह देवांत प्रमुख अशी काय ती मीच आहें ! विविध प्राणिजातांत प्राविष्ट होऊन राहिलेल्या त्या मला देवांनीं अनेक ठिकाणीं स्थापन केली आहे. (१०–१२५–३). जो जो म्हणून अन्न खातो, जो जो हें विविध जग पाहतो व जो जो शब्द श्रवण करतो, तो तो ती ती क्रिया माझ्यामुळेंच करीत असतो. याप्रमाणें सर्वांच्या अंतर्यामीं असणाऱ्या मला जे जाणत नाहींत, ते संसारांत हीनावस्थेंत राहतात. हे सुप्रसिद्ध मित्रा ! ऐक. श्रद्धा ठेवण्या-सारखें सत्यज्ञानच मी तुला सांगत आहें. (१०–१२५–४)

अहमेव स्वयमिदं वदामि जुष्टं देवेभिरुत मानुषेभिः ।
यं कामये तंतमुग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तमृषिं तं सुमेधाम् ॥
॥ १०-१२५-५ ॥

अहं रुद्राय धनुरा तनोमि ब्रह्मद्विषे शरवे हन्तवा उं ।
अहं जनाय समदं कृणोम्यहं द्यावापृथिवी आ विवेश ॥
॥ १०-१२५-६ ॥

अहं सुवे पितरमस्य मूर्धन्मम योनिरप्स्व१न्तः समुद्रे ।
ततो वि तिष्ठे भुवनानु विश्वोतामूं द्यां वर्ष्मणोप स्पृशामि ॥
॥ १०-१२५-७ ॥

अहमेव वात इव प्र वाम्यारभमाणा भुवनानि विश्वा ।
परो दिवा पर एना पृथिव्यैतावती महिना सं बभूव ॥
॥ १०-१२५-८ ॥

## रत्न ४९५ वें

**गुल्मलबर्हिष शैलूपि-ऋषि, विश्वेदेव-देवता, उपरिष्टद्बृहती-छंद**

न तमंहो न दुरितं देवासो अष्ट मर्त्यम् ।
सजोषसो यमर्यमा मित्रो नयन्ति वरुणो अति द्विषः ॥
॥ १०-१२६-१ ॥

तद्धि वयं वृणीमहे वरुण मित्रार्यमन् ।
येना निरंहसो यूयं पाथ नेथा च मर्त्यमति द्विषः ॥
॥ १०-१२६-२ ॥

देव व मनुष्य यांना ज्या ज्ञानाचा साक्षात्कार झाला, असें ज्ञानच मी तुला सांगत आहें. ज्याला मी वांचविण्याची इच्छा करतें, त्याला मी समर्थ करतें, त्याला मी स्रष्टा बनवितें, त्यालाच मी ऋषि बनवितें आणि त्यालाच मी ज्ञानीहि पण करते ! (१०-१२५-५). वेदविद्येचा द्वेष करणारा असा जो दुष्ट चांडाळ आहे, त्या ब्रह्मद्वेष्ट्या दुष्ट शत्रूला बाणानें मारून धुळीत लोळविण्यासाठीं रुद्र देवाचें धनुष्य जोडून सज्ज करणारी ती मीच होय ! लोकरक्षणार्थ रणधुमाळी माजविणारी तीहि मीच ! या द्यावापृथ्वीमध्यें सर्वत्र व्यापून असणारी अशी काय ती मीच आहें ! (१०-१२५-६) मी द्युलोकाला उत्पन्न करतें. माझें उत्पत्तिस्थान जलमय अशा अंतरिक्षामध्यें आहे. तेथूनच मी सर्व भुवनांत प्रवेश करून सर्वत्र विविधरूपांनीं नटून राहिलेली आहें. तशीच मी स्वर्गालाहि व्यापून आहें. फार काय सर्व विकारजाताला मी माझ्या मायात्मक देहानें स्पर्श करून आहें. (१०-१२५-७) सर्व जगाला निर्माण करण्यास प्रवृत्त झालेली मी वाऱ्याप्रमाणें सर्वत्र संचार करीत असतें. मी द्यावापृथ्वीच्या पलीकडे असून, माझ्या महिम्यानेंच मी एवढी कर्तृत्वशालिनी झालें आहें ! (१०-१२५-८)

## रत्न ४९५ वें

अहो देवास देव हो ! ज्या भक्ताला अर्यमा, मित्र व वरुण हे एक होऊन, त्याच्या शत्रूचा धुव्वा उडवून, त्यास इष्ट स्थळीं सुखरूप पोंचवितात, त्या भक्ताला पातक व तत्फलात्मक संकट याची मुळींसुद्धां बाधा होत नाहीं. (१०-१२६-१) मित्र, वरुण, अर्यमा देव हो! ज्या रक्षणानें तुम्हीं आमचें पापापासून रक्षण करतां व शत्रूच्या तावडींतून पार करून आम्हांस अभीष्ट प्राप्त करून देतां, त्या रक्षणशक्तीची आम्हीं तुमच्याजवळ याचना करतों. (१०-१२६-२).

## रत्न ४९६ वें

**कुशिक सौभर-ऋषि, रात्रि-देवता, गायत्री छंद.**

रात्री व्यख्यदायती पुरुत्रा देव्य१क्षभिः ।
विश्वा अधि श्रियोऽधित ॥ १०-१२७-१ ॥

**औ. वि. रात्रीस्तव. दुस्वप्ननाशनार्थ पायस होम-**

ओर्वप्रा अमर्त्या निवतो देव्यु१द्वतः ।
ज्योतिषा बाधते तमः ॥ १०-१२७-२ ॥

निरु स्वसारमस्कृतोषसं देव्यायती ।
अपेदु हासते तमः ॥ १०-१२७-३ ॥

सा नो अद्य यस्या वयं नि ते यामन्नविक्ष्महि ।
वृक्षे न वसतिं वयः ॥ १०-१२७-४ ॥

नि ग्रामासो अविक्षत नि पद्वन्तो नि पक्षिणः ।
नि श्येनासश्चिदर्थिनः ॥ १०-१२७-५ ॥

यावया वृक्यं१ वृकं यवय स्तेनमूर्म्ये ।
अथा नः सुतरा भव ॥ १०-१२७-६ ॥

उप मा पेपिशत्तमः कृष्णं व्यक्तमस्थित ।
उष ऋणेव यातय ॥ १०-१२७-७ ॥

उप ते गा इवाकरं वृणीष्व दुहितर्दिवः ।
रात्रि स्तोमं न जिग्युषे ॥ १०-१२७-८ ॥

## रत्न ४९६ वें

अनेक प्रदेश व्यापून सोडणारी ही देवी रात्र आतां जवळ जवळ येऊं लागली आहे. आकाशांत लुकलुकणारीं नक्षत्रें हे तिचे डोळे असून, त्या डोळ्यांनीं ती सर्वत्र पाहात असते. अर्थात् तिनें सर्व प्रकारचें रमणीय सौंदर्य धारण केलें आहे. ( १०-१२७-१ ). त्या अमर देवीनें अंधकारानें प्रथम आकाशाला व्यापून सोडलें. नंतर हळूंहळूं उंच व सखल प्रदेशहि घेऊन टाकले. आणि मग ग्रह-नक्षत्रादिकांच्या तेजानें तो अंधारहि नाहींसा केला। ( १०-१२७-२ ) ही देवी रात्र प्रकट झाल्यावर पुढें कांहीं वेळानें आपली भगिनी जी उषा तिला तिनें प्रकाशानें विभूषित केलें. आणि ती उषा देवी आली न आली तोंच त्या अंधकारानें पार तेथून धूम पळ काढला ! (१०-१२७-३) रात्र आली म्हणजे आम्ही सुखानें झोंपीं जातों. अशा प्रकारची ती रात्र आम्हांस क्षेमकर होवो ! ( १०-१२७-४ ) रात्र आली म्हणजे सर्व लोक झोंपी जातात. तसेंच गायी-बैल, पशु-पक्षी आणि जलद धांवणारे बहिरी ससाण्या-सारखे प्राणी हेही निद्रावश होतात.(१०-१२७-५) हे रात्री देवी! लांडगा काय, अथवा लांडगी काय अथवा यांसारखे इतर हिंस्र प्राणी तरी काय या सर्वांना आम्हांपासून दूर हुसकावून लाव ! चोरांना दूर पिटाळून दे! आणि आम्हांला क्षेमकर हो ! ( १०-१२७-६ ) सर्वत्र पसरून राहिलेला हा काळाकुट्ट अंधःकार माझ्याजवळ आला आहे. तर हे उषा देवी ! भक्ताचें ऋण जसें धनदान करून नष्ट करतेस तद्वत् हा अंधारहि पण नष्ट करून टाक की ! ( १०-१२७-७ ) हे रात्री देवी ! मी तुझी स्तुति करून गाईप्रमाणें तुला मजकडे वळवितों. हे द्युकन्ये ! शत्रूंना जिंकूं इच्छिणारा जो मी त्या माझ्या स्तोत्राप्रमाणेच हे हवि झाले तरी तूं ग्रहण कर ! ( १०-१२७-८ ).

## रत्न ४९७ वें

**कुशिक सौभरि-ऋषि, रात्रि-देवता, गायत्री-छंद.**

आ रात्रि पार्थिवं रजः पितरः प्रायु धामभिः ।
दिवः सदांसि बृहती वि तिष्ठस आ त्वेषं वर्तते तमः ॥
॥ १०-१२७ खिल २६-१ ॥

**स्मा. वि. रात्रिसूक्त.**

ये ते रात्रि नृचक्षसो युक्तासो नवतिर्नव ।
अशीतिः संत्वष्टा उतो ते सप्त सप्ततीः ॥
॥ १०-१२७ खिल २६-२ ॥

रात्रीं प्र पद्ये जननीं सर्वभूतनिवेशनीम् ।
भद्रां भगवतीं कृष्णां विश्वस्य जगतो निशाम् ॥
॥ १०-१२७ खिल २६-३ ॥

संवेशिनीं संयमिनीं ग्रहनक्षत्रमालिनीम् ।
प्रपन्नोऽहं शिवां रात्रीं भद्रे पारमशीमहि ॥
॥ १०-१२७ खिल २६-४ ॥

स्तोष्यामि प्रयतो देवीं शरण्यां बह्वृचप्रियाम् ।
सहस्रसंमितां दुर्गां जातवेदसे सुनवाम सोमम् ॥
॥ १०-१२७ खिल २६-५ ॥

**स्मा. वि. दुर्गास्तोत्र.**

शान्त्यर्थं तद् द्विजातीनामृषिभिः सोमपाश्रिताः ।
ऋग्वेदे त्वं समुत्पन्नाऽरातीयतो नि दहाति वेदः ॥
॥ १०-१२७ खिल २६-६ ॥

ये त्वां देवि प्र पद्यन्ति ब्राह्मणा हव्यवाहनीम् ।
अविद्या बहुविद्या वा स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा ॥
॥ १०-१२७ खिल २६-७ ॥

## रत्न ४९७ वें

हे रात्री देवी ! पृथ्वी, अंतरिक्ष व द्युलोक हे तीनहि लोक तूं आपल्या प्रतापानें भरून टाकतेस. विशाल अशी तूं आकाशाच्या मध्यभागीं राहून आपल्या कृष्णवर्ण अंधकारानें प्रकाशाला पार गाडून सोडतेस! (१०-१२७ खिल (२६-१) हे रात्री देवी ! तुझे लोकांना दिसणारे ९९, ८८, व ७७ असे एकंदर २६४ भाग आहेत. ( १०-१२७ खिल २६-२ ) सर्व प्राण्यांचा आधार, मंगलकारक, सामर्थ्यसंपन्न, सर्व जगाला काळोखांत गाडून टाकणारी अशा मातृस्वरूप रात्रदेवीला मी शरण जातों. ( १०-१२७ खिल २६-३ ). सर्वांना आश्रय देणारी, संयमानें वागणारी, ग्रह-नक्षत्रादिकांच्या परिवारांत शोभणारी, अशा मंगलमय रात्रीला मी शरण जातों. हे शुभप्रद देवा ! आम्ही या काळोखांतून सुरक्षित पार पडूं असें कर ! १०-१२७ खिल २६-४ ) पवित्र-आचरणाचा हा मी आतां बहूवृचांना प्रिय, हजारोंना प्रिय व भक्तांचें परम आधारस्थान अशा दुर्गा देवीचें स्तोत्र गातों. ( १०-१२७ खिल २६-५ ). हव्य वाहून नेणारी अशी जी तूं त्या तुला जो कोणी शरण येईल—मग तो विद्वान असो वा अविद्वान असो—तो सर्व संकटांतून खास पार होऊन जातो. ( १०-१२७ खिल २६-७ ).

ये अग्निवर्णां शुभां सौम्यां कीर्तयिष्यन्ति ये द्विजाः ।
तांस्तारयति दुर्गाणि नावेव सिन्धुं दुरितात्यग्निः ॥
॥ १०-१२७ खिल २६-८ ॥

दुर्गेषु विषमे घोरे संग्रामे रिपुसंकटे ।
अग्निचोरनिपातेषु दुष्टग्रहनिवारिणि ॥
॥ १०-१२७ खिल २६-९ ॥

दुर्गेषु विषमेषु त्वं संग्रामेषु वनेषु च ।
मोहयित्वा प्र पद्यन्ते तेषां मे अभयं कुरु ॥
॥ १०-१२७ खिल २६-१० ॥

केशिनीं सर्वभूतानां पञ्चमीति च नाम च ।
सा मां समा निशा देवी सर्वतः परि रक्षतु ॥
॥ १०-१२७ खिल २६-११ ॥

तामग्निवर्णां तपसा ज्वलन्तीं वैरोचनीं कर्मफलेषु जुष्टाम् ।
दुर्गां देवीं शरणमहं प्र पद्ये सुतरसि तरसे नमः ॥
॥ १०-१२७ खिल २६-१२ ॥

दुर्गा दुर्गेषु स्थानेषु शं नो देवीरभिष्टये ।
य इमं दुर्गास्तवं पुण्यं रात्रौरात्रौ सदा पठेत् ॥
॥ १०-१२७ खिल २६-१३ ॥

रात्रीसूक्तं जपेन्नित्यं तत्कालमुपपद्यते ।
न योनिं पुनरायाति सर्वपापैः प्रमुच्यते ॥
॥ १०-१२७ खिल २६-१४ ॥

महाभये समुत्पन्ने स्मरन्ति च जपन्ति च ।
सर्वं तारयते दुर्गा नावेव सिन्धुं दुरितात्यग्निः ॥
॥ १०-१२७ खिल २६-२० ॥

अग्नीसारखी..तेजस्वी अशा या शुभ व शांत देवींचे जे द्विजलोक स्तुतिस्तोत्र गातात, त्यांना ती देवी समुद्रांतील नावेप्रमाणें सर्व संकटातून पार नेते, आणि अग्निदेव सर्व संकटांतून तारून नेतो. ( १०-१२७ खिल २६-८ ) किल्ल्यांत, अत्यंत घोर अशा रणकंदनांत, शत्रुसंकटांत आणि तसेंच अग्नि व चोर यांचे तडाख्यांत सांपडलेल्या भक्तांस, हे देवी ! तूं सुरक्षित पार नेणारी आहेस ! तशीच तूं सर्व ग्रहादिकांची पीडा दूर करणारी आहेस ! तुला आमचा नमस्कार असो ! ( १०-१२७ खिल २६-९ ) भयंकर अशा कठिण प्रदेशांत, घनघोर रणसंग्रामांत, व निबिड अरण्यांत मला फसवून मजवर हल्ला करण्यास जे दुष्ट लोक टपून बसले आहेत, त्यांच्या तावडींतून हे दुर्गादेवी ! तूं मला निर्भय कर ! ( १०-१२७ खिल २६-१० ). अग्नीप्रमाणें सुतेजस्वी, तपाच्या योगानें अत्यंत प्रखर, सुंदर कांतीनें विलसणारी, आणि भक्तांना कर्मफल देणारी अशी जी ही दुर्गा, त्या दुर्गादेवीला मी शरण आहें. ( १०-१२७ खिल २६-१२ ) जो हें पुण्यमय दुर्गास्तोत्र दररोज रात्रीं पठण करतो, त्याचें कठिण प्रसंगीं दुर्गादेवी रक्षण करो ! व याप्रमाणें पठण करणारे जे आम्ही त्या आम्हांसांहि आमच्या अभिवृध्यर्थ शुभ वरप्रदान करो ! ( १०-१२७ खिल २६-१३) हें रात्रिसूक्त नित्य जपावें. तो काळ अगदीं योग्य आहे. जो या सूक्ताचा जप करील त्याला पुनर्जन्म नाहीं ! व तो सर्व पापांतून मुक्त होतो ! ( १०-१२७ खिल २६-१४) महद्भय प्राप्त झालें असतां जे हें दुर्गादेवीचें स्तोत्र स्मरतात व जपतात त्यांना दुर्गादेवी ही समुद्रांतील नावेप्रमाणें सर्व संकटांतून पार करून नेते. आणि अग्नि नारायण हा त्यांचें सर्व पापापासून रक्षण करतो. ( १०-१२७ खिल २६-२० ).

य इमं दुर्गास्तवं पुण्यं शृण्वन्ति च जपन्ति च ।
त्रिषु लोकेषु विख्यातं त्रिषु लोकेषु पूजितम् ।।
।। १०-१२७ खिल २६-२१ ।।

अपुत्रो लभते पुत्रान् धनहीनो धनं लभेत् ।
अचक्षुर्लभते चक्षुर्बद्धो मुच्येत बन्धनात् ।।
।। १०-१२७ खिल २६-२२ ।।

व्याधितो मुच्यते रोगादरोगी श्रियमाप्नुयात् ।
ददाति कामितं सर्वं कात्यायनि नमोस्तु ते ।।
।। १०-१२७ खिल २६-२३ ।।

## रत्न ४९८ वें

**विहव्य आंगिरस-ऋषि, विश्वेदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

ममाग्ने वर्चो विहवेष्वस्तु वयं त्वेन्धानास्तन्वं पुषेम ।
मह्यं नमन्तां प्रदिशश्चतस्रस्त्वयाध्यक्षेण पृतना जयेम ।।
।। १०-१२८-१ ।।

**श्रौ. वि. वैश्वदेव संशत.** **स्मा. वि. (समावर्तत) समिधान.**

मम देवा विहवे सन्तु सर्व इन्द्रवन्तो मरुतो विष्णुरग्निः ।।
ममान्तरिक्षमुरुलोकमस्तु मह्यं वातः पवतां कामे अस्मिन् ।।
।। १०-१२८-२ ।।

मयि देवा द्रविणमा यजन्तां मय्याशीरस्तु मयि देवहूतिः ।।
दैव्या होतारो वनुषन्त पूर्वेऽरिष्टाः स्याम तन्वा सुवीराः
।। १०-१२८-३ ।।

मह्यं यजन्तु मम यानि हव्याऽऽकूतिः सत्या मनसो मे अस्तु ।
एनो मा नि गां कतमच्चनाहं विश्वे देवासो अधि वोचता नः ।।
।। १०-१२८-४ ।।

जे लोक पुण्यप्रद असें हें दुर्गास्तोत्र भक्तीपूर्वक ऐकतात व जपतात, ते तीनहि लोकीं सुविख्यात होत्साते, त्या तीनहि लोकांत पूज्यत्व पावतात. (१०-१२७ खिल २६-२१) ज्यांना पुत्र नाहीं त्यांना पुत्रलाभ होतो! ज्यांना संपत्ति नाहीं, त्यांना संपत्ति मिळते! ज्याला दृष्टि नाहीं, त्याला दृष्टि येते आणि जो बद्ध असेल तो मुक्त होतो! (१०-१२७ खिल २६-२२) जो रोगी असेल तो रोगमुक्त होतो, व जो निरोगी असेल तो धनवान् बनतो! याप्रमाणें ही दुर्गादेवी भक्तांचे सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे। हे कात्यायनि! तुला आमचा नमस्कार असो! (१० १२७ खिल २६-२३).

## रत्न ४९८ वें

हे अग्निदेवा! तुझ्या अनुग्रहानें माझ्यांत रणभूमीवर उत्तम वीरश्री चमकेल असें घडो! आम्ही तुला समिधांनीं प्रदीप्त करून तुझें शरीर हवि अर्पून सुपुष्ट करूं! चारहि दिशांतील लोक माझ्याशीं नम्रभावानें वागतील आणि तुझ्या अध्यक्षतेखालीं आम्ही शत्रूवर विजय मिळवूं असें घडो! (१०-१२८-१) सर्व देव या लढाईत मलाच मदत करणारे होवोत! तसेंच इन्द्र, मरुत्, विष्णु व अग्नि हे देवहि मलाच मदत करोत! त्याच-प्रमाणें अंतरिक्ष व स्वर्ग हे दोन्ही लोक मलाच मदत करोत! आणि वायु देखील मला अनुकूल असाच वाहो! (१०-१२८-२) सर्व देव मला द्रव्य आणून देवोत! तसेंच मला शुभ आशिर्वादहि अर्पण करोत! माझे हातून देवांप्रीत्यर्थ पुष्कळ होमहवन घडो! देवांना होम अर्पण करणारे असे जे आमचे प्राचीन यज्ञोपासक आहेत, त्यांचा मजवर अनुग्रह होवो! आम्ही शरीरानें अहिंसित होत्साते वीरपुत्रांनीं युक्त होऊं असें घडो! (१०-१२८-३). माझ्याजवळ जीं हवनद्रव्यें आहेत, त्या द्रव्यांनी देवां-प्रीत्यर्थ माझे ऋत्विज हवन करोत! आणि माझ्या मनांतील इच्छा फल-द्रूप होवोत! कसलेंहि पापकर्म मला अधोगतीस न नेवो! हे विश्वेदेवहो! तुम्ही आम्हांस चार उपदेशाच्या गोष्टी सांगा कीं! (१०-१२८-४)

देवी: षळुर्वीरुरु नः कृणोत विश्वे देवास इह वीरयध्वम् ।
मा हास्महि प्रजया मा तनूभिर्मा रधाम द्विषते सोम राजन् ।।
।। १०-१२८-५ ।।

अग्ने मन्युं प्रतिनुदन् परेषामदब्धो गोपाः परि पाहि नस्त्वम् ।
प्रत्यञ्चो यन्तु निगुतः पुनस्तेऽमैषां चित्तं प्रबुधां वि नेशत् ।।
।। १०-१२८-६ ।।

धाता धातॄणां भुवनस्य यस्पतिर्देवं त्रातारमभिमातिषाहम् ।
इमं यज्ञमश्विनोभा बृहस्पतिर्देवाः पान्तु यजमानं न्यर्थात् ।।
।। १०-१२८-७ ।।

उरुव्यचा नो महिषः शर्म यंसदस्मिन् हवे पुरुहूतः पुरुक्षुः ।
स नः प्रजायै हर्यश्व मृळयेन्द्र मा नो रीरिषो मा परा दाः ।।
।। १०-१२८-८ ।।

## रत्न ४९९ वें

**विहव्य आंगिरस-ऋषि, विश्वेदेव-देवता, जगती-छंद.**

ये नः सपत्ना अप ते भवन्त्विन्द्राग्निभ्यामव बाधामहे तान् ।
वसवो रुद्रा आदित्या उपरिस्पृशं मोग्रं चेत्तारमधिराजमक्रन् ।।
।। १०-१२८-९ ।।

## रत्न ५०० वें

**सनक-सनंदन-सनातनाहय-ऋषि, हिरण्य-देवता, अनुष्टुप-छंद**

आयुष्यं वर्चस्यं रायस्पोषमोद्भिदम् ।
इदं हिरण्यं वर्चस्वज्जैत्राया विशतादिमाम् ।।
।। १०-१२८ खिल २७-१ ।।

**स्मा. वि. मंगलसूत्र बंधन, शांतिपाठ.**

हे महा उर्वी देवींनो! आमच्या वैभवाची चांगली भरभराट करा! हे विश्वेदेवांनो तुम्ही आमच्यांत उत्साह वाढवा! आम्ही आमच्या पुत्रपौत्रादि प्रजेस टाकून देणार नाहीं, असें घडो! हे सोमराजा! आम्ही शत्रूच्या आधीन जाणार नाहीं असें कर! ( १०-१२८-५ ) हे अग्निदेवा! तूं शत्रूची रग व राग पक्का जिरविणारा आहेस! तसाच तूं अजिंक्य आहेस! भक्तप्रतिपालक आहेस! तर, देवी! तूं आमचें सर्व बाजूंनीं रक्षण कर! पराभव पावून परत फिरलेले व भयभीत होऊन अस्पष्ट शब्द उच्चारणारे आमचे शत्रू आपल्या घराकडे धूम ठोकीत जावोत! आणि जे कोणी युद्धावर असतील त्यांचें मन एकदम भानरहित होऊन जावो! ( १०-१२८ ६ ). सृष्टिकर्त्यांचाहि जो उत्पन्नकर्ता, सर्व भुवनांचा जो पालक, भक्तांचा तारक व शत्रूचा मारक अशा इन्द्र देवाचें आम्ही आतां स्तवन करतों. अश्विनी, बृहस्पति प्रभृति सर्व देव आमच्या या यज्ञाचें व यज्ञकर्त्या यजमानाचें सर्व अरिष्टांपासून रक्षण करोत! (१०–१२७–७)हे इंद्रदेवा! तूं या विशाल विश्वांत सर्वत्र व्यापून राहिला आहेस! तूं अत्यंत पूज्य आहेस! अनेकांकडून स्तविला जात आहेस! व अनेक ठिकाणी राहणारा असा आहेस! आम्ही सर्व मिळून तुला या यज्ञसमारंभांत हाक मारीत आहों. तर देवा! आम्हांस तुझा सुखदायक आश्रय मिळेल असें कर! हरी नांवाचे अश्व असलेल्या इंद्रा! तूं आमच्या पुत्रपौत्रादि प्रजेला सुखी राख! कृपा कर, आम्हांस मारूं नकोस! आणि तसेंच शत्रूंच्या स्वाधीनहि पण करूं नकोस! (१०-१२८-८)

## रत्न ४९९ वें

आमचे जे शत्रु आहेत ते पराभव पावोत! आम्ही त्यांना इंद्राग्नीच्या अनुग्रहानें खास जर्जर करून टाकूं! वसु, रुद्र व आदित्य हे सर्व देव मिळून मला सर्वांत श्रेष्ठ, अत्यंत प्रबल व मोठा बुद्धिमान असा सार्वभौम राजा करोत! (१० १-८-९)

## रत्न ५०० वें

आयुष्य, तेज व ऐश्वर्य वाढविणारें आणि तसेंच विजय प्राप्त करून देणारें हें सुवर्ण वर्चस्व व विजयप्राप्तीसाठीं म्हणून माझ्या शरीरावर अलंकार होऊन राहो! ( १०-१२८ खिल २७-१ )

उच्चैर्वाजि पृतनाषाट् सभासाहं धनंजयम् ।
सर्वाः समग्रा ऋद्धयो हिरण्येऽस्मिन् समाहिताः ॥
॥ १०-१२८ खिल २७-२ ॥

शुनमहं हिरण्यस्य पितुर्नामेव जग्रभ ।
तेन मा सूर्यत्वचमकरं पुरुषु प्रियम् ॥
॥ १०-१२८ खिल २७-३ ॥

सम्राजं च विराजं चाभिष्टिर्या च मे ध्रुवा ।
लक्ष्मी राष्ट्रस्य या मुखे तया मामिन्द्र सं सृज ॥
॥ १०-१२८ खिल २७-४ ॥

अग्नेः प्रजातं परि यद्धिरण्यममृतं यज्ञे अधि मर्त्येषु ।
य एनद्वेद स इदेनमर्हति जरामृत्युर्भवति यो बिभर्ति ॥
॥ १०-१२८ खिल २७-५ ॥

यद्वेद राजा वरुणो यदु देवी सरस्वती ।
इन्द्रो यद्वृत्रहा वेद तन्मे वर्चस आयुषे ॥
॥ १०-१२८ खिल २७-६ ॥

न तद्रक्षांसि न पिशाचाश्चरन्ति देवानामोजः प्रथमजं ह्येतत् ।
यो बिभर्ति दाक्षायणा हिरण्यं स देवेषु कृणुते दीर्घमायुः स मनुष्येषु कृणुते दीर्घमायुः ॥ १०-१२८ खिल २७-७ ॥

**स्मा. वि. हिरण्यस्तुति; पुण्याहवाचन; शांतिपाठ.**

यदाबध्नन् दाक्षायणा हिरण्यं शतानीकाय सुमनस्यमाना ।
तन्न आ बध्नामि शतशारदायायुष्मान् जरदष्टिर्यथासत् ॥
॥ १०-१२८ खिल २७-८ ॥

**स्मा. वि. कंकण बंधन, मंगलसूत्र बंधन, शांतिपाठ.**

हें सुवर्ण म्हणजे अत्यंत बलसंपन्न आहे, शत्रुघातक आहे, सभाविजयी आहे, व ऐश्वर्यदायक आहे. या सुवर्णांत सर्व उत्कर्ष संपूर्ण सामावून राहिले आहेत. (१०-१२८-खिल-२७-२) माता जशी पित्यापासून सुखाचा उपभोग घेते तद्वत् मीहि या सुवर्णापासून सर्व सुखोपभोग प्राप्त करून घेईन. त्यायोगें मी माझ्या शरीराला सूर्याप्रमाणें तेजस्वी बनवीन व लोकांना संतुष्ट करीन. ( १०-१२८-खिल-२७-३ ). जिच्या योगानें तेज व सौंदर्य खुलतें आणि मनोरथ सिद्धीस जातात अशी ती वीर्यशाली भाग्यवंताच्या मुखावर विलासणारी दिव्य कांति, तिच्याशीं, हे इन्द्रदेवा ! माझा समागम घडो ! ( १०-१२८-खिल २७-४ ) जें अग्नीपासून उत्पन्न झालें, यज्ञांत जें अमृत बनलें व मनुष्यांत जें श्रेष्ठ ठरलें, अशा सुवर्णाला जो उत्तम ओळखतो, तोच तें धारण करण्यास योग्य होय. आणि जो तें धारण करतो, तोच वृद्धावस्थेचा नाश करतो ( १०-१२८-खिल-२७-५ ). राजा वरुण, देवी सरस्वती व वृत्रहंता इंद्र ज्या सुवर्णाला चांगले ओळखतात, तें सुवर्ण माझ्या आयुष्य व तेजोवृद्धीस कारण होवो ! ( १०-१२८-खिल-२७-६ ) हे दक्षकुलोत्पन्न ऋषिजनहो ! राक्षस काय किंवा पिशाच्च काय कोणीहि या सुवर्णाचा नाश करूं शकत नाहींत ! कारण हें देवांचें प्रथम उत्पन्न झालेलें तेज आहे. जो ब्राह्मण हें सुवर्ण धारण करील, तो देव लोकांत दीर्घकाल जगून राहील. ( १०-१२८-खिल-२७-७ ). अंतःकरणांत सदैव मंगल विचार धारण करणारे असे जे दक्षप्रजापतीचे पुत्र म्हणजे ब्राह्मण, त्यांनी जें सुवर्ण अलंकाररूपानें शतानीक राजाच्या हाताला बांधलें, तें सुवर्ण मीहि माझ्या शरीरावर अलंकाररूपानें धारण करतों. असें झालें म्हणजे मी शतायुषी होईन आणि त्याबरोबरच हें शरीर वृद्ध होऊन राहील ! ( १०-१२८-खिल-२७-८ )

घृतादुल्लुप्तं मधुमत्सुवर्णं धनंजयं धरुणं धारयिष्णु ।
ऋणक् सपत्नादधरांश्च कृण्वदाऽऽरोह मां महते सौभगाय ॥
॥ १०-१२८ खिल २७-९ ॥

प्रियं मा कुरु देवेषु प्रियं राजसु मा कुरु ।
प्रियं विश्वेषु गोप्त्रेषु मयि धेहि रुचा रुचम् ॥
॥ १०-१२८ खिल २७-१० ॥

अग्निर्येन विराजति सूर्यो येन विराजति ।
विराज्येन विराजति तेनास्मान् ब्रह्मणस्पते विराज समिधं कुरु ॥ १०-१२८ खिल २७-११ ॥

## रत्न ५०१ वें

**प्रजापति परमेष्ठी-ऋषि, भाववृत्तम्-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परो यत् ।
किमावरीवः कुह कस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥
॥ १०-१२९-१ ॥

न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः ।
आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किं चनास ॥
॥ १०-१२९-२ ॥

तम आसीत्तमसा गूळ्हमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्वमा इदम् ।
तुच्छ्येनाभ्वपिहितं यदासीत्तपसस्तन्महिनाजायतैकम् ॥
॥ १०-१२९-३ ॥

अग्नीपासून उत्पन्न झालेलें, मनोल्हादकारक, धनदायक, स्थैर्यकारक, शरीरावर धारण करण्यास योग्य, चंचल व शत्रुसंहारक असें हें सुवर्ण मला शोभा येण्यासाठीं म्हणून माझ्या शरीरावर अलंकाररूपानें विराजमान होऊन राहो! ( १०-१२८-खिल-२७-९ ) हे सुवर्णा! मला देवांमध्यें प्रिय कर! राजांमध्यें प्रिय कर! सामर्थ्यसंपन्न अशा सर्व लोकांमध्यें प्रिय कर! तुझ्या तेजानें माझ्या मुखश्रीवर उत्तम कांति चमकेल असें घडो! ( १०-१२८-खिल-२७-१० ) ज्या सुवर्णाच्या योगानें अग्नि हा शोभायमान दिसतो, तसाच सूर्यहि दिसतो, त्या सुवर्णानें, हे ब्रह्मणस्पति देवा! तूं आम्हांस सुशोभित व सुकांतिमान कर! ( १०-१२८-खिल-२७-११ )

## रत्न ५०१ वें

सर्वांत प्रथम म्हणजे सृष्टि उत्पत्तीच्या पूर्वी-अर्थात् प्रलयावस्थेंत-जगाचें मूल कारण जें असत्, तें नव्हतें. त्याचप्रमाणें सत् म्हणजे आत्मतत्त्व तेंहि नव्हतें. त्या वेळेला कोणतेच लोक नव्हते; अंतरिक्षहि नव्हतें व त्यापलीकडील द्युलोकहि नव्हता. अशा स्थितींत कोणत्या आवरक तत्त्वानें भूतजाताला आवरण घातलें व तें कुठें होतें? आणि तें सर्व कोणाच्या सुखासाठीं? आतां खरेंच सांगावयाचें म्हणजे त्या वेळी गहन व गंभीर असें उदक होतें म्हणावें तर तें सुद्धां नव्हतें. ( १०-१२९-१ ) त्या वेळीं मृत्युहि नव्हता आणि अमृतत्वहि पण नव्हतें. तेव्हां खरें म्हणाल तर रात्र व दिवस ओळखण्याचें कांहीं चिन्हच नव्हतें. त्या वेळीं जें काय होतें, तें एकटें एकच पण मायेसहित होतें. त्या ब्रह्माशिवाय व त्याच्यापलीकडे दुसरें असें निराळें कांहींच नव्हतें (१०-१२९-२). कांहींच नव्हतें म्हणायला तेव्हां अज्ञानरूपी अंधःकार मात्र होता. सृष्टीच्या पूर्वी म्हणजे प्रलयावस्थेंत हें भूत भौतिक जग सगळें त्या अंधकारांत गुरफटून गेलें होतें. तेथें भेदाभेद समजण्याला कांहीं साधनच नव्हतें. हें सर्व दृश्यमान जग त्या वेळीं मूल कारणापासून अविभक्त होतें; आणि सर्व बाजूंनी तें अज्ञानरूप मायेनें गुरफटलेलें होतें. त्या वेळीं जें काय होतें, तें एकच एक असून पुढें तपाच्या योगानें त्यापासूनच ही सृष्टि निर्माण झाली ( १०-१२९-३ )

कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।
सतो बन्धुमसति निरविन्दन्हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥

॥ १०-१२९-४ ॥

तिरश्चीनो विततो रश्मिरेषामधः स्विदासी३दुपरि स्विदासी३त् ।
रेतोधा आसन्महिमान आसन्त्स्वधा अवस्तात्प्रयतिः परस्तात् ॥

॥ १०-१२९-५ ॥

को अद्धा वेद क इह प्र वोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः ।
अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाऽथा को वेद यत आबभूव ॥

॥ १०-१२९-६ ॥

इयं विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न ।
यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्त्सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥

॥ १०-१२९-७ ॥

## रत्न ५०२ वें

**यज्ञ प्राजापत्य-ऋषि, भाववृत्त-देवता, जगती-छंद.**

यो यज्ञो विश्वतस्तन्तुभिस्तत एकशतं देवकर्मेभिरायतः ।
इमे वयन्ति पितरो य आययुः प्र वयाप वयेत्यासते तते ॥

॥ १०-१३०-१ ॥

ही सृष्टि उत्पन्न व्हावयाच्यापूर्वी परमेश्वराच्या मनामध्यें प्रथम काम उत्पन्न झाला. परमेश्वराची सृष्टि उत्पन्न करण्याची जी इच्छा तेंच सृष्टि-उत्पत्तीचें आदिबीज रेत झालें. त्रिकालज्ञ योगी पुरुषांनीं मनांत विचार करून असें ठरविलें कीं या सर्व वर्तमानकालीन जगाचें मूल कारण म्हणजे कल्पांतरी प्राण्यांनीं केलेल्या कर्मांचा संग्रह हें होय ( १०-१२९-४ ). तो तेजस्वी किरण त्या दृश्यादृश्य वस्तूंच्या मध्यें प्रथम आडवा पसरला. त्याच्यावरच्या बाजूस काय आहे आणि खालच्या बाजूस काय आहे ? त्या सृष्ट वस्तूंमध्यें कांहीं भाव रेत धारण करणारे व भोग घेणारे जीव झाले व कांहीं भाव भोग्य पदार्थ झाले. या भोक्तृ-भोग्य वस्तूंमध्यें अन्नरूप भोग्य वस्तुजात निकृष्ट असून, त्याचा भोक्ता हा उत्कृष्ट आहे. ( १०-१२९-५ ). ही दृश्यमान विविध सृष्टि कशापासून झाली, अर्थात् तिचें उपादान कारण कोणतें आणि ती कोणापासून झाली, म्हणजे तिचें निमित्तकारण कोणतें, तें सर्व यथार्थतः समजावून सांगणारा असा कोण आहे ? आणि हें सर्व आम्हांस सविस्तर सांगणारा तरी कोण ? देव पहावे तर ते देखील ही भूतसृष्टि उत्पन्न झाल्यानंतरचे आहेत. मग ही सृष्टि कशापासून झाली हें कोण नि कसें सांगणार ?( १०-१२९-६ ) ही विविध सृष्टि कोठून उत्पन्न झाली, ती परमेश्वरानेंच निर्माण केली अगर नाहीं हें उंच आका-शांत राहणारा या सृष्टीचा जो अध्यक्ष आहे तो कदाचित् जाणत असला तर असेल, अगर नसेलहि ! ( दुसऱ्याला हें समजणें अर्थात् शक्यच नाहीं.) ( १०-१२७-७ )

### रत्न ५०२ वें

ज्योतिष्टोमादि तंतूंनीं सर्व बाजूंनीं विस्तार केलेला, व त्याचप्रमाणें एकाधिक अग्निचयनानें युक्त व गवामयन प्रभृति सत्रांनीं दीर्घकाल चालणारा असा हा यज्ञपट प्रजापतीनें निर्माण केला. आणि तो पट आमचे जे अंगिरसादि पितर आहेत ते विणतात आणि विणत असतां 'हें तूं कर, हे तूं कर' असें परस्परांस सांगत असतात. ( १०-१३०-१ ).

## रत्न ५०३ वें

**यज्ञ प्राजापत्य-ऋषि, भाववृत्त-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

पुमाँ एनं तनुत उत्कृणत्ति पुमान्वि तत्ने अधि नाके अस्मिन् ।
इमे मयूखा उप सेदुरू सदः सामानि चक्रुस्तसराण्योतवे ॥
॥ १०-१३०-२ ॥

कासीत्प्रमा प्रतिमा किं निदानमाज्यं किमासीत्परिधिः क आसीत् ।
छन्दः किमासीत्प्रउगं किमुक्थं यद्देवा देवमयजन्त विश्वे ॥
॥ १०-१३०-३ ॥

अग्नेर्गायत्र्यभवत्सयुग्वोष्णिहया सविता सं बभूव ।
अनुष्टुभा सोम उक्थैर्महस्वान्बृहस्पतेर्बृहती वाचमावत् ॥
॥ १०-१३०-४ ॥

विराण्मित्रावरुणयोरभिश्रीरिन्द्रस्य त्रिष्टुबिह भागो अह्नः ।
विश्वान्देवाञ्जगत्या विवेश तेन चाक्लृप्र ऋषयो मनुष्याः ॥
॥ १०-१३०-५ ॥

चाक्लृप्रे तेन ऋषयो मनुष्या यज्ञे जाते पितरो नः पुराणे ।
पश्यन्मन्ये मनसा चक्षसा तान्य इमं यज्ञमयजन्त पूर्वे ॥
॥ १०-१३०-६ ॥

सहस्तोमाः सहछन्दस आवृतः सहप्रमा ऋषयः सप्त दैव्याः ।
पूर्वेषां पन्थामनुदृश्य धीरा अन्वालेभिरे रथ्योऽ न रश्मीन् ॥
॥ १०-१३०-७ ॥

**स्मा. वि. ऋषि-तर्पण; ब्रह्मयज्ञ.**

## रत्न ५०३ वें

प्रजापति हा यज्ञ विस्तारण्याचें कार्य करतो आणि तोच त्याला पुनः गुंडाळतोहि, तोच हा यज्ञ या लोकांत व स्वर्गलोकांतहि विस्तार करतो. त्या प्रजापतीचे किरणभूत असे हे देव देवयजनस्थानांत येऊन बसतात. अर्थात् ते हा विश्वसृजामयनाख्य यज्ञ करण्यासाठीं येऊन बसतात. व येऊन बसल्यावर यज्ञरूपी वस्त्र विणण्यासाठीं म्हणून ते रथन्तरादि सामसूक्ताचे आडवे धागे तयार करतात. (१०-१२०-२) सर्व देवांनीं मिळून सृष्टि उत्पन्न करण्याकरतां जेव्हां यज्ञानुष्ठान आरंभिलें, तेव्हां त्याची मर्यादा कोणती होती ? त्या यज्ञाची देवता कोणती होती ? त्याचें आदिकारण कोण होतें ? मुख्य हवनद्रव्य जें तूप, तें काय होतें ? आणि समिधा काय होत्या ? तसेंच गायत्र्यादि छंद काय होते ? प्रउग शस्त्र कोणतें ? आणि उक्थतरी कोणतें होतें ? (१०-१३०-३) त्या यज्ञप्रसंगीं गायत्री ही अग्नीची सहाकर्त्री झाली. सविता हा उष्णिक छंदासह जन्मला. तो तेजस्वी सोम अनुष्टुप् व उक्थ यांच्यासह प्रगट झाला. आणि बृहस्पतीची वाणी बृहती छंदाचें रक्षण करती झाली. (१०-१३०-४). विराट छंद मित्रावरुणाचा आश्रित झाला. मध्यंदिन सवन व त्रिष्टुप् छंद हे इंद्राला धरून राहिले. जगती छंद विश्वेदेवांत प्रविष्ट होऊन राहिला. आणि अशा या यज्ञापासूनच मनुष्य व ऋषी यांची उत्पत्ति झाली. (१०-१३०-५) अशा प्रकारचा हा प्राचीन यज्ञ देवांनीं अनुष्ठिल्यावरच त्यापासून ऋषी, मनुष्य व आमचे पितर उत्पन्न झाले. अशा प्रकारचा यज्ञ पूर्वीच्या ज्या साध्य देवांनी अनुष्ठित केला, त्या देवांना मी डोळ्यानें व मनानें पहात त्यांचें स्तवन करतों. (१०-१३०-६) रथ सुरळीत चालावा म्हणून सारथी जसा घोड्याचा लगाम धरून रथ चालवितां तद्वत स्तोमसहित, छंदसहित, आवृतसहित, प्रमासहित, असणारे देवसंबंधक सात ऋषी यांनीं पूर्वीचे देव व ऋषी यांच्या यज्ञानुष्ठान मार्गाचें ज्ञान करून घेऊन सूज्ञ होत्साते त्याप्रमाणें यथाक्रम यज्ञानुष्ठान करण्यास सुरुवात केली. (१०-१३०-७)

## रत्न ५०४ वें

**सुकीर्ति काक्षीवत-ऋषि, इन्द्र-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

इन्द्रः सुत्रामा स्ववाँ अवोभिः सुमृळीको भवतु विश्ववेदाः ।
बाधतां द्वेषो अभयं कृणोतु सुवीर्यस्य पतयः स्याम ॥

॥ १०-१३१-६ ॥

तस्य वयं सुमतौ यज्ञियस्यापि भद्रे सौमनसे स्याम ।
स सुत्रामा स्ववाँ इन्द्रो अस्मे आराच्चिद् द्वेषः सनुतर्युयोतु ॥

॥ १०-१३१-७ ॥

## रत्न ५०५ वें

**विश्वामित्र-ऋषि, विश्वेदेव-देवता, अनुष्टुप्-छंद.**

त्रायन्तमिह देवास्त्रायतां मरुतां गणः ।
त्रायन्तां विश्वा भूतानि यथायमरपा असत् ॥

॥ १०-१३७-५ ॥

## रत्न ५०६ वें

**जमदग्नि-ऋषि, विश्वदेव-देवता, अनुष्टुप्-छंद.**

आप इद्वा उ भेषजीरापो अमीवचातनीः ।
आपः सर्वस्य भेषजीस्तास्ते कृण्वन्तु भेषजम् ॥

॥ १०-१३७-६ ॥

## रत्न ५०७ वें

**विश्वावसु-ऋषि, सविता-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

सूर्यरश्मिर्हरिकेशः पुरस्तात्सविता ज्योतिरुदयाँ अजस्रम् ।
तस्य पूषा प्रसवे याति विद्वान्त्संपश्यन्विश्वा भुवनानि गोपाः ॥

॥ १०-१३९-१ ॥

**स्मा. वि. सूर्यध्यान.**

## रत्न ५०४ वें

इन्द्रदेव हा भक्तजनांचा श्रेष्ठ तारक असून, तसाच तो ऐश्वर्यवान व सर्वज्ञहि आहे. तो आपल्या संरक्षणशक्तिनिशी आम्हांस सुखदायक होवो! तो आमच्या द्वेष्ट्यांचा निःपात करो! आणि आम्हांस निर्भय राखो! आम्हीं शोभन वीर्याचे मालक व्हावें असें घडो! (१०-१३१-६) त्या पूजार्ह देवाच्या कृपाबुद्धींत व प्रसन्न मर्जींत आम्हीं सदैव रहावें! इन्द्रदेव हाच सर्वोत्तम तारणकर्ता आहे. तसाच तो ऐश्वर्यवानहि आहे. तो आमच्या द्वेष्ट्यांना आम्हांपासून दूर पिटाळून लावो!

## रत्न ५०५ वें

अहो देवांनो! तुम्ही आमचें या प्रदेशांत रक्षण करणारे व्हा! मरुद्गणहि आमचे रक्षणकर्ते होवोत! सर्व भूत-जात आमचें रक्षण करो! कीं ज्यायोगें आम्ही निष्पाप होऊन राहूं! (१०-१३७-५).

## रत्न ५०६ वें

उदक हें सुखकारक आहे. तेंच रोगनाशकहि आहे. आणि तेंच सर्व प्राणिमात्रांना हितकारीहि पण आहे! असें हें उदक तुला हितकारक होवो! (१०-१३७-६).

## रत्न ५०७ वें

ज्याचे किरण सूर्यासारखे तेजस्वी आहेत, व केंस हरिद्वर्ण आहेत, जो जगाचा प्रेरक आहे, असा हा सविता देव पूर्वदिशेस उदय पावता झाला. त्याच्या प्रेरणेनेंच प्राणिमात्रांचें रक्षण करणारा असा हा सर्वज्ञ आदित्य देव हें सर्व भूतजात उदंड प्रकाशानें उजळत आकाशांत संचार करतो! (१०-१३९-१).

नृचक्षा एष दिवो मध्य आस्त आपप्रिवान्रोदसी अन्तरिक्षम् ।
स विश्वाचीरभि चष्टे घृताचीरन्तरा पूर्वमपरं च केतुम् ॥
॥ १०-१३९-२ ॥

रायो बुध्नः संगमनो वसूनां विश्वा रूपाभि: चष्टे शचीभिः ।
देव इव सविता सत्यधर्मेन्द्रो न तस्थौ समरे धनानाम् ॥
॥ १०-१३९-३ ॥

## रत्न ५०८ वें

**अग्नितापस-ऋषि, विश्वेदेव-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अग्ने अच्छा वदेह नः प्रत्यङ् नः सुमना भव ।
प्र नो यच्छ विशस्पते धनदा असि नस्त्वम् ॥
॥ १०-१४१-१ ॥

प्र नो यच्छत्वर्यमा प्र भगः प्र बृहस्पतिः ।
प्र देवाः प्रोत सूनृता रायो देवी ददातु नः ॥
॥ १०-१४१-२ ॥

सोमं राजानमवसेऽग्निं गीर्भिर्हवामहे ।
आदित्यान्विष्णुं सूर्यं ब्रह्माणं च बृहस्पतिम् ॥ १०-१४१-३ ॥
इन्द्रवायू बृहस्पतिं सुहवेह हवामहे ।
यथा नः सर्व इज्जनः संगत्या सुमना असत् ॥ १०-१४१-४ ॥
अर्यमणं बृहस्पतिमिन्द्रं दानाय चोदय ।
वातं विष्णुं सरस्वतीं सवितारं च वाजिनम् ॥ १०-१४१-५ ॥
त्वं नो अग्ने अग्निभिर्ब्रह्म यज्ञं च वर्धय ।
त्वं नो देवतातये रायो दानाय चोदय ॥ १०-१४१-६ ॥

स्वर्ग, पृथ्वी व अंतरिक्ष लोक यांना आपल्या तेजोराशीनें भरून काढून, नंतर मग मनुष्यांवर नजर फिरवीत तो सविता देव द्युलोकामध्येंच बसून असतो. तो सर्वव्यापी असून दिशा व उपदिशा यांना प्रकाशानें व्यापून सोडतो. त्याचप्रमाणें पूर्वभाग, पृष्ठभाग व आकाश यांना प्रकाशित करतो. ( १०–१३९–२ ). तो सकल संपत्तीचें माहेरघर असून भक्तांना ऐश्वर्य प्राप्त करून देणारा आहे. तो आपल्या प्रकाशरूपी नेत्रानें सर्व पदार्थ पहात असतो. देवांप्रमाणेंच हा सविता झाला तरी सत्यधर्मा आहे आणि इन्द्राप्रमाणें तो धनप्राप्तीच्या संग्रामांत सदैव दक्ष होऊन असतो. (१०–१३९–३)

## रत्न ५०८ वें

हे अग्निदेवा ! तूं आमच्याशीं गोड गोड भाषण कर ! आमच्याजवळ ये ! आणि आम्हांवर कृपादृष्टि ठेव ! हे लोकाधिपते ! तूं धनदाता आहेस, तर आम्हांस धन दे ! ( १०-१४१-१) अर्यमा, भग व बृहस्पति हे आम्हांस विपुल संपत्ति देवोत ! तसेंच दिव्यविभुव आणि सत्यवाग्रूप देवी सरस्वती आम्हांस उत्कृष्ट धन अर्पण करोत ( १०-१४१-२ ) ! सोमराजा व अग्निदेव यांना आम्ही सुंदर स्तोत्र गाऊन आमचें रक्षण करण्यासाठीं येथें बोलावीत आहों. त्याचप्रमाणें आदित्य, विष्णु, सूर्य, ब्रह्मा व बृहस्पति यांनाहि पाचारण करितों ( १०-१४१-३ ). आमचे सोयरेधायरे आणि इतर आप्तजन आमच्याशीं गोडीगुलाबीनें वागतील अशा तऱ्हेनें आम्ही सत्वर धावून येणारा इन्द्र, वायु व बृहस्पति या देवांना हाक मारतों. ( १०-१४१-४ ). हे स्तोत्या ! अर्यमा, बृहस्पति, इन्द्र, वायु, विष्णु, सरस्वती, सत्वसंपन्न सविता या देवांना आम्हांस धन देण्यास स्तोत्र गाऊन प्रेरणा कर ! ( १०-१४१-५ ). हे अग्नि देवा ! तूं तुझ्या विभूतिरूप इतर अग्नीसह आमचें मंत्रज्ञान व यज्ञकर्म यांचें अभिवर्धन कर ! आणि आमच्या यज्ञकर्मार्थ धन देण्यास दात्यांस प्रेरणा कर ! ( १०-१४१-६ ).

## रत्न ५०९ वें

**इन्द्राणी-ऋषि, सपत्नीनाश-देवता, अनुष्टुप्-छंद.**

इमां खनाम्योषधिं वीरुधं बलवत्तमाम् ।।
यया सपत्नीं बाधते यया संविन्दते पतिम् ।। १०-१४५-१ ।।

**श्रौ. वि. सपत्नीबाधन.**

उत्तानपर्णे सुभगे देवजूते सहस्वति ।
सपत्नीं मे परा धम पतिं मे केवलं कुरु ।। १०-१४५-२ ।।
उत्तराहमुत्तर उत्तरेदुत्तराभ्यः ।
अथा सपत्नी या ममाऽधरा साधराभ्यः ।। १०-१४५-३ ।।
नह्यस्या नाम गृभ्णामि नो अस्मिन्रमते जने ।
परामेव परावतं सपत्नीं गमयामसि ।। १०-१४५-४ ।।
अहमस्मि सहमानाऽथ त्वमसि सासहिः ।
उभे सहस्वती भूत्वी सपत्नीं मे सहावहै ।। १०-१४५-५ ।।
उप तेऽधां सहमानामभि त्वाधां सहीयसा ।
मामनु प्र ते मनो वत्सं गौरिव धावतु पथा वारिव धावतु ।।
।। १०-१४५-६ ।।

## रत्न ५१० वें

**श्रद्धा कामायनी-ऋषि, श्रद्धा-देवता, अनुष्टुप्-छंद.**

श्रद्धयाग्निः समिध्यते श्रद्धया हूयते हविः ।
श्रद्धां भगस्य मूर्धनि वचसा वेदयामसि ।। १०-१५१-१ ।।
प्रियं श्रद्धे ददतः प्रियं श्रद्धे दिदासतः ।
प्रियं भोजेषु यज्वस्विदं म उदितं कृधि ।। १०-१५१-२ ।।

## रत्न ५०९ वें

अत्यंत बलशाली अशा या पाठ नांवाच्या लतारूप ओषधीला मी खणून काढतें. कारण तिच्यामुळेंच माझ्या सवतीचा विनाश होणार असून, मला पतीचा सुखकर समागम घडणार आहे (१०-१४५-१). हे उताणपानाची ओषधे! हे मंगला देवि! देवांनीं तुला प्रेरणा केली आहे. हे शुक्रमर्दिनि! प्रार्थना ही कीं, जी माझी सवत आहे, तिला तूं दूर-अतिदूर-पिटाळून लाव! आणि माझा पति केवळ माझ्याच मुठींत राहील, असें कर!(१०-१४५-२) हे सर्वोत्कृष्ट पाठलते! मी उत्तमांतली उत्तम स्त्री आहें! इतकेंच नव्हे, तर जगांत जितक्या म्हणून उत्कृष्टांतील उत्कृष्ट स्त्रिया आहेत, त्यांच्यापेक्षांहि मी तुझ्या प्रसादानें उत्कृष्टतर होईन! आणि त्याच वेळेस माझी जी सवत आहे, ती हलक्यांतली अगदी हलकी होवो! (१०-१४५ ३). खरोखर मी सांगतें कीं त्या द्वाड सवतीचें मी नांवसुद्धा घेणार नाहीं! आणि ती पण आमच्यांत कोणाला आवडतहि नाहीं! म्हणून परकी अशी ती माझी सवत, तिला मी दूर–अत्यंत दूर-देशीं-हाकलून देईन. ( १०–१४५–४ ). हे ओषधे! मी मोठी जहांबाज आहें आणि तूंहि पण तशीच मोठी बस्ताद आहेस! आपण दोघीहि शत्रुचा पराभव करण्यास पुरेशा असून, माझ्या सवतीला आपण पराभूत करून टाकूं! १०–१४५–५ ). हे पतिदेवा! सवतीचा बीमोड करून टाकणारी ही ओषधि मी तुझ्या उशाला ठेवीत आहें. ती प्रभावशाली औषधि तुझ्याजवळ ठेविल्याने माझी तुजवर सर्व बाजूंनीं छाप बसेल. गाय जशी वांसराकडे धांव घेते किंवा पाणी जसें सखल प्रदेशाकडे वाहत जातें, तद्वत तुझें मन झालें तरी मजकडेच जोरानें उसळी मारून येवो! ( १०–१४५–६ ).

## रत्न ५१० वें

श्रद्धेच्या योगानेंच यज्ञिय अग्नि प्रदीप्त केला जातो आणि श्रद्धेनेंच अग्नींत होमहवन केलें जातें. प्रलोभनीय अशा संपत्तच्या अग्रस्थानीं आरूढ झालेल्या श्रद्धा देवीला आम्ही स्तोत्र गाऊन आळवितों. (१०–१५१–१). हे श्रद्धा देवि! तुला हवि अर्पण करणाऱ्यांचें तूं प्रिय कर! हविर्भाग देऊं इच्छिणाऱ्यांचेंहि प्रिय कर! देवयजन करणारे असे जे आमचे कृतयज्ञ स्वजन आहेत, त्यांचेंहि आमच्या प्रार्थनेप्रमाणें प्रियच कर!(१०-१५१-२)

यथा देवा असुरेषु श्रद्धामुग्रेषु चक्रिरे ।
एवं भोजेषु यज्वस्वस्माकमुदितं कृधि ॥ १०-१५१-३ ॥
श्रद्धां देवा यजमाना वायुगोपा उपासते ।
श्रद्धां हृदय्य१याकूत्या श्रद्धया विन्दते वसु ॥ १०-१५१-४ ॥
श्रद्धां प्रातर्हवामहे श्रद्धां मध्यंदिनं परि ।
श्रद्धां सूर्यस्य निम्रुचि श्रद्धे श्रद्धापयेह नः ॥ १०-१५१-५ ॥

## रत्न ५११ वें

मेधां मह्यमङ्गिरसो मेधां सप्त ऋषयो ददुः ।
मेधामिन्द्रश्चाग्निश्च मेधां धाता ददातु ते ॥
॥ १०-१५१ खिल ३१-१ ॥

**स्मा. वि. मेधासूक्त.**

मेधां ते वरुणो राजा मेधां देवी सरस्वती ।
मेधां ते अश्विनौ देवावा धत्तां पुष्करस्रजा ॥
॥ १०-१५१ खिल ३१-२ ॥

**स्मा. वि. मेधाजनन-जप. (कुमाराच्या कानांत)**

या मेधा अप्सरस्सु गन्धर्वेषु च यन्मनः ।
दैवी या मानुषी मेधा सा मामा विशतादिमाम् ॥
॥ १०-१५१ खिल ३१-३ ॥

यन्मे नोक्तं तद्रमतां शकेयं यदनुब्रुवे ।
निशामतं नि शामहै मयि व्रतं सह व्रतेषु भूयासं ब्रह्मणा सं गमेमहि ॥ १०-१५१ खिल ३१-४ ॥

ज्याप्रमाणें इन्द्रादि देव हे अत्यंत बलवान अशा असुरादिकांविषयीं 'आम्ही त्यांना जिंकूंच जिंकूं' असा दृढ विश्वास बाळगते झाले, त्याप्रमाणें यज्ञ श्रद्धान्वित मनानें करणारे असे जे उदार यजमान आहेत, त्यांच्या विषयींचें आमचें मागणें तूं सुपूर्त कर! ( १०-१५१-३ ). वायुरक्षित असे देव व यजमान हे श्रद्धादेवीची उपासना करतात, आणि ही श्रद्धेची उपासना ते अगदीं अन्तःकरणपूर्वक व विचारपूर्वक करतात. कारण त्या उपासनेचें फल हें त्यांना त्या श्रद्धेच्या योगानेंच प्राप्त होतें. ( १०-१५१-४ ). प्रातःकालीं आम्ही श्रद्धादेवीला हांक मारतों. मध्यान्हकालींहि तिचें आवाहन करतों. तसेंच सूर्यास्त समयींहि आम्ही त्या श्रद्धेला बोलावतों. तर, हे श्रद्धादेवि ! तूं आमच्या अंतःकरणांत दृढश्रद्धेची स्थापना कर ! (१०-१५१-५)

## रत्न ५११ वें

अंगिरस ऋषि, तसेच सप्तऋषी, इंद्र, अग्नि आणि ब्रह्मदेव असे ते हे सर्व मला मेधा-म्हणजे स्मरणशक्ति-प्रदान करोत ! ( १०-१५१ खिल ३१-१ ) राजा वरुण, सरस्वती देवी आणि कमलमाला धारण करणारे अश्विनी कुमार मला मेधाशक्ति प्रदान करोत ! ( १०-१५१-खिल ३१-२) जी मेधा अप्सरांमध्यें व गंधर्वांमध्यें मनोरूपानें असते व जी देवांमध्यें व मनुष्यांमध्येंहि असते, ती मेधा माझ्या बुद्धीमध्यें प्रविष्ट होवो! ( १०-१५१ खिल-३१-३) मी म्हटला नसेन किंवा वारंवार आवृत्ति केली नसेन तरी हा वेद माझ्या अंतःकरणांत स्थिर होऊन राहो. आणि प्रसंगास बिनचूक म्हणतां येईल असा मला आठवो. जें मी कानांनीं ऐकेन, तें माझ्या बुद्धींत ठसून टिकून राहो ! माझें वेदांचें व्रत इतर वेदज्ञांशीं बरोबरी करील असें होवो ! (१०-१५१ खिल ३१-४)

शरीरं मे विचक्षणं वाङ् मे मधुमद् दुहाम् ॥
अवृद्धमहमसौ सूर्यो ब्रह्मणानी स्थः श्रुतं मे मा प्र हासीः ॥
॥ १०-१५१ खिल ३१-५ ॥

मेधां देवीं मनसा रेजमानां गन्धर्वजुष्टां प्रति नो जुषस्व ।
मह्यं मेधां वद मह्यं श्रियं वद मेधावी भूयासमजराजरिष्णु ॥
॥ १०-१५१ खिल ३१-६ ॥

सदसस्पतिमद्भुतं प्रियमिन्द्रस्य काम्यम् ।
सनिं मेधामयासिषम् ॥ १०-१५१ खिल ३१-७ ॥

यां मेधां देवगणाः पितरश्चोपासते ।
तया मामद्य मेधयाऽग्ने मेधाविनं कुरु ॥
॥ १०-१५१ खिल ३१-८ ॥

मेधाव्य१हं सुमनाः सुप्रतीकः श्रद्धामनाः सत्यमतिः सुशेवः ।
महायशा धारयिष्णुः प्रवक्ता भूयासमस्मै शरया प्रयोगे ॥
॥ १०-१५१ खिल ३१-९ ॥

नाशयित्री पलाशस्यारुषसौ पथिकामसु ।
अथो ततस्य यक्ष्माणमपापा रोगनाशिनी ॥
॥ १०-१५१ खिल ३१-१० ॥

ब्रह्मवृक्ष पलाश त्वं श्रद्धां मेधां च देहि मे ।
वृक्षाधिप नमस्तेऽस्तु अत्र त्वं संनिधौ भव ॥
॥ १०-१५१ खिल ३१-११ ॥

## रत्न ५१२ वें

**शिरिंबिठ-ऋषि, अलक्ष्मीनाशन-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अरायि काणे विकटे गिरिं गच्छ सदान्वे ।
शिरिम्बिठस्य सत्वभिस्तेभिष्ट्वा चातयामसि ॥ १०-१५५-१ ।

माझें शरीर कार्यकुशल असो ! आणि माझी वाणी गोड भाषण करणारी होवो ! अवृद्ध असा हा मी, व हा सूर्य, ज्ञानावर माझी आसक्ति राहील असें करूं ! आणि माझ्या कानावर पडलेलें कधींही न विसरेल असें होवो ! (१०-१५१-खिल-३१-५). मनानें तेजस्वी व ऋषिजनांना प्रिय अशी दिव्य स्मरणशक्ति मला लाभो ! हे अग्ने ! मला बुद्धि सांग ! हित सांग ! मीं मेधासंपन्न व्हावें ! (१०-१५१-खिल-३१-६) जो गृहाचें रक्षण करतो, जो अचिंत्यशक्ति आहे, जो इंद्राचा मित्र व जो सर्वांना प्रिय अशा त्या अग्निनारायणाजवळ मला ऐश्वर्य व मेधा देण्याविषयीं मी प्रार्थना करतों (१०-१५१-खिल-३१-७) ! ज्या मेधादेवीची देवगण व पितर उपासना करतात त्या मेधाशक्तीनें मला संपन्न करून, हे अग्ने ! तूं मला मेधावी कर ! (१०-१५१-खिल-३१-८) मी मेधावान्, मंगल मनाचा, सुदृढ शरीराचा, आस्तिक्यबुद्धीचा, सद्विचाराचा, सुखरूप, महाकीर्तिमान, धैर्यशाली व प्रवचन करणारा, असा होईन ! (१०-१५१-खिल-३१-९). 'हे ब्रह्मवृक्षा ! हे पलाशा ! तूं मला श्रद्धा दे ! व त्याबरोबरच मेधाहि पण दे ! हे वृक्षराजा ! तुला माझा नमस्कार असो ! येथें तूं माझ्या सन्निधच रहा ! (१०१-५१ खिल ३१-११).

## रत्न ५१२ वें

हे दानविरोधिनी देवते ! हे दुर्मुखलेले ! हे विकटांगे ! हे सदा अक्रोश करणारे दारिद्र्य देवते ! तूं आतां येथून दूर पर्वतावर निघून जा कशी ! नाहीं तर बघ, आम्ही तुझा आकाशांतील मेघोदकानें पार नायनाट करून टाकूं ! (१०-१५५-१).

## रत्न ५१३ वें

**शिरिंबिठ-ऋषि, ब्रह्मणस्पति-देवता, अनुष्टुप्-छंद.**

चत्तो इतश्चत्तामुतः सर्वा भ्रूणान्यारुषी ।
अराय्यं ब्रह्मणस्पते तीक्ष्णशृङ्गोदृषन्निहि ॥ १०-१५५-२ ॥

## रत्न ५१४ वें

**शिरिंबिठ-ऋषि, अलक्ष्मीनाशन-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अदो यद्दारु प्लवते सिन्धोः पारे अपूरुषम् ।
तदा रभस्व दुर्हणो तेन गच्छ परस्तरम् ॥ १०-१५५-३ ॥

## रत्न ५१५ वें

**शिरिंबिठ-ऋषि, विश्वेदेव-देवता, अनुष्टुप्-छंद.**

यद्ध प्राचीरजगन्तोरो मण्डूरधाणिकीः ।
हता इन्द्रस्य शत्रवः सर्वे बुद्बुदयाशवः ॥ १०-१५५-४ ॥
परीमे गामनेषत पर्यग्निमहृषत ।
देवेष्वक्रत श्रवः क इमाँ आ दधर्षति ॥ १०-१५५-५ ॥

## रत्न ५१६ वें

**चक्षु सौर्य-ऋषि, सूर्य-देवता, गायत्री-छंद.**

सूर्यो नो दिवस्पातु वातो अन्तरिक्षात् ।
अग्निर्नः पार्थिवेभ्यः ॥ १०-१५८-१ ॥

**श्रौ. वि. ( दर्शपूर्णमास ) जप अश्विनअस्त्र.  स्मा. वि. सूर्योपस्थान.**

जोषा सवितर्यस्य ते हरः शतं सवाँ अर्हति ।
पाहि नो दिद्युतः पतन्त्याः ॥ १०-१५८-२ ॥

## रत्न ५१३ वें

आम्हीं दारिद्र्यअवदशेची येथून हाकालपट्टी केली म्हणजे दुसऱ्या लोकांतूनहि तिची हाकालपट्टी झालीच म्हणून समजा. गर्भांतील कोवळ्या कोवळ्या अर्भकांना व शेतांतील अंकुरांना निर्दयपणें मारून टाकणारी ही नीच कृत्या आहे ! हे तीक्ष्ण तेज धारण करणाऱ्या ब्रह्मणस्पति देवा ! या अवदसेचें येथून उच्चाटन करून मग जाशील तर बरें होईल. ( १०·१५५-२ ). ही येथें समुद्रावर तरंगणारी एक लाकडी नाव आहे. तेथें कोणी माणूस नाहीं. तर, हे स्तोत्या ! तूं तिचा तेथें जाऊन आश्रय कर आणि निमूटपणें मोक्षरूपी परतीराला जाऊन लाग कसा ! (१०-१५५-३)

## रत्न ५१४ वें

हे बेडकाप्रमाणें कर्कश आवाज काढणारे अवदसे ! जेव्हां तूं येथून चालती होशील तेव्हां इंद्राचे सर्व शत्रु पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें क्षणांत खलास होऊन जातील ! ( १०-५१५-४ )

## रत्न ५१५ वें

सर्व देवांनीं मिळून आंगिरसाच्या चोरीस गेलेल्या गायी पुनः परत आणल्या. गार्हपत्यादि त्रैताग्नीची जेथल्या तेथें स्थापना करण्यांत आली. यजनीय अशा इंद्रादि देवांना हविर्भागहि अर्पण करण्यांत आला. मग आतां आम्हासारख्या देवभक्तांचा पराभव करण्यास कोण समर्थ आहे ! ( १०-१५५-५ )

## रत्न ५१६ वें

सूर्य देव हा स्वर्गांतील जनांपासून, वायु हा आकाशांतील जनांपासून व अग्निदेव हा पृथ्वीवरील शत्रूंपासून आमचें रक्षण करो ! (१०–१५८–१). हे जगत्प्रेरक सूर्य देवा ! तूं आमच्या स्तुतिस्तोत्राचा स्वीकार कर ! तुझें तें तेज बहुतप्रकारें यजनार्ह आहे. तर देवा ! कडाडून खालीं आदळणाऱ्या विद्युल्लतेपासून तूं आमचें रक्षण कर ! (१०–१५८–२).

चक्षुर्नो देवः सविता चक्षुर्न उत पर्वतः ।
चक्षुर्धाता दधातु नः ॥ १०-१५८-३ ॥
चक्षुर्नो धेहि चक्षुषे चक्षुर्विख्यै तनूभ्यः ।
सं चेदं वि च पश्येम ॥ १०-१५८-४ ॥
सुसंदृशं त्वा वयं प्रति पश्येम सूर्य ।
वि पश्येम नृचक्षसः ॥ १०-१५८-५ ॥

## रत्न ५१७ वें

**प्राजापत्य यक्ष्मनाशन-ऋषि, राजयक्ष्मघ्न-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

मुञ्चामि त्वा हविषा जीवनाय कमज्ञातयक्ष्मादुत राजयक्ष्मात् ।
ग्राहिर्जग्राह यदि वैतदेनं तस्या इन्द्राग्नी प्र मुमुक्तमेनम् ॥
॥ १०-१६१-१ ॥

**श्रौ. वि. हृदयरोग उपशमनार्थ होम**

यदि क्षितायुर्यदि वा परेतो यदि मृत्योरन्तिकं नीत एव ।
तमा हरामि निर्ऋतेरुपस्थादस्पार्षमेनं शतशारदाय ॥
॥ १०-१६१-२ ॥

सहस्राक्षेण शतशारदेन शतायुषा हविषाहार्षमेनम् ।
शतं यथेमं शरदो नयातीन्द्रो विश्वस्य दुरितस्य पारम् ॥
॥ १०-१६१-३ ॥

शतं जीव शरदो वर्धमानः शतं हेमन्ताञ्छतमु वसन्तान् ।
शतमिन्द्राग्नी सविता बृहस्पतिः शतायुषा हविषेमं पुनर्दुः ॥
॥ १०-१६१-४ ।

सविता देव आम्हांला उत्तम दृष्टि देवो! इंद्रसखा जो पर्वत देव, तो आमची दृष्टि अव्यंग राखो! धाता देव आमची दृष्टि निर्दोष ठेवो! (१०-१५८-३). हे सूर्य देवा! आमच्या डोळ्यांना सर्वोत्कृष्ट असें दर्शनतेज दे! आणि आमच्या मुलांनाहि पाहण्यासाठीं तुझा प्रकाश बहाल कर! म्हणजे आम्ही हें सर्व जग नीट निरखून व पारखून पाहूं! (१०-१५८-४). हे सूर्यनारायणा! तूं दिसावयास मोठा सुंदर आहेस! तर आम्ही तुझें नित्य दर्शन घेत असावें आणि मानवी नेत्राला जें काय पाहतां येण्यासारखें आहे तें सर्व आम्हीं आमच्या डोळ्यांनीं उत्तम पाहणारे व्हावें असें घडो! (१०-१५८-५).

## रत्न ५१७ वें

हे रोगी मनुष्या! अचूक निदान करतां न येणारा असा जो रोग तुला जडला आहे, त्या रोगापासून व त्याचप्रमाणें राजयक्ष्मा नांवाच्या रोगापासून मी देवांना हविरन्न अर्पण करून तुला दीर्घकाल जगण्यासाठीं मुक्त करतों आणि तसेंच ज्या कोणी ग्रहरूप देवतांनीं या रोग्याला पछाडलें असेल त्यांच्या पीडेपासून, हे इन्द्र व अग्निदेव हो! तुम्ही मुक्त करा! (१०-१६१-१). या रोगी मनुष्याचें आयुष्य क्षीण झालेलें असलें, अगर तो मरणाच्या अगदीं दारांत जाऊन बसलेला असला अथवा जवळ जवळ मृत्यूच्या दाढेंत जाऊन शिरलेला असला तरी मी त्याला त्या निर्ऋतीपासून म्हणजे त्या पापदेवतेपासून खचीत खचीत परत घेऊन येईन. आणि शंभर वर्षे जगून राहण्यासाठीं त्याच्यांत नवीन जीवनशक्ति पुनः निर्माण करीन. (१०-१६१-२). ज्याला हजारों नेत्र आहेत आणि ज्यापासून शंभर वर्षांचें उदंड आयुष्य प्राप्त होतें, अशा प्रकारच्या देवाला हविर्भाग अर्पण करून, मीं त्या रोग्याला पुनः निरोगी केला आहे. तें असें कीं इन्द्र देव याला सर्व दुःखांतून मुक्त करून त्याला शंभर वर्षांचें उदंड आयुष्य प्राप्त करून देईल. (१०-१६१-३). हे रोगमुक्त मनुष्या! तूं आतां दिवसेंदिवस सुधारत जाऊन, शंभर शरद् ऋतु, शंभर हेमंत ऋतु आणि शंभर वसंत ऋतु येथपर्यंत खुशाल जगून रहा! कारण इन्द्र, अग्नि, सविता, बृहस्पति या देवांनीं ज्याच्यायोगें मनुष्याला शंभर वर्षे आयुष्य लाभेल, अशा हविरन्नानें प्रसन्न होत्साते या तुला आम्हांस पुनः दिला आहे. (१०-१६१-४).

## रत्न ५१८ वें

**यक्ष्मानाशन-ऋषि, राजयक्ष्मघ्न-देवता, अनुष्टुप्-छंद.**

आहार्षं त्वाविदं त्वा पुनरागाः पुनर्नव ।
सर्वाङ्ग सर्वं ते चक्षुः सर्वमायुश्च तेऽविदम् ॥

॥ १०-१६१-५ ॥

## रत्न ५१९ वें

**ब्राह्म रक्षोहा-ऋषि, रक्षोहा ( गर्भरक्षक )-देवता, अनुष्टुप-छंद.**

ब्रह्मणाग्निः संविदानो रक्षोहा बाधतामितः ।
अमीवा यस्ते गर्भं दुर्णामा योनिमाशये ॥

॥ १०-१६२-१ ॥

**श्रां. वि. गर्भरक्षक सूक्त.**

यस्ते गर्भममीवा दुर्णामा योनिमाशये ।
अग्निष्टं ब्रह्मणा सह निष्क्रव्यादमनीनशत् ॥

॥ १०-१६२-२ ॥

यस्ते हन्ति पतयन्तं निषत्स्नुं यः सरीसृपम् ।
जातं यस्ते जिघांसति तमितो नाशयामसि ॥

॥ १०-१६२-३ ॥

यस्त ऊरू विहरत्यन्तरा दम्पती शये ।
योनिं यो अन्तरारेळिह तमितो नाशयामसि ॥

॥ १०-१६२-४ ॥

## रत्न ५१८ वें

हे रोगी मनुष्या ! मीं तुला मृत्यूच्या दाढेंतून खेंचून बाहेर काढलें आहे ! म्हणून तर तूं आम्हांला लाभलास. हे आतां पुनः गुटगुटीत झालेल्या मनुष्या ! तूं आतां पुनः आमच्या जवळ ये ! हे सर्वांग परिपूर्णा ! तुला आतां पूर्ण दृष्टि व संपूर्ण आयुष्य हीं मी मिळवून दिलीं आहेत. ( १०–१६१–५ ).

## रत्न ५१९ वें

हे स्त्रिये! मंत्राशीं ऐकमत्य प्राप्त झालेला असा हा राक्षसांचा नाश करणारी अग्निदेव या स्थानापासून राक्षसादिकांना पार पिटाळून लावो ! तो राक्षस रोगाचें रूप धारण करून,तुझ्या गर्भाशयांत ठाण मांडून बसला आहे. त्याचप्रमाणें अर्श नांवाच्या रोगाचें रूप धारण करून तो तुझ्या गर्भांत शिरला आहे. तर त्याला अग्निदेव माझ्या मंत्राच्या योगानें पार तेथून हुसकावून लावो !(१०–१६२–१). अर्श नांवाच्या भयंकर रोगाचें रूप धारण करून जो राक्षस तुझ्या गर्भाशयांत दडी मारून दसला आहे आणि जो तुझें मांस चघळावयास चटावला आहे, अशा त्या राक्षसाला अग्नि देव माझ्या मंत्राच्या योगानें सरळ तेथून हुसकावून लावो ! ( १०-१६२-२ ) हे स्त्रिये ! तुझ्या गर्भाशयांत रेतोरूपानें प्रवेश करून तेथें जो गर्भ होऊन राहिला आहे त्याचा किंवा पोटांत चलनवलन करूं पाहणारा जो गर्भ आहे त्याचा अगर पूर्ण दिवस भरून नुकताच जन्मास आलेला बालक त्याचा जो कोणी राक्षस घातपात करूं पाहतो, त्याला आम्ही पार तेथून खेचून काढतों. ( १०-१६२-३ ) हे स्त्रिये ! तुझा गर्भ नाश करावा म्हणुन जो कोणी मायावी राक्षस तुझ्या पायाखालीं घुटमळूं लागतो, किंवा तुम्ही नवराबायको एकत्र निजला असतां तुम्हा दोघांमध्यें गुप्तपणें शिरून निजतो, अथवा तुझ्या गर्भाशयांत पतीनें सिंचन केलेलें रेत जिभेनें चटकन् चाटून पार फस्त करून टाकतो, त्याला आम्ही पार तेथून घालवून देतों ( १०-१६२-४ )

यस्त्वा भ्राता पतिर्भूत्वा जारो भूत्वा निपद्यते ।
प्रजां यस्ते जिघांसति तमितो नाशयामसि ॥
॥ १०-१६२-५ ॥

यस्त्वा स्वप्नेन तमसा मोहयित्वा निपद्यते ।
प्रजां यस्ते जिघांसति तमितो नाशयामसि ॥
॥ १०-१६२-६ ॥

## रत्न ५२० वें

**विवृहा काश्यप-ऋषि, यक्ष्मनाशन-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अक्षीभ्यां ते नासिकाभ्यां कर्णाभ्यां छुबुकादधि ।
यक्ष्मं शीर्षण्यं मस्तिष्काज्जिह्वाया वि वृहामि ते ॥
॥ १०-१६३-१ ॥

**श्री. वि. यक्ष्मानाशन सूक्त.**

ग्रीवाभ्यस्त उष्णिहाभ्यः कीकसाभ्यो अनूक्यात् ।
यक्ष्मं दोषण्य१मंसाभ्यां बाहुभ्यां वि वृहामि ते ॥
॥ १०-१६३-२ ॥

आन्त्रेभ्यस्ते गुदाभ्यो वनिष्ठोर्हृदयादधि ।
यक्ष्मं मतस्नाभ्यां यक्नः प्लाशिभ्यो वि वृहामि ते ॥
॥ १०-१६३-३ ॥

ऊरुभ्यां ते अष्ठीवभ्द्यां पार्ष्णिभ्यां प्रपदाभ्याम् ।
यक्ष्मं श्रोणिभ्यां भासदाद्भंससो वि वृहामि ते ॥१०-१६३-४॥

मेहनाद्वनंकरणाल्लोमभ्यस्ते नखेभ्यः ।
यक्ष्मं सर्वस्मादात्मनस्तमिद वि वृहामि ते ॥ १०-१६३-५ ॥

अङ्गादङ्गाल्लोम्नोलोम्नो जातं पर्वणिपर्वणि ।
यक्ष्मं सर्वस्मादात्मनस्तमिदं वि वृहामि ते ॥ १०-१६३-६ ॥

जो राक्षस तुझ्या भावाचें रूप धारण करून किंवा पतीचें रूप धारण करून, किंवा जाराचें रूप धारण करून, तुझ्याजवळ येऊन राहतो आणि संधी साधून तुझ्या प्रजेला मारूं पाहतो, त्या नीच राक्षसाला मी तेथून पार यमसदनाला पाठवितों. (१०-१६२-५) त्याचप्रमाणें हें पहा, जो राक्षस तुला स्वप्न पाडून अगर निद्रावश करून त्या संधींत तुझ्या गर्भाचा नाश करूं पाहतो, त्याचा मी जेथल्या तेथें चेंचून फडशा पाडलाच म्हणून समज ! ( १०-१६२-६ ).

## रत्न ५२० वें

हे क्षयरोगी मनुष्या ! तुझे डोळे, नाक, कान, हनुवटी, डोकें, जीभ आणि मेंदू यांत जो यक्ष्मारोग जडून बसला आहे, तो मी बाहेर घालवून देतों. ( १०-१६३-१ ). तुझा गळा, मानेचा स्नायु, छातीचीं हाडें, पाठीचा कणा, हाडाचे सांधे, खांदे, बाहू आणि आंतील भाग या सर्वांत जो क्षय-रोग ठाण मांडून बसला आहे त्याची मी तेथून पूर्ण हकालपट्टी करितों. ( १०-१६३-२ ). तुझीं पोटांतील आंतडीं, गुदस्थान, स्थूल आंतडीं, हृदय, अंड, यकृत्, फुप्फुस आणि पांथरी यांत जो विकार जडला आहे, तो मी सर्व दूर करीत आहें. (१०-१६३-३). त्याचप्रमाणें तुझ्या मांड्या, गुडघे, चवडे, टांचा, पादाग्र, कमर, आणि जांघे यांत जो रोग धरणें घेऊन बसला आहे, त्याला मी सपशेल हुसकावून लावतों. ( १०-१६३-४ ). मूत्रमार्ग, केंस, नखें आणि तुझ्या शरीरांतील इतर कोठलाहि भाग यांत जो रोग शिरला आहे, त्याचा मी पार नाश करून टाकतों. ( १०-१६३-५ ). प्रत्येक अंगा-अंगांत, केंसा-केंसांत, सांध्या-सांध्यांत आणि शरीराच्या प्रत्येक भागांत जो रोग ठाण मांडून बसला आहे, त्याला मी त्या त्या ठिकाणांतून पार हुसकावून लावतों. ( १०-१६३-६ ).

## रत्न ५२१ वें

प्रचेता-आंगिरस-ऋषि, दुःस्वप्ननाशन देवता, अनुष्टुप्-छंद.

अपेहि मनसस्पतेऽप क्राम परश्चर ।
परो निर्ऋत्या आ चक्ष्व बहुधा जीवतो मनः ॥
॥ १०-१६४-१ ॥

भद्रं वै वरं वृणते भद्रं युञ्जन्ति दक्षिणम् ।
भद्रं वैवस्वते चक्षुर्बहुत्रा जीवतो मनः ॥
॥ १०-१६४-२ ॥

## रत्न ५२२ वें

प्रचेता आंगिरस-ऋषि, दुःस्वप्ननाशन-देवता त्रिष्टुप्-छंद.

यदाशसा निःशसाभिशसोपारिम जाग्रतो यत्स्वपन्तः ।
अग्निर्विश्वान्यप दुष्कृतान्यजुष्टान्यारे अस्मद्दधातु ॥
॥ १०-१६४-३ ॥

## रत्न ५२३ वें

प्रचेता आंगिरस-ऋषि, दुःस्वप्ननाशन-देवता, अनुष्टुप्-छंद.

यदिन्द्र ब्रह्मणस्पतेऽभिद्रोहं चरामसि ।
प्रचेता न आङ्गिरसो द्विषतां पात्वंहसः ॥
॥ १०-१६४-४ ॥

## रत्न ५२४ वें

प्रचेता आंगिरस-ऋषि, दुःस्वप्ननाशन-देवता, पंक्ति-छंद.

अजैष्माद्यासनाम चाऽभूमानागसो वयम् ।
जाग्रत्स्वप्नः संकल्पः पापो यं द्विष्मस्तं स ऋच्छतु यो नो
द्वेष्टि तमृच्छतु ॥ १०-१६४-५ ॥

## रत्न ५२१ वें

हे दुःस्वप्नाच्या अधिदेवा ! दूर जा ! बाबा ! माझ्या स्वप्नांतून दूर हो! लांब जा ! आणि लांब जाऊन तेथें यथेच्छ विहार कर ! निर्ऋतीला (पाप देवतेला) सांग की मला छळू नकोस म्हणून. जिवंत असे माझें मन सारखें भ्रमण करीत असतें.(१०-१६४-१).लोक पाहावेत तर सगळे शुभ फलाचीच इच्छा करीत असतात. आणि प्रवृद्ध असें शुभ फलच मिळवितात. यमराजाच्या मंगल कटाक्षाची मी इच्छा करतों. हें माझें मन अनेक विषयांकडे सारखें भराऱ्या मारीत असतें. ( १०–१६४–२ ).

## रत्न ५२२ वें

मनांत कांहीं अभिलाष धरून अगर अभिलाष नसतांहि जागृतपणीं काय किंवा निद्रितावस्थेंत काय, आम्हीं जें कांहीं पातक केलें असेल, तें सर्व निंद्य पातक अग्निदेव आमच्यापासून दूर करो !( १०-१६४-३)

## रत्न ५२३ वें

हे इंद्र देवा ! हे ब्रह्मणस्पते ! दुःखस्वप्नाला कारण असा तुमच्याविषयीं आमच्याकडून जो कांहीं अपराध घडला असेल, त्यापासून आणि त्याचप्रमाणें आमचा द्वेष करणाऱ्या दुष्टांच्या पापकृत्यापासून आंगिरस ऋषि व वरुण आमचें रक्षण करोत ! ( १०-१६४-४ ) !

## रत्न ५२४ वें

जें कांहीं जिंकावयाचें तें सर्व आम्हीं आज जिंकलें आणि सर्व कांहीं उपभोगिलें. आतां आम्ही निष्पाप झालों आहों. आम्ही जागे असतांना अगर झोंपल्यावेळीं जे कांहीं पाप विचार आमच्या मनांत येतील, ते सर्व आमच्या शत्रूंकडे आणि द्वेष्ट्यांकडे जावोत ! ( १०-१६४-५ ) !

## रत्न ५२५ वें

**ऋषभ वैराज-ऋषि, सपत्ननाशन-देवता, अनुष्टुप्-छंद.**

ऋषभं मा समानानां सपत्नानां विषासहिम् ।
हन्तारं शत्रूणां कृधि विराजं गोपतिं गवाम् ॥

॥ १०-१६६-१ ॥

**श्रौ. वि. प्रयाणकालीन जप.**

अहमस्मि सपत्नहेन्द्र इवारिष्टो अक्षतः ।
अधः सपत्ना मे पदोरिमे सर्वे अभिष्ठिताः ॥

॥ १०-१६६-२ ॥

अत्रैव वोऽपि नह्याम्युभे आर्त्नी इव ज्यया ।
वाचस्पते नि षेधेमान्यथा मदधरं वदान् ॥

॥ १०-१६६-३ ॥

अभिभूरहमागमं विश्वकर्मेण धाम्ना ।
आ वश्चित्तमा वो व्रतमा वोऽहं समितिं ददे ॥

॥ १०-१६६-४ ॥

## रत्न ५२६ वें

**ऋषभ वैराज-ऋषि, सपत्ननाशन-देवता, महापंक्ति-छंद.**

योगक्षेमं व आदायाऽहं भूयासमुत्तम आ वो मूर्धानमक्रमीम् ।
अधस्पदान्म उद्वदत मण्डूका इवोदकान्मण्डूका उदकादिव ॥

॥ १०-१६६-५ ॥

## रत्न ५२५ वें

हे शत्रुमर्दन इन्द्र देवा ! माझ्या कुलांत जे जन्मलेले आहेत त्या सर्वांमध्यें वृषभाप्रमाणें मला सर्व श्रेष्ठ कर ! आणि जे माझ्याशीं शत्रुत्वानें वागतात त्यांना मी नमविणारा होईन, असें घडो ! शिवाय आणखी, माझे जे इतर वैरी आहेत त्यांचा मी वधकर्ता होईन, असें कर ! त्याचप्रमाणें मी तेजस्वी होत्साता विपुल गोधनाचा मालक होईन, असें घडो ! ( १०-१६६-१ ) तसें म्हणाल तर मी शत्रूंचा कर्दनकाळ आहें, इंद्राप्रमाणें मी कोणाकडूनहि वधिला जाणार नाहीं व कसल्याहि शस्त्रास्त्रानें घायाळ होणार नाहीं. हे माझे सर्व शत्रु माझ्या पायाखालीं दडपले जावोत ! ( १०-१६६-२ ) अहो ! द्वेष करणाऱ्या वैऱ्यांनो जेथें तुम्ही असाल तेथें येऊन मी तुम्हांला पकडीन आणि ज्या (धनुष्याची दोरी) जशी धनुष्याचीं दोन्ही टोकें बद्ध करून टाकिते, तद्वत मीहि तुम्हांला पाशानें आवळून मुसक्या बांधून ठेवीन ! हे वाचस्पति देवा ! या माझ्या शत्रूंचा असा सणसणीत निषेध कर कीं, ज्यायोगें त्यांची माझ्यापुढें बोबडीच वळेल ! ( १०-१६६-३ ) ! अहो शत्रुहो ! मी तुमचा पराभव करणार असून सर्वसमर्थ आहें. तसाच बलसंपन्नहि पण आहें. आतां तुमचें मनोधैर्य मी खास हिरावून घेईन ! तुमचे डावपेंच हाणून पाडीन ! इतकेंच काय, तुमचा संग्रामसुद्धां उधळून लावीन तरच नांवाचा वीर ! ( १०-१६६-४ ) !

## रत्न ५२६ वें

अहो शत्रुहो ! तुमचा योगक्षेम हिरावून घेऊन मी श्रेष्ठ होईन. तसेंच तुमच्या डोक्यावर पाय देऊन उभा राहीन. असें झालें म्हणजे मग पाण्यांतून ओरडणाऱ्या बेंडकाप्रमाणें माझ्या पायाखालीं रगडले जाणारे तुम्ही मोठ्यानें आक्रोश करूं लागाल ! ( १०-१६६-५ )

## रत्न ५२७ वें

**शिवसंकल्प-ऋषि, मन-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

येनेदं भूतं भुवनं भविष्यत्परिगृहीतममृतेन सर्वम् ।
येन यज्ञस्तायते सप्तहोता तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
॥ १०-१६६ खिल ३३-१ ॥

येन कर्माण्यपसो मनीषिणो यज्ञे कृण्वन्ति विदथेषु धीराः ।
यदपूर्वं यक्षमन्तःप्रजानां तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
॥ १०-१६६ खिल ३३-२ ॥

यज्जाग्रतो दूरमुदैति दैवं तदु सुप्तस्य तथैवेति ।
दूरंगमं ज्योतिषां ज्योतिरेकं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
॥ १०-१६६ खिल ३३-३ ॥

यत्प्रज्ञानमुत चेतो धृतिश्च यज्ज्योतिरन्तरमृतं प्रजासु ।
यस्मान्न ऋते किञ्चन कर्म क्रियते तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
॥ १०-१६६ खिल ३३-४ ॥

यस्मिन्नृचः साम यजूंषि यस्मिन्प्रतिष्ठिता रथनाभाविवाराः ।
यस्मिंश्चित्तं सर्वमोतं प्रजानां तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
॥ १०-१६६ खिल ३३-५ ॥

सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनीयतेऽभीशुभिर्वाजिन इव ।
हृत्प्रतिष्ठं यदजिरं यविष्ठं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
॥ १०-१६६ खिल ३३-६ ॥

**स्मा. वि. शिवसंकल्प-उपनिषत्.**

## रत्न ५२७ वें

ज्या अविनाशी मनानें भूत–भविष्य–वर्तमानकालीन सर्व वस्तुजाताला ओळखिलें आहे व ज्याच्या सहाय्यानें मैत्रावरुणादि सात होत्यांनीं युक्त असा अग्निष्टोमासारखा यज्ञ अनुष्ठिला जातो, असें तें माझें मन मंगल विचारांतरांत मग्न असो ! ( १०–१६६ खिल ३३–१ ). कर्मनिष्ठ, बुद्धिमान व ज्ञानसंपन्न असे जे लोक आहेत, ते ज्याच्या सहाय्यानें यज्ञामध्यें यथाविधि कर्म करतात, जें सर्व इंद्रियांच्या अगोदर उत्पन्न झालें, जें कर्म करण्यास समर्थ आहे, जें प्राणिमात्रांच्या अंतर्यामीं असतें, असें तें माझें मन मंगल विचारांत सदैव मग्न असो ! ( १०–१६६ खिल ३३–२ ). जें जागृतावस्थेंत वाटेल तितकें दूर जाऊं शकतें, जें आत्मस्वरूप ओळखण्यास समर्थ आहे, निद्रावश झालें म्हणजे जें दूर गेलेलें पुनः परत जवळ येतें, जें त्रिकाळांतील दूरची व गूढ वस्तु जाणूं शकतें, जें इंद्रियांचें एकमेव प्रेरक आहे, असें तें माझें मन मंगल विचारांत मग्न असो ! ( १०–१६६ खिल ३३–३ ). जें परमार्थ ज्ञानजनक आहे, जें लौकिक ज्ञानजनक आहे, जें धैर्यरूप आहे, जें शरीरांत राहून सर्व इंद्रियांस प्रकाश देतें, जें अमर व ज्याच्या मदतीवांचून कोणतीच क्रिया केली जात नाहीं, असें तें माझें मन मंगल विचारांत सतत मग्न असो ! ( १०–१६६ खिल ३३–४ ). रथचक्राच्या तुंब्यामध्यें ज्याप्रमाणें आरा बसविलेल्या असतात, त्याप्रमाणें ज्या मनामध्यें ऋचा, साम व यजु हीं बसविलेलीं आहेत व ज्या मनामध्यें प्राणिमात्रांचें सर्व ज्ञान ओतप्रोत भरलेलें आहे, असें तें माझें मन सदैव शांत व्यापारयुक्त असो ! ( १०–१६६ खिल ३३–५ ). शाहणा सारथि ज्याप्रमाणें घोड्यांस नीट मार्गदर्शन करतो अथवा लगामानें त्यांचें योग्य नियमन करतो, त्याप्रमाणें जें मन मनुष्यमात्रांना सन्मार्ग दाखवितें, जें प्राणिमात्रांच्या हृदयांत राहतें, जें जरारहित आहे आणि जें अत्यंत वेगवान आहे असें तें माझें मन शांत व्यापारयुक्त असो ! ( १०–१६६ खिल ३३–६ ).

## रत्न ५२८ वें

**अनिल वातायन-ऋषि, वायु-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

वातस्य नु महिमानं रथस्य रुजन्नेति स्तनयन्नस्य घोषः ।
दिविस्पृग्यात्यरुणानि कृण्वन्नुतो एति पृथिव्या रेणुमस्यन् ॥
॥ १०-१६८-१ ॥

सं प्रेरते अनु वातस्य विष्ठा ऐनं गच्छन्ति समनं न योषाः ।
ताभिः सयुक्सरथं देव ईयतेऽस्य विश्वस्य भुवनस्य राजा ॥
॥ १०-१६८-२ ॥

अन्तरिक्षे पथिभिरीयमानो न नि विशते कतमच्चनाहः ।
अपां सखा प्रथमजा ऋतावा क्व स्विज्जातः कुत आ बभूव ॥
॥ १०-१६८-३ ॥

आत्मा देवानां भुवनस्य गर्भो यथावशं चरति देव एषः ।
घोषा इदस्य शृण्विरे न रूपं तस्मै वाताय हविषा विधेम ॥
॥ १०-१६८-४ ॥

## रत्न ५२९ वें

**विभ्राट् सौर्य-ऋषि, सूय-देवता, जगती-छंद.**

विभ्राड् बृहत्पिबतु सोम्यं मध्वायुर्दधद्यज्ञपतावविह्रुतम् ।
वातजूतो यो अभिरक्षति त्मना प्रजाः पुपोष पुरुधा वि राजति ॥
॥ १०-१७०-१ ॥

**श्रौ. वि. ( वाजपेय ) याज्या** **स्मा. वि. सूर्योपस्थान.**

विभ्राड् बृहत्सुभृतं वाजसातमं धर्मन्दिवो धरुणे सत्यमर्पितम् ।
अमित्रहा वृत्रहा दस्युहंतमं ज्योतिर्जज्ञे असुरहा सपत्नहा ॥
॥ १०-१७०-२ ॥

## रत्न ५२८ वें

आतां वाताच्या रथाचा महिमा मी वर्णन करीत आहें. याचा घोष गिरिगव्हरांत विविध प्रकारचा आवाज निर्माण करतो, व स्थावर जंगमादिकाची मोडतोड करीत जातो. तो आकाशाला व्यापणारा असून, दिशा आरक्तवर्ण करीत व पृथ्वीवर धुळीचे लोळ उठवीत जात असतो. (१०-१६८-१).पर्वतादि स्थावर सृष्टि वायु ज्या रोखानें वाहील त्या रोखानें प्रकंपित होते, आणि संग्रामाप्रमाणें त्याच्याकडे अश्वस्त्रिया जातात.त्यांना जोडून सर्व भुवनांचा राजा जो वायुदेव तो रथांत बसून जातो. (१०-१६८-२). आकाशमार्गांतून संचार करणारा हा वायु एक दिवस तरी स्वस्थ बसला असें कधीं होत नाहीं. तो उदकांचा सखा आहे, तो सर्व प्राणिमात्रांच्या आधीं जन्मला, आणि तो सत्यस्वरूप असा आहे. असा हा वायु देव खरें म्हटलें तर तो कोठें जन्मला ? व कोठून येऊन हें सर्व जग त्यानें व्यापून टाकिलें म्हणावें ? ( १०-१६८-३ ) तो वायु म्हणजे देवांचा आत्मा आहे. भुवनांचा गर्भ आहे. तो मनास येईल त्याप्रमाणें संचार करणारा आहे. याचा आवाज तेवढाच ऐकूं येतो. पण रूप मात्र कोणालाच दिसत नाहीं ! त्या वायुदेवाला हवि अर्पण करून आम्ही त्या वायुराजाची सेवा करतों ( १०-१६८-४ ).

## रत्न ५२९ वें

जो अत्यंत प्रकाशमान आहे,जो यज्ञोपासक यजमानास उदंड आयुष्य देतो, जो वायुप्रेरित असून,सर्व जगाचा पालनपोषणकर्ता आहे व जो अग्निनक्षत्रादिरूपानें विविध प्रकारें प्रकाशमान होतो असा तो भगवान सूर्यनारायण या आमच्या यज्ञशालेंत उपस्थित होऊन अत्यंत मधुर अशा या सोमरसाचें पान करो ! ( १०-१७०-१ ) अत्यंत तेजस्वी, अत्यत प्रौढ, अत्यंत पुष्ट, बलप्रद, वायूला धारण करण्यास योग्य व द्युलोकाला आधारभूत अशा त्या सूर्यमंडलांत ठेविलेलें अविनाशी, मेघनाशक, दस्युघातक, असुरमर्दक, सपत्नहारक, शत्रुसंहारक असें मंगल तेज प्रादर्भूत होत आहे ! ( १०-१७०-२ )

इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिरुत्तमं विश्वजिद्धनजिदुच्यते बृहत् ।
विश्वभ्राड् भ्राजो महि सूर्यो दृश उरु पप्रथे सह ओजो अच्युतम् ॥

॥ १०-१७०-३ ॥

## रत्न ५२९ (अ) वें

**विभ्राट सौर्य-ऋषि, सूर्य-देवता, अस्तारपंक्ति-छंद.**

विभ्राजञ्ज्योतिषा स्व१रगच्छो रोचनं दिवः ।
येनेमा विश्वा भुवनान्याभृता विश्वकर्मणा विश्वदेव्यावता ॥

॥ १०-१७०-४ ॥

## रत्न ५३० वें

**ध्रुव आंगिरस-ऋषि, राजा-देवता, अनुष्टुप्-छंद.**

आ त्वाहार्षमन्तरेधि ध्रुवस्तिष्ठाविचाचलिः ।
विशस्त्वा सर्वा वाञ्छन्तु मा त्वद्राष्ट्रमधि भ्रशत् ॥

॥ १०-१७३-१ ॥

**श्री. वि. राजस्तुति. लढाईला जातांना करावयाचे राजाभिमंत्रण.**

इहैवैधि माप च्योष्ठाः पर्वत इवाविचाचलिः ।
इन्द्र इवेह ध्रुवस्तिष्ठेह राष्ट्रमु धारय ॥ १०-१७३-२ ॥
इममिन्द्रो अदीधरद् ध्रुवं ध्रुवेण हविषा ।
तस्मै सोमो अधि ब्रवत्तस्मा उ ब्रह्मणस्पतिः ॥

॥ १०-१७३-३ ॥

ध्रुवा द्यौर्ध्रुवा पृथिवी ध्रुवासः पर्वता इमे ।
ध्रुवं विश्वमिदं जगद् ध्रुवो राजा विशामयम् ॥

॥ १०-१७३-४ ॥

हें सूर्यदेवाचें तेज म्हणजे अत्यंत श्रेष्ठ आहे! तसेंच तें ग्रहनक्षत्रादिकांना प्रकाश देणारें असून सर्वांत उत्तमोत्तम असें आहे! तेंच सर्व विश्वाला जिंकणारें असून सर्व प्रकारचें धनहि तेंच प्राप्त करून देतें; अर्थात् तें सर्वांत महान् आहे! आणि अशा या विस्तीर्ण, तमोनाशक व अविनाशी तेजाचा तो विश्व प्रकाशित करणारा, तेजस्वी व महान असा सूर्यदेव जगाला पाहण्यासाठीं म्हणून सर्वत्र विस्तार करतो. ( १०-१७०-३ ).

## रत्न ५२९ (अ) वें

हे सूर्य देवा! आपल्या स्वतःच्या महातेजानें सर्व जगाला प्रकाशित करीत तूं आकाशांत प्राप्त झाला आहेस! किती वर्णूं तुझ्या प्रखर तेजाचा तो दिव्य महिमा! तें तेज म्हणजे असें आहे कीं सर्व जगाचे व्यवहार केवळ त्याच्यामुळेंच चालतात. सर्व देवांना तें हितकर असून अखिल प्राणिमात्राचें पोषकहि तेंच आहे! ( १०-१७०-४ )

## रत्न ५३० वें

हे राजन्! या राष्ट्राचा स्वामी म्हणून आम्हीं तुला येथें उदयास आणलें आहे. तूं आमच्यामध्यें राजा हो! तूं सिंहासनावर स्थिर रहा! तेथून हलूं नकोस! सर्व प्रजाजन तुझ्यावरच प्रेम करोत! आणि हें राष्ट्र तुझ्यापासून कधींहि न ढळो! ( १०-१७३-१ )! हे राजन्! या राज्यांतच तूं मालक होऊन रहा! तेथून तूं हलूं नकोस! पर्वताप्रमाणें स्थिर व अढळ रहा! इन्द्राप्रमाणें तूं येथें स्थिर होऊन रहा आणि या राष्ट्राचें संरक्षण कर! ( १०–१७३–२ ) या स्थिर हवीनें तृप्त झालेला इंद्रदेव या अभिषिक्त राजास राज्यावर स्थिर करो! त्याला सोम व ब्रह्मणस्पति देव 'हा आपला आहे' असें म्हणोत! ( १०–१७३–३ ) तें आकाश, ही पृथ्वी, ते पर्वत आणि हें सर्व जग ज्याप्रमाणें स्थिर आहे, त्याप्रमाणें आम्हा प्रजेचा हा राजाहि राज्यावर चिरकाल टिकून राहो!(१०-१७३-४)

**स्मा. वि. ध्रुवदर्शन ( वधूला ).**

ध्रुवं ते राजा वरुणो ध्रुवं देवो बृहस्पतिः ।
ध्रुवं त इन्द्रश्चाग्निश्च राष्ट्रं धारयतां ध्रुवम् ॥

॥ १०-१७३-५ ॥

ध्रुवं ध्रुवेण हविषाऽभि सोमं मृशामसि ।
अथो त इन्द्रः केवलीर्विशो बलिहृतस्करत् ॥

॥ १०-१७३-६ ॥

## रत्न ५३१ वें

**अभीवर्त आंगिरस-ऋषि, राजा-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अभीवर्तेन हविषा येनेन्द्रो अभिवावृते ।
तेनास्मान्ब्रह्मणस्पतेऽभि राष्ट्राय वर्तय ॥ १०-१७४-१ ॥

**श्रौ. वि. युद्धाला निघावयाच्या वेळीं राजाला उद्देशून म्हणावयाचा मंत्र**

अभिवृत्य सपत्नानभि या नो अरातयः ।
अभि पृतन्यन्तं तिष्ठाऽभि यो न इरस्यति ॥

॥ १०-१७४-२ ॥

अभि त्वा देवः सविताऽभि सोमो अवीवृतत् ।
अभि त्वा विश्वा भूतान्यभीवर्तो यथाससि ॥

॥ १०-१७४-३ ॥

येनेन्द्रो हविषा कृत्व्यभवद् द्युम्न्युत्तमः ।
इदं तदक्रि देवा असपत्नः किलाभुवम् ॥ १०-१७४-४ ॥

असपत्नः सपत्नहाऽभिराष्ट्रो विषासहिः ।
यथाहमेषां भूतानां विराजानि जनस्य च ॥

॥ १०-१७४-५ ॥

राजा वरुण, देवगुरु बृहस्पति, तसेच इन्द्र व अग्नि हे. तुला, हे राजन्! राज्यावर दृढ करोत! आणि त्याचप्रमाणें तुझें राष्ट्रहि पण स्थिर करोत! (१०-१७३-५)! या स्थिर पुरोडाशादि हवीनें युक्त अशा या सोमाला यागार्थ आम्ही स्पर्श करतों! म्हणजे ही प्रजा केवळ तुझीच होत्साती, तुलाच करभाग आणून देत जाईल असें तो इंद्रदेव करील. (१०-१७३-६).

## रत्न ५३१ वें

ज्या हविर्द्रव्यानें इन्द्र देव हा सर्वांवर विजय मिळविता झाला, त्या हविर्द्रव्याच्या अर्पणानें, हे ब्रह्मणस्पते! तूं हें मला राज्य मिळविण्यासाठीं सुसमर्थ कर! (१०-१७४-१). जे आमचे शत्रु असतील त्यांच्यावर चढाई करून आणि जे आमच्याशीं स्पर्धा करतील त्यांच्याबरोबर लढाई करून, त्यांवर विजय मिळविण्यास तूं मला समर्थ कर! (१०-१७४-२) हे राजन्! सविता देव तुझें चौबाजूंनीं रक्षण करो! त्याचप्रमाणें सोमदेवहि तुझें रक्षण करो! आणि अखिल भूतमात्रहि रक्षण करोत! कीं ज्यायोगें तूं शत्रूंवर विजय संपादून सर्वसत्ताधीश होशील! (१०-१७४-३). ज्या हविर्द्रव्यामुळें इन्द्र हा पराक्रमशाली, तेजस्वी व सर्वश्रेष्ठ असा झाला, तशा प्रकारचें हविर्द्रव्य मीं आतां तयार केलें आहे आणि म्हणूनच मी शत्रुरहित होऊन राहिलों आहें. (१०-१७४-४). मी सर्व शत्रूंचा पार फडशा पाडला! आतां मला शत्रु असा कोणी राहिला नाहीं! मला राज्य प्राप्त झालें आहे. ज्याप्रमाणें मी या सर्व प्राणिमात्रांचा व लोकांचा राजा झालों आहें, त्याचप्रमाणें शत्रूंचा कर्दन काळहि बनलों आहें! (१०-१७४-५).

## रत्न ५३२ वें

**उर्ध्वग्रावा सर्प आर्बुदि-ऋषि, ग्रावाण-देवता, गायत्री-छंद.**

प्र वो ग्रावाणः सविता देवः सुवतु धर्मणा ।
धूर्षु युज्यध्वं सुनुत ॥ १०-१७५-१ ॥

**औ. वि. ग्रावास्तोत्र.**

ग्रावाणो अप दुच्छुनामप सेधत दुर्मतिम् ॥
उस्राः कर्तन भेषजम् ॥ १०-१७५-२ ॥
ग्रावाण उपरेष्वा महीयन्ते सजोषसः ।
वृष्णे दधतो वृष्ण्यम् ॥ १०-१७५-३ ॥
ग्रावाणः सविता नु वो देवः सुवतु धर्मणा ।
यजमानाय सुन्वते ॥ १०-१७५-४ ॥

## रत्न ५३३ वें

**सूनुरार्भव-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद.**

प्र देवं देव्या धिया भरता जातवेदसम् ।
हव्या नो वक्षदानुषक् ॥ १०-१७६-२ ॥

**औ. वि. अग्नि-प्रणयन.**

## रत्न ५३४ वें

**सूनुरार्भव-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद.**

अयमु ष्य प्र देवयुर्होता यज्ञाय नीयते ।
रथो न योरभीवृतो घृणीवाञ्चेतति त्मना ॥ १०-१७६-३ ॥
अयमग्निरुरुष्यत्यमृतादिव जन्मनः ।
सहसश्चित्सहीयान्देवो जीवातवे कृतः ॥ १०-१७६-४ ॥

### रत्न ५३२ वें

अहो ग्राव्यांनो! तुम्हांला सविता देव तत्पर राहून सोम कुटण्याची प्रेरणा करो! तुम्ही सोम कुटण्याच्या जागीं स्थानापन्न व्हा आणि सोमरस काढा! (१०-१७५-१) हे ग्राव्यांनो! (सोम कुटण्याच्या दगडांनो!) आम्हांला दुःख देणाऱ्या दुष्ट शत्रूंचा नायनाट करा! आमच्यांतील दुर्बुद्धि विलयास न्या! आणि आम्हांस गाई सुखकर होतील असें करा! (१०-१७५-२) ग्राव्यानो! तुम्ही परस्परावर प्रेम करणारे असें एकत्र होऊन पाट्याच्या शेजारीं (सोम वाटण्याचा सपाट दगड) प्रकाशत असता. आणि बलकारक सोमाला वीर्य प्राप्त करून देतां. (१०-१७५-३) हे ग्राव्यांनो! सविता देव तुम्हांला दक्षतेनें सोमयाग करूं पाहणाऱ्या या यजमानासाठीं सत्वर सोमरस पिळून काढण्यास प्रेरणा करो! (१०-१७५-४).

### रत्न ५३३ वें

अहो ऋत्विग्यजमानहो! आम्हीं अर्पण केलेलीं हविर्द्रव्यें देवांना यथाक्रम पोंचविण्यासाठीं म्हणून तुम्ही या जातप्रज्ञ अग्निदेवाला दिव्य स्तुतिस्तोत्र गाऊन पूर्वेकडे घेऊन या! (१०-१७६-२).

### रत्न ५३४ वें

देवांचें यजन करूं इच्छिणारा व त्यांना यज्ञगृहांत बोलावणारा अग्निदेव तो हाच असून तोच देवांना पण बोलावणाराहि आहे. आणि तोच आतां यज्ञार्थ आहवनीय स्थानाकडे नेला जात आहे. सूर्याप्रमाणें तो दीप्तिमान असून, देवांना हवि पोंचविणारा आहे. तसाच तो ऋत्विग्यजमान-प्रभृतींनीं परिवेष्टित आहे. असा हा अग्निदेव देवांचें यजन कसें करावें हें तो स्वतः उत्तम जाणतो. (१०-१७६-३). हा अग्निदेव देवभयापासून व मनुष्यभयापासून आमचें रक्षण करणारा आहे. तो बलवानांतला बलवान असून त्याला यागार्थ म्हणून ब्रह्मानें निर्माण केला आहे. (१०-१७६-४).

## रत्न ५३५ वें

**पतंग प्राजापत्य-ऋषि, मायाभेद-देवता, जगती-छंद.**

पतङ्गमक्तमसुरस्य मायया हृदा पश्यन्ति मनसा विपश्चितः ।
समुद्रे अन्तः कवयो वि चक्षते मरीचीनां पदमिच्छन्ति वेधसः ॥

॥ १०-१७७-१ ॥

**श्रौ. वि. ( वाग्देवत्य पशु ) पुरोडाश अनुवाक्या.**

## रत्न ५३६ वें

**पतंग प्राजापत्य-ऋषि, मायाभेद-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

पतङ्गो वाचं मनसा बिभर्ति तां गन्धर्वोऽवदद्गर्भे अन्तः ।
तां द्योतमानां स्वर्यं मनीषामृतस्य पदे कवयो नि पान्ति ॥

॥ १०-१७७-२ ॥

अपश्यं गोपामनिपद्यमानमा च परा च पथिभिश्चरन्तम् ।
स सध्रीचीः स विषूचीर्वसान आ वरीवर्ति भुवनेष्वन्तः ॥

॥ १०-१७७-३ ॥

## रत्न ५३७ वें

**तपुर्मूर्धा बार्हस्पत्य-ऋषि, बृहस्पति-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

बृहस्पतिर्नयतु दुर्गहा तिरः पुनर्नेषदघशंसाय मन्म ।
क्षिपदशस्तिमप दुर्मतिं हन्नथा करद्यजमानाय शं योः ॥

॥ १०-१८२-१ ॥

नराशंसो नोऽवतु प्रयाजे शं नो अस्त्वनुयाजो हवेषु ।
क्षिपदशस्तिमप दुर्मतिं हन्नथा करद्यजमानाय शं योः ॥

॥ १०-१८२-२ ॥

## रत्न ५३५ वें

ईश्वरी मायेनें निर्माण झालेल्या सूर्यदेवाला ज्ञानीजन हृदयस्थ मनानेंच जाणतात. जे सूक्ष्म दृष्टीचे कविजन आहेत, ते त्या हिरण्मय पुरुषाला विशाल अशा सूर्यमंडळांत स्थित असलेला असा हृदयस्थ मनानेंच जाणतात. अशा प्रकारचे जे सूर्योपासक आहेत, ते किरणांचें मूलस्थान जें सूर्यमंडल त्या सूर्यमडळाची इच्छा करतात. ( १०-१७७-१ ).

## रत्न ५३६ वें

सूर्यदेव हा मनानेंच वेदरूप वाणीचें धारण करतो आणि शरीरांत संचारणारा प्राणवायु हा त्या वाणीला स्वररूपानें उच्चारून बाहेर प्रकट करितो; अशा त्या तेजस्वी देवांना हितकर, आणि मनावर सत्ता चालविणाऱ्या अशा वेदरूप वाणीचें कविजन यज्ञसमारभांत संरक्षण करतात (१०-१७७-२). प्रातःकाळीं आकाशमार्गानें वर चढत जाऊन पुनः सायंकाळीं खालीं उतरत जाणारा आणि सर्व दिशोपदिशांना स्वतेजानें प्रकाशित करणारा असा तो सूर्यदेव भुवनामध्यें पुनः पुनः उदयास्त करीत फिरत असतो ( १०-१७७-३ ).

## रत्न ५३७ वें

संकटांचा नाश करणारा असा हा बृहस्पति देव आमचें निंद्य असें दुराचरण नाहींसें करो ! आमच्या आपत्तीची प्रशंसा करणाऱ्या दुर्जनांवर आपलें तीक्ष्ण तेजस्वी हत्यार चालवो ! पराभव पावलेल्या शत्रूचें निर्दालन करो ! दुष्ट बुद्धीचा नाश करो ! आणि देवभक्त अशा या यजमानाला सुख व क्षेम प्राप्त करून देवो ! ( १०-१८२-१ ) ! प्रयाज नांवाच्या यज्ञानुष्ठानांत नराशंस अग्निदेव आमचें रक्षण करो ! आम्ही देवांचें स्तोत्र गात असतांना अनुयाजांतील अग्निदेव आम्हांस सुख देवो ! बृहस्पति देव आमच्या आपत्कालाची प्रशंसा करणाऱ्या दुर्जनांवर आपलें प्रखर अस्त्र टाको ! आमच्या पराभूत शत्रूचें उच्चाटन करो ! दुर्मतीचा नाश करो ! आणि आम्हा यज्ञोपासकांस सुख व क्षेम लाभेल असें करो (१०-१८२-२)

तपुर्मूर्धा तपतु रक्षसो ये ब्रह्मद्विषः शरवे हन्तवा उ ।
क्षिपदशस्तिमप दुर्मतिं हन्नथा करद्यजमानाय शं योः ॥

॥ १०-१८२-३ ॥

## रत्न ५३८ वें

**प्रजावान् प्राजापत्य-ऋषि, होत्राशिष-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

अहं गर्भमदधामोषधीष्वहं विश्वेषु भुवनेष्वन्तः ।
अहं प्रजा अजनयं पृथिव्यामहं जनिभ्यो अपरीषु पुत्रान् ॥

॥ १०-१८३-३ ॥

## रत्न ५३९ वें

**त्वष्टा गर्भकर्ता-ऋषि, विष्णु-देवता, अनुष्टुप्-छंद.**

विष्णुर्योनिं कल्पयतु त्वष्टा रूपाणि पिंशतु ।
आ सिञ्चतु प्रजापतिर्धाता गर्भं दधातु ते ॥

॥ १०-१८४-१ ॥

**स्मा. वि. गर्भाधान होम.**

## रत्न ५४० वें

**त्वष्टा गर्भकर्ता-ऋषि, सिनीवाली-देवता, अनुष्टुप्-छंद.**

गर्भं धेहि सिनीवालि गर्भं धेहि सरस्वति ।
गर्भं ते अश्विनौ देवावा धत्तां पुष्करस्रजा ॥

॥ १०-१८४-२ ॥

## रत्न ५४१ वें

**त्वष्टा गर्भकर्ता-ऋषि, अश्वी-देवता, अनुष्टुप्-छंद.**

हिरण्ययी अरणी यं निर्मन्थतो अश्विना ।
तं ते गर्भं हवामहे दशमे मासि सूतवे ॥

॥ १०-१८४-३ ॥

ज्याचें मस्तक तप्त आहे असा बृहस्पति देव वेदज्ञानाचा द्वेष करणारे असे जे राक्षस आहेत त्यांना, व त्यांच्या राक्षसाग्रणीला आपल्या प्रखर तेजानें भाजून होरपळून काढो ! तसेंच जें अमंगल आहे तें दूर करो ! दुष्टबुद्धीचा नाश करो ! आणि यजमानाचें म्हणजे देवभक्ताचें क्षेम व कल्याण करो ! ( १०-१८२-३ )

## रत्न ५३८ वें

मी-हा जो परमपुरुष-तोच ओषधि-वनस्पतीमध्यें गर्भ-म्हणजे फलाची उत्पत्ति करतों. त्याचप्रमाणें मीच सकल भूतजातांमध्यें गर्भ धारण करणारा आहें. या पृथ्वीवर जे जे मनुष्य प्राणी आहेत, त्या सर्वांना मींच उत्पन्न केलें आहे आणि भविष्यकालांतहि स्त्रियांपासून संतति निर्माण करणारा पण मीच आहें ( १०-१८३-३ ) .

## रत्न ५३९ वें

हे जाये! तुझ्या गर्भाधानाचें स्थान विष्णु देव तयार करो ! त्या गर्भाचें लिंग-रूप, म्हणजे स्त्री-पुरुषाच्या अवयवाचें मूर्तस्वरूप, त्वष्टा देव निर्माण करो ! प्रजापति देव हा गर्भबीजाचें म्हणजे रेताचें सिंचन करो ! आणि धाता देव हा त्या गर्भाची तुझ्या उदरांत धारणा करो ! (१०-१८४-१).

## रत्न ५४० वें

हे सिनीवालि ! हे देवि ! तूं या स्त्रीच्या उदरांतील गर्भाचें रक्षण कर ! हे सरस्वति ! तूं त्याचें संगोपन कर ! आणि हे कमलमाला धारण करणारे अश्वि देवहो ! तुम्ही त्या गर्भाचें धारण करा ! (१०-१८४-२)

## रत्न ५४१ वें

अश्विदेवांनीं सुवर्णमय अरणीचें मंथन करून ज्या गर्भाला निर्माण केला आहे, त्याला हे जाये ! तुझ्यासाठीं आम्ही बोलावीत आहों. उद्देश हा कीं तो गर्भ तुझ्या उदरांत वाढीस लागून पुढें दहाव्या महिन्यांत सुरक्षित असा सुखरूप बाहेर पडावा ( १०-१८४-३ ).

## रत्न ५४२ वें

नेजमेष परा पत सुपुत्रः पुनरा पत ।
अस्यै मे पुत्रकामायै गर्भमा धेहि यः पुमान् ॥
॥ १०-१८४ खिल ३४-१ ॥

यथेयं पृथिवी मह्युत्ताना गर्भमादधे ।
एवं तं गर्भमा धेहि दशमे मासि सूतवे ॥
॥ १०-१८४ खिल ३४-२ ॥

विष्णोः श्रेष्ठेन रूपेणास्यां नार्यां गवीन्याम् ।
पुमांसं पुत्राना धेहि दशमे मासि सूतवे ॥
॥ १०-१८४ खिल ३४-३ ॥

**स्मा. वि. गर्भाधान.**

## रत्न ५४३ वें

**वातायन उल-ऋषि, वायु-देवता, गायत्री-छंद.**

वात आ वातु भेषजं शंभु मयोभु नो हृदे ।
प्र ण आयूंषि तारिषत् ॥ १०-१८६-१ ॥
उत वात पितासि न उत भ्रातोत नः सखा ।
स नो जीवातवे कृधि ॥ १०-१८६-२ ॥
यददो वात ते गृहे३ऽमृतस्य निधिर्हितः ।
ततो नो देहि जीवसे ॥ १०-१८६-३ ॥

## रत्न ५४४ वें

**श्येन आग्नेय, अग्नि-देवता, गायत्री-छंद.**

प्र नूनं जातवेदसमश्वं हिनोत वाजिनम् ।
इदं नो बर्हिरासदे ॥ १०-१८८-१ ॥

## रत्न ५४२ वें

पुरुषानें आपल्या स्त्रीशीं खुशाल प्रेमविलास करावा आणि पुत्ररूपानें पुनः उत्पन्न व्हावें. पुत्राची इच्छा करणाऱ्या आपल्या स्वतःच्या भार्येच्या ठिकाणीं हे पुरुषहो, तुम्ही गर्भाची स्थापना करा! (१० १८४खिल ३४-१) ही पृथ्वीमाता उताणी राहून जशी आपल्या उदरांत बीज धारण करते, तद्वत दहाव्या महिन्यांत उत्पन्न होणेकरतां, हे पुरुषहो ! तुम्हीं आपल्या पत्नीच्या उदरांत गर्भस्थापना करा! (१०-१८४खिल३४-२). विष्णूसारखा सुंदर रूपवान पुत्र दहाव्या महिन्यांत उत्पन्न व्हावा म्हणून तुम्ही आपल्या पत्नीच्या उदरांत गर्भाची स्थापना करा ! (१०-१८४ खिल ३४-३).

## रत्न ५४३ वें

वायुदेव आमच्या हृदयाला हित व सुख होईल अशा तऱ्हेनें वाहो ! तसाच तो आमच्या रोगाचें शमन करणारा आणि आम्हांस सुख देणारा असा होवो ! त्याबरोबरच आमचें आयुष्यहि वर्धन करो ! (१०-१८६-१) हे वायुदेवा ! तूं आमचा पिता आहेस. आमचा भाऊ आहेस. आमचा मित्र आहेस. तर तूं आमचें जीवन दीर्घकाल टिकून राहील, असें कर ! ( १०-१८६-२ ) वायुदेवा ! तुझ्याजवळ जो अमृताचा सांठा आहे, त्यांतून आमच्या जीवनासाठीं कांहीं दे ! (१०–१८६–३).

## रत्न ५४४ वें

हे भक्तजन हो ! सर्वज्ञ, सर्वव्यापक व अन्नसंपन्न असा जो अग्नि देव त्या अग्निदवाला येथें पसरलेल्या दर्भासनावर बसण्यासाठीं लवकर प्रवर्धन करा! ( १०–१८८–१).

अस्य प्र जातवेदसो विप्रवीरस्य मीळ्हुषः ।
महीमियर्मि सुष्टुतिम् ॥ १०-१८८-२ ॥
या रुचो जातवेदसो देवत्रा हव्यवाहनीः ।
ताभिर्नो यज्ञमिन्वतु ॥ १०-१८८-३ ॥

## रत्न ५४५ वें

**सार्पराज्ञी-ऋषि, सूर्य-देवता, गायत्री-छंद.**

आयं गौः पृश्निरक्रमीदसदन्मातरं पुरः ।
पितरं च प्रयन्त्स्वः ॥ १०-१८९-१ ॥

**स्मा. वि. सूर्योपस्थान; अघमर्षण.**

अन्तश्चरति रोचनाऽस्य प्राणादपानती ।
व्यख्यन्महिषो दिवम् ॥ १०-१८९-२ ॥
त्रिंशद्धाम वि राजति वाक्पतङ्गाय धीयते ।
प्रति वस्तोरह द्युभिः ॥ १०-१८९-३ ॥

## रत्न ५४६ वें

**माधुच्छंदस अघमर्षण-ऋषि, भाववृत्त-देवता, अनुष्टुप्-छंद.**

ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत ।
ततो रात्र्यजायत ततः समुद्रो अर्णवः ॥ १०-१९०-१ ॥

**स्मा. वि. अघमर्षण.**

समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत ।
अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी ॥ १०-१९०-२ ॥
सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।
दिवं च पृथिवीं चाऽन्तरिक्षमथो स्वः ॥ १०-१९०-३ ॥

जो सकल वस्तुजात जाणणारा आहे, मेधावी यजमान हे ज्याचे पुत्र आहेत व जो भक्तांच्या कामना परिपूर्ण करतो, अशा त्या अग्निदेवाप्रीत्यर्थ मी सर्वोत्कृष्ट असें स्तुतिस्तोत्र गात आहें (१०-१८८-२). त्या सर्वज्ञ अग्निदेवाच्या ज्या कालीकरालादि सप्त जिव्हा देवांना हवि नेऊन पोंचविणाऱ्या आहेत, त्या जिव्हांनीं तो देव हें आमचें हविरन्न देवांप्रत नेऊन पोंचवो. (१०-१८८-३).

## रत्न ५४५ वें

विविध रंगांच्या किरणांनीं युक्त असा हा यजमानगृहीं जाणारा सूर्य-नारायण उदयाचलावर प्राप्त झाला आहे. तो आतां पूर्वदिशेस पृथ्वीवर आला असून, यानंतर पिता जो स्वर्ग त्याकडे जावयास निघणार आहे (१०-१८९-१), या सूर्यदेवाचें तेज द्यावापृथ्वीमध्यें संचारत असतें. तें प्रातःकालीं उदय पावून सायंकाळीं अस्त पावतें. अशा प्रकारच्या तेजानें युक्त असा तो महान् सूर्यनारायण आकाशांत उदयास्ताच्या दरम्यान प्रकाशत असतो (१०-१८९-२). तीस घटिकांचा एक दिवस होत असून एतावत्कालपर्यंत सूर्य हा आपल्या तेजानें या पृथ्वीवर प्रकाशत असतो. त्या वेळीं वेदवाणी ही त्या सूर्यदेवाचें स्तुतिस्तोत्र गात असते. (१०-१८९-३).

## रत्न ५४६ वें

प्रदीप्त झालेल्या तपःसामर्थ्याच्या योगानें परमेश्वरापासून ऋत म्हणजे यथार्थ संकल्प व सत्य म्हणजे यथार्थ भाषण हीं उत्पन्न झालीं. नंतर त्याच परमेश्वरापासून दिवस व रात्र हीं जन्मलीं आणि मग उदकांनीं उचं-बळणारा असा समुद्रहि त्यापासूनच निर्माण झाला.(१०-१९०-१).तरंगांनीं उचंबळणारा समुद्र उत्पन्न झाल्यावर संवत्सरात्मक काल निर्माण झाला. त्यानंतर त्या परमेश्वरानें अहोरात्र यांनीं उपलक्षित असें सर्व भूतमात्र उत्पन्न करून, डोळ्यांची उघडझांक करणाऱ्या सर्व प्राणिमात्रांचा तोच पुढें स्वामी होऊन राहिला. (१०-१९०-२). पूर्व कल्पांत ठरलेल्या योजनेप्रमाणें तो सृष्टिकर्ता परमेश्वर सूर्यचंद्र, सुखकर असा द्युलोक, तशीच पृथ्वी व अंतरिक्ष यांना यथाक्रम निर्माण करता झाला (१०-१९०-३).

## रत्न ५४७ वें

**संवनन आंगिरस-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद.**

संसमिद्युवसे वृषन्नग्ने विश्वान्यर्य आ ।
इळस्पदे समिध्यसे स नो वसून्या भर ॥ १०-१९१-१ ॥

## रत्न ५४८ वें

**संवनन-ऋषि, संज्ञान देवता, अनुष्टुप्-छंद.**

सं गच्छध्वं सं वदध्वं सं वो मनांसि जानताम् ।
देवा भागं यथा पूर्वे संजानाना उपासते ॥ १०-१९१-२ ॥

## रत्न ५४९ वें

**संवनन-ऋषि, संज्ञान-देवता, त्रिष्टुप्-छंद.**

समानो मंत्रः समितिः समानी समानं मनः सह चित्तमेषाम् ।
समानं मन्त्रमभि मन्त्रये वः समानेन वो हविषा जुहोमि ॥
॥ १०-१९१-३ ॥

## रत्न ५५० वें

**संवनन आंगिरस-ऋषि, संज्ञान-देवता, अनुष्टुप्-छंद.**

समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥
॥ १०-१९१-४ ॥

## रत्न ५५१ वें

संज्ञानमुशनावदत् सज्ञानं वरुणोऽवदत् ।
संज्ञानमिन्द्रश्चाग्निश्च संज्ञानं सवितावदत् ॥
॥ १०-१९१ खिल ३६-१ ॥

## रत्न ५४७ वें

हे भक्तकाम कल्पद्रुम अग्निदेवा! हे ईश्वरा! सर्व प्राणीमात्रांना तूं वैश्वानर रूपानें व्यापून राहिला आहेस. आणि पृथ्वीच्या स्थानीं म्हणजे उत्तर वेदीच्या मध्यभागीं ऋत्विजांकडून तूंच प्रज्वलित केला जातोस. अशा प्रकारचा तूं आम्हांस देण्यासाठीं म्हणून सुंदर संपत्ति घेऊन ये! (१०-१९१-१).

## रत्न ५४८ वें

अहो देवभक्त हो! तुम्ही सर्वजण एकत्र जमा! आपापसांतील विरोध टाकून, सर्वजण एकाच प्रकारचें भाषण बोला! तुमचीं मनें एकच अर्थ आकलन करोत! ज्याप्रमाणें पुरातन देव हे एक विचाराचे होऊनच यज्ञांत अपापला हविर्भाग स्वीकारतात त्याच प्रमाणें तुम्हीहि भिन्नमत टाकून आपापला द्रव्यभाग स्वीकार करा! (१०-१९१-२).

## रत्न ५४९ वें

तुम्हां सर्वांचा मंत्र म्हणजे गुप्तविचार हा सगळा सारखाच असो! तुम्हा सर्वांची प्राप्तिहि सारखीच असो! तुमचें अंतःकरण झालें तरी सर्वांचें सारखेंच असो! आणि विचार करून ठरलेला निर्णयहि पण सारखाच असो! मीं तुम्हां सर्वांसाठीं म्हणून आतां एकच मंत्र म्हणजे एकच उपदेश सांगतों आणि तुम्हां सर्वांच्या पुरोडाशादि समान हवींनें मी अग्निदेवाला आहुति अर्पण करतों. (१०-१९१-३).

## रत्न ५५० वें

अहो देवोपासनेंत गुंतलेले पुरोहित-यजमानहो! तुमचा संकल्प हा एकविधच असूं दे! तुमचें हृदयहि समान-म्हणजे एकविधच असो! त्याचप्रमाणें तुमचें मनहि सर्वांचें सारखेंच-म्हणजे एकच विचाराचें असो! थोडक्यांत म्हणजे हें कीं ज्याप्रमाणें तुमचें साहित्य सुंदर आहे, त्याच प्रमाणें तें तुमचें मनहि सारखेंच असो! (१०-१९१-४).

## रत्न ५५१ वें

उशनानें आम्हांस ज्ञानोपदेश केला. वरुणानें आम्हांस ज्ञानोपदेश केला. त्याचप्रमाणें इंद्र, अग्नि व सविता या देवांनींहि आम्हांस ज्ञानोपदेश केला (१०-१९१-खिल-३६-१).

संज्ञानं वः स्वेभ्यः संज्ञानमरणेभ्यः ।
संज्ञानमश्विना युत्र मिहास्मासु नि यच्छताम् ॥

॥ १०-१९१ खिल ३६-२ ॥

यत् कक्षीवां संवननं पुत्रो अङ्गिरसां भवेत् ।
तेन नोऽद्य विश्वेदेवाः सं प्रियां समजीजनन् ॥

॥ १०-१९१ खिल ३६-३ ॥

सं वो मनांसि जानतां समाकूतिर्मनामसि ।
असौ यो विमना मनःसं समावर्तयामसि ॥

॥ १०-१९१ खिल ३६-४ ॥

तच्छंयोरा वृणीमहे गातुं यज्ञाय गातुं यज्ञपतये ।
दैवी स्वस्तिरस्तु नः स्वस्तिर्मानुषेभ्यः ।
ऊर्ध्वं जिगातु भेषजं शं नो अस्तु द्विपदे शं चतुष्पदे ॥

॥ १०-१९१ खिल ३६-५ ॥

— दहावें मंडल समाप्त —

ॐ शान्तिः ! शान्तिः ! शान्तिः !

ॐ तत्सत्

— समाप्तोऽयं ऋग्रत्नभाण्डारः —



हा जो ज्ञानोपदेश आहे तो तुमच्यासाठीं, आमच्या स्वकीयांसाठीं आणि त्याचप्रमाणें शत्रूसाठीं देखील आहे. तो ज्ञानोपदेश अश्विदेव आम्हांस येथें देवोत ! (१०-१९०-खिल-३६-२) ! ज्याअर्थी अंगिरसपुत्र कक्षीवान् यानें संवननाचें रक्षण केलें, त्याअर्थी विश्वेदेव आमचे प्रिय करोत ! ( १०-१९१-खिल-३६-३ ) तुम्ही आपले विचार चांगले समजून घ्या, आम्ही आमचे विचार चांगले समजून घेऊं आणि जो कोणी आमच्या विचाराचा नाहीं, त्याला आम्हीं आमच्या विचाराचा बनवूंच बनवूं. (१०-१९१-खिल-३६-४ )

बृहस्पतीचा पुत्र जो शंयु त्या शंयूजवळ आम्ही अशी प्रार्थना करतों कीं हा जो आमचा यज्ञ आहे, तो सरळ देवांप्रत जावो ! त्याचप्रमाणें हा यज्ञकर्ता यजमानहि देवांजवळ जावो ! देवांकडून होणारीं विघ्नें आमचीं उपशमन पावोत ! आणि मनुष्यांकडून होणारीं विघ्नेंहि निरसन होवोत ! तसेंच सर्व दुरितांचें निवारण करणारें असें हें आमचें औपधिसदृश कर्मानुष्ठान निर्विघ्न पार पडो ! आणि आमच्या मनुष्यांना व पशूंना सुखशांतीचा उदंड लाभ मिळो ! ! ( १०-१९१ खिल ३६-५ ).

— दहावें मंडल समाप्त —

ॐ शान्तिः ! शान्तिः ! शान्तिः !

ॐ तत्सत्

ऋग्रत्न भांडार समाप्त



ऋग्रत्न भांडारांतील

# मंत्रानुक्रमणिका

# खिलमंत्राणुक्रमाणिका

| मंत्र | पृष्ठ |
|---|---|

वाचनीय व मननीय

# ऋग्रत्न भांडारांतील अशी कांहीं बोधप्रद

# सूक्तावलि

| सूक्त | देवता |
|---|---|
| | **मंडल १ लें** |
| १-१ | अग्नि ( अग्निमीळे ) |
| १-२२ | अश्विनी ( प्रातर्युजा ) |
| १-४० | ब्रह्मणस्पति ( उत्तिष्ठब्रह्मणस्पते ) |
| १-४३ | रुद्र ( कद्रुद्राय ) |
| १-५० | सूर्य ( उदु त्यं ) |
| १-८९ | विश्वेदेव ( आ नो भद्रा ) |
| १-९२ | उषा ( एता उ त्या ) |
| १-११३ | उषा ( इदं श्रेष्ठं ) |
| १-११४ | रुद्र ( इमा रुद्राय ) |
| १-११५ | सूर्य ( चित्रं देवानामुद ) |
| १-११७ | अश्विनी ( मध्वः सोमस्या ) |
| १-१५० | अग्नि ( पुरु त्वा ) |
| १-१५४ | विष्णु ( विष्णोर्नु कं ) |
| १-१५५ | विष्णु ( प्रवः प्रान्त ) |
| १-१५६ | विष्णु ( भवा मित्रो ) |
| १-१७९ | रति ( पूर्वीरहं शरदः ) |
| १-१८९ | अग्नि ( अग्ने नय ) |
| १-१९१ | अप्तृण-सूर्य ( कंकतो न ) |
| | **मंडल २ रें** |
| २-१ | अग्नि ( त्वमग्ने द्युभि- ) |
| २-१२ | इंद्र ( योजात एव ) |
| २-१५ | इंद्र ( प्रघान्वस्य ) |
| २-१८ | इंद्र ( प्राता रथो नवो ) |
| २-३३ | रुद्र ( आ ते पित- ) |
| २-३८ | सविता ( उदु ष्य देवः ) |
| २-४२ | शकुंत ( कनिक्रदज्जनुषं ) |
| २-४३ | शकुंत ( प्रदक्षिणिदभि ) |
| | **मंडल ३ रें** |
| ३-११ | अग्नि ( अग्निर्होता पुरोहितो ) |
| | **मंडल ४ थें** |
| ४-४ | रक्षोहा अग्नि ( कृणुष्व पाजः ) |
| ४-२७ | इंद्र ( गर्भे नु सन्न ) |
| ४-५२ | उषा ( प्रति ष्या सूनरी ) |
| ४-५७ | क्षेत्रपति ( क्षेत्रस्य पतिना ) |
| ४-५८ | अग्नि ( समुद्रादूर्मि मधुमाँ ) |
| | **मंडल ५ वें** |
| ५-७७ | अश्विनी ( प्रातर्यावाणा ) |
| | **मंडल ६ वें** |
| ६-९ | वैश्वानर अग्नि ( अहश्च कृष्ण- ) |
| ६-२८ | गो ( आ गावो अग्मन् ) |

सूक्त देवता

१०-१४५ सपत्नीनाश (इमां खना-)

१०-१५१ श्रद्धा ( श्रद्धयाग्निः )

१०-१५१-खिल. मेधा ( मेधां मह्यंगिरसो)

१०-१५५ अलक्ष्मीनाशन ( अरायिकाणे )

१०-१५८ सूर्य (सूर्यो नो दिवस्पातु)

१०-१६१ राजयक्ष्मा नाशन (मुंचामि त्वा)

१०-१६२ गर्भरक्षक ( ब्रह्मणाग्निः)

१०-१६३ यक्ष्मानाशन (अक्षीभ्यां)

१०-१६४ दुःस्वप्ननाशन (अपेहि)

१०-१६६ सपत्ननाशन (ऋषभं मा)

१०-१६६ (खिल) शिवसंकल्प (येनेदं भूतं)

सूक्त देवता

१०-१६८ वायु (वातस्य नु)

१०-१७० सूर्य (विभ्राड्‍ बृहत्पिबतु)

१०-१७३ राजा (आ त्वाहार्षमन्त०)

१०-१७४ राजा (अभीवर्तेन)

१०-१७७ मायाभेद (पतंगमक्त)

१०-१८२ बृहस्पति (बृहस्पतिर्नयतु)

१०-१८३ विष्णु ( विष्णुर्योनिं )

१० १८६ वायु (वात आ वातु)

१०-१८९ सूर्य (आयं गौः पृश्निः)

१०-१९० भाववृत्त (ऋतं च सत्यं)

१०-१९१ संज्ञान (सं गच्छध्वं)

१०-१९१-खिल संज्ञान (संज्ञानमुकानावदत्.)

हीं वरील सूक्तें संपूर्ण असून तीं अत्यंत महत्त्वाचीं व बोधप्रद असल्या-मुळें अवश्य वाचनीय व मननीय आहेत.

# स्मार्त विनियोग, विषय व मंत्र सूची

